**॥ ॐ ॥**

॥ दिगंबरा दिगंबरा श्रीपाद श्रीवल्लभ दिगंबरा ॥

॥ दिगंबरा दिगंबरा श्रीपाद श्रीवल्लभ दिगंबरा ॥

॥ दिगंबरा दिगंबरा श्रीपाद श्रीवल्लभ दिगंबरा ॥

**॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥**

ॐ सर्वजगद्रक्षाय गुरु दत्तात्रेयाय श्रीपाद श्रीवल्लभ परमात्मने नम:

# श्रीपाद श्रीवल्लभ चरित्रामृत



 

# मूल ग्रंथ रचयिता

श्री शंकर भटऽ

**(श्री श्रीपाद श्रीवल्लभांचे समकालीन)**

**शंकरभट लिखित तेलुगु प्रत उपलब्ध करून दिली**

श्री मल्लादी गोविंद दीक्षितुलु, भीमावरम्.

**मराठी अनुवाद**

श्री हरिभाऊ जोशी निटूरकर (भाऊ महाराज), हैदराबाद

॥ दिगंबरा दिगंबरा श्रीपाद श्रीवल्लभ दिगंबरा ॥

॥ दिगंबरा दिगंबरा श्रीपाद श्रीवल्लभ दिगंबरा ॥

॥ दिगंबरा दिगंबरा श्रीपाद श्रीवल्लभ दिगंबरा ॥

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

# अध्याय -1

## श्री व्याघ्रेश्वर शर्माचा वृतांत

श्री महागणपती, श्री महासरस्वती, श्रीकृष्ण भगवान, सर्व चराचरवासी देवी-देवता आणि सकल गुरु परंपरेच्या चरणी नतमस्तक होऊन, मी त्या अनंत कोटी ब्रह्मांड नायक श्री दत्तप्रभुंच्या, कलियुगातील, श्रीपाद श्रीवल्लभ स्वामींच्या अवतार लीलांचे वर्णन करण्याचा संकल्प केला आहे.

अनसूया-अत्रिनंदन भगवान श्री दत्तात्रेय यांनी आंध्र प्रदेशातील पीठिकापुरम् या गावी श्रीपाद श्रीवल्लभ या नावाने अवतार घेतला. त्यांच्या दिव्य चरित्राचे वर्णन यथायोग्य करणे अनेक पंडितांना, विद्वानांना सुध्दा

जमले नाही. ते करण्याचे मी धाडस करीत आहे, ते केवळ आपणासारख्या थोर, विद्वान श्रोत्यांच्या आशिर्वादामुळेच.

मी शंकरभट्ट, देशस्थ कर्नाटकी स्मार्त ब्राह्मण. माझा जन्म भारद्वाज गोत्रात झाला. मी श्रीकृष्ण दर्शनासाठी "उडपी" तीर्थस्थानी गेलो असताना तेथील नयन मनोहारी, मोरमुकुटधारी कृष्णाने मला मंत्रमुग्ध केले. त्याने मला कन्याकुमारीस जाऊन कन्यका परमेश्वरीचे दर्शन घेण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणे मी कन्याकुमारीस जाऊन त्रिवेणी सागरात स्नान करून श्रीकन्यका देवीचे दर्शन घेतले. मंदिरातील पुजारी मोठ्या भक्तीभावाने देवीची पूजा करीत होता. मी आणलेले लाल फूल त्याने मोठ्या श्रध्देने देवीस अर्पण केले. देवी अंबा माझ्याकडे मोठ्या स्नेहपूर्ण नजरेने पहात असल्याचे जाणवले. ती म्हणत होती "शंकरा, तुझ्या अंतरंगातील भक्तीभावावर मी प्रसन्न झाले आहे. तू

 

कुरवपूर क्षेत्रास जा आणि श्रीपाद श्रीवल्लभ स्वामींच्या दर्शनाने आपल्या जीवनाचे सार्थक कर. त्यांच्या दर्शनाने मनाला, अंतर आत्म्याला जो आनंदाचा अनुभव येतो, तो अवर्णनीय असतो." अंबामातेचा आशिर्वाद घेऊन मी प्रवास आरंभ केला आणि थोडया अंतरावर असलेल्या "मरुत्वमलै" या गावी येऊन पोहोंचलो. लंकेतील राम-रावण संग्रामात लक्ष्मणास इंद्रजीताची शक्ति लागून तो अचेतन अवस्थेत असताना, श्री हनुमंताने संजीवनी बुटीसाठी द्रोणागिरी पर्वत उचलून आणला होता. लक्ष्मण संजीवनी बुटीने सजीव झाल्यावर हनुमंत तो पर्वत स्वस्थानी घेऊन जात असताना त्याचा एक मोठा तुकडा येथे पडला. त्याचेच नाव "मरुत्वमलै" असे पडले. हे स्थान अत्यंत रम्य आहे. येथे अनेक गुहा असून त्यात सिध्द पुरुष गुप्तरुपाने तपश्चर्या करीत असतात. मी साऱ्या गुहेचे दर्शन घेण्यास आरंभ केला. एका गुहेच्या आत गेलो तेव्हा आत एक वाघ शांत बसलेला दिसला. त्याला पहाताच माझ्या अंगात कापरे

भरले आणि घाबरुन मी एकदम "श्रीपाद ! श्रीवल्लभा !" असे जोराने ओरडलो. त्या निर्जन अरण्यात माझ्या आरोळीचा प्रतिध्वनी तितक्याच मोठ्या आवाजात ऐकू आला. त्या आवाजाने त्या गुहेतून एक वृद्ध तपस्वी बाहेर आले आणि म्हणाले "बाबारे, तू धन्य आहेस. या अरण्यात श्रीपाद श्रीवल्लभ या नावाचा प्रतिध्वनी आला. श्री दत्त प्रभूंनी कलीयुगात श्रीपाद श्रीवल्लभ या नांवाने अवतार घेतल्याचे योगी, ज्ञानी, परमहंस लोकांनाच माहीत आहे. तू भाग्यवान असल्याने या पुण्यस्थळी आलास. तुझ्या सर्व कामना पूर्ण होतील. तुला श्रीपाद श्रीवल्लभांच्या दर्शनाचा लाभ होईल. ह्या गुहेच्या दाराजवळ बसलेला वाघ एक ज्ञानी महात्मा आहे. त्याला नमस्कार कर." मी अत्यंत नम्रभावाने त्या वाघास नमस्कार केला. त्या वाघाने लगेच ॐ काराचा उच्चार केला. त्या आवाजाने सारा मरुत्वमलै

पर्वत दुमदुमला. नंतर त्या व्याघ्राने "श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये" असे सुस्वरात प्रभूंना आळविले. याच वेळी एक चमत्कार झाला. त्या वाघाच्या ठिकाणी एक दिव्य कांतीमान पुरुष प्रगट झाला. त्याने त्या वृद्ध तपस्व्यास साष्टांग प्रणिपात केला आणि क्षणार्धात आकाश मार्गाने निघून गेला. त्या वृद्ध तपस्व्याने मला त्यांच्या गुहेत मोठ्या आग्रहाने नेले. गुहेत गेल्यावर त्यांनी केवळ संकल्पाने अग्नि प्रज्वलित केला. त्यात आहुती देण्या साठी लागणारे पवित्र साहित्य, मधुर फळे यांची निर्मिती केली. वैदिक मंत्रोच्चारासह या पदार्थांची अग्नित आहुती दिली.

ते वृद्ध तपस्वी सांगू लगले, "या कली युगात यज्ञ, याग सत्कर्मे सारे लुप्त झाले आहेत. पंचभुतात्मक सृष्टीतून सर्व लाभ करुन घ्यायचा, परंतु त्या दैवतांचे मात्र विस्मरण करायचे असा

मानवाचा धर्म झाला आहे. देवांची प्रीति प्राप्त करण्यासाठी यज्ञ करावेत व त्यांना संतुष्ट करावे. त्यांच्या कृपाप्रसादानेच प्रकृती अनुकुल होते. प्रकृतीमधील कोणत्याही शक्तीचा प्रकोप मानव सहन करु शकत नाही. प्रकृतीमधील शक्तींची मानवाने यथायोग्य मार्गाने शांती करावी, नसता अनेक संकटे उद्भवतात. मानवाने धर्माचरण न केल्यास प्रकृति शक्ती त्याची शिक्षा यथाकाली देते. लोकहितासाठी मी हा यज्ञ केला आहे. या यज्ञाचे फल स्वरूप म्हणून तुला श्रीपाद श्रीवल्लभ स्वामींचे दर्शन होईल. जन्मजन्मांतरीचे पुण्य फळास आले म्हणजे असे लाभ घडतात." त्या वृद्ध तपस्व्याच्या मुखातून वहाणाऱ्या या पवित्र वाकगंगा प्रवाहाने मी अगदी भाराऊन गेलो आणि अत्यंत नम्रतेने त्यांना साष्टांग दंडवत घातले. मी त्या तपस्व्याच्या चरणी प्रार्थना

केली "हे ऋषिवर, मी पंडित नाही, योगी नाही, साधक नाही, मी एक अल्पज्ञ आहे. माझ्या मनातील संदेहाची निवृत्ती करुन आपण आपला वरदहस्त माझ्या मस्तकी ठेवावा ." त्या महापुरुषाने माझ्या शंकेचे समाधान करण्याचा मनोदय दर्शविला.

मी म्हटले "हे सिध्द मुनिवर्या, मी कन्यका देवीचे दर्शन घेताना देवीने सांगितले होते की कुरवपुरी जाऊन श्रीपाद श्रीवल्लभ स्वामींचे दर्शन घ्यावे. मी तेथे जाण्यासाठी निघालो असताना मार्गात आपले व व्याघ्ररूपी महात्म्याचे दर्शन झाले. ते कोण होते ? तसेच दत्तप्रभू म्हणजे कोण ? या विषयी कृपया विस्तारपूर्वक सांगावे " तेव्हा त्या वृद्ध तपस्व्याने सांगण्यास सुरवात केली.

या आंध्र प्रांतातील, गोदावरी मंडलातील अत्री मुनींची तपोभूमी अशा नांवाने प्रसिध्द असलेल्या आत्रेयपूर ग्रामात एक काश्यप गोत्रीय ब्राह्मण कुटुंब वास्तव्य करीत होते. त्यांना परमेश्वराच्या कृपा प्रसादाने एका पुत्राचा लाभ झाला. ब्राह्मण अत्यंत विद्वान, आचार संपन्न होता परंतु पुत्र मात्र मतिमंद होता. आई वडिलांनी त्याचे नांव व्याघ्रेश्वर असे ठेवले . व्याघ्रेश्वर मोठा होऊ लागला. परंतु त्याच्या बुध्दिची वाढ मात्र होत नव्हती. पित्याने त्याला शिकविण्याचे खूप प्रयत्न केले. परंतु त्यास संपूर्ण संध्यावंदन सुध्दा करता येत नसे. एवढया विद्वान ब्राह्मणाचा पुत्र असा अज्ञानी, अशी गावातील लोकांची सारखी टोचणी त्याला अत्यंत दु:खदायक वाटे. एका ब्रह्ममुहूर्तावर त्यास स्वप्न पडले, त्यात त्याला एका दिव्य बालकाचे दर्शन झाले. ते बालक आकाशातून खाली येत होते. त्याचे चरण कमल भूमीस

लागताच भूमी सुध्दा दिव्य कांतीमान झाली. तो बालक हळू हळू पावले टाकीत व्याघ्रेश्वराकडे आला आणि म्हणाला, मी असताना तुला भय कशाचे ? या ग्रामाचे व माझे ऋणानुबंध आहेत. तू हिमालयातील बदरिकारण्यात जा. तेथे तुझे सारे शुभ होईल. एवढे सांगून तो बालक अंतर्धान पावला. त्या दिव्य बालकाच्या संदेशानुसार व्याघ्रेश्वर शर्मा हिमालयातील बदरिकारण्यात जाण्यास निघाला. मार्गात त्यास अन्नपाण्याची काहीच अडचण पडली नाही. श्रीदत्त कृपेने त्याला वेळेवर अन्नपाणी मिळे. मार्गात एक कुत्रा भेटला व तो त्याच्या बरोबर बदरीवनापर्यंत सोबत होता. या प्रवासात त्यांनी उर्वशी कुंडात स्नान केले. याच वेळी एक महात्मा आपल्या शिष्य समुदायासह उर्वशी कुंडात स्नाना साठी आले. व्याघ्रेश्वराने त्या गुरुवर्यांना साष्टांग नमस्कार केला आणि माझे शिष्यत्व स्विकारावे अशी नम्र प्रार्थना केली.

त्या महान गुरुवर्याने शिष्य करुन घेण्याचे मान्य केले आणि आश्चर्य असे की तत्काळ बरोबर आलेले ते कुत्रे अंतर्धान पावले. त्यावेळी ते महात्मा म्हणाले "हे व्याघ्रेश्वरा तुझ्याबरोबर आलेला तो श्वान तुझ्या पुर्वजन्मातील केलेल्या पुण्याचे द्योतक होते. त्याने तुला आमच्या स्वाधीन करून ते अंतर्धान पावले. श्रीपाद श्रीवल्लभ स्वामींच्या कृपे मुळेच तू येथे आलास आणि या पुण्यप्रद कुंडात स्नान करु शकलास. ही नरनारायणाच्या वास्तव्याने पुनीत झालेली तपोभूमी आहे. यावर व्याघ्रेश्वर म्हणाला हे गुरुदेवा, श्रीपाद श्रीवल्लभ कोण आहेत ? त्यांनी माझ्यावर एवढी कृपा का केली ? गुरुदेव म्हणाले "ते साक्षात दत्त प्रभूच आहेत. त्रेतायुगात भारद्वाज महर्षींनी "सावित्र काठक चयन" नावाचा महायज्ञ श्री क्षेत्र पीठिकापुरम येथे संपन्न केला होता. त्या यज्ञ प्रसंगी शिव पार्वतींना

 

आमंत्रित केले होते. त्यावेळी शिवानी महर्षींना आशिर्वाद दिला की "तुमच्या कुलामध्ये अनेक महात्मा, सिध्दपुरुष, योगीपुरुष अवतार घेतील" अनेक जन्मांच्या पुण्य कर्माने दत्तभक्तीचा अंकुर फुटतो व तो पुढे सातत्याने वाढत गेल्यास श्रीपाद श्रीवल्लभ स्वामींचे दर्शन होते. त्यांच्या चरण स्पर्शाचे, संभाषणाचे भाग्य लाभते. हे व्याघ्रेश्वरा तुझ्यावर स्वामींची कृपा झाली आहे. मी आता माझ्या गुरुदेवांच्या दर्शनास जात आहे. पुन: एक वर्षाने येईन. तुम्ही तुमच्या गुहेत आत्मज्ञान प्राप्तीसाठी तपश्चर्या करावी." असे सांगून ते महान गुरुदेव द्रोणागिरी पर्वताकडे गेले. व्याघ्रेश्वर गुहेत ध्यान करु लागला परंतु त्याचे सारे ध्यान व्याघ्ररुपाकडेच असे. याचा असा परिणाम झाला की त्याला इच्छित असलेले वाघाचे रूपच प्राप्त झाले. एक वर्षाचा काळ लोटला.

गुरुदेव यात्रा करुन परत आले. त्यांनी सर्व गुहा बघितल्या.

प्रत्येक शिष्याच्या एका वर्षात झालेल्या प्रगतीचा ते आढावा घेत होते. एका गुहेच्या आत गेले, तेथे त्याना एक वाघ ध्यानस्थ बसलेला दिसला. त्यांना अत्यंत आश्चर्य वाटले. त्यांनी अंतर्ज्ञानाने ओळखले की तो वाघ दुसरा कोणी नसून व्याघ्रेश्वरच आहे. व्याघ्ररूपाचेच सतत ध्यान केल्याने त्याला व्याघ्ररूपच प्राप्त झाले, हे त्यांनी जाणले. त्यांनी त्याला आशिर्वाद देऊन ॐ काराचा मंत्र शिकविला व "श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये" हा मंत्र जपण्यास सांगितला. गुरूआज्ञेनुसार व्याघ्रेश्वर त्या रूपातच मंत्राचा जप करू लागला. वाघाच्या रूपातच त्याने कुरवपूरला प्रयाण केले. यथाकाली तो कुरवपूर ग्रामाजवळ येऊन पोहोचला. मध्ये कृष्णा नदी वहात

 

होती. तो अलिकडील तीरावर बसून "श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये" या मंत्राचा जप करू लागला. श्रीपाद श्रीवल्लभ कुरवपूर ग्रामात आपल्या शिष्यासह बसले होते. ते एकदम उठले आणि माझा परम भक्तच् मला हाक मारतो आहे असे म्हणून नदीच्या पैलतीरास येण्यास निघाले. ते पाण्यातून चालतांना त्यांच्या पदकमलांची चिन्हे पाण्यावर उमटत होती व ती फारच सुंदर दिसत होती. स्वामी पैलतीरावर पोहोचल्यावर, व्याघ्रेश्वराने त्यांच्या दिव्य चरणांवर आपले मस्तक ठेवून अत्यंत भक्तीभावाने नमस्कार केला. स्वामींनी अत्यंत आनंदाने त्या वाघाचे मस्तक कुरवाळले व त्यावर स्वार होऊन पाण्यातून ते कुरवपूरला पोहोचले. वाघावर बसून आलेले बघून सर्वांना आश्चर्य वाटले. ते वाघावरुन उतरताच त्या वाघाच्या शरीरातून एक दिव्य पुरुष बाहेर आला. त्याने आपल्या देहाचे व्याघ्राजिन (वाघाचे कातडे) स्वामींनी

आसन म्हणून स्वीकार करावा अशी विनंती केली. तो श्रींच्या चरणी अत्यंत भक्तीभावाने नतमस्तक झाला. त्याचे अष्टभाव जागृत होऊन प्रेमभावाने त्याने स्वामींच्या चरणांवर आपल्या नेत्रातील अश्रूंनी अभिषेक केला. मोठ्या प्रेमभराने स्वामींनी त्याला उठवले आणि म्हणाले, "हे व्याघ्रेश्वरा ! तू एका जन्मात अत्यंत बलशाली असा मल्ल होतास. तेव्हा तू वाघांशी युध्द करून त्यांना अतिक्रूरतेने वागवीत होतास. त्यांना वेळेवर अन्न पाणी सुध्दा देत नव्हतास. त्यांना साखळीने बांधून लोकांच्या प्रदर्शनासाठी ठेवीत होतास. या दुष्कर्मामुळे तुला अनेक नीच जीव जंतुंच्या योनीत जन्म घ्यावा लागला असता परंतु माझ्या अनुग्रहाने ते सारे दुष्कर्म हरण झाले आहेत. तू दीर्घकाळ व्याघ्ररूपात राहिल्यामुळे तुला इच्छेनुसार वाघाचे रूप धारण करता येईल व सोडताही येईल. हिमालयात कित्येक वर्षापासून

माझी तपश्चर्या करणाऱ्या महान सिध्दांचे तुला दर्शन होईल आणि आशिर्वादही मिळतील. योग मार्गात तू अत्यंत प्रज्ञावंत होशील." असा स्वामींनी आशिर्वाद दिला.

स्वामी पुढे म्हणाले "तू हिमालयात एक वाघ अत्यंत शांत असलेला पाहिला होतास ना ! तो एक महात्मा आहे. तपश्चर्या करणाऱ्या संत पुरुषांना सामान्य लोक व इतर वन्य प्राण्यांपासून त्रास होऊ नये म्हणून त्याने ते व्याघ्ररूप धारण केले होते व तो त्यांचे संरक्षण करीत होता. गुहेतील तपश्चर्या करणाऱ्या संतांचे परस्पर वर्तमान कळविण्याचे काम सुध्दा तो वाघ मोठ्या आनंदाने करीत असे, ही सगळी दत्त प्रभूंची लीलाच."

॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जयकार ॥

 

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

# अध्याय -2

## सिध्द योग्याचे दर्शन-विचित्रपुरीचा वृत्तान्त

मी मरुत्वमलै या पुण्यस्थळी घडलेल्या रोमहर्षक अनुभवाचे मनन करीत, श्रीपाद श्रीवल्लभ स्वामींचे स्मरण करीत पुढील प्रवासास प्रारंभ केला. मार्गात अनेक पुण्यात्म्यांचे, थोर संतांचे दर्शन घेत मी मार्गक्रमण करीत होतो. या प्रवासात आश्चर्याची गोष्ट अशी की, कांही न मागता भोजन मिळत असे. पांडय देशातील कदंब वनात जाईपर्यंत माझ्या शरीराचे वजन क्रमा क्रमाने कमी होत होते. या प्रांतात अतिजागृत असे शिवलिंग होते. त्याचे मी दर्शन घेतले व विश्रांतीसाठी

शिवालयात थोडा वेळ थांबलो. नंतर प्रवास करण्यास सुरुवात केली. मार्गात मला सिध्द योगींद्र नावाच्या एका महान तपस्व्यांचा आश्रम लागला. मी आश्रमात जाऊन त्या महापुरुषांचे चरणी नतमस्तक झालो. त्यांनी मोठया वात्सल्यपूर्ण भावाने माझ्या डोक्यावर हात ठेवला आणि "श्रीपाद श्रीवल्लभ दर्शन प्राप्तिरस्तु" असा तोंडभरून आशिर्वाद दिला. त्यांच्या चरणस्पर्शाने माझे शरीर कापसाप्रमाणे हलके वाटू लागले होते. ते महायोगी मला म्हणाले "तू दर्शन घेतलेले ते शिवलिंग अत्यंत जागृत आहे"त्याची कथा सुध्दा मोठी रंजक आहे. देवेंद्राने आपल्या सामर्थ्याने अनेक राक्षसांना मारून टाकले. परंतु त्यांच्यातील एक राक्षस पळून गेला व त्याने महादेवाची तपस्या करण्यास सुरूवात केली. तो ध्यानस्थ असतांना इंद्राने त्या राक्षसास निर्दयतेने ठार केले. त्याच्या हत्येमुळे इंद्राचे सारे तेज लोप पावले व तो निस्तेज दिसू

लागला. या पापाचे क्षालन करण्यासाठी त्याने अनेक तीर्थांचे दर्शन घेतले. पांडय देशातील कदंब वनात तो आला आणि काय आश्चर्य तेथील शिवलिंगाच्या प्रभावामुळे तो पूर्वीसारखा कांतीमान, तेजस्वी दिसू लागला. त्याला अत्यंत आनंद झाला व त्या क्षेत्राचे महात्म्य जाणून घेण्याची उत्कंठा लागली. इंद्राने ते वन मोठ्या उत्सुकतेने पाहिले. तेव्हा त्या दिव्य शिवलिंगाचे दर्शन झाले. मोठ्या भक्ति भक्ति भक्तीभावाने त्याने त्याचे पूजन-अर्चन केले. नंतर त्या स्वयंभू लिंगावर हे सुंदरसे देवालय बांधले. हे इंद्राने प्रतिष्ठापना केलेले शिवलिंग समस्त पापांचे हरण करणारे असून, अत्यंत मंगल दायक आहे. पुण्यवंतांनाच, श्री दत्त प्रभूंच्या भक्तांनाच विनासायास याचे दर्शन घडते. मी त्या महायोग्याचे हे वक्तव्य ऐकून अत्यंत रोमांचित झालो होतो. मोठ्या श्रध्दाभावाने त्यांचे चरणकमली मी

नमस्कार केला. तेव्हा त्यांनी त्या शिवलिंगाचे पुन्हा एकदा दर्शन घेण्यास सांगितले. मी त्यांच्या आदेशानुसार पुन्हा त्या वनात गेलो तेथे मला अतिशय सुंदर असे शिवालय दिसले पण मी पाहिलेले शिवमंदिर हे नव्हतेच. मला हे मंदिर श्रीमीनाक्षी सुंदरेश्वराच्या मंदिरासारखे अप्रतिम वाटले. मी मोठ्या श्रध्देने शिवलिंगाचे दर्शन घेतले व श्री सिध्दयोगींद्राकडे येण्यास निघालो. तेथील परिसर जनसमुदायाने भरलेल्या एका शहरासारखा वाटला. श्रीयोगींद्राचा आश्रम मात्र सापडला नाही. मी श्रीपाद श्रीवल्लभ स्वामींचे मनांत चिंतन करून पुढे प्रवास करण्यास प्रारंभ केला तेव्हा सूर्यास्त होऊन अंधकार चोहिकडे पसरला होता. मी मार्गक्रमण करीतच होतो. माझ्या मागून प्रकाशाचा झोत आल्यासारखे वाटल्याने मी मागे वळून पाहिले. माझ्या मागे तीन शिरे असलेला एक सर्प येत होता. त्याच्या मस्तकावर

तीन दिव्य मणी होते. त्यांचाच प्रकाश मला मार्ग दाखवीत होता. मी अत्यंत भयभीत झालो होतो. माझ्या हृदयाचे स्पंदन वाढत होते. मी श्रीपाद श्रीवल्लभाच्या दिव्य नामाचा उच्चार करीत पुढे चाललो होतो. त्या सर्पाचा उजेड मार्ग प्रदर्शन करीत होता. शेवटी मी कसाबसा श्रीसिध्दयोगींद्राच्या आश्रमात पोहोचलो. तेव्हा तो दिव्य सर्प व त्याचा प्रकाश तत्काल अदृष्य झाला. श्रीसिध्दयोगींद्रानी माझे मोठ्या प्रेमाने स्वागत केले व केळीच्या पानात भाजलेले गरम गरम चणे प्रसाद म्हणून दिले. मी ते पोटभर खाल्ले परंतु माझ्या हृदयातील धडधड कमी झाली नव्हती. तेव्हा त्या दयामूर्ती योगिश्वरानी मोठ्या प्रेमभावाने माझ्या धडधडत्या छातीवर हात फिरविला, नंतर तो दिव्य हस्त माझ्या मस्तकावरून फिरविला व माझ्या डोळयांनाहीं प्रेमस्पर्श केला. त्या करुणामय स्पर्शाने माझ्या हृदयातील सारी

धडधड पार पळून गेली. तसेच मनातील वाईट विचार, दुष्ट संकल्प बाहेर निघून जात असल्याचे जाणवले. हृदय एका अनामिक आनंदाने भरून गेले.

## श्री दत्तमहिमा, श्रीपाद श्रीवल्लभ स्वामींचा अनुग्रह संपादन करण्यास योग्यता

यावेळी सिध्दयोगी म्हणाले "तू अगोदर दर्शन घेतलेले शिवलिंग आणि त्या नंतर दर्शन घेतलेले श्रीसुंदरेश्वराचे मंदिर, ही दोन वेगवेगळी देवालये नाहीत. तुला अशा प्रकारचा अनुभव घडवून आणावा अशी श्रीदत्तात्रेयांची अनुज्ञा होती. म्हणून तुला अशी वेगवेगळी मंदिरे दाखविली. श्रीदत्ताच्या कृपाप्रसादाने काळास मागे नेऊन देवेंद्राने प्रतिस्थापना केलेली मूर्ति, त्या वेळचा परिसर तुला दाखविला. तू पाहिलेली सारी सृष्टी (सृष्टी असे

समजणे हा एक मायेचा खेळच आहे. सर्व कांही चैतन्यस्वरूप आहे.) श्रीदत्तप्रभूंच्या केवळ संकल्पाने भविष्य, वर्तमानामध्ये बदलु शकते, वर्तमान काळ भूतकाळात व भूतकाळ वर्तमानात परावर्तित होऊ शकतो. भूतकाळातील घडलेल्या साऱ्या घटना, वर्तमान काळात घडत असलेल्या व भविष्यकाळी घडणाऱ्या साऱ्या घटना श्रीदत्तप्रभूंच्या संकल्पानुसार घडतात. एखादी गोष्ट घडणे न घडणे अथवा वेगळयाप्रकारे घडण्यास श्रीदत्तप्रभूंचा संकल्पच कारणीभूत असतो. ज्या संकल्पाने सृष्टीची उत्पति, स्थिती व लय होतो, त्या महासंकल्पाचे प्रणेते प्रत्यक्ष श्रीदत्तप्रभूच आहेत. तेच सगुण रूपात पीठिकापुरम या क्षेत्री श्रीपाद श्रीवल्लभ या नावाने अवतरले आहेत. तेथील लोकांनी त्यांचे सत्यस्वरूप जाणले नाही, परंतु कुरवपूर येथील मासे पकडणाऱ्या कोळी लोकांनी त्यांच्यावर नितांत श्रध्दा

ठेवली व अल्पज्ञ असूनही ते स्वामींच्या कृपा प्रसादाने भवसागर आनंदाने पार करून गेले. श्रीपाद श्रीवल्लभांची कृपा संपादन करण्यासाठी आपल्यातील अहंकार पूर्णपणे नाहिसा झाला पाहिजे. ज्या वेळेस आपले हृदय काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, या षड्रिपुतून मुक्त होऊन शुध्द होईल त्यावेळी स्वामींची कृपा होण्यास मुळीच विलंब लागणार नाही.''

देवेंद्रांने प्रतिष्ठापित केलेले ते शिवलिंग धनंजय नावाच्या एका व्यापाऱ्याने पाहिले. त्याने त्या शिवलिंगाचा महिमा आपल्या देशाचा राजा कुलशेखर पांडयास सांगितला. ही शिवाज्ञाच मानून त्याने त्या मंदिराचा जीर्णोध्दार केला व तेथे एका नगराची स्थापना करून त्याला "मधुरानगर" असे नांव दिले. कुलशेखर याचा पुत्र मलयध्वज आपल्या पित्याप्रमाणेच

ईश्वरभक्तच् होता. त्याने संतानप्राप्तीसाठी "पुत्रकामेष्टी" यज्ञ केला होता. त्या यज्ञकुंडातून एक तीन वर्षाची अतिशय लावण्यवती कन्या अवतरीत झाली. तिला पाहून राजा व यज्ञ करणारे सारे विप्र, ऋषिगन अत्यंत आनंदित झाले. ही कन्या म्हणजेच मीनाक्षीदेवी. तिचा विवाह पुढे सुंदरेश्वराबरोबर झाला. या विवाहात प्रत्यक्ष भगवान विष्णुंनी कन्यादान केले होते. लग्न सोहळा अत्यंत थाटामाटाने साजरा झाला होता. शिवाच्या जटेमधून निघालेली वेगवती नदी, मधुरानगरीतून वहात होती व तिच्या परिसरातील प्रदेश अत्यंत सुपिक होऊन निसर्ग रम्य झाला होता. श्रीसिध्दयोगींद्र पुढे म्हणाले अरे बाबा ! सृष्टीमधील प्रत्येक वस्तुमधे स्पंदन होत असते. भिन्न भिन्न प्रकारच्या स्पंदनामुळे व्यक्ति - व्यक्ति मध्ये आकर्षण तर काही मध्ये विकर्षण होते. पुण्य कर्म, उत्तम आचार आणि विचारांनी स्थूल, सुक्ष्म

आणि कारण देहात पुण्यरूपी प्रकंपन होते. पाप कर्माने पापरूपी प्रकंपन होते. मनुष्याच्या पुण्याईने पुण्यशील व्यक्तीचा संग अर्थात सत्संगाची प्राप्ति होते, पुण्यस्थलांचे दर्शन घडते, पुण्य कर्मात आसक्ती वाढून पुण्याची वृध्दी होत जाते व पापांचा नाश होतो. या सर्वांचे फलस्वरूप म्हणून श्रीदत्तप्रभूवर भक्ति जडते. अरे बाबा शंकर भट्टा, तुझ्यावर श्री श्रीपाद वल्लभांची अपार कृपा असल्यामुळेच तू येथे येऊ शकलास.

माझ्या सद्भाग्याचे मलाच आश्चर्य वाटत होते. श्री श्रीपाद श्रीवल्लभांच्या दर्शनाची तळमळ दर क्षणी वाढत होती. केव्हा एकदा कुरवपुरी जाऊन श्रींच्या चरणी नतमस्तक होईन असे झाले होते. अशा स्थितीतच मला निद्रा लागली होती. दुसऱ्या दिवशी सकाळी उठलो तर आश्चर्याचा धक्काच बसला. मी एका उंचश्या टेकडीवरील

पिंपळाच्या झाडाखाली होतो. जवळपास कोणी माणसे नव्हती. मी रात्री ज्या श्रीसिध्दयोगींद्रांच्या आश्रमात राहिलो होतो, तो आश्रम दिसत नव्हता. मला वाटले रात्रभर ज्या आश्रमात राहिलो, श्री सिध्दयोगीच्या वचनामृताचा आस्वाद घेतला, तो एक भ्रम होता काय ? असे नाना विकल्प मनांत येऊ लागले तेव्हा मी आपले सामान आवरून घेऊन पुन्हा प्रवास सुरू केला. सकाळी निघालेला दुपार झाली तरी चालतच होतो. थोडयाच वेळात एक लहानसे गाव दिसले. मला अत्यंत भूक लागली होती. मी ब्राह्मणांच्याशिवाय इतर कोणाचे घरी अन्न ग्रहण करीत नसे. त्या गावात एकही ब्राह्मण नव्हता. ते एक गिरीजन लोकांचे गाव होते. त्यांचा मुख्य माझ्याजवळ आला व म्हणाला आमच्या गावात कोणीही ब्राह्मण नाही. आम्ही तुला फळे व मध देतो. त्याप्रमाणे त्या वृध्द गृहस्थाने मला फळे व मध आणून दिले. मी

ते खाणार एवढयात एक कावळा उडत आला आणि माझ्या डोक्यावर येऊन बसला व चोंचीने डोक्यास इजा करू लागला. मी त्याला हाकलण्याचे खूप प्रयत्न केले परंतु व्यर्थ गेले. तेवढयात बाजूस असलेल्या झाडावरून एकदम चारपाच कावळे आले ते माझ्या हातावर, खांद्यावर बसून चोंचीने हातापायांना जखमा करू लागले. मी तेथून फळे, मध टाकून पळालो. तो वृद्ध गृहस्थ म्हणत होता, मी कोणा सिध्द पुरुषाची निंदा केली असेल त्यामुळेच हा कावळयांचा त्रास भोगावा लागला. मला आठवले , मी त्या सिध्दयोगींद्रा बद्दल मनांत शंका घेतली होती, त्याच अपराधाची ही शिक्षा होती. माझे शरीर रक्तबंबाळ झाले होते. मी पळत होतो, कावळे पाठलाग करीतच होते. मी श्रीपाद श्रीवल्लभांची मनोमन प्रार्थना केली व

या संकटातून सुटका करण्याची विनंती केली. तेव्हा मला समोर एक औदुंबराचे झाड दिसले. मी त्या झाडाखाली विश्रांतीसाठी बसलो, त्यावेळी मला जाणवले की माझ्या शरीरातून एक प्रकारचा दुर्गंध येत आहे. त्या वासामुळे जवळपास असलेल्या वारुळातून सर्प बाहेर आले आणि दंश करण्यास सुरूवात केली. त्यांच्या त्या विषाने मी मृतप्रायच झालो. तोंडातून फेस येत होता. हृदयाचे ठोके मंद गतीने चालले होते. केव्हा मृत्यू येईल ते सांगता येत नव्हते. सायंकाळ झाली होती. धोबी कपडे धुऊन, वाळवून, कपडयाचे गाठोडे गाढवावर ठेऊन ते घरी जात होते. माझी स्थिती पाहून त्यांना दया आली. त्यांनी मला एका गाढवावर बसविले व त्यांच्या गावातील चर्म वैद्याकडे

घेऊन गेले. त्या वैद्याने वनातील काही मुळयाचा रस काढून मला पिण्यास दिला. सर्पदंश झालेल्या जागेवर थोडी पाने बांधली. पिंपळाच्या कोवळया पानांचा रस काढून तो जखमेवर लावला. माझ्या दोन्ही कानात पिंपळाच्या पानाचे देठ ठेवले होते. विष जसे जसे पिंपळाच्या पानात उतरु लागले, तशा तशा वेदना असह्य होऊन मी ओरडू लागलो. विष पूर्ण उतरून गेल्यावर मला बरे वाटले. ती रात्र मी वैद्याच्या घरीच काढली. तो वैद्य श्रीदत्तप्रभूंचा भक्तच् होता. तो रात्रीच्या वेळी आपल्या कुटुंबियांसह मधुर आवाजात दत्त प्रभुंचे भजन गात होता. मी पलंगावर निजलो होतो. त्यांच्या त्या रसभरीत कीर्तन-गायनाने माझे हृदय श्रीदत्तप्रभूंच्या अनुकंपेने भरून आले होते.

त्या वैद्याने केलेल्या उपचारांनी मी पूर्ण बरा झालो होतो. त्याचे हे उपकार कसे फेडावे हे मला समजत नव्हते. भजन संपवून तो वैद्य माझ्याकडे आला. त्याचे नेत्र करुणारसाची जणू वर्षाच करीत होते. तो म्हणाला, "माझे नांव वल्लभदास आहे. मी चर्मकारांचा वैद्य आहे. मी नीच जातीचा असलो तरी मी जाणतो की तुम्ही श्रीपाद श्रीवल्लभांच्या दर्शनासाठी निघाला आहात. तुम्हाला कावळयाकडून त्रास झाला व सर्पदंश का झाला ते सुध्दा मला माहित आहे. आपले नांव शंकर भट्ट आहे ते मी जाणतो."

त्याच्या या अचूक वक्तव्याने मी अवाकच झालो. मला वाटले त्या वैद्यास ज्योतिष शास्त्राचे ज्ञान असावे. हा विचार मनात येताच

वल्लभदास म्हणाला, "मी ज्योतिषी नाही. श्रीपीठिकापुरम म्हणजे पंडितांचे माहेर घर. "सांगवेदार्थ सम्राट" अशी पदवी मिळविलेले श्री मल्लादी बापन्ना अवधानलु यांनी सुध्दा या पुण्यभूमीत निवास केला होता. परंतु हे प्रगाढ वेदज्ञान असलेले पंडित अहंकारामुळे श्रीपाद श्रीवल्लभाचे खरे स्वरूप जाणू शकले नाहीत. शुष्क वेदांत, अर्थहीन तर्क-वितर्क करणारे पंडित, श्रीपाद श्रीवल्लभाच्या कृपेस पात्र होऊ शकले नाहीत. तुला टोचून जखमा केलेले कावळे हे पूर्व जन्मीचे पीठिकापुरम येथील महा अहंकारी पंडितच होते. त्यांनी आपले जीवन श्री श्रीपाद श्रीवल्लभांचे महात्म्य न जाणता आपल्या ज्ञानाच्या अहंकारातच व्यर्थ घालविले. ते मृत्यूनंतर स्वर्ग लोकास गेले. तेथे इंद्राने त्यांचा

वेदपंडित घनपाठी म्हणून सत्कार केला. परंतु जेव्हा त्यांना भूक लागली व जीव भुकेने व्याकूळ झाला, तेव्हा त्यांना खाण्यासाठी कोणी काहीच दिले नाही. इंद्र म्हणाला, तुम्ही पृथ्वीवर असताना दान धर्म केला असता तर एका दाण्यासाठी हजार दाणे आमच्या कडून मिळाले असते. परंतु तुम्ही कोणाला काही दान दिले नाही. तेव्हा तुम्हाला आम्ही काहीच देऊ शकत नाही. तुम्ही या लोकात स्वेच्छेने कितीही काळ राहु शकता." परंतु अन्न पाण्यावाचून इतर स्वर्गसुखे खरोखर शिक्षे सारखी होती. इंद्र पुढे म्हणाला "हे पंडितांनो तुम्ही पादगये सारख्या पवित्र स्थळी राहून सुध्दा श्रध्दा, भक्ति निष्ठेने आपल्या पितरांना पिंडदान केले नाहीत. आई वडिलांचा योग्य तो सन्मान न करता त्यांच्या

औषध पाण्यासाठी एवढा खर्च झाला असे कृतघ्नतेचे उद्‌गार तुम्ही वारंवार काढले.श्रीपाद श्रीवल्लभांना श्रीदत्तप्रभुचे अवतार न मानण्या एवढे तुम्ही अंध झालात. श्रीपाद श्रीवल्लभांच्या नामस्मरणाने पवित्र झालेल्या भक्ताचे रक्त प्राशन केल्यावरच तुम्हास उत्तम गती लाभेल."

वल्लभदास सारी कहाणी सांगत होता. तो म्हणाला "शंकरभट्टा ! हे कावळे, ते सर्प पूर्व जन्मीचे अहंकारी पंडित होते. त्यांनी तुझे रक्त चाखले व उत्तम गतीस प्राप्त झाले. वल्लभदास पुढे म्हणाला" ब्राह्मण सत्यनिष्ठ असावा, क्षत्रिय धर्मबध्द असावा. वैश्यांनी व्यवसाय, व्यापार, गाईचे रक्षण, क्रय विक्रय आदि व्यवहार करावे. शूद्रानी प्रेमस्वरूप राहून

सेवा करावी. भगवंताच्या भक्तीसाठी मात्र वर्ण, जात, कुळ, श्रीमंत, गरीब, स्त्री, पुरुष असा भेदभाव इथे नसतो. भगवंत भक्ताचा केवळ प्रेमभाव, श्रध्दा, दृढ विश्वास पाहतो. मानव कोणत्याही वर्णात जन्मला तरी त्याने स्वधर्मानुसार कर्म करावे.

वल्लभदास पुढे म्हणाला, तू लहान असतांना विष्णूमूर्तीचे ध्यान श्लोकाचे पठण करीत होतास, त्यावेळी तू विनोदाने एका श्लोकाचा चूक अर्थ आपल्या मित्रांना सांगत होतास, तो श्लोक असा होता "शुक्लांबरधरं विष्णुं शशिवर्णं चतुर्भुजम्॥ प्रसन्न वदनं ध्यायेत् सर्व विघ्नोऽपशांतये.॥"

 

याचा विनोदार्थ केलेला अर्थ श्रीदत्तप्रभूंना आवडला नाही. त्याची शिक्षा म्हणून तुला धोबी लोकांनी गाढवावर बसवून आणले. शेवटी चर्मकारांच्या गावात पोहोचविले . तुझी अशी दुर्गती करण्यामागे श्रीपाद श्रीवल्लभांचा विनोदाबरोबर तुला कांही पाठ शिकवून तुझ्यातील अहंकार दूर करण्याचा मानस होता. त्या दयाघन श्रीगुरु श्रीपाद श्रीवल्लभांची प्रत्येक क्षणी आपल्यावर दृष्टी असते, ही गोष्ट ध्यानात असू दे.

श्री वल्लभदासांच्या हितोपदेशाने मी कृतकृत्य झालो. माझ्यातील ब्राह्मण असल्याचा अहंकार नाहिसा झाला. मी वल्लभदासांचा पाहुणचार

 

स्वीकारला. दोन तीन दिवस राहून पुढे चिदंबरला जाण्यास निघालो. चिदंबरला पोहोचण्याच्या अगोदर विचित्रपूर नावाचे गांव लागले. त्या गावाच्या नावाप्रमाणे राजाही विचित्र वर्तन करणारा होता. त्या राजास एक मुलगा होता. परंतु तो मुका असल्याने राजा नेहमी उदास असे. त्याला वाटे की ब्राह्मणांनी लोपभूइष्ट (यज्ञ कर्मलोप) असा यज्ञ केल्याने त्याचा मुलगा मुका झाला. तो ब्राह्मणांचा अपमान करून त्यांना गाढवावर बसवून त्यांची मिरवणूक काढीत असे. ब्राह्मणांना दान म्हणून राजगिऱ्याची भाजी देत असे. त्या राज्यात ब्राह्मण आपला अहंकार विसरून अगदी दयनीय स्थितीस प्राप्त झाले होते. एका विद्वान ब्राह्मणास राजाने मूक भाषेवर ग्रंथ लिहिण्याची

 

आज्ञा केली होती. त्या राजाज्ञेनुसार ते राजगुरु ब्राह्मण मूक भाषेवर संशोधन करु लागले होते.

## शंकर भट्ट आणि राजे महाराजांचा संवाद

राजाच्या सैनिकांनी मला आपण ब्राह्मण आहात का असा प्रश्न विचारला. मी होकारार्थी मान हालविताच "आपणास आमच्या महाराजांचे आग्रहाचे आमंत्रण आहे" असे म्हणून राजवाडयात येण्याची विनंती केली. मी त्यांच्याबरोबर राजा समोर उभा राहिलो. मला भीतीने घाम सुटला होता. मी तेव्हा मनोमन श्री श्रीपाद वल्लभांची प्रार्थना केली व नामस्मरण करू लागलो. राजाने मला पहिला प्रश्न विचारला," तेवढयास एवढे तर एवढयाला

किती होईल ? मी गंभीरपणे उत्तर दिले "एवढयाला एवढेच" माझ्या उत्तराने राजाला आश्चर्य वाटले व तो म्हणाला "महात्मन् आपण मोठे पंडित आहात. आपल्या दर्शनाने मी धन्य झालो." राजाने आपल्या पूर्वजन्मातील आठवणी सांगण्यास सुरूवात केली. तो त्या जन्मी एक ब्राह्मण होता. त्याच्या घरी राजगीरा पिकत असे. ती भाजी तो सर्वांना मुक्तहस्ताने देत असे. त्याच्या सहाध्यायी ब्राह्मणा कडून यजमानांच्या घरी पूजा, अर्चा, अभिषेक आदि करवून घेत. यजमानांनी दिलेली दक्षिणा मात्र स्वत: घेऊन अगदी अल्पशी त्या गरीब ब्राह्मणास देत असत. त्यांच्या घरची राजगिऱ्याची भाजी सुध्दा फुकटच घेत. कालचक्र फिरत गेले. दुसऱ्या जन्मी तो गरीब ब्राह्मण,

 

राजा म्हणून जन्मला आणि त्याला त्रास देणारे, लुबाडणारे ब्राह्मण दुसऱ्या जन्मी सुध्दा त्याच राज्यात ब्राह्मण म्हणून जन्मले. तो राजा पूर्वीच्या जन्मी दिलेल्या राजगिऱ्याच्या भाजीच्या दानाच्या कैकपट या जन्मात दान देत होता. त्याला अचाट दानाचे फळ काय मिळेल याचे उत्तर हवे होते. मी राजाला म्हणालो "महाराज राजगिऱ्याची भाजी कितीहि दान केली तरी तिच्या शंभर पटीने तीच भाजी आपणास मिळेल. सध्याच्या परिस्थितीत रत्न, मणि, सोने आदि दान करणे तुझ्या हिताचे आहे." माझ्या उत्तराने राजास आनंद झाला. आता दुसरा प्रश्न मूक भाषेचा होता.

राजगुरुंनी माझी परिक्षा घेण्यासाठी आपली दोन बोटे दाखवून एक का दोन असे खुणेनेच विचारले. त्यांनी मला एकटाच आलास का सोबत कोणी आहे, असा प्रश्न वाटून मी एकटाच आलो असे दर्शाविण्यास एकच बोट दाखवून खुणेनेच उत्तर दिले. त्यानंतर त्यांनी तीन बोटे दाखविली. तीन संख्या पहाताच मला दत्तात्रेयांची त्रैमूर्ति आठवली. तुम्ही दत्तभक्त आहात का, असा प्रश्न वाटला. मी भक्ति ही गुप्त असावी असे जाणून हाताची मूठ बंद करून दाखविली व भक्ति हा विषय अंतरंगाचा आहे असे सांगितले. नंतर राजगुरुंनी गोड पदार्थाचा, मिठाईचा भंडारच मला देत असल्याची खूण म्हणून तसे हातवारे केले, परंतु मी हाताने ते नाकारले व माझ्या जवळ असलेले

 

पोहे पुरचुंडीतून काढून त्यांना दिले. मला गोड पदार्थापेक्षा पोहेच जास्त आवडतात, तुम्ही सुध्दा यांची चव पाहू शकता, असा माझा भाव होता. माझ्या उत्तरांनी राजगुरु अतिप्रसन्न झाले आणि राजास म्हणाले "राजा हा फार मोठा पंडित आहे. हा मुक्यांच्या भाषेत सुध्दा मोठा पंडित आहे."

दोन परिक्षांमध्ये तर मी सफल झालो होतो. आता तिसरी परिक्षा डोळयासमोर भेडसावित होती. राजगुरुंनी सांगितले "चमक" मधील श्लोक वाचून त्याचा अर्थ सांगावा. मी श्रीपाद श्रीवल्लभांचे मनोमन स्मरण करीत एक एक श्लोक वाचला व त्याचा अर्थ सभेस समजावून सांगितला. मी सांगितलेला अर्थ असा होता

"एकाचमे" म्हणजे एक. "तिस्रश्चमे" म्हणजे एकाला तीन जोडले असता चार होतात व त्यांचे वर्गमूळ दोन येते. "पंचचमे" म्हणजे चारात पाच मिसळल्यास नऊ होतात त्याचे वर्गमूळ तीन येते. "सप्तचमे" वर आलेल्या नऊ मध्ये सात मिसळल्यास सोळा येतात व त्याचा वर्गमूळ चार येतो. "नवचमे" म्हणजे वरील सोळा संख्येत नऊ मिसळले असता पंचविस येतात व त्याचा वर्गमूळ पाच येतो. "एकादशचमे" म्हणजे वरील पंचविस मध्ये अकरा मिसळल्यास छत्तीस येतात व त्याचे वर्गमूळ सहा येते. "त्रयोदशचमे" म्हणजे वरील छत्तीस संख्येत तेरा मिसळल्यास एकोणपन्नास येतात व त्याचे वर्गमूळ सात. "पंचदशचमे" म्हणजे वरील एकोणपन्नास संख्येत पंधरा

 

मिसळले असता चौंसष्ट होतात व त्याचे वर्गमूळ आठ येते. "सप्तदशचमे"चा अर्थ वरील चौंसष्ट संख्येत सतरा मिसळले असता येणारी संख्या एकयांशी आणि त्याचे वर्गमूळ नऊ "नवदशचमे" म्हणजे वरील एकयांशी संख्येत एकूणीस मिसळले असता शंभर होतात व त्याचे वर्गमूळ येते दहा. "एकविंशतिश्चमे" म्हणजे वरील शंभर या संख्येत एकविस मिळविल्यास संख्या एकशे एकवीस होते व त्याचे वर्गमूळे येते अकरा." "त्रयोविंशतिश्चमे" वरील एकशे एकविस संख्येत तेवीस मिळविले असता एकशे चव्वेचाळीस होतात, त्याचे वर्गमूळ येते बारा. "पंचविंशतिश्चमे" याचा अर्थ वरील एकशे चव्वेचाळीस संख्येत पंचेवीस मिसळले असता एकशे एकोणसत्तर होतात व त्याचे वर्गमूळ

 

येते तेरा. "सप्तविंशतिश्चमे" याचा अर्थ वरील एकशे एकोणसत्तर मध्ये सत्तावीस मिसळले असता एकशे शहाण्णव होतात व त्याचे वर्गमूळ येते चौदा. "नवविंशतिश्चमे" म्हणजे वरील एकशे शहाण्णव मध्ये एकोणतीस मिसळल्यास दोनशे पंचविस होतात व त्याचे वर्गमूळ पंधरा येते.

"एकत्रिंशच्चमे" याचा अर्थ वरील दोनशे पंचविस मध्ये एकतीस मिळविले असता दोनशे छप्पन्न येतात आणि त्याचे वर्गमूळ येते सोळा. "त्रयस्त्रिंशच्चमे" म्हणजे वरील दोनशे छप्पन मध्ये तेहतीस मिसळले असता दोनशे एकोण नव्वद येते, त्याचे वर्गमूळ येते सतरा. माझे हे प्रवचन मलाच आश्चर्यकारक वाटले. मी हे जे बोललो ते सर्व सृष्टीच्या परमाणूचे रहस्य होते.

ते कणाद ऋषींना माहित होते. परमाणूंच्या सूक्ष्म कणांच्या भेदामुळेच विविध धातुची निर्मिती होते. माझे प्रवचन दरबारातील सर्वानाच खूप आवडले. राजाच्या सर्व प्रश्नांना समर्पक उत्तरे दिल्यामुळे व श्री श्रीपाद श्रीवल्लभांच्या कृपेने मी त्या विचित्रपूर नगरातून सुरक्षितपणे बाहेर पडलो.

॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जयकार ॥

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -3

## पळनीस्वामी दर्शन - कुरवपुरचे श्रीपाद श्रीवल्लभ स्वामींचा स्मरण महिमा

विचित्रपूर सोडून मी तीन दिवस प्रवास केला. मार्गात अन्न-पाण्याची व्यवस्था ईश्वरकृपेने होत होती. चवथ्या दिवशी अग्रहारपूरला पोहोंचलो. तेथील एका ब्राह्मणाच्या घरासमोर उभे राहून "ॐ भिक्षांदेहीं" असे म्हणून भिक्षा मागितली. त्या घरातून एक अतिशय क्रोधायमान झालेली

 

एक स्त्री बाहेर आली. ती म्हणाली, भात नाही, लात नाही. मी थोडा वेळ तसाच दारासमोर उभा राहिलो. थोडयाच वेळात त्या घरातील गृहस्थ बाहेर आले आणि म्हणाले माझ्या पत्नीने रागाने माझ्या डोक्यावर मातीचे मडके फोडले व आता त्याच्या किंमती एवढे पैसे आणून द्या असे म्हणून घरातून बाहेर घालविले. मी आपणाबरोबर येतो. दोघे मिळून भिक्षा मागू या. मी म्हटले समस्त जीवांना अन्न-पाणी पुरविणारे सर्वव्यापी असलेले श्रीदत्तप्रभूच आहेत. समोरच्या पिंपळाच्या झाडाखाली बसून आपण त्यांचे चिंतन करु या. आम्ही दोघे त्या विशाल पिंपळाच्या छायेत बसून, श्री दत्तप्रभूंचे भजन करू लागलो. भूक लागल्याने आवाज सुध्दा अगदी बारीक येत

होता. इतक्यात तेथे विचित्रपूरच्या राजाचे दूत आले. ते म्हणाले आमच्या युवराजांना बोलता येऊ लागले आहे. राजेसाहेबांनी तुम्हाला घेऊन या अशी आज्ञा केली आहे. आपण आमच्याबरोबर घोडयावर चलावे. मी म्हणालो "मी एकटा येणार नाहीं. माझ्या बरोबर माझ्या मित्रास येऊ देत असल्यास मी येईन." त्या राजदूतांनी माझी विनंती मान्य केली. आम्हा दोघांस घोडयावर बसवून ते दूत राजवाडयाकडे निघाले. त्या गावचे लोक आश्चर्याने पहात होते. राजवाडयात पोहोचल्यावर, राजाने आमचे स्वागत केले व म्हणाला, "तुम्ही गेल्यानंतर आमचा युवराज एकाएकी बेशुध्द पडला. आम्ही घाबरुन गेलो. राजवैद्यांना बोलावले, परंतु ते येण्याच्या अगोदरच युवराज शुध्दीवर आला.

त्याने डोळे उघडून "दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा" अशा मंत्राचा उच्चार करण्यास सुरूवात केली. थोडया वेळाने युवराजाने सांगितले की तो बेशुध्द असताना एक सोळा-सतरा वर्षाचा अजानबाहु अत्यंत दैदिप्यमान कांतीचा एक यती आला. त्याने युवराजाच्या जिभेवर विभूती घातली आणि त्याच क्षणी त्याला वाचा प्राप्त झाली. राजाने विचारले ते यती कोण होते ? श्रीदत्तप्रभूंशी त्याचे काय नाते आहे ? हे सारे विस्तार पूर्वक सांगावे."

मी सांगितले युवराजाला दिसलेले सोळासतरा वर्षाचे दिव्य स्वरूप यती, श्री श्रीपाद श्रील्लभ होते. त्यांनीच युवराजास वाचा प्रदान केली. ते श्रीदत्तप्रभूंचे कलियुगातील अवतार आहेत. त्यांच्या

दर्शनासाठीच मी कुरवपूर क्षेत्री जात आहे. मार्गात अनेक पुण्य पुरुषांचे संत महात्म्यांचे दर्शन होत आहे. दरबारातील सर्व लोकांनी श्रीपाद श्रीवल्लभांचा एकमुखाने जयजयकार केला. राजाने मला व माझ्याबरोबर आलेल्या त्या गृहस्थास सुवर्णमुद्रा दान दिल्या. त्या घेऊन आम्ही निघालो. राजाच्या राजगुरुने म्हटले "आपणामुळे आमचा ज्ञानोदय झाला व दत्तमहिमा कळला. आम्ही आतापर्यंत वैष्णव व शैव या भेदात पापच करीत होतो. आपणच आम्हास खरा मार्ग दाखविला." आमच्याबरोबर माधव नंबुद्री नावाचा एक ब्राह्मण सुध्दा कुरवपुरास श्री स्वामींच्या दर्शनास निघाला. आम्ही तिघे विचित्रपूर सोडून अग्रहारपूर या गावी आलो. माझ्याबरोबर आलेल्या अग्रहारपूरच्या गृहस्थाने , राजाने दिलेल्या

 

सुवर्ण मुद्रा आपल्या पत्नीस दिल्या. ती अत्यंत आनंदित झाली. तिने सर्वांना यथेच्छ भोजन दिले. त्यानंतर ती श्री श्रीपाद श्रीवल्लभांची भक्त झाली.

मी आणि माधव नंबुद्री चिदंबरमकडे जाण्यास निघालो. सध्याच्या गुंटूर (गर्तपुरी) मंडलातील नंबुरु गावात अनेक विद्वान ब्राह्मणांचे वास्तव्य होते. मळियाळ देशातील राजाने नंबुरु येथील अनेक विद्वान पंडितांना आपल्या देशात बोलावून त्यांना राजाश्रय दिला होता. हेच ब्राह्मण नंबुद्री ब्राह्मण या नांवाने प्रसिध्द झाले. हे आचार संपन्न असून परमेश्वरावर दृढ श्रध्दा असलेले वेदसंपन्न ब्राह्मण होते. परंतु माझ्याबरोबर असलेला माधव नंबुद्री लहानपणीच माता-पित्याच्या छत्राला मुकला असल्याने

निरक्षर होता. त्याची श्री दत्तप्रभुंवर मात्र गाढ श्रध्दा होती.

चिदंबरमला गेल्यावर तेथे श्री पळनीस्वामी नांवाचे एक सिध्द महात्मा असल्याचे कळले. त्यांच्या दर्शनासाठी पर्वतावरील त्यांच्या एकांतात असलेल्या गुहेकडे गेलो. गुहेच्या द्वाराजवळ जाताच पळनीस्वामींनी आम्हाला बघून "माधवा ! शंकरा ! दोघे मिळून आलात ! आमचे अहोभाग्य" असे म्हणाले. प्रथम भेटीतच नाव माहित नसताना आम्हास नांवाने हाक मारणारे हे सिध्द महात्मे आहेत, यात तिळमात्र संशय नव्हता. स्वामी म्हणाले "बाबांनो, श्रीपाद श्रीवल्लभांच्या आज्ञेनुसार मी हा देह त्यागून दुसऱ्या तरुण अशा देहात प्रवेश करणार आहे. ती वेळ आता आली आहे. मी या शरीरात तीनशे वर्षे आहे. या देहाचा त्याग करुन नूतन शरीरात पुन्हा तीनशे वर्षे

 

रहावे अशी श्रीपादांची आज्ञा झाली आहे. जीवनमुक्त झालेले जनन-मरण रूप सृष्टी क्रमाला अतित असलेले आणि समस्त सृष्टीला चालविणारा महासंकल्प म्हणजेच श्री श्रीपाद श्रीवल्लभ ! पुढे पळनी स्वामी म्हणाले, "अरे शंकरा ! तू विचित्रपुरीतील कणाद महर्षिंच्या कणाद सिध्दांता विषयी बोलला होतास, त्याचे वर्णन करुन सांग."

## कणाद महर्षिंचा कण - सिध्दांत

स्वामींच्या प्रश्नाला उत्तर देताना मी म्हणालो "स्वामी मला क्षमा करा. कणाद महर्षिच्या विषयी व त्यांच्या सिध्दांताच्या बाबतीत मला फारच थोडी माहिती आहे. मी सांगितलेली माहिती ही श्री दत्तप्रभुनीच माझ्या तोंडून वदविली होती. हे तर स्वामींना ज्ञात आहेच"

 

करुणास्वरूप पळनी स्वामींनी कण सिध्दांत सांगण्यास सुरूवात केली. ते म्हणाले, "समस्त सृष्टी सुध्दा परम मूल अशा अणूंनी निर्माण झाली आहे. त्या परमाणूंपेक्षा सूक्ष्म अशा कणांच्या अस्तित्वाने, विद्युत शक्ति उद्भवते. हे सूक्ष्म कण महावेगाने आपापल्या कक्षेमध्ये परिभ्रमण करीत असतात. स्थूल सूर्याभोवती ग्रह आपल्या भिन्न भिन्न कक्षेतून परिभ्रमण करीत असतात. त्याचप्रमाणे हे सूक्ष्म कण सुध्दा आपल्या केंद्रबिंदुस अनुसरुन परिभ्रमण करीत असतात. या सूक्ष्म कणापेक्षा सूक्ष्म अशा स्थितीत प्राणीमात्रांचे समस्त भावोद्वेगाचे स्पंदन चालू असते. स्पंदनशील अशा जगात काहीच स्थिर नाही. चंचलता हा याचा स्वभाव आहे. क्षणोक्षणी बदलणे याचा स्वभाव आहे. या स्पंदनापेक्षा सूक्ष्म स्थितीत

दत्त प्रभूंचे चैतन्य असते. यावरून मला सर्वात महत्वाचे म्हणजे सूक्ष्म असलेल्या सगळयांपेक्षाही सूक्ष्म असलेल्या श्री दत्तप्रभूंचा अनुग्रह मिळविणे जितके सोपे आहे, तितकेच कठीण सुध्दा आहे. प्रति कणाचे अनंत भाग केले असता, एक एक कणाचा भाग शून्यासमान होतो. अनंत अशा शून्यांचे फलस्वरूपच ही चराचर सृष्टी आहे. पदार्थ सृष्टी ज्याप्रकारे होते, त्याचप्रमाणे व्यतिरेकी पदार्थाची सुध्दा असते. या दोहोचे मिश्रण झाल्यास व्यतिरेक पदार्थांचा नाश होतो. पदार्थाचे गुणात सुध्दा फरक होतो. अर्चावतारात प्राणप्रतिष्ठा केली असता, ती मूर्ती चैतन्यवंत होऊन भक्ताची मनोकामना पूर्ण करते. सर्व मंत्र कुंडलिनी शक्तिमध्ये असतात. गायत्रीमंत्र सुध्दा ह्या शक्तिमध्ये सामावलेला असतो.

गायत्री मंत्रात तीन पाद आहेत असा सर्वसाधारण समज आहे. परंतु या मंत्रात चौथा पाद सुध्दा आहे. तो असा "परोरजसि सावदोम" चतुष्पाद गायत्री निर्गुण ब्रह्मास सूचित करते.

कुंडलिनी शक्ति चोवीस तत्वापासून या विश्वाची निर्मिती करते. गायत्री मंत्रात चोवीस अक्षरे आहेत. चोवीस संख्येला गोकुळ असे सुध्दा नांव आहे. ''गो'' म्हणजे दोन ''कुळ'' म्हणजे चार. ब्रह्मस्वरूपात कोणताच बदल होत नाही. ''परिवर्तनातीत'' असते म्हणून ते नऊ या संख्येने सूचित केले जाते. आणि ही संख्या महामायेचे स्वरूप दर्शविणारी आहे. श्रीपाद श्रीवल्लभाचे भक्तगण त्यांना ''दो चौपाती देवलक्ष्मी'' असे म्हणत असत. सर्व जीवांचा पतिस्वरूप परब्रह्मच आहे. म्हणून पतिदेव म्हणजे नऊ संख्या. लक्ष्मी म्हणजे आठ संख्या, दो

 

म्हणजे दोन संख्या चौ म्हणजे चार संख्या सूचित करते म्हणून "दो चौ पती लक्ष्मी" याचा अपभ्रंश होऊन "दो चौपाती देवलक्ष्मी" असा झाला. हे सर्व जीवांना 2498 या संख्येची आठवण करून देत असे. गोकुळामध्ये परब्रह्म पराशत्तिच् हे श्रीपाद श्रीवल्लभ या रूपानेच आहेत. श्रीकृष्ण परमात्मा हे श्रीपाद श्रीवल्लभच आहेत. गायत्री मंत्राचे स्वरूप त्यांच्या निर्गुण पादुकेसमान आहे." स्वामी पुढे म्हणाले "बाबा शंकरा, स्थूल मानव शरीरात बारा प्रकारचे भेद आहेत. सर्वांना अनुभवास आलेले स्थूल शरीर सूर्याच्या प्रभावात आलेले आहे." श्रीपाद श्रीवल्लभ पीठिकापुरम येथे मानवशरीराने अवतार घेण्यापूर्वी सुमारे 108 वर्षे या प्रदेशात आले होते. त्यांनी माझ्यावर अनुग्रह केला होता. सध्या ज्या रुपात ते कुरवपूर क्षेत्रात आहेत त्याच रूपात तेव्हा ते येथे आले होते. त्या वेळी आश्चर्यकारक घटना घडली. हिमालयातील काही

महायोगी बद्रीकेदार तीर्थ क्षेत्रातील बद्रीनारायणाची ब्रह्मकमळे अर्पण करून पूजा करीत होते. ती बद्रीनारायणाच्या चरणी वाहिलेली ब्रह्मकमळे श्रीपाद श्रीवल्लभांच्या चरणांवर येऊन पडत. हे दृश्य आम्ही स्वत: नेत्राने पाहिले होते.

पळनीस्वामीच्या त्या दिव्य वक्तव्याने मी अगदी भारावून गेलो. अंगी रोमांच उठू लागले. मी त्यांना विचारले, ब्रह्मकमळ म्हणजे काय ? ते कोठे मिळतात ? त्या फुलांनी पूजा केली असता श्रीदत्तप्रभू संतुष्ट होतात असे आपल्या सांगण्यावरुन कळाले. तरी कृपा करून आपण माझ्या शंकेचे समाधान करावे.

# ब्रह्मकमळाचे स्वरूप

माझ्या विनंतीला मान देऊन श्री पळनीस्वामी स्नेहपूर्ण नजरेने माझ्याकडे पहात म्हणाले "श्री महाविष्णूंनी श्री सदाशिवाची ब्रह्मकमळाने पूजा केली होती. श्री विष्णुंच्या नाभीतील कमळाला सुध्दा ब्रह्मकमळ असेच म्हणतात. दिव्य लोकातील ब्रह्मकमळासमान भूमंडलातील हिमालयामध्ये हे कमळ सापडते. सुमारे बारा हजार फुटावर हिमालयात वर्षातून एकदाच हे उमलते. अर्धरात्रीच्या वेळी हे फूल उमलते आणि उमलत असतांना सभोवतालचा परिसर अद्भूत सुवासाने भरून जातो. हिमालयातील साधक माहात्मे अशा ब्रह्मकमळाच्या शोधात असतात. शरद ऋतुपासून वसंतऋतु पर्यंत हे बर्फामध्येच असतात. चैत्रमासाच्या आरंभी हे बर्फातून बाहेर पडते. ग्रीष्म ऋतूमध्ये याची

विकासाची प्रक्रिया घडते अमरनाथ मधील अमरेश्वर हिमलिंगाचे दर्शन श्रावण शुध्द पोर्णिमेस होते आणि याच वेळी अर्धरात्री हे पूर्ण विकसित होऊन उमलते. हिमालयातच तपस्या करणाऱ्या तपस्वी सिध्द पुरुषसाठी व साधकांसाठी ही परमेश्वरी अद्भुत लीला होत असते. ब्रह्मकमळाच्या दर्शनाने सर्व पातकांचा नाश होतो. योग सिध्दीतील विघ्ने नष्ट होतात. या कमळाच्या दर्शनाने योगी, तपस्वी, सिध्द पुरुष आपापल्या मार्गात उच्च स्थिती प्राप्त करतात. ज्या भक्तांच्या भाग्यात या ब्रह्म कमळाचे दर्शन असते, त्या सर्वांचे दर्शन घेणे झाल्यावर हे कमळ अंतर्धान पावते."

श्री पळणीस्वामी पुढे म्हणाले. "बाबा शंकरा ! मी दहा दिवस समाधीत बसण्याचे ठरविले आहे. दर्शन घेण्याच्या आर्त इच्छेने कोणी भक्त आल्यास माझ्या समाधीत भंग

न पडू देता त्यांना शांतपणे दर्शन करवा. साप चावून मृत झालेले कोणी आल्यास त्यांना मी समाधीमध्ये असल्याचे सांगून मृत देहास नदीच्या प्रवाहात अथवा जमिनीत पुरून ठेवावे , अशी माझी आज्ञा आहे, असे सांगावे."

श्री पळनीस्वामी बसलेल्या आसनावर समाधिस्त झाले. मी आणि माधव दोघे मिळून येणाऱ्या भक्तांना दुरून अत्यंत शांतपणे दर्शन घडवून आणित होतो. दर्शनास आलेल्या कांही भक्तांना तांदुळ, दाळ, पीठ असे साहित्य स्वामींना अर्पण करण्यासाठी आणले होते. ते पाहून माधवने स्वयंपाक करण्याचे ठरविले . सरपणासाठी उपयोगात आणण्यासाठी त्याला जवळच पडलेले एक वाळलेले मोठे नारळाच्या झाडाचे पान दिसले. ते आणण्यासाठी तो त्या पानाजवळ गेला. त्याच्या बरोबर

 

एक भक्त सुध्दा होता. माधवने ते पान उचलून खांद्यावर ठेवले , इतक्यात त्या पानाखाली बसून विश्रांती घेत असलेला एक सर्प रागाने त्याला कडकडून चावला. त्या सर्पाचे विष एवढे दाहक होते की माधव तत्काळ काळानिळा होऊन मृत झाला व जमिनीवर पडला. दोघा तिघांनी मिळुन त्याला गुहे जवळ आणले. ते दृष्य पाहून मी घाबरून गेलो. काय करावे ते सुचेना. तेंव्हा स्वामींच्या आदेशानुसार त्याला जमिनीत पूरून ठेवण्याचे ठरवून एक खड्डा खोदण्यास सुरूवात केली. इतर भक्तांनी मला मदत केली. त्या खड्डयात तो मृतदेह ठेऊन मी आलो. तेवढयात तेथील गावातील कांही लोक एका सतरा आठरा वर्षाच्या, सर्पदंशाने मृत झालेल्या मुलास घेऊन आले. प्रथम माधवची दुर्घटना, नंतर ही दुसरी घटना

पाहून मला रडू आवरेनासे झाले. मी कसे बसे त्यांना स्वामींची आज्ञा सांगितली. गावातील लोकांनी गुहेजवळच एक खड्डा खोदून त्या मुलास त्यात झोपविले. रोज स्वामींच्या दर्शनाला तीनचार लोक येत असत. त्यांना मी दर्शन घडवून आणित असे. असे दहा दिवस गेले. अकराव्या दिवशी ब्रह्ममुहूर्तावर श्री पळनीस्वामी आपल्या समाधीतून बाहेर आले आणि माधवा ! माधवा ! अशा हाका मारू लागले. मी रडत रडत झालेली घटना त्यांना सांगितली. स्वामींनी मला समजविले. त्यांनी योगदृष्टीने माझ्याकडे पाहिले. तेव्हा माझ्या पाठीच्या कण्यात थोडे चलन वलन झाल्यासारखे वाटले व ते दुखू लागले. नंतर पुन्हा एकदा अगदी प्रसन्न चित्ताने माझ्याकडे पाहिले, आणि माझी सारी

वेदना नष्ट झाली. स्वामी मला म्हणाले बाबा शंकरा ! माधवला श्रीपाद श्रीवल्लभांचे दर्शन स्थूल शरीराने होणार नव्हते. त्यामुळे त्याचे सूक्ष्म शरीर गेल्या दहा दिवसांपासून कुरुवपुरात असलेल्या श्री चरणांच्या सान्निध्यात आहे. कांही झाले तरी त्याची इच्छा पूर्ण झाली. श्रीपाद श्रीवल्लभांची लीला अगाध आहे. ती कोणी ओळखू शकत नाही. काळ, कर्म, कारण यांचे रहस्य कोणी जाणू शकत नाही हेच खरे. ते केवळ स्वामीच जाणू शकतात माधवला पुन्हा स्थूल शरीरात आणण्याचे काम प्रभूंनी मजवर सोपविले आहे. असे श्री पळणीस्वामी म्हणाले, स्वामींच्या आदेशानुसार माधवचा मृत देह बाहेर काढून आणला व दक्षिणेकडील घनदाट असलेल्या ताडाच्या झाडाजवळ जाऊन मोठ्याने

म्हटले "माधवास दंश केलेल्या नागराजा ! श्रीपाद श्रीवल्लभांच्या आज्ञेनुसार तू पळनीस्वामींच्या जवळ यावे." अशी साद घातली.

श्री पळनीस्वामींनी आपल्या वस्त्रातून चार कवडया काढल्या व त्या मृत देहाच्या चारी बाजूस ठेवल्या . थोडयाच वेळात त्या कवडया उंच उडाल्या व आकाशात चारी दिशानी गेल्या. पाच दहा मिनिटातच उत्तरे कडून एक साप आला. स्वामींच्या चार कवडया त्याच्या फण्यात रुतून बसल्या होत्या. त्यामुळे तो त्रस्त होऊन फुस, फुस असा ध्वनी करीत होता. स्वामींनी माधवच्या शरीरातील विष काढून घेण्यास सांगितले. सर्पदंश ज्या ठिकाणी झाला होता. तेथूनच त्याने सर्व विष काढून घेतले. श्री पळनीस्वामींनी श्रीपाद श्रीवल्लभांना मनोमनी नमस्कार केला व त्या सर्पावर मंत्रोदक शिंपडले. तो सर्प

स्वामींच्या पद कमलांना स्पर्श करून व त्यांना तीन प्रदक्षिणा घालून निघून गेला.

## श्रीदत्त भक्तांना अन्नदान केल्याचे फळ

श्री पळनीस्वामी म्हणाले "अरे शंकरा, हा साप गेल्या जन्मी एक स्त्री होता. तिने आयुष्यात थोडे पाप, थोडे पुण्य केले होते. तिने एका दत्तभक्ताला जेवू घातले होते. हा पुण्याचा भाग होता.

यथाकाली तिने देह सोडल्यावर यमदूत तिला यमराजांकडे घेऊन गेले. तिला यमराज म्हणाले, "तू एकदा एका दत्तभक्तास जेवण दिलेस, त्याचे विशेष पुण्य तुला लाभले आहे. तुला पाप प्रथम भोगायचे आहे

 

का पुण्य फल ? ती स्त्री म्हणाली, "थोडे आहे ते मी प्रथम भोगते." त्याप्रमाणे तिला पापयोनीत-सर्पाच्या योनीत जन्म मिळाला. तिची वृत्ती सर्वांना हानी करण्याची असल्याने वाटेत जो कोणी आडवा येईल त्याला ती चावत असे. ती स्त्री, मानव जन्मात रजोगुणी असल्याने तिच्या केवळ जवळ गेलेल्या माधवास तिने दंश केला होता. तिच्या पूर्व पुण्याईनेच माधवास तिने दंश केला होता. माधव मात्र पूर्व जन्मीच्या पापामुळे मरणासन्न अवस्थेत गेला होता. कालांतराने श्रीपाद श्रीवल्लभांच्या कृपेने त्या स्त्रीची सर्पयोनीतून मुक्तता झाली.

# योग्य व्यक्तीस केलेल्या अन्नदानाचे फळ

श्रीदत्तप्रभू अल्पसंतोषी आहेत. थोडया सेवेवर ते भक्तास प्रसन्न होऊन अमाप फळ देतात. श्रीदत्तांच्या नावाने कोणाही व्यक्तीस अन्नदान केल्यास व जर ती व्यक्ति योग्य असल्यास त्या अन्नदानाचे विशेष फळ लाभते. अन्नाच्या थोडया भागाने मन बनते. अन्नदात्याचे मन, बुध्दि, चित्त, अहंकार शरीर मंगल स्पंदनाने भरून जाते. यामुळे त्याच्यात लोकांना आपणाकडे आकृष्ट करण्याची शक्ति उत्पन्न होते. पुढे पळनीस्वामी म्हणाले "इच्छित वस्तूची समृद्धी म्हणजेच लक्ष्मीचा कृपा कटाक्ष. ही सृष्टी सगळीच सूक्ष्म स्पंदनाने सूक्ष्म नियमांनी चालत असते."

# श्रीपाद श्रीवल्लभांचा महिमा

श्रीपाद श्रीवल्लभांचे नामस्मरण लक्ष्मी, धन, ऐश्वर्य, समाधान प्रदान करणारे आहे. त्यांच्या अनुग्रहितांच्या भाग्याचे काय वर्णन करावे ! श्री चरणांच्या अनुग्रहानेच दहा दिवस जमिनीत पुरलेल्या माधवच्या शरीरास कांही झाले नाही. त्याला प्राणदान करणाऱ्या श्रीपाद श्रीवल्लभांची करुणा, दया, भक्तप्रेम हे शब्दांनी वर्णन करता येत नाही. माधवामध्ये चैतन्य येऊ लागले त्याने तहान लागल्यामुळे पाणी मागितले. श्री पळनीस्वामींनी त्याला समजावून प्रथम तूप पिण्यास दिले. ते घेतल्यावर फळांचा रस दिला आणि थोडया वेळाने पाणी दिले.

# नागलोकांचे वर्णन

माधव पुनर्जिवित झाल्याने. आमच्या आनंदाला सीमा राहिली नाही. माधवाने आपला अनुभव सांगण्यास सुरूवात केली, "मी सूक्ष्म शरिराने कुरवपुरात पोहोचलो आणि श्रीपाद श्रीवल्लभांचे दर्शन घेतले. श्रीपाद श्रीवल्लभ आजानुबाहु आहेत. त्यांचे नेत्र विशाल आहेत. त्या नेत्रामध्ये जीवांच्या प्रति करुणा, दया, प्रेम निरंतर प्रवाहित होत असते. मी स्थूल देहधारी नसल्यामुळे तेथील स्थूल देहधारी भक्ताना मी दिसत नव्हतो. श्रीवल्लभांनी "कुरवपुरातील त्या द्वीपाच्या मध्यभागी जा," अशी आज्ञा केली. मी श्री वल्लभांचे नामस्मरण करत त्या द्वीपाच्या मध्यभागांतून खोलामध्ये गेलो. भूमीमध्ये खोलांत भुकेंद्राजवळ अनेक प्रासाद, वरांडे असल्यासारखे भासले. ते पाताळ लोकच आहे अशी खात्री

 

झाली. स्थूलता पहाणाऱ्याला स्थूलरूप पदार्थच दिसतात. माझ्या सारख्या सूक्ष्मरूआहे अशी खात्री झाली. स्थूलता पहाणाऱ्याला स्थूलरूप पदार्थच दिसतात. माझ्या सारख्या सूक्ष्मरूप धारित शरिराला सूक्ष्मरूप असलेले लोक दिसले. तेथे असणारे लोक नागजातीचे असून कामरूपधारण केलेले होते. त्यांना इच्छा असलेले रुप धारण करण्याची शक्ति होती. त्यांना साधारणत: नागरुपांतच संचार करणे आवडे. तेथे मी अनेक महा सर्पांना पाहिले. कांही सर्पांना हजार फणे होते. फण्यावर मणी असून त्या मण्यातून दिव्य तेज प्रसारित होत होते. अन्य नाग योगमुद्रेत असल्यासारखे फणे उकलुन मौन मुद्रेत होते. आश्चर्य असे की त्यातच एक महासर्प होता. त्या सर्पाला हजार फणे होते. त्या महासर्पावर श्रीपाद श्रीवल्लभ श्रीमहाविष्णूंसारखे शयन करीत होते. तेथे असलेले महासर्प वेदगान करीत होते. चिदानंद स्वरूपाने

स्वामी ते गायन ऐकत होते. माझ्या बाजूला असलेल्या एका महासर्पाने श्रीदत्त प्रभुंचा महिमा सांगण्यास सुरुवात केली.

## श्री दत्तात्रेयांचा महामहिमा

तो म्हणाला "श्री दत्तप्रभु नेपाळ देशात असलेल्या चित्रकुटातील "अनसूया पर्वतावर" अत्री अनसूयेच्या पुत्र रूपाने पूर्वयुगात अवतरले. ते अवतार न संपवता सुक्ष्मरूपात नीलगिरी शिखरावर, श्रीशैल शिखरावर, शबरगिरी शिखरावर, सहयाद्रीमध्ये संचार करीत असतात. त्यांनी नाथ संप्रदायातील गोरक्षनाथाला योगमार्गाचा उपदेश दिला. ज्ञानेश्वर नावाच्या योग्याला खेचरी मुद्रेत बसलेल्या निराकार योगीरूपात दर्शन दिले. श्री दत्तप्रभु देश काळाहून अतीत आहेत. श्री प्रभूंच्या

सान्निध्यात आम्हाला भूत, भविष्य, वर्तमान हे वेगवेगळे दिसत नाहीत. सगळेच नित्य वर्तमानच असते."

## अनघा समेत दत्तात्रेयांचे दर्शन

तो महासर्प पुढे म्हणाला,"बाबा ! माधवा ! आम्हाला "कालनाग ऋषिश्वर " म्हणतात. श्री दत्ताने हजारो वर्षे राज्याचे परिपालन केल्यानंतर त्यांनी त्यांच्या रूपास गुप्त ठेवण्याचा विचार केला. ते कांही वर्षे नदीमध्ये अदृष्य राहिले. त्यानंतर ते पाण्यावर आले. आम्ही अनुचर, परत आमच्या बरोबर येतील म्हणून तेथेच वाट पहात होतो. परंतु ते आमच्या पासून लपण्याचा प्रयत्न करीत होते. ते आम्हाला माहीत होते. ते परत जलसमाधीत जाऊन थोडया कालांतराने (वर्षानंतर) वर

आले. या वेळेस मात्र त्यांच्या हातात मधुपात्र होते. दुसऱ्या हातात 16 वर्षाची सुंदर कन्या होती. मधुपान करून सदैव गुंगीत असणाऱ्या आणि स्त्रीच्या दास्यात असलेल्या व्यक्तीस आपण आतापर्यंत भ्रमाने आपले दैवत मानले होते या विचाराने आम्ही तेथून परतलो. त्याचवेळी ते दोघेही अदृश्य झाले. ते अदृश्य झाल्यावरच आम्हाला ज्ञानोदय झाला. त्यांच्या हातातील मधुपात्र हे योगानंद स्वरूप असलेले अमृत आणि ती सुंदरी त्रिशक्ति रूपिणी अनघालक्ष्मी देवी आहे, याचे आम्हाला स्मरण झाले. पुनरपि त्यांनी ह्या भूमीवर अवतार घ्यावा या साठी आम्ही घोर तपश्चर्या केली. आमच्या तपश्चर्येचे फलस्वरूप श्री दत्तात्रेयांनी पीठिकापुरात श्रीपाद श्रीवल्लभ या नावाने अवतार घेतला."

# श्री कुरुवपुराचे वर्णन

श्रीदत्तात्रेयप्रभू त्या दिवशी ज्या जागेत स्नानासाठी पाण्यात उतरले होते तीच जागा म्हणजे हे आजचे परम पवित्र कुरवपुर आहे. ते जलसमाधीमध्ये असताना आम्हीसुध्दा आमच्या सूक्ष्मस्पंदनाने ह्या सूक्ष्मलोकांत योग समाधिमध्ये होतो. कौरवांचा आणि पांडवांचा मूळ पुरुष "कुरु" महाराजाला ज्ञानोपदेश झालेले कुरवपुरच हे पवित्रस्थळ आहे. बाबा ! माधवा ! ह्या कुरवपुराचे महात्म्य वर्णन करण्याचे सामर्थ्य आदिशेषास सुध्दा नाही.

# सदाशिव ब्रम्हेंद्रांची पूर्वगाथा

श्रीपाद श्रीवल्लभांच्या श्रीचरणांना मी अत्यंत नम्रभावाने नमस्कार केला. त्या वेळी प्रभु अत्यंत करुणापूर्ण अंतरंगाने म्हणाले. "वत्सा ! हे दिव्य भव्य दर्शन म्हणजेच फार मोठा अलभ्य योगच आहे. तुला बोललेला एक महासर्प येणाऱ्या शताब्दीत ज्योती रामलिंगेश्वर स्वामी या रूपाने अवतरून ज्योती रूपानेच अंतर्धान पावेल. तुझ्याशी बोललेलाच दुसरा महासर्प सदाशिव ब्रह्मेंद्र या नावाने येणाऱ्या शताब्दीत भूमीवर अवतार घेऊन अनेक लीला दाखवेल. श्री पीठिकापुर सुध्दा माझे अत्यंत प्रियस्थान आहे. पीठिकापुरात मी जन्मलेल्या माझ्या मातेच्या गृहात माझ्या पादुकांची प्रतिष्ठापना होईल. माझा जन्म, कर्म अत्यंत दिव्य आहे, ते एक गोपनीय रहस्य आहे. तू श्री पीठिकापुरातील माझ्या

 

पादुका प्रतिष्ठास्थळापासून पाताळात जाऊन, तेथील तपोनिष्ठ असलेल्या कालनागांची भेट घेऊन ये.''

श्री पळनीस्वामी मंदहास्याने म्हणाले ''बाबा ! माधवा ! पीठिकापुरातील कालनागांविषयी चर्चा नंतर करू. आपण सत्वरच स्नानाची पूर्ती करून ध्यानास बसावे. अशी श्रीपाद श्रीवल्लभांची आज्ञा आहे''

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जयकार ॥**

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -4

## कुरवपुरात वासवांबिकेचे दर्शन

## श्रीपादांच्या जन्मस्थानात होणाऱ्या लीला

पळनीस्वामींच्या आज्ञेनुसार आम्ही ध्यान करण्याचा संकल्प केला. श्री पळनीस्वामी म्हणाले, "बाबा ! माधवा ! वत्सा ! शंकरा आपण तिघेही श्रीपाद श्रीवल्लभांच्या आज्ञेनुसार ध्यानस्त होऊन आपल्याला घडलेल्या ध्यानानुभवांची चर्चा करू या. ह्या अवस्थेत आपणास एखादा उत्कृष्ट अध्यात्मिक परिणाम अनुभवास येईल. भविष्य काळात हूणशक (इसवीसन) हे व्यवहारात असेल.

आज हूणशकानुसार दिनांक 25-5-1336. शुक्रवार आहे. आजचा दिवस आपल्या जीवनातील फार महत्वाचा आहे. मी माझ्या स्थूल शरीराला येथेच ठेऊन सूक्ष्मशरीराने कुरवपुरास जाईन. एका वेळेस चारपाच ठिकाणी सूक्ष्म रूपांत विहार करणे मला बाल्यक्रीडा वाटते. आपण सगळेच श्रीपाद श्रीवल्लभांच्या ध्यानात असताना, त्यांची आज्ञा झाल्यावर मी सूक्ष्म शरीराने कुरवपुरात त्यांच्या सांनिध्यात जाईन."

## स्वामींचा अनुग्रह मिळवण्याचे विधान

श्री स्वामींचे वक्तव्य ऐकल्यावर मला गंमत वाटली म्हणून विचारले, "स्वामी ! माधवाने श्रीवल्लभांच्या दिव्य मंगल स्वरूपाचे दर्शन घेतले आहे. आपण सदैव श्रीवल्लभांबरोबर सूक्ष्मरूपाने विचरण करता, मला मात्र

त्यांचे नावच माहीत आहे, रूप माहीत नाही. मग ध्यान कसे करायचे ?" त्यावर श्री पळनीस्वामी मंदहास्य करित म्हणाले. "बाबा ! श्रीपादांची भक्ती असल्यास सगळेच सिध्द होईल. श्रीपादप्रभु सर्वात प्रथम आपल्या भक्ताचे कासवाच्या पिलाप्रमाणे पालन करतात. कासव आपल्या पिलापासून किती दूर असले तरी त्याच्या विचार तरंगानेच त्या पिलांचे रक्षण होते. थोडी उन्नती झाल्यावर मांजराचे पिलां प्रमाणे भक्ताचे पालन करतात. जसे मांजर त्याच्या पिलाला आपल्या तोंडात धरुन एका घरातून दुसऱ्या घरात घेऊन जाते. त्या किशोरांसाठी जेथे सुरक्षीत स्थान वाटते तेथेच त्या पिलास ठेवते . त्यानंतर माकडाचे पिलां प्रमाणे भक्ताचे पालन होते. अशा पालनात पिल्लू त्यांच्या आईस अति प्रयत्नाने चिटकुन असते. अधिक उन्नती झाल्यावर आई मासोळी बरोबर अति स्वेच्छेने आनंदाने विहार करणाऱ्या बाल

माझ्या सारखे भक्त श्रीगुरु समवेत असतात. तू ध्यानात बसल्यावर तेच दर्शन देतील. आज 25-5-1336, शुक्रवार सर्व शुभयोग मिळून असलेला योग. संपूर्ण असा महोत्तम दिवस आहे. श्रीवल्लभांनी अतिमुख्य असा भविष्यनिर्णय करण्याचे ठरवले असुन, मला सूक्ष्मरूपांत कुरवपुरास यावे असे सांगितले आहे. ध्यानस्थ असतांना त्यांची आज्ञा कोणत्या क्षणी होते त्याच क्षणी मी कुरवपुरास जाणार. तेथे एखादी महत्वाची घटना घडणार आहे. ती माझ्या डोळयाने पहाण्याची संधि श्रीदत्तप्रभुंच्या कृपेनेच मिळेल" असे म्हणतच श्री पळनीस्वामी ध्यानस्थ झाले. मी आणि माधव सुध्दा ध्यानस्थ झालो.

अशा प्रकारे ध्यानात दहा तासांचा वेळ गेला. ध्यानानंतर श्रीपळनीस्वामी अत्यंत उल्हासित दिसत होते. मी आणि माधवने श्री स्वामींना त्यांच्या ध्यानानुभूतीबद्दल सांगा अशी प्रार्थना केली. त्यावर स्वामींनी हसत मुखाने सांगण्यास सुरुवात केली.

## शिवशर्माची गाथा - श्रीपाद श्रीवल्लभांचे चिंतनाचे फळ

ते म्हणाले, "या कलियुगातील लोकांचे किती महत् भाग्य आहे. कुरवपुर गाव हे फार लहान असले तरी स्वामींच्या महत्तेस जाणून वेदपंडित सद्ब्राह्मण शिवशर्मा, भार्या अंबिके सह कुरवपुरातच रहात होते. कुरवपुरातील एकुलते एक असे हे ब्राह्मण कुटुंब होते. ते द्वीप ओलांडून येऊन ब्राह्मणोचित कार्यकर्माने धनार्जन

करून रोज कुरवपुरास परत येत असत. ते फार मोठे विद्वान पंडीत होते. ते अनुष्ठानीरत, काश्यप गोत्रोत्पन्न, यजुर्वेदीय ब्राह्मण होते. शिवशर्मास झालेली संताने थोडयाच कालावधीत दिवंगत होत असत. कसा बसा एक मुलगा वाचला. दुर्दैवाने तो मुलगा जड, मंदबुध्दिचा होता. निष्प्रयोजक संतान प्राप्तिमुळे शिवशर्मा दु:खी होते. एके दिवशी श्रीवल्लभांच्या समोर वेदपठन करून ते मौनपणे उभे राहिले. श्री स्वामींनी त्यांचे मनोगत ओळखून मंद हास्य करीत ते म्हणाले, "शिवशर्मा ! दुसरी सगळी चिंता सोडून निरंतर माझेच ध्यान करणाऱ्यांचा मी दास असतो. तुझी इच्छा काय आहे ती सांग." त्यावर शिवशर्मा म्हणाले, "स्वामी ! माझा मुलगा माझ्यापेक्षाही मोठा पंडीत, वक्ता व्हावा अशी माझी इच्छा होती. परंतु ती पूर्णपणे रसातळास गेली. माझा मुलगा अत्यंत मंद बुध्दिचा आहे. सर्व

चराचरात, सगळया घटाघटात व्यापून असणाऱ्या, सामर्थ्यवंत असलेल्या आपणास त्याला पंडित करणे, निष्ठावान करणे काहीच अवघड नाही. एवढी मजवर कृपा करावी."

त्यावर श्रीपाद म्हणाले "बाबा ! कोणी कितीही मोठा असला तरी पूर्वजन्म कर्मफल अनिवार्य असते. सगळी सृष्टी सुध्दा शासनाचे उल्लंघन न करता चालत आहे. स्त्रियांना पूजेचे फळ म्हणून नवरा मिळतो. दानाचे फलस्वरूप मुलेबाळे होतात. सर्वदा दान सत्पात्री करावे. दान घेणारे सत्पात्री नसतील तर किंवा दानास योग्य असे नसतील तर अनिष्टच संभवते. सद्बुध्दी असलेल्या व्यक्तीस जेवू घातल्यास त्याने केलेल्या पुण्यकार्याबद्दल प्राप्त होणाऱ्या पुण्यातील थोडा भाग अन्नदात्यास मिळतो. दुर्बुध्दी असलेल्या माणसाला अन्न दिल्यास

त्याने केलेल्या पापकार्यामुळे मिळालेल्या पापाचा थोडा भाग अन्नदात्यास मिळतो. दान करताना माणसाने अहंकार रहित होऊन दान करावे. तेव्हाच त्याचे चांगले फळ मिळेल. पूर्वजन्मीच्या कर्म फळानेच तुला मंदबुध्दीचा मुलगा जन्मला. तुम्ही दाम्पत्याने अल्पायुषी संतान नको पूर्णायुषीच द्या असे मागणे केले होते. पूर्णायुषी पुत्र दिला. त्याचे पूर्व जन्मीचे पाप निवारण करून त्याला योग्य असा पंडित करावयाचे म्हणजे कर्मसूत्राला अनुसरून तू देहत्याग करण्यास सिध्द असलास तर मी त्याला योग्य असा पंडित करेन." त्यावर शिवशर्मा म्हणाले, "स्वामी ! माझा वृद्धावस्थेमध्ये प्रवेश झालेलाच आहे. मी माझे जीवन त्यागण्यास सिध्द आहे. माझा कुमार बृहस्पतीसारखा पंडित, वक्ता झाल्यावर मला दुसरे काय हवे ? संपूर्ण चराचराला, घटाघटाला व्यापून रहाणारे सामर्थ्यवंत

श्रीपाद प्रभू म्हणाले, "बरे ! तुझा लवकरच मृत्यू होईल. मरणांनंतर तर सूक्ष्म देहाने धीशीला नगारामध्ये (सध्याचे शिर्डी) निंबवृक्षाच्या पायथ्यापाशी असलेल्या भूगृहात थोडाकाळ तपश्चर्येत रहाशील. त्यानंतर पुण्यभूमि असलेल्या महाराष्ट देशामध्ये जन्म घेशील. ह्या विषयी तू तुझ्या बायकोला थोडे सुध्दा कळू देऊ नकोस."

## श्रीपाद श्रीवल्लभांच्या भावीजन्माचा निश्चय (आविष्करण)

लवकरच शिवशर्मा मरण पावला. अंबिका तिच्या मुलासह भिक्षाटन करून जगत होती. शेजार पाजारचे लोक हसत, टिंगल उडवीत. त्यास अंतच नसे. त्या मठ्ठब्राह्मण मुलास अपमान असह्य होऊन तो आत्महत्या

करण्यासाठी नदीकडे पळत सुटला. त्याची माता सुध्दा असहायपणे आत्महत्या करण्यासाठी मुलाच्या मागे पळत सुटली. त्यांच्या पूर्वपुण्याईच्या प्रभावाने वाटेत श्रीपाद श्रीवल्लभ स्वामी सामोरे आले. त्या दोघांनाही त्यांनी आत्महत्येच्या प्रयत्नातून सोडविले. श्रीपाद श्रीवल्लभ स्वामींनी त्यांच्या अपार करुणा कटाक्षाने त्या मूर्ख बालकाला महापंडित केले. अंबिकेने शेष जीवन शिव पूजेत घालवावे असा आदेश दिला. शनिप्रदोष व्रताचे महात्म्य सांगून प्रदोष समयास केलेल्या शिवपूजानाचे फळ कसे मिळते ह्याची सविस्तर माहिती दिली. पुढील जन्मी अंबिकेला "माझ्या सारखाच मुलगा होईल" असा वर दिला. परंतु त्यांच्या सम या तिन्ही लोकांत कोणीही नसल्याने श्रीस्वामीनी पुढील जन्मात तिच्या पुत्र रूपात जन्म घेण्याचा निश्चय केला.

# नृसिंहसरस्वति आणि स्वामी समर्थ यांचा जन्मसंकल्प

समस्त कल्याणकारी गुणांनी युक्त अशा वासवांबिकेस श्रीपाद प्रभू म्हणाले "तुझा संकल्प सिध्द होईल ! मी आणखी 14 वर्षे म्हणजे या शरिराला 30 वर्ष येईपर्यंत श्रीपाद श्रीवल्लभ या रूपांतच राहून त्या नंतर गुप्त होईन. त्यानंतर संन्यास धर्माच्या उध्दाराच्या निमित्ताने नृसिंहसरस्वती ह्या नावाने ओळखला जाईन. ह्या दुसऱ्या अवतारात 80 वर्षे राहीन, या अवतार समाप्तीनंतर कर्दळी वनात 300 वर्ष तपोनिष्ठेत राहून प्रज्ञापुरात (अक्कलकोट) स्वामी समर्थ या नावाने अवतार धारण करीन. अवधूत अवस्थेत सिध्दपुरुषांच्या रूपाने, अपरिमित अशा दिव्यकांतीने, अगाध लीला, दाखवीन. साऱ्या जगाला धर्म कर्माला अनुसरून, त्या विषयी आसक्तीरहित करीन."

पळनीस्वामी पुढे म्हणाले जशी-जशी युगे बदलतील तशी-तशी मानवाची शक्ती कमी होत जाईल. त्यासाठी परतत्त्व ऋषिश्वरांच्या इच्छेनुसार खालच्या स्थाईवर उतरून येईल. शरिरधारी प्रभूंचा अवतार म्हणजे संपूर्ण अनुग्रहाचे सूचकच होय. अशा रीतीने प्रभूतत्त्व खालच्या पातळीवर उतरण्याने थोडया श्रमाने मानवास उत्तम फळ प्राप्त होईल. म्हणूनच कलियुगातील मानव धन्यआहेत. केवळ स्मरण मात्रेच दत्तप्रभूंचा अनुग्रह प्राप्त होईल. मानवाचे पतन होण्यास जेवढे मार्ग आहेत, श्रीचरणांचा अनुग्रह प्राप्त होण्यास त्याहीपेक्षा असंख्य मार्ग आहेत. हेच परम सत्य आहे. स्मरण, अर्चन केल्यामुळे श्रीपाद श्रीवल्लभ प्रभूंशी अनुसंधान घडते. यामुळे साधकांचे पापकर्म, दोष, विषयवासना, संस्कार श्रीपाद श्रीवल्लभांच्या चैतन्यात प्रवेश करतात. त्यांच्याकडून

भक्तांना श्रेयस्कर शुभस्पंदनांचा लाभ होतो. श्रीपाद प्रभू साधकांच्या चैतन्यात प्रवेश झालेल्या पाप समुदायाचे पवित्र नदीच्या स्नानानेच निर्मूलन करतात. तसे न केल्यास त्यांच्या योगाग्नीनेच त्या पापांना जाळून भस्म करतात. ते स्वत: तप करून त्या तपाचे फळ त्यांच्या भक्तांना देतात. कर्मसूत्राचे अतिक्रमण न करता भक्ताचे रक्षण करतात. त्यांना आवश्यक वाटल्यास कितीही जडस्वरूपी कर्मफलांचे शोषण करून आपल्या भक्तांना विमुक्तीचा प्रसाद देतात. क्षणोक्षणी त्यांच्या कर्मांचा ध्वंस करतात. म्हणुनच, त्यांच्या भक्तांची , त्यांच्या न कळनच कर्मबंधनातून सुटका होते. मुक्ती मिळते. या पळनीस्वामींच्या वक्तव्यानंतर सुध्दा माझ्या मनातील प्रश्न मिटला नव्हता. मी त्यांना अजून एक प्रश्न विचारण्याचे साहस केले. "स्वामी ! साडेसातीच्या त्रासातून शंकराची सुध्दा सुटका झाली नाही असे ऐकले

 

होते. ग्रहासंबंधी त्रासातून श्रीगुरु सार्वभौम कशा प्रकारे सुटका करतात, ह्याबद्दल माहिती द्यावी अशी प्रार्थना." या वर पळनीस्वामी म्हणाले.

"बाबा ! शंकरा ! खगोलातील ग्रहांना जीवांशी मित्रत्व किंवा शत्रुत्व असे नसतेच. मानव जन्माच्या वेळी त्याच्या प्रारब्ध कर्माला अनुसरून ग्रह महर्दशेने जन्म घेतो, त्या ग्रहांना अनुसरून शुभाशुभ फळ त्याला मिळत असते. ग्रहांच्यामुळे येणारे सूक्ष्मकिरण अशुभ फळ देणारे असल्यास, त्यांच्या दोष निवारणासाठी मंत्र, तंत्र, यंत्राने काही फळ न दिसल्यास, जप, तप होमाचा आश्रय घ्यावा. या उपायाने सुध्दा उपशमन न झाल्यास श्रीगुरु पादुकांना शरण जावे. श्रीचरण सर्वशक्ती संपन्न असतात. शक्तीमध्ये चांगल्या आणि वाईट शक्ती असतात. त्या त्या शक्तीकडून निघालेली स्पंदने शुभ

अशुभ घटना घडवून आणतात. प्रत्येक ग्रहास मानव शरिरातील थोडया विशेष भागावर अधिपत्य असते. ग्रहबाधा असल्यास मानवाच्या शरिरातील कोणत्या भागावर त्या त्या ग्रहांचे अधिपत्य असते, तेच पिडित होतात. विश्वचैतन्यापासून प्रवाहित सूक्ष्म स्पंदना मुळेच इष्ट अनिष्ट फळांची सिध्दी होते. स्पंदनांमुळे आकर्षण किंवा, विकर्षण होते. सज्जनांचा सहवास असणाऱ्या व्यक्तीस दुर्जन सहवास घडल्यास अकारण कलह, बंधुवियोग, कुटुंबातील सदस्यांशी वाद-विवाद होतात. हे सारे आकर्षण शक्ती कमी झाल्याने मिळणारे अनिष्ट फळ आहे. विश्वशक्तीकडून स्पंदनाची निरंतर उत्पत्ति होत असते. ते थोडया कालावधीपर्यंत त्या माणसावर प्रभाव पाडण्याचे कार्य करतात. काळ हा शक्ती-स्वरूप आहे. थोडया कालांतराने ती स्पंदने त्या माणसास सोडून विधीरीत्या प्रभावित होणाऱ्या माणसाच्या शरीरात प्रवेश

करतात. कालचक्राला अनुसरून त्याचे फळ मिळत असते. मानवाची दैवभक्ती जागृत होऊन जप, तप केल्यास ग्रहांची तीव्रता थोडया प्रमाणात कमी होते. महात्मे लोक विश्वकल्याणाची इच्छा करून विविध प्रकारचे यज्ञ करीत असतात. त्यांच्या तपाचे फळ सुध्दा दान करीत असतात. ह्या प्रक्रियेने विश्वात उद्भवलेली अनिष्टकारक अशी स्पंदने एका माणसानंतर दुसऱ्या माणसाला कष्ट न देता ती जेथून उद्भवली तेथेच परत जातात. म्हणजे मूळ बिंदुस्थानात जातात. ह्याला तिरोधान म्हणतात. थोडे पुण्यकार्य केल्याबद्दल विशेष शुभ फळ मिळाल्यास त्यास अनुग्रह असे म्हणतात. स्वामी पुढे म्हणाले "बाबा! क्रियायोग सिध्दांताप्रकारे सृष्टी , स्थिती, लय या तिरोधान अनुग्रहांना मी स्पष्ट केले. तू ध्यानात

असताना पाहिलेल्या यवन भासणाऱ्या साधूमध्ये भविष्यात श्रीपाद श्रीवल्लभांची शक्ति विशेषरीत्या प्रवाहित होईल. निंबवृक्षाच्या जवळ असलेल्या, भूगृहातील चार नंदादिपांना तू पाहू शकलास ही असाधारण किमया आहे. श्रीपाद श्रीवल्लभांनी कोणत्यातरी महान उद्देशाच्या दृष्टीनेच तुला असा अनुभव दिला. त्यांची आंतरिक कल्पना केवळ त्यांनाच माहीत आहे. त्यांच्या लीला फार अगम्य असतात. गुढार्थ प्रयोजक असतात. त्यांच्या व्यतिरिक्त दुसऱ्यांना त्याचा मतितार्थ जाणता येत नाही. त्यात सुध्दा देवरहस्ये असू शकतात. त्यांच्या अनुमतिनेच मी तुला त्याचे विवरण करु शकलो. समस्त सृष्टी त्यांच्या नजरेखालीच असते. त्यांचे तेच प्रमाण आहेत. त्यांच्यात तेच श्रेष्ठ आहेत. विश्वनियंता सुध्दा

 

तेच आहेत, योगसिध्द आहेत, अमेय आहेत. ते परिणामांना, मोजमापांना, परिमितीला साध्य होणारे विषयच नाहीत."

श्री पळनीस्वामींच्या या वर्णनाने माझे मन आनंदाने बहरून गेले. मी उडुपी क्षेत्राहून निघालो. कुरवरपुरास जाताना मध्येच कितीतरी चित्र-विचित्र अशा घटना घडत चालल्या होत्या. या सर्व ग्रंथस्थ करण्यासाठी श्रीगुरु सार्वभौमांची अनुमति घ्यावी या विचाराने श्रीपाद श्रीवल्लभांच्या दर्शनोत्तर त्यांच्याशी विचार विनिमय करण्याचे ठरविले .

श्री पळनीस्वामींनी माझ्या मनातील भावाला लीलेनेच समजुन घेतले ते म्हणाले "तुझ्या मनातील भाव मला अवगत झालेला आहे. भविष्यात भक्तांच्या हितासाठी

श्रीप्रभूंच्या चरित्राचे लिखाण करण्याचे तू ठरवले आहेस. ते जरूर तुझ्या प्रयत्नांना आशिर्वाद देतील." त्यानंतर श्री पळनीस्वामी माधवास त्याच्या ध्यानानुभवाविषयी सांग असे म्हणाले. माधवाने आपले अनुभव सांगण्यास सुरूवात केली.

प्रमाणात कमी होते. महात्मे लोक विश्वकल्याणाची इच्छा करून विविध प्रकारचे यज्ञ करीत असतात. त्यांच्या तपाचे फळ सुध्दा दान करीत असतात. ह्या प्रक्रियेने विश्वात उद्भवलेली अनिष्टकारक अशी स्पंदने एका माणसानंतर दुसऱ्या माणसाला कष्ट न देता ती जेथून उद्भवली तेथेच परत जातात. म्हणजे मूळ बिंदुस्थानात जातात. ह्याला तिरोधान म्हणतात. थोडे पुण्यकार्य केल्याबद्दल विशेष शुभ फळ मिळाल्यास त्यास अनुग्रह असे म्हणतात. स्वामी पुढे म्हणाले "बाबा!

क्रियायोग सिध्दांताप्रकारे सृष्टी , स्थिती, लय या तिरोधान अनुग्रहांना मी स्पष्ट केले. तू ध्यानात असताना पाहिलेल्या यवन भासणाऱ्या साधूमध्ये भविष्यात श्रीपाद श्रीवल्लभांची शक्ति विशेषरीत्या प्रवाहित होईल. निंबवृक्षाच्या जवळ असलेल्या, भूगृहातील चार नंदादिपांना तू पाहू शकलास ही असाधारण किमया आहे. श्रीपाद श्रीवल्लभांनी कोणत्यातरी महान उद्देशाच्या दृष्टीनेच तुला असा अनुभव दिला. त्यांची आंतरिक कल्पना केवळ त्यांनाच माहीत आहे. त्यांच्या लीला फार अगम्य असतात. गुढार्थ प्रयोजक असतात. त्यांच्या व्यतिरिक्त दुसऱ्यांना त्याचा मतितार्थ जाणता येत नाही. त्यात सुध्दा देवरहस्ये असू शकतात. त्यांच्या अनुमतिनेच मी तुला त्याचे विवरण करु शकलो. समस्त सृष्टी त्यांच्या नजरेखालीच असते. त्यांचे तेच प्रमाण आहेत. त्यांच्यात तेच श्रेष्ठ आहेत. विश्वनियंता सुध्दा

तेच आहेत, योगसिध्द आहेत, अमेय आहेत. ते परिणामांना, मोजमापांना, परिमितीला साध्य होणारे विषयच नाहीत."

श्री पळनीस्वामींच्या या वर्णनाने माझे मन आनंदाने बहरून गेले. मी उडुपी क्षेत्राहून निघालो. कुरवरपुरास जाताना मध्येच कितीतरी चित्र-विचित्र अशा घटना घडत चालल्या होत्या. या सर्व ग्रंथस्थ करण्यासाठी श्रीगुरु सार्वभौमांची अनुमति घ्यावी या विचाराने श्रीपाद श्रीवल्लभांच्या दर्शनोत्तर त्यांच्याशी विचार विनिमय करण्याचे ठरविले .

श्री पळनीस्वामींनी माझ्या मनातील भावाला लीलेनेच समजुन घेतले ते म्हणाले "तुझ्या मनातील भाव मला अवगत झालेला आहे. भविष्यात भक्तांच्या हितासाठी

श्रीप्रभूंच्या चरित्राचे लिखाण करण्याचे तू ठरवले आहेस. ते जरूर तुझ्या प्रयत्नांना आशिर्वाद देतील." त्यानंतर श्री पळनीस्वामी माधवास त्याच्या ध्यानानुभवाविषयी सांग असे म्हणाले. माधवाने आपले अनुभव सांगण्यास सुरूवात केली.

## श्रीपाद श्रीवल्लभांचे जन्मस्थानी, श्रींच्या पादुका, श्रीपाद श्रीवल्लभ, श्रीदत्तात्रेय आणि श्री नृसिंहसरस्वती यांच्या मूर्तिंची प्रतिष्ठापना

श्री पळनीस्वामी म्हणाले, "बाबा ! शंकरा, तू दर्शन घेतलेले श्रीवल्लभांचे मातागृह तुझ्यातील सर्वशक्तींना आकर्षित केलेले स्थळ श्रीपाद श्रीवल्लभांचे जन्मस्थान आहे. तेथे असलेल्या पादुकांच्या खाली पाताळात अनेक सहस्त्र वर्षांपासून तपात बसलेले ऋषी आहेत. तू

 

पाहिलेल्या श्रीवल्लभांच्या जन्मस्थानातच केवळ श्रींच्या पादुकांची प्रतिष्ठापना केली जाईल. पादुकांच्या प्रतिष्ठापणे नंतर काही वर्षानी अति प्रयत्नाने श्रीपाद श्रीवल्लभांचे चरित्रामृत प्रकाशित होईल. तू बसून ध्यान

 

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -5

## शंकर भट्टाचे तिरुपतीला पोहोचणे

## काणिपाकात तिरुमलदासांची भेट

## श्रीपादांच्या अनुग्रहाने शंकर भट्टाची शनिपीडा निवारण

मी माझ्या प्रवासात परम पवित्र तिरुपती महाक्षेत्रास आलो. माझ्या मनात केव्हाही न अनुभवलेल्या शांतीचा अनुभव आला. तिरुपती महाक्षेत्रातील पुष्करणीचे स्नान करून श्री वेंकटेश्वराचे दर्शन घेतले. मंदिराच्या अंगणातच ध्यानस्थ झालो. ध्यानात श्री वेंकटेश्वरांना स्त्रीमूर्तिरूपात पहिले. बालत्रिपुरसुंदरी या रूपात पाहिलेली

मूर्ति थोडया क्षणां तच परमेश्वराच्या रूपात बदलली, आणि थोडया वेळाने महाविष्णुच्या रूपात बदलली. ध्यानात असतानाच काही वेळाने ती मूर्ती चौदा वर्षाचे वय असलेल्या अतिसुंदर काया धारण केलेल्या बालयतीच्या रूपात प्रकट झाली. त्या बाल यतीची दृष्टी अमृतमय असल्याचे जाणवले. नेत्रद्वयातून हजारो मातेच्या वाच्छल्यानुरागाची जणु वर्षाच होत होती. एवढयातच त्या बालयतीजवळ काळया रंगाचा एक कुरूप माणूस पोहोचला. तो त्या बालयतीस म्हणाला, "श्रीपाद श्रीवल्लभ प्रभू ! आपण साऱ्या जगाचे नियंत्रण करणारे आहात. तुमचा भक्त असलेल्या शंकर भट्टाला आजपासून साडेसातीचा प्रारंभ होत आहे. या विश्वात अनेक प्रकारचे कष्ट आहेत ते मी त्याच्या अनुभवास आणीन. प्रभूंच्या आज्ञेसाठी येथे उभा आहे." करुणांसागर प्रभु म्हणाले, "अरे शनेश्चरा ! तू कर्मकारक आहेस. जीवांना

कर्मफलितांचे अनुभव करवून त्यांना कर्मविमुत्तच् करतोस. तू तुझ्या धर्माला अनुसरून कर्तव्य कर. आश्रित जनांचे रक्षण करणे ही माझी प्रतिज्ञा आहे. म्हणून शंकर भट्टाला मी तुझ्या पासून झालेल्या कष्टकाळात सहाय्य करून कशी सुटका करून देतो ते तू बघ." श्रीपाद महाराज आणि शनैश्चराचे असे संभाषण झाल्यावर दोघेही माझ्या ध्यानातून निघून गेले. परंतु नंतर भगवन्मूर्तिचे ध्यान करणे कठीण झाले. माझ्या कष्टकाळाची सुरूवात झाली. श्रीपादांकडून माझी कष्टातून सुटका होईल याचा दृढ विश्वास होता. मी तिरुमलाहुन तिरुपतीला आलो.

तिरुपतीच्या रस्त्यावर मनाला वाटेल तसे चाललो होतो. मन चंचल होते. एक न्हावी मला बळजबरीने थांबऊन म्हणाला, "तू वीस वर्षापूर्वी घरातून पळून गेलेला

सुब्बय्या आहेस ना ? तुझे आईबाप काळजी करीत आहेत. तुझी भार्या रजस्वला झालेली आहे. ती वयात आली आहे. तू तिच्या बरोबर संसार कर. मुलाबाळासहित सुखी रहा. तेव्हाच मी म्हणालो, "अहो, मी शंकरभट्ट नावाचा कन्नड देशात राहणारा ब्राह्मण. वाटसरू आहे आणि पुण्यक्षेत्र संचार करीत येत आहे. मी दत्तभक्त आहे. श्री दत्तप्रभू श्रीपाद श्रीवल्लभ या नामरूपाने अवतरले आहेत, असे ऐकून कुरूगड्डीला प्रयाण आरंभिले आहे. परम पवित्र गायत्रीची शपथ घेऊन सांगतो, मी ब्रह्मचारी आहे. मी तुम्ही म्हणता तो सुबय्या न्हावी नाही."

परंतु माझा आवाज ऐकणारे कोणी नव्हते. तेथे पुष्कळ लोक जमा झाले होते. प्रत्येकजण कोणत्या न कोणत्या रीतिने माझी निंदाच करीत होता. मला सुब्बय्या

 

नावाच्या माणसाच्या घरी नेण्यात आले. सुब्बय्याचे आई वडील मलाच त्यांचा मुलगा समजून अनेक प्रकारे माझी समजूत घालीत म्हणाले, या पुढे आम्हाला सोडून जाऊ नकोस. रजस्वला स्त्रीला सोडून जाणे हा महाअपराध आहे. त्यातील एक माणूस म्हणाला, "सुब्बय्या दाढी आणि मिशांनी झाकला गेला आहे. याचे क्षौरकर्म केल्यास पूर्वीची कळा येईल." मी सुब्बय्या नाही असे अनेकदा सांगितले परंतु माझे ऐकणारे कोणीच नव्हते. बळजबरीने माझे क्षौर कर्म करण्यात आले. गुळगुळीत गुंडू केला. दाढी, मिशा पण काढून टाकल्या. माझ्या गळयातील पवित्र यज्ञोपवित सुध्दा काढून टाकले. माझ्यासाठी त्यांच्या माहितीतल्या एका भूत वैद्याला बोलावण्यात आले. त्याने चित्रविचित्र अशी वेशभूषा केली होती. त्याच्या भयंकर दृष्टीनेच माझ्या हृदयात कांपरे भरले. मला बांधून चाकूने माझ्या डोक्यावर वार केला

गेला. त्यावर लिंबाचा रस आणि विविधप्रकारचे रस ओतले गेले. मला तो त्रास सहन होत नव्हता. हा सगळा छळ झाल्यावर सुब्बय्याला ब्राह्मण भूताने पछाडले आहे, म्हणूनच हा जानवे घालून मंत्र बरळतो असा निर्णय घेण्यात आला. तिरुपतीत असलेले ब्राह्मण सुध्दा स्तब्धच झाले होते. ह्या नगरात आलेला वाटसरू सुब्बय्याच आहे, त्याला एका ब्रह्मराक्षसाने बाधले आहे असेच ते समजले. मला त्या गावातील मोठ्या श्रेष्ठ ब्राह्मणांकडे नेले गेले. मी कन्नड देशीय स्मार्त ब्राह्मण आहे, भारद्वाज गोत्राचा आहे. नमक चमक मला येते, संध्या वंदन पण करतो असे माझ्या सांगण्यावर त्यांचा विश्वासच नव्हता. सुब्बय्यास एका कन्नड ब्राह्मण भूताने झपाटले आहे, त्यासाठी योग्य चिकित्सा करून परत पूर्वीसारखे करावे. असे त्या श्रेष्ठ ब्राह्मणांनी सांगीतले.

घावाने झालेल्या त्रासाने मी चक्राऊन गेलो. माझे रुदन केवळ अरण्यरुदनासारखेच झाले. शुध्दीवर आलो तेव्हा माझ्या समोर माझ्या सारखाच काळे तेज असलेला एक विकृत आकाराचा माणूस बसलेला आहे असे वाटले. तो माझ्याशी काही न बोलता माझ्यामध्ये समाऊन गेला. माझ्याशी तदाकार झाला. साडेसातीच्या प्रभावाने साडेसात वर्ष माझा कष्टकाळ आहे. याची कल्पना मला आली. श्रीपाद श्रीवल्लभच या कष्टाच्या काळात माझे रक्षण करतील असा मला दृढ विश्वास होता. तेवढया तापात सुध्दा मी मनात श्रीपाद श्रीवल्लभांचे नामस्मरण करीत होतो. श्रीचरणांचे नामस्मरण केल्याबरोबर माझा त्रास कमी होण्यास सुरुवात झाली. भूतवैद्य मात्र कोंबडया, बकऱ्यांची बळी देत, चित्रविचित्र पूजा करीत होता. मला मात्र पथ्याचा आहार दिला होता. सुब्बय्याला

ब्राह्मण भूताने बाधले आहे, त्यामुळे त्याला शाकाहारच दिला पाहिजे असे मांत्रिकाने सांगितले. श्रीपादांच्या अनुग्रहानेच मला शाकाहार दिला गेला, याचे मनाला बरे वाटले. तीन दिवस मी तीव्र नरक यातना भोगल्या. त्या संकटात सुध्दा मी श्रीचरणांचे स्मरण न चुकविल्यामुळे चौथ्या दिवसापासून संकटे येणे बंद झाले. ते लोक माझ्या शरिरावर चित्रविचित्र असे प्रयोग करीत होते. मांत्रिक मधून मधून चाबकाने मारत होता. "श्रीवल्लभा शरणं शरणं" अशी दीनतेने हाक मारीत मी रडत होतो. श्रीदत्ताची अनन्य भक्तीने सेवा करणाऱ्याला ही अशी नरकबाधा कशी असते, याचे मला आश्चर्य वाटत होते. तेवढयातच विचित्र घडले. माझ्या शरिरावर चाबकाचा मार बसला परंतु मला किंचित सुध्दा त्रास झाला नाही. तेव्हा मांत्रिकच रडू लागला. तो मला मारत होता, पण त्याच्या माराचा त्रास त्यालाच होत होता. हे कसे घडते हे

त्याला समजत नव्हते. तो माझ्याकडे वेडसर नजरेने पाहात होता. मी मात्र ही श्रींचीच लीला आहे असे समजून हसलो. मी पथ्याचेच जेवण जेवत होतो परंतु ते सुध्दा मला मधुर वाटत होते. मी पोटभर जेवण्यास सुरूवात केली. जेवण श्रीपादांच्या अनुग्रहाचा प्रसाद समजून जेवत होतो. तो मांत्रिक मात्र त्याच्या आवडीचे कोंबडया बकऱ्या खात असला तरी त्याला ते विषासाखेच भासत होते. त्याची तब्येत पण क्षीण होत होती. तो मला त्रास देण्याचे सोडून केवळ मंत्र, पूजा वगैरे करून वेळ घालवीत होता. माझा इलाज सुरू झाल्यापासून पाचव्या दिवशी त्याचे घर जळून गेले. त्या घरात अग्नी नव्हताच, तरीसुध्दा सगळयांच्या देखतच अग्नी प्रकट झाला आणि क्षणातच सगळे राख झाले. सहाव्या दिवशी तो खिन्नतेने सुब्बय्याच्या घरी येऊन म्हणाला,

 

"सुब्बय्याला लागलेले ब्राह्मण भूत मांत्रिक होते. त्याने माझ्या घराला मांत्रिक प्रयोगाने दग्ध केले."

वेताळ वगैरे अनेक क्षुद्रशक्तींना प्रसन्न करण्यास, अनेक प्रकारच्या पूजा कराव्या लागतील, त्यासाठी अधिक धनराशी लागेल असे त्याने सूचित केले. मंत्रातंत्राचा काहीच उपयोग नव्हता. मांत्रिक धनाच्या आशेने असे वागत होता हे मला माहित होते. विधिचे विधान मानून मान खाली घालून, सुब्बय्याच्या पत्नीला माझीच पत्नी म्हणून स्वीकार करण्याची वेळ आल्यास त्याच्यापेक्षा अधिक लाजिरवाणी परिस्थिती काय असणार ? त्यापेक्षा मोठा विश्वासघात कोणता असू शकतो. याची मला खंत वाटली. विधी माझ्या जीवनाशी एवढया क्रूरतेने का खेळत आहे समजत नव्हते, उलगडत नव्हते. माझे काळीज कापत असल्याचा अनुभव येत होता. मी

सुब्बय्याच्या आई-बापांना म्हणालो, "माझे माय बाप ! तुमच्या सर्व स्थावर संपत्तिची विक्री करून या मांत्रिकाच्या मायाजाळात पडू नका. माझी तब्बेत चांगलीच आहे. मी तुम्हाला आई-बापासारखेच मानतो." तेवढयावरच मला मांत्रिकाकडून मुक्ती मिळाली. सुब्बयाचे आई-वडील अत्यानंदीत झाले. त्यांच्या डोळयातील आनंद पाहून माझे डोळे पण ओले झाले. परस्त्री मातेसमान असते म्हणून येणाऱ्या संकटातून माझी रक्षा करावी. धर्म भ्रष्ट होऊ देऊ नये, अशी अत्यंत दीनपणे मनातल्या मनातच श्रीपादांची प्रार्थना करीत होतो.

माझा इलाज सुरू झाल्यावर आठव्या दिवशी माझी सेवा करणाऱ्या सुब्बय्याच्या पत्नीला बघून म्हणालो. "माझ्या बाबतीत तू काय समजतेस ? मी खरा खरा सुब्बय्याच

 

आहे यावर तुझा विश्वास आहे का ?" त्यावर ती म्हणाली. "मी दोन वर्षाची असताना माझे लग्न झाले. आता माझे वय 22 वर्ष आहे. आपण माझे पती आहात का नाही ते त्या परमेश्वरालाच माहीत, दुसऱ्या कोणालाहि माहित नाही. नूतन यौवनांत पदार्पण केलेल्या पत्नीस पाहून पुरूष स्थिर राहू शकत नाही. आपण इतका त्रास सहन करीत असताना सुध्दा मला पत्नी या नात्याने स्विकारले नाही. स्पर्श केला नाही, हे सगळे उत्तम संस्कार असणाऱ्यालाच शक्य आहे. तुमच्या विषयी मला कसलीच भावना नाही. मी कुळाचराला अनुसरून धर्मानेच जीवन कंठायचे ठरवले आहे. आपण माझे पति असल्यास या चरण दासीला सोडून जाऊ नये. माझा नवरा पळून जाऊन 20 वर्षे झाली. माझा विवाह बालपणातच झाला तो मला नकळतच. या कारणास्तव तुम्ही मला आपली पत्नी म्हणून स्वीकार करू शकता.

मी तुमच्या मार्गदर्शनाखालीच राहीन. तुम्ही नेहमी स्मरण करता ते श्रीपाद श्रीवल्लभांचे स्मरण करीन. त्या सद्गुरुंच्या चरणी ह्या जटिल समस्येचे धर्मसम्मतिपूर्वक निवारण करावे अशी मी प्रार्थना करीन."

तिचे वक्तव्य मला युक्ति संगत असल्यासारखे वाटले. मी म्हणालो, "श्रीपाद श्रीवल्लभ साक्षात दत्तप्रभूच आहेत. या कलियुगात त्यांनी अवतार घेतला आहे. प्रस्तुत ते कुरवपुरांतच आहेत. आपल्या भक्तीभावास अनुसरून त्यांचे वर्तन असते. श्रीपाद श्रीवल्लभांना सद्गुरु या रूपाने स्मरण केल्यास सद्गुरुसारखेच अनुभव येतात. परमात्मा या रूपाने स्मरण केल्यास, तेच परमात्मा आहेत असे सिध्द करतात. तू सुध्दा

श्रीपाद श्रीवल्लभांचे नामस्मरण कर. अचूक कर्तव्याचा बोध होईल. सगळयांना आनंदमय परिणाम लाभतील."

त्या दिवशी वाडयात भविष्य सांगणारा एक माला जंगम आला. जंगमाच्या वेशात असलेल्या त्या माणसाकडे ताडपत्री ग्रंथ होते. आमच्या वाडयातील सर्वजणांना थोडयाच कालावधीत तो फार आदरणीय झाला. त्याला भेटलेल्या सर्व भाविकांना तो भूत भविष्याची माहिती अत्यंत अद्भूत प्रकारे सांगत असे. त्याच्याजवळचे ताडपत्र ग्रंथ हे नाडी ग्रंथ असून, त्याला रमलशास्त्र असे नाव होते. त्यातील विषय अचूक असून त्यात सांगितलेल्या घटना बरोबर घडतात असे तो सांगत असे. सुब्बय्याच्या जनकांच्या समजूतीसाठी तो आमच्या घरीसुध्दा आला. माझ्या हातात थोडया कवडया देऊन त्या खाली टाकण्यास सांगितल्या, त्यानंतर गणित घालुन त्याच्या

ताडपत्राच्या ग्रंथातून एक पत्र काढून त्याने वाचण्यास सुरूवात केली. ''प्रश्न केलेला माणूस शंकरभट्ट नावाचा कन्नड ब्राह्मण आहे. दत्तावतारी श्रीपाद श्रीवल्लभांच्या चरित्राचे लिखाण हाच करेल. पूर्वजन्मी हा आणि याचा एक मित्र कंदुकूर ह्या शहराच्या थोडयाच दूर असलेल्या मोगलीचर्ला ह्या ग्रामात जन्मले. जुगार खेळण्यात त्यांची विशेष आसक्ती होती. त्या ग्रामात एक प्रसिध्द स्वयंभू दत्ताचे देऊळ होते. हा श्री दत्त देवालयाच्या अर्चकाच्या भावाच्या रूपात जन्मास आला. मोठ्या भावाच्या अनुपस्थितीत पूजा वगैरे हाच करीत असे. दत्त देवालयाच्या प्रांगणात हा आणि याचा मित्र दोघेही जुगार खेळण्यात मग्न असत. हा किती अनाचार आहे याची त्यांना खंत नव्हती त्याच्या मित्राबरोबर एके दिवशी खेळताना त्याने विचित्र अशी अट ठेवली . त्याचा मित्र जिंकल्यास हयाने खेळात हरलेली रक्कम द्यावी

आणि हा जिंकला तर त्याच्या मित्राने आपल्या पत्नीस ह्याला द्यावे असे ठरले . या कराराला साक्ष म्हणजे हे दत्तप्रभूच आहेत असे मानून प्रमाण करून जुगार खेळण्यास सुरूवात केली. "

आपल्या समक्ष अत्यंत वाईट खेळ चालू असलेला दत्तप्रभू बघतच होते. खेळामध्ये शंकरभट्ट विजयी झाला. शंकराच्या मित्राने त्याच्या पत्नीस त्याला देण्याचे नाकारले. भांडण मोठ्या माणसांपर्यंत गेले. कुळातील सुज्ञ लोक एकत्रित जमले. पवित्र अशा दत्तप्रभूंसमोर एवढे मोठे दुष्कृत्य घडले, ही अत्यंत खेदपूर्ण घटना होती. परस्त्रीचा मोह करूनन तिला वक्रमार्गाने प्राप्त करून घेण्याची इच्छा दर्शविल्या बद्दल शंकर याच्या डोक्यावर गरम गरम तेल घालावे. तसेच खेळामधे आपल्या पत्नीस पणाला लावलेल्या ह्यांच्या मित्राला

 

नपुंसकपणा येण्यासारखे अंगछेदन करावे. असे केल्यावर त्या दोघांना ग्रामातून बहिष्कृत करावे असा न्याय सूज्ञांनी दिला. त्यांच्या न्यायाची अंमलबजावणी करण्यात आली. शंकरभट्टाने त्याच्या पूर्वजन्मी थोडाकाळ दत्त सेवा केल्यामुळे ह्या जन्मी देवभक्ति असलेला जन्म प्राप्त झाला. त्याचा मित्र सुब्बय्या या नावाने क्षौर कर्म करणाऱ्यांच्या घरी परमपवित्र अशा तिरुपती क्षेत्रात जन्मला. त्याचे मन चंचल झाल्यामुळे वेडा होऊन लग्न झाल्यानंतर पळून गेला. भोळसर असलेली सुब्बय्याची पत्नी निर्दोष आहे. तिच्या पातिव्रत्याच्या प्रभावाने सुब्बय्याच्या मनाची चंचलता कमी होऊन हे रमल शास्त्र ऐकल्याच्या दुसऱ्या दिवशी सुब्बय्या परत येईल. त्या दिवशी शंकरभट्टाची सुटका होईल. शंकरभट्टाला असलेली साडेसाती श्रीपाद श्रीवल्लभांच्या अनुग्रहाने साडेसात दिवसांतच निघून जाईल. भगवंताला साक्ष ठेऊन

 

अनुचित संकल्प केल्यास अथवा, अधर्म केल्यास दत्तप्रभूंच्याकडून कठींनातील कठीण शिक्षेस पात्र होतात. सुब्बयाच्या मन चंचलतेच्या परिहारास्तव शंकरभट्टाच्या पुण्यातील थोडा भाग खर्च झाल्याचे चित्रगुप्ताने लिहिले आहे. कर्माचा प्रभाव अत्यंत सूक्ष्म रीतिने काम करीत असतो, ह्या सत्याची जाणिव होऊन जीवाने सदैव सत्कर्मच करावे. दुष्कर्म कधीहि करू नये. श्रीपाद श्रीवल्लभांच्या जन्म पत्रिकेप्रमाणे त्यांच्या अवतार समाप्ती नंतर थोडया शतकांनी त्रिपुर देशातील अक्षयकुमार या नावाच्या जैन मतस्थाकडून श्री पीठिकापुरत श्री प्रभूंची माहिती पोहोचेल. त्या अगोदर विलासांची माहिती देणारे 'श्रीपाद श्रीवल्लभ चरित्रामृत ' या नावाचा ग्रंथ प्रकाशीत होईल."

श्रीवल्लभांच्या करुणेचे वर्णन कसे करावे ? दुसऱ्या दिवशीच सुब्बय्या स्वगृहास परतला. त्याच्या मनाचे चंचलत्व पूर्णपणे मिटून तो स्वस्थचित्त झाला होता. सुब्बयाच्या पत्नीस मी माझी बहिण मानले. सुब्बय्याच्या माता-पित्याची परवानगी घेऊन मी चित्तूर जिल्हयातील काणिपाकं ग्रामास पोहोंचलो.

काणिपाकं हे ग्राम चित्तूरहून थोडयाच अंतरावर आहे. त्या ग्रामात वरदराज स्वामींचे देऊळ,मणिकंठेश्वर स्वामींचे देऊळ, वरसिध्दी विनायकाचे देऊळ आहे. मी देवदर्शन घेऊन बाहेर आलो. तिथे एक उंच कुत्रे उभे होते. मला भीती वाटून मी वरसिध्दिविनायकाच्या देवळात परत गेलो. थोडावेळ देवाचे ध्यान करून बाहेर आलो. त्या कुत्र्याबरोबर अजून एक कुत्रा तेवढयाच उंचीचा होता. आज ह्या

 

कालभैरवाकडून चावणे हे निश्चितच आहे अशी भीति वाटली. परत वरसिध्दिविनायकाच्या मंदिरात गेलो. मंदिरातील पुजाऱ्याला माझे वर्तन विचित्र वाटले. "बाबा तू घटके घटकेला बाहेर जाऊन परत मधे येतो आहेस याचे कारण काय ?" असे त्याने विचारले. मी माझ्या भीतीचे कारण सांगितले. "ते निष्कारण कोणाला कांही इजा करित नाहीत. ते एका धोब्याचे पाळीव कुत्रे आहेत. तो धोबी दत्तभक्त आहे. श्रीपाद श्रीवल्लभ या नामाने श्रीदत्तांनी या भूमीवर अवतार घेतला आहे, असे तो सांगत असतो. धोब्यांना देवालयात प्रवेश निषिध्द नाही, तरी सुध्दा तो या देवळामधे येत नाही. त्याच्या कुत्र्यास पाठवतो . मी स्वामींच्या प्रसादाचे गाठोडे बांधुन देतो. ते घेऊन ते

त्याला देतात. तू दोनच कुत्रे पाहिले असे सांगितलेस. एकूण चार कुत्रे आल्यावरच मी प्रसाद देतो. अजून दोन कुत्रे आले का ते पाहू या" असे तो पुजारी म्हणाला. आम्ही बाहेर येईपर्यंत चार कुत्रे होते. पुजाऱ्यांनी प्रसादाचे गाठोडे करून दिले. ते चारी कुत्रे माझ्या चारी बाजुंनी आले आणि त्यानी मला घेरले. पुजारी म्हणाला "कुत्र्यांच्या मर्जीप्रमाणे तू त्या धोब्याकडे जा. तुला शुभकारकच होईल."

माझ्या जीवनातील प्रत्येक घटना श्रीपाद श्रीवल्लभांच्या निर्देशानेच घडत असते असा माझा विश्वास होता. सुब्बय्याच्या घरात घडलेल्या घटने वरून कुळ, मत भेद नसावा असे मला वाटले. एक चांडाळ ब्राह्मणकुळात जन्म घेऊ शकतो. या जन्मातील ब्राह्मण दुसऱ्या

जन्मात चांडाळ रूपाने जन्म घेऊ शकतो. मानव आपण केलेल्या पापपुण्याचे गाठोडे घेऊन जन्मजन्मांतराच्या कर्म प्रवाहात वाहत जात असतो

## शंकरभट्ट आणि तिरुमलदासांचा संवाद

मी धोब्याच्या राहत्या गल्लीत आलो. तिरुमलदास असे नाव असलेला तो रजक 70 वर्षाचा म्हातारा होता. तो त्याच्या झोपडीतून बाहेर आला. मी घरात गेल्यावर त्याने मला एका पलंगावर बसवले. ब्राह्मणजन्माचा माझा अहंकार पूर्णपणे गेला होता. श्रीपाद श्रीवल्लभांचे भक्त कोणीही असले तरी मला आत्मियांसारखेच दिसत होते. वरसिध्दिविनायकाच्या देवळातील प्रसाद तिरुमलदासाने मला खाण्यास दिला. मी प्रसाद ग्रहण केला. नंतर तिरुमलदासाने सांगण्यास सुरुवात केली.

# आइनविल्लिचे गणपतीच श्रीपाद श्रीवल्लभ म्हणून अवतरले

ते म्हणाले ''बाबा ! आजचा दिवस माझ्या अत्यंत भाग्याचा आहे ! आपल्या दर्शनाचा लाभ घडला. तुम्ही माझ्याकडे कधी याल, माल्याद्रीपुराचे आणि श्रीपीठिकापुर येथील विशेष वार्ता कधी सांगाल याची उत्सुकतेने वाट पाहातो आहे. बाबा ! शंकरभट्टा ! वरसिध्दि विनायकाचा प्रसाद घेतलास. तू आजच्या दिवशीच श्रीपाद श्रीवल्लभांच्या चरित्रामृताचा श्रीगणेशा कर. तुला श्रीवल्लभांचा आशिर्वाद कुरवपुरात लाभेल. तिरुमलदासाने ह्याचा पूर्व वृतांत सांगायला सुरुवात केली. मी पूर्वजन्मी एक प्रतिष्ठित वेद पंडित होतो. परंतु परमलोभी होतो. माझ्या मृत्यूसमयी नुकतेच जन्मलेले

 

गाईचेवासरू जुन्या चिंधिस चघळताना पाहून त्यास जपून ठेवण्यास मुलांना सूचना दिली. मरतेवेळी मलिन वस्त्रावर नजर ठेऊन मी प्राणत्याग केला त्यामुळे रजकाच्या जन्मास आलो. मरतेवेळी ज्या संकल्पाने प्राणत्याग होतो त्याला अनुसरून त्याला दुसरा जन्म मिळतो. माझ्या पूर्वपुण्याईनेच गर्तपुरी (गुंटुरू) मंडळातील पल्यनाडू प्रांतातील माल्याद्रीपुरात मी जन्मलो. तेच मल्याद्रीपुर कालांतराने मल्लादि या नावाने ओळखले जाऊ लागले. त्या ग्रामात मल्लादि नावाची दोन घराणी होती. मल्लादि बापन्नावधानि या नांवाचे महापंडित हरितस गोत्राचे होते. मल्लादि श्रीधरअवधानी या नांवाचे महापंडित कौशिक गोत्रीक होते. श्रीधरअवधानी यांची बहिण राजमांबा हिचा विवाह

बापन्नावधानी यांच्या बरोबर झाला. गोदावरी मंडलांतर्गत असलेल्या "आइनविल्लि" या ग्रामात झालेल्या गणपती महायागास दोघेही गेले होते. शास्त्राप्रमाणे शेवटच्या आहुतीचा गणपती आपल्या सोंडेत स्विकार करील आणि आपले स्वर्णकांतीयुक्त स्वरूपाचे दर्शन देईल असे पंडितांचे मत होते. यज्ञाच्या शेवटी स्वर्णमयकांतीने गणपतीने दर्शन दिले. शेवटची आहुती आपल्या सोंडेत घेतली आणि मी स्वत: संपूर्ण कलेने गणेशचतुर्थीच्या दिवशी श्रीपाद श्रीवल्लभ रूपाने अवतार घेईन असे वचन दिले. यज्ञास आलेले सगळेच लोक आश्चर्यचकित झाले. त्या सभेत तिघे नास्तिक होते. ते म्हणाले, "दिसते ते सगळेच इंद्रजाल आहे की महेंद्रजाल आहे, पण गणपती मात्र नाही. तसे

 

असलेच तर परत एकदा त्याचे दर्शन घडवून आणावे."

## काणिपूर विनायकाचा महिमा

होमकुंडातील विभूतीने मानवाचा आकार घेतला. त्यानंतर ती महागणपती स्वरूपात रूपांतरित झाली. ते रूप बोलु लागले. "मुर्खानो ! त्रिपुरासुराच्या वधाच्या वेळी शिवाने, बलिचक्रवर्तीचा निग्रह करण्यापूर्वी तसेच शिवाचे आत्मलिंग घेऊन जाणाऱ्या रावणास विरोध करते वेळी भगवान विष्णुने, महिषासुराचा वध करण्याच्या समयी पार्वतीने, भूभार घेण्यापूर्वी आदिशेषाने, सर्व सिध्दी सिध्द होण्यापूर्वी सिध्दमुनींनी, प्रंपचावर विजय साधण्याच्या निमित्ताने मन्मथाने, याच प्रमाणे सकल देवतांनी माझी आराधना करूनच अभीष्ट प्राप्त केले. सगळया शक्तींचे

 

मीच भांडार आहे. मी सर्वशक्तिमान आहे, राक्षस शक्ति सुध्दा माझ्यामध्येच आहे. सर्व विघ्नकर्ता मीच, सर्व विघ्नहर्ता सुध्दा मीच आहे. दत्तात्रेय म्हणजे कोण समजलात ? हरिहर पुत्र असलेला धर्मशास्ता तोच. विष्णुरूपात ब्रह्मारुद्र रूप विलीन झाले तेच दत्तरूप होय. धर्मशास्तारूपात गणपती, षण्मुख रूप विलीन झालेले हे रूप सुध्दा दत्तरूपच आहे. दत्तात्रेय हे सर्वकाळ त्रिमूर्ति स्वरूपच असतात. श्रीपाद श्रीवल्लभ रूपात महागणपती असल्याने गणेशचतुर्थीच्या दिवशीच त्यांचा अवतार होईल. त्यांच्या मधे सुब्रह्मंण्याचे तत्त्व असल्याने ते केवळ ज्ञान अवतार म्हणून ओळखले जातील. धर्मशास्ता तत्त्वामुळे ते रूप समस्त धर्म, कर्माचे आदि, आणि मूळ असे समजले जातील. हा अवतार माता-पित्याच्या संयोगाचे फळ नसेल. ज्योतिस्वरूपच मानवाकृतीचे रूप घेईल."

श्री गणपती पुढे म्हणाले मी तुम्हाला शाप देत आहे. सत्यस्वरूप पाहुन सुध्दा ते असत्यआहे असे म्हणालात, त्यामुळे तुमच्या पैकी एक आंधळा जन्मेल. सत्यस्वरूपाची प्रशंसा न करता टिंगल केल्यामुळे तुमच्या पैकी एक मुका जन्मेल. एवढा जनसमुदाय निजभक्त , त्या सत्याच्या बाबतीत सांगत असता दुर्लक्ष करून न ऐकल्यामुळे तुमच्यापैकी एक बहिरा जन्मेल. तुम्ही तिघे बंधुरूपाने जन्माल. माझ्या स्वयंभू मूर्तीचे दर्शन घेतल्यावरच तुम्ही दोषरहित व्हाल.

बाबा ! ते तिघेही या काणिपुरात भावंडाच्या रूपात जन्मले. त्रिमूर्तिना दूषण दिल्यास, घोर अनर्थ होतो. ही तीन भावंडे, एक एकर जमिनीत, याच ग्रामात उत्पन्न काढीत असत. त्या शेतात पायथ्याला एक विहीर होती.

मोटेच्या सहाय्याने पिकांना पाणी देण्याची सोय केली होती. एका वर्षी दुष्काळ पडला. जमिनीतील पाणी वाळून गेले. एके दिवशी विहिरीत असलेले पाणी सारे खर्च झाले, फावडा घेऊन तिघेही वाळू काढण्याच्या प्रयत्नात होते. त्या पाण्याखालील भागात असलेल्या दगडावर फावडा लागुन रक्ताचा फवारा वर आला. रक्त हाताला लागल्याने मुक्याला वाचा फुटली. पाणीसुध्दा विहीरीत यथाविधी भरू लागले. पाण्याच्या स्पर्शाने बहिऱ्याचा दोष गेला. तिसऱ्या आंधळयाने त्या पाण्यातील दगडाला स्पर्श केल्यामुळे त्याचे अंधत्व नाहीसे झाले. त्या स्वयंभू विनायकाच्या दगडी मूर्तीच्या डोक्यावर फावडा लागून रत्तच्स्रावास आरंभ झाला. ती स्वयंभू मूर्ती बाहेर काढण्यात आली.

त्या वरसिध्दी विनायकाची प्रतिष्ठापना करण्यास सत्यऋषिश्वर असे नामांतर झालेले बापन्नावधानी आणि त्यांचा मेव्हणा श्रीधरावधानी या ग्रामास आले होते. वरसिध्दी विनायक त्यांना म्हणाले. "महाभूमी मधून या लोकात आलो. पृथ्वीतत्त्वावर अवतार घेतला. हे तत्त्व कालांतराने अनेक रूपांत रूपांतर होईल. जलतत्त्वात, अग्नीतत्त्वात, वायुतत्त्वात, आकाशतत्त्वात माझे अवतरण झालेलेच आहे. आइनविल्ली मधे तुम्ही केलेल्या महायज्ञातील भस्मानेच हे रूप धारण केले. नंतरच्या कर्तव्याचे आदेश देतो. श्रीशैल्यामधे कळा कमी आहे. सूर्यमंडळातील तेजाचा तेथे शक्तिपात केला पाहिजे. तुम्ही श्रीशैल्यामधे शक्तिपात केल्याच्या दिवशीच गोकर्णामधे, काशीमधे, बदरीमधे, केदारामधे, एकाच वेळी माझ्या विशेष अनुग्रहाने शक्तिपात होईल. श्रीपाद श्रीवल्लभांच्या अवतरणाचा

समय निकट येत आहे. श्रीधरा तुझ्या घरचे नांव श्रीपाद म्हणून बदलत आहे. कौशिक गोत्रिक तुमचे वंशज आजपासून श्रीपाद या अडनावाने ओळखले जातील."

बाबा ! शंकरा ! मल्यादिपुरातून सत्य ऋषिश्वर आणि श्रीधर पंडित पीठिकापुरत निवास करण्यास गेले. मी श्रीपाद श्रीवल्लभांच्या अनेक बाललीला पाहिल्या. उद्या मी तुला त्या सविस्तर सांगेन. माझ्या पहिल्या बायकोपासून मला एक मुलगा झाला. त्याचे नांव रविदास आहे. तो कुरवपुरात राहात आहे. श्रीपादांची यथामतीने सेवा करीत असतो. मी श्रीपाद प्रभूंच्या आज्ञेनुसार काणिपुरातच दुसऱ्या पत्नी आणि मुलाबरोबर कुलवृत्तीला अनुसरून रहात आहे.

 

तू श्री पीठिकापुरात अनेक महानुभावांना भेटशील. वेंकटप्पय्या श्रेष्ठी नावाच्या व्यक्तीस भेटशील तेंव्हा अनेक महत्वाच्या विषया बद्दल माहिती मिळेल. श्री श्रेष्ठींना श्रीपाद प्रभु, वेंकटप्पय्या श्रेष्ठी या टोपण नावाने हाक मारीत असत. श्री श्रेष्ठींच्या वंशावर श्रीपादांचा अभयहस्त आहे. वत्सवाई असे उपनाम असलेल्या नरसिंह वर्मांना सुध्दा भेट. त्यांचा श्रीपादांशी घनिष्ट संबंध आहे. तुझ्याकडून रचल्या जाणाऱ्या श्रीपादांच्या चरित्रास श्रीचरणांचा आशिर्वाद लाभेल. तू लिहीलेल्या ग्रंथाखेरीज दुसरा कोणताही ग्रंथ श्रीपादांचे चरित्र संपूर्ण रीतिने माहिती देणारा असणार नाही, ही श्री चरणांची आज्ञा आहे.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जयकार ॥**

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

## अध्याय -6

## **नरसावधानींचे वृत्त**

दुसऱ्या दिवशी सकाळी जपध्यानादि पूर्ण झाल्यावर तिरुमलदास म्हणाले. "बाबा ! श्रीपाद श्रीवल्लभ या चराचर सृष्टीचे मूल आहेत. ते वटवृक्षासारखे आहेत. त्यांचे अंशावतार सगळेच विविधता असलेल्या पारंब्या प्रमाणे आहेत (झाडातून निघालेले मूळ). तेच मूळ परत भूमीमध्ये जाऊन स्वतंत्र तत्त्व असल्यासारखे दिसते, परंतु त्यांना आधार वटवृक्षच असतो. देवदानवापासून समस्त प्राणिमात्रांना त्यांचाच आधार आहे.

त्यांच्याकडूनच समस्त शक्तींना आश्रय प्राप्त होतो. पुनरपि त्या शक्ति त्यांच्यातच विलीन होत असतात. पर्वत शिखरावर पोहोचलेल्या व्यक्तीस सगळया वाटा एक सारख्याच वाटतात. त्याच प्रमाणे सगळया प्रकारच्या सांप्रदायाचे लोक दत्ततत्त्वामधेच समन्वय पावतात. प्रत्येक प्राणीमात्रास कांतीचे एक वलय असते. मी पीठिकापुरत रहात असताना तेथे एक योगी आला. तो विग्रहाच्या कांतीवलया बद्दल माहिती सांगत असे. त्याला व्यक्तीची कांती कोणत्या रंगाची असून किती दूरवर व्यापून आहे ते सांगता येत असे. त्याने श्री कुक्कुटेश्वरालयात येऊन स्वयंभू दत्ताची सूक्ष्मकांती किती दूर व्यापून आहे आणि कोणत्या रंगाची आहे, ह्याची परिक्षा करण्याचे ठरविले त्या योग्यास स्वयंभू दत्ताच्या ठिकाणी श्रीवल्लभांचे दर्शन झाले. त्यांच्या मस्तकाच्या भोवताली विद्युल्लतेच्या तुलनेची

धवलकांती अप्रतिमपणे व्यापून होती. त्या धवल कांतीच्या भोवती खालच्या भागात व्यापून असलेल्या निळया रंगाच्या कांतीचे त्यास दर्शन झाले. ती मूर्ति त्या योग्यास बघून म्हणाली, "बाबा ! दुसऱ्यांचे सूक्ष्म शरीर किती दूर व्यापलेले आहे याची माहिती काढण्याच्या प्रयत्नात अमूल्य जीवन काळ व्यर्थ घालवू नकोस. प्रथम तुझ्या हिताचा विचार कर. थोडयाच दिवसात तुझा मृत्यू होणार आहे. सद्गति संपादन करण्याचा विचार कर. सर्व सत्यांचा, सर्व तत्वमूलांचा मूल असलेला दत्त मीच आहे. ह्या कलियुगांत पादगया क्षेत्रात महासिध्दपुरुषांच्या, महायोग्यांच्या, महाभक्तांच्या प्रेमभरित आव्हानानेच मी येथे अवतार घेतला आहे."

स्वामींच्या या उपदेशाने त्याच्यातील पूर्व वासनांचा नाश झाला. सूक्ष्म शरिराच्या कांतीची माहिती मिळविण्याची

त्याची शक्ति श्रीवल्लभांतच विलीन झाली, तो श्रीवल्लभांचे त्यांच्याच स्वगृहात दर्शन घेऊन धन्य झाला. स्वच्छ अशी धवलकांती असलेले श्रीवल्लभ निर्मळ असून, संपूर्ण योगावतार आहेत. निळया रंगाची कांती असणारे श्रीप्रभू अनंत प्रेमाने, करुणेने भरलेले आहेत आणि ह्या गुणांचे हे रंग निदर्शक आहेत.

त्या योग्याची विश्रांती झाल्यावर श्रध्दापूर्ण चर्चा सुरू झाली. चतुर्वर्ण विभाग असलेल्या सुक्ष्म शरीराच्या कांतीचा भेददृष्टया निर्णय घ्यावा कां ? किंवा जन्मसिध्द कुलगोत्राच्या दृष्टीने निर्णय घ्यावा ? कोणत्या वर्णाचा जन्म असला तर वेदोक्त पध्दतीने उपनयन करावे ? कोणत्या वर्णाच्या लोकांचे शास्त्रोक्त म्हणजे पुराणोक्त उपनयन करावे ? उपनयनात भृकुटी मध्ये असलेल्या तिसऱ्या डोळयाचा संबंध असतो कां ?

 

नसेल तर कांही विशेष आहे कां ? मेधावी लोक म्हणजे काय ? अशी चर्चा बराच वेळ गरम गरम चालली होती परंतु पंडितांचे मतैक्य होत नव्हते.

सत्यऋषिश्वर या नावाचे मल्लादि बापन्नावधानी "पीठिकापुर ब्राह्मण परिषदेंचे" अध्यक्ष होते. त्यांना बापन्ना आर्य असे सुध्दा लोक श्रध्देने म्हणत असत. ते मुख्यतः सूर्याची, अग्निची उपासना करीत. पीठिकापुरत झालेल्या एका यज्ञाचे अधिपत्य करण्याची त्यांना विनंती केली होती. यज्ञाच्या शेवटी कुंभवृष्टी झाली, अर्थात वर्षा झाली. सकल जन समुदाय आनंदला. श्री च्छवाई नरसिंह वर्मा या नावाच्या क्षत्रिय गृहस्थानी श्री सत्यऋषिश्वरांना त्यांच्या गावात रहावे अशी विनंती केली. परंतु यज्ञयागात मिळालेले धन शिधा तेवढेच श्रीबापन्ना आर्य घेत असत. त्या द्रव्यास शुध्दी नसेल

 

तर ते स्वीकार करीत नसत. श्री वर्मांच्या विनंतीस त्यांनी नकार दिला, श्री वर्मांची अत्यंत प्रिय असलेली कपिला गाय होती. तीचे नांव गायत्री असे होते. ती भरपूर दुध देत असे. ती अत्यंत सुशील आणि साधु स्वभावाची होती. एकदा गायत्री दिसेनासी झाली. कुठेतरी हरवली. रस्ता विसरली असे वर्तमान श्री वर्मांना कळाले. श्री बापन्ना आर्य ज्योतिष शास्त्राचे पंडित असल्याने वर्मांनी त्यांना गायत्रीच्या क्षेम-कुशला संबंधी प्रश्न केला. तेंव्हा "श्यामलांबापुरम् (सामर्लकोटा) मध्ये खानसाहेब नावाचा कसाई आहे. त्याच्याकडे ती आहे. लगेच न गेल्यास तिचा वध होण्याची भीती आहे बापन्ना आर्य म्हणाले. वर्मांनी शामलांबापुरास मनुष्यास पाठवण्याच्या प्रयत्नात बापन्ना आर्यांना एक अट घातली. बापन्ना आर्यांच्या वचनानुसार गायत्री मिळाली तर, वर्मांनी तीन एकर भूमी, निवासास योग्य असे घर बापन्नाआर्यांना

त्यांच्या पांडित्याचा बहुमान म्हणून द्यावे. बापन्ना आर्यांनी त्याचा अंगिकार न केल्यास गोहत्येचे पातक प्राप्त होईल. बापन्ना आर्य संकट स्थितीत पडले. त्यांनी हे दान जर नाही घेतले तर, वर्मा त्या गाईची हत्या होऊ देतील. त्यामुळे गोहत्येचे पातक लागेल. गोहत्या पातकापेक्षा पंडित बहुमानाचा स्विकार करणेच श्रेयस्कर ठरले आणि गायत्रीची रक्षा झाली. पीठिकापुरवासियांचे नशीब उघडले. श्री बापन्नावधानी तीन खंडी धान्य देणाऱ्या भूमीचे मालक झाले. त्यांना निवसासाठी घराची व्यवस्था झाली. श्री बापन्ना आर्यांना वेंकटावधानी नावाचा मुलगा व सुमती नावाची मुलगी झाली. तिच्या जन्मपत्रिकेत सर्व शुभ लक्षण असून ती चालते वेळी महाराणीस लाजवील अशी चाल आणि लचक असल्या कारणाने सुमती महाराणी असे तिचे नामकरण झाले.

 

श्रीबापन्ना आर्यांची कीर्ति थोडयाच काळात दाही दिशांना पसरली. घंडिकोटा अडनावाचा अप्पललक्ष्मी नरसिंहराज शर्मा नावाचा भारद्वाज गोत्री, अपस्तंभ, वैदिकशाखेचा एक बालक पीठिकापुरांत आला. त्यांच्या घरी कालाग्निशमन नावाने ओळखली जाणारी दत्ताची मूर्ति होती. ती दत्तमूर्ति पुजेच्या वेळी स्पष्ट बोलत असे. आदेश सुध्दा देत असे. लहाणपणीच अप्पल राजू शर्माचे मातृ -पितृ छत्र हरवले असल्याने तो पोरका झाला होता. पूजा समयी कालाग्निशमनाने "तू पीठिकापुरत जाऊन हरितस गोत्रिक, अपस्तंभ सूत्राच्या वैदिक शाखेचे मल्लादि बापन्नावधानी यांच्या कडे विद्याभ्यास करावा" असा आदेश दिला. श्री बापन्ना आर्यांनी दत्ताच्याआदेशानुसार आपल्या घरी विद्यार्थी म्हणून आलेल्या राजशर्मास माधुकरी न मागू

देता, आपल्याच घरात भोजनाची व्यवस्था केली. श्री बापन्ना आर्य शनिप्रदोष समयास शिवाराधना करीत असत. घरातील स्त्रिया शनिप्रदोषादिवशी शिवाचे व्रत करीत असत. पूर्वीच्या काळी नंदयशोदेने शनिप्रदोष, शिवाराधना केल्यामुळेच साक्षात् श्रीकृष्णाचे लालन पालन करण्याचा सुयोग घडून आला. बापन्ना आर्याबरोबर सुदैवाने श्री नरसिंह वर्मा, श्री वेंकटप्पैय्या श्रेष्ठी, आणि थोडे प्रमुख वैश्य लोक सहभागी होत.

# श्री कुक्कुटेश्वर स्वामींच्या मुखातून निघालेली वाणी

# सुमती आणि अप्पलराजुचा विवाह

एके वेळी शनिप्रदोश शिवाराधना झाल्या नंतर, श्री कुक्कुटेश्वराच्या शिवलिंगामधुन विद्युत्कांति प्रकाशत होती. त्यावेळी त्यातून वाणी झाली. "बाबा ! बापनार्या, नि:संदेहपणे तुझी मुलगी सुमती महाराणीस अप्पलराजु शर्मास देऊन विवाह कर, त्यामुळे लोककल्याण होईल. हा दत्तप्रभूंचा निर्णय आहे. ह्या महानिर्णयाचे उल्लंघन करण्याचा ह्या चराचर सृष्टीमध्ये कुठल्याही व्यक्तीस अधिकार नाही." ही देववाणी वेंकटप्पया श्रेष्ठीला नरसिंह वर्माला, तेथे असणाऱ्या सर्व जन समुदायास ऐकण्यात आली. सगळे आश्चर्यचकित झाले.

 

गोदावरी मंडलांतर्गत आइनविल्ली ह्या गावातील राजवर्मांचे बंधुमित्र परिवारास वर्तमान पाठवले. विवाहाचा निर्णय झाला. राजशर्माला घरदार नव्हते. त्यामुळे थोडा विचार चालला होता. श्री वेंकटप्पा श्रेष्ठी म्हणाले, "मला पुष्कळ घरे आहेत त्यापैकी एखादे मी राजशर्मास देईन." राजशर्मा दान घेण्यास तयार नव्हते. श्री श्रेष्ठींनी राजशर्मांच्या सोयऱ्यांबरोबर बोलून राजशर्माला मिळणाऱ्या वडिलोपार्जित गृहभागाची किंमत लावली. ती एक वराह (जुन्या काळातील नाणे) ठरविली गेली. श्री श्रेष्ठींच्या घराची किंमत बारा वराह निश्चित केली. अकरा वराह देण्यास माझ्याकडे एक पै पण नाही असे राजशर्मा म्हणाले. तसे असेल तर मी माझ्या घराची किंमत 1 वराह मात्रच ठरवून विकतो."दान घेण्यास तुम्हास संकोच असेल तर 1 वराह मला देऊन हे घर विकत घ्या" असे श्रेष्ठी म्हणाले. श्रेष्ठीनी जे सांगितले

ते धर्मसम्मत आहे असा सगळयांनी होकार दिला. श्री सुमती महाराणी आणि श्री अप्पल लक्ष्मी नरसिंह शर्मा यांचा विवाह महापंडितांच्या वेदघोषाने, मंगल वाद्याच्या गजरात मोठ्या थाटामाटात पार पडला. श्रीपाद श्रीवल्लभांचा अवतार अज्ञानाच्या अंधकाराला दूर करण्यासच झाला आहे. त्या कारणाने श्री प्रभूंनी कालदेवतेला, कर्मदेवतेला शाप दिला. त्या शापास अनुसरून अज्ञानांधकाराचे प्रतिक स्वरूप जन्मांध शिशु, आणि अप्राकृतिक प्रगतिचे स्वरूप दर्शविणारे लंगडे बालक अशी दोन बालके राजशर्मास प्राप्त झाली. आपली दोन्हि मुले अशा रीतिने अपंग असल्याने सुमति आणि राजशर्मा अत्यंत दु:खी होते. आइनविल्लि गावांत एक प्रसिध्द विघ्नेश्वराचे देऊळ आहे. श्रीराज शर्मा यांच्या दु:खाचा परिहार करण्यासाठी त्यांचे नातेवाईक

तेथील महाप्रसाद पीठिकापुरात घेऊन आले. सुमती आणि राजशर्मांनी तो प्रसाद आदराने घेतला. त्या दिवशीच रात्री सुमती महाराणीला स्वप्नात ऐरावताचे दर्शन झाले. नंतर काही दिवस शंख, चक्र, गदा, पद्म, त्रिशूल, विविध देवतेचे, ॠषींचे , सिध्दपुरुषांचे, योग्यांचे अशी अनेक दर्शने तिला स्वप्नात होत होती. कांही दिवसांनी जागृतास्थेत सुध्दा तिला दिव्य दर्शन होऊ लागले. डोळे झाकले कि पडद्यावरील चित्रपटासारखे दिव्यकांतीमय तपसमाधीत मग्न असलेले योगी, मुनी, अद्भुत दर्शन देत.

 

# देवतांचे जन्मनक्षत्र आणि सुमतीच्या प्रसवसमयाचे नक्षत्रात असलेला संबंध

सुमती महाराणीने आपल्या पित्यास दिव्य अनुभवाबद्दल सविस्तर सांगितले. ते म्हणाले, "ही सर्व लक्षणे महापुरुषाच्या जननाचे शुभसूचक आहेत." सुमती महाराणीचे मामा श्रीधर पंडित म्हणाले "बाई ! सुमती ! रवि (सूर्य) चे जन्मनक्षत्र विशाखाचा आणि श्रीरामावताराचा संबंध आहे. कृतिका हे चंद्राचे जन्मनक्षत्र आहे. ह्याचा आणि श्री कृष्णावताराचा संबंध आहे. पूर्वाषाढा या नक्षत्रावर जन्मलेल्या अंगारकाचा श्रीलक्ष्मीनरसिंह अवताराशी संबंध आहे. श्रवण नक्षत्रावर जन्मलेल्या बुधाचा, बुध्दावताराशी संबंध आहे. पूर्वाफाल्गुनी नक्षत्रावर जन्मलेल्या गुरुचा विष्णुअंशाशी संबंध आहे. पुष्य नक्षत्रावर जन्मलेल्या शुक्राचा

 

भार्गवरामाशी संबंध आहे. रेवती नक्षत्रावर जन्मलेल्या शनिचा कुर्मावताराबरोबर संबंध आहे. भरणी नक्षत्रावर जन्मलेल्या राहूचा वराह अवताराशी संबंध आहे. आश्लेषा नक्षत्रावर जन्मलेल्या केतुचा, मच्छावताराशी संबंध आहे. तू मला प्रश्न केलेला समय दैवी रहस्याशी संबंधित आहे. कोटयावधी ग्रहांना, नक्षत्रांना ब्रह्मांडाच्या स्थिती गतीला निर्देश देणारे दत्तप्रभूच जन्मास येतील असे मला निश्चित वाटते."

## दत्तप्रभु हे नित्य वैभव विभूति

आपले दिव्य अनुभव आणि श्रीधर पंडित यांचे मत सुमती महाराणीने राजशर्मास सांगितले. तेव्हा राजशर्मा म्हणाले, "मी पूजा करते समयी कालाग्नीशमन दत्तांना विचारतो. कालाग्नीशमन दत्तात्रेयांची पूजा होत असता

कोणत्याहि माणसाने ती पाहू नये असा नियम आहे. पूजेनंतर दत्त प्रभु मानवाच्या रूपात समोर बसून बोलतात. नंतर परत त्या मूर्तिमध्ये विलीन होतात, हा रोजचा आमचा नियम आहे. सामान्य विषय किंवा स्वार्थभरित समस्या आम्ही दत्ताला निवेदन करीत नाही." त्या दिवशी पूजे समयी दत्तमहाराज प्रसन्न होते. पूजेनंतर ते मानवी रूपात समोर बसले आणि श्रीधरा ! या ! असे बोलविले. दत्तमूर्तीमधून एक रूप बाहेर पडले आणि त्यांच्या समोर ध्यानस्थ बसले. परत आपल्या बोटाने संकेत करीत श्रीधरा ! या ! असे म्हणाले. तत्काळ ते रूप त्यांच्यातच विलीन झाले. राजशर्माला हे सगळेच आश्चर्यजनक होते. श्रीदत्तप्रभू म्हणाले, "तू आता पाहिलेले रूप येणाऱ्या शताब्दीतील येणारा एकुलता एक अंशावतारच आहे. माझ्यात लीन झालेल्या

जीवनमुक्ताना सुध्दा मी बोलावताच यावे लागते. आणि जा अशी आज्ञा झाल्यास पडद्याआड झाल्यासारखे जावे लागते. माझ्या आज्ञेचे पालन करणे त्यांना चुकतच नाही. माझ्या लीला विभूति केवळ भूमिवरच परिमित नाहीत. हे ब्रह्मांड सारेच माझ्या हातातील खेळण्याच्या चेंडुसारखे आहे. मी एका पायाने लत्ताप्रहार केल्यास कोटयावधी योजने पार करतो. मी जन्म मृत्यूच्या अतीत आहे, असे म्हणत श्री प्रभूनी राजशर्माच्या भूमध्यांत स्पर्श केला. लगेच राजशर्माला पूर्वजन्माची स्मृति झाली. त्याने एका युगात विष्णुदत्त या नावाने जन्म घेतला असून त्याची पत्नी सुमतीने सोमदेवम्मा नावाने जन्म घेतला होता असे ज्ञात झाले. श्री दत्तमहाराज पुढे म्हणाले, मी दत्त या रूपाने

 

दर्शन देऊन तुमची काय इच्छा आहे असे विचारले होते. त्यावेळी पितृश्राध्दाच्या दिवशी जेवायला यावे अशी विनंती तुम्ही केली होती. सूर्याग्नि बरोबर मी श्राध्दाचे जेवण केले. तुमच्या पितृदेवतांना शाश्वत ब्रह्मलोकांची प्राप्ति करून दिली. मी श्रीपाद श्रीवल्लभ या नावाने अवतार घेऊन गेल्या 100 वर्षापासून ह्या भूमीवर योग्यांना, महापुरुषांना दर्शन देतच आहे. पीठिकापुरत सवितृकाठक चयन (होम) भारद्वाज महार्षिने त्रेतायुगात केला होता. तेव्हाचे त्या होमाचे भस्म पर्वतासारखे जमून बसले. कालांतराने ते भस्म द्रोणागिरी पर्वतावर शिंपडले गेले. मारूती द्रोणागिरी पर्वत घेऊन जात असताना एक छोटा भाग गंधर्वपुरात (गाणगापुर) पडला. गंधर्वनगर भीमा, अमरजा पवित्र नद्याचा

 

संगम प्रदेश आहे. श्रीपाद श्रीवल्लभांच्या अवातर समाप्तिनंतर मी मीनअंश, मीन लग्नावर करंज नगरीत शुक्ल यजुर्वेदीय वाजसनेय माध्यंदिन शाखेत, नृसिंहसरस्वती या नांवाने जन्म घेऊन, गंधर्वनगरात अनेक लीला करीन. श्री शैल्यातील कर्दळीवनात 300 वर्ष तपोसमाधी नंतर, स्वामी समर्थ ह्या नांवाने प्रज्ञापुरात निवास करीन. जेव्हा शनि मीनेत प्रवेश करेल तेव्हा त्या शरिराचा त्याग करिन."

दत्तप्रभुंचे हे वरील वक्तव्य राजशर्माने आपल्या धर्मपत्नीस सांगितले. त्यावेळी सत्यऋषिश्वर बापनार्य म्हणाले "बाबा ! राजशर्मा ! तुझ्या पूर्वीच्या युगातील जन्मात श्री दत्तप्रभूंना, सूर्याला, अग्निला श्राध्द भोजन दिलेला तू पुण्यात्मा आहेस. ह्या जन्मात कोणत्याहि

रूपांत दत्तमहाराज भोजन द्या असे विचारतील, तो दिवस पितृश्राध्दाचा असला तरी कसलाही विचार न करता ब्राह्मण जेवायच्या अगोदरच श्री दत्ताने भोजन विचारले तर जरूर वाढावे." बाई सुमती ! ही गोष्ट लक्षात ठेव ."

बाबा ! शंकरभट्टा ! दत्तप्रभुंच्या लीला अलौकीक आहेत. आतापर्यंत कधीही न ऐकलेल्या आणि अपूर्व आहेत. महालया अमावस्येचा दिवस होता. राज शर्मा पितृश्राध्दाच्या तयारीत होते. दारा समोर "भवति भिक्षांदेही" असा आवाज ऐकला आणि त्या अवधूताला सुमती महाराणीने भिक्षा घातली. काही मागणे माग, असे म्हणणाऱ्या अवधूताला सुमती म्हणाली. "बाबा आपण अवधूत आहात. आपले वाक्य म्हणजे सिध्दवाक्यच आहे. श्रीपाद श्रीवल्लभांचा अवतार

 

लवकरच या भूमीवर होईल असे विद्वान लोक सांगतात. दत्तप्रभू आता कोणत्या रूपात संचार करीत आहेत?

या शंभर वर्षापूर्वीपासून ह्या भूमिवर श्री दत्तप्रभू श्रीपाद श्रीवल्लभ या रूपात फिरत आहेत असे ज्ञातहोत आहे. आपण मला "काहीतरी माग" असे म्हटलेत. मला श्रीपाद श्रीवल्लभांचे रूप पहाण्याची फार तीव्र इच्छा आहे."

## श्रीपाद श्रीवल्लभांचा अविर्भाव (प्राकटय)

हे शब्द ऐकून त्या अवधूताने भुवने दणाणून जाण्यासारखे, भूकंप आल्यासारखे विकट हास्य केले. सुमती महाराणीला तिच्या सभोवतीचे समस्त विश्व एका क्षणातच अदृष्य झाल्यासारखे वाटले. समोर 16 वर्षे वय

 

असलेला सुंदर बालक यतीच्या रूपात प्रकट झाला. आणि म्हणाला "आई ! मीच श्रीपाद श्रीवल्लभ आहे. मीच दत्त आहे. अवधूतांच्या रूपात असतांना श्रीवल्लभांचे रूप पहाण्याची इच्छा व्यक्त केलीस. ती इच्छा पूर्ण करण्यास तुला श्रीवल्लभांच्या रूपात दर्शन दिले. श्रीवल्लभांच्या रूपात असलेल्या मला कोणतेही मागणे मागु शकतेस. तू मला जेऊ घालून तृप्त केलेस. जे मागशील ते वरदान द्यावे अशी इच्छा आहे. या जगातील लोकांनी संकल्प रूपाने पापकर्म केल्यास पापांचे फळच प्राप्त होते. संकल्पाने पुण्यकर्म केल्यास पुण्यकर्माचे फळ प्राप्त होते. निष्काम कर्माचे आचरण केल्यास त्याला अकर्म म्हणतात. ते सुकर्म ही नसते अथवा दुष्कर्म ही नसते. अकर्मास पुण्य किंवा पाप असे कोणतेच फळ नाही म्हणून दुसरेच फळ द्यावे लागते. ते भगवंताधिन असते. अर्जुनाने अकर्म केल्यामुळेच

श्रीकृष्णाने त्याला कौरवांना मारावयास सांगितले. तसे मारल्यास पाप लागणार नाही असे श्रीकृष्णाने अर्जुनास सांगितले होते. कौरवांचा संहार हा भगवंत निर्णयच होता. तुम्ही दंपतींनी पण विशेष असे अकर्म केले आहे. म्हणुन लोकहितार्थाने काही तरी प्रतिफळ दिले पाहिजे. निसंदेहाने तुझी इच्छा मला सांग, न चुकता ती पुरवीन."

## श्री दत्तांच्या दर्शनानंतर सुमती महाराणीला स्फुरलेला संकल्प

ती दिव्यमंगल मूर्ति पाहून सुमती महाराणीने पादाभिवंदन केले. श्रीवल्लभांनी सुमती महाराणीला उचलून उभे केले व म्हणाले "आई ! मुलाच्या पाया पडणे हे अयोग्य आहे. याने मुलाचे आयुष्य क्षीण होते. तेंव्हा सुमती म्हणाली, "श्रीवल्लभ प्रभू ! आई म्हणून

बोलाविलेत. आपले हे सिध्दवाक्य आहे तेच बोल खरे करावे. तू माझा मुलगा म्हणून जन्मास यावे." यावर श्रीदत्त प्रभूंनी "तथास्तु" असा आशिर्वाद दिला व म्हणाले "मी श्रीपाद श्रीवल्लभ या रूपाने तुझ्या गर्भात येईन. आईने लेकरांच्या पायावर पडणे हे लेकराचे आयुष्य क्षीण होणेच होय. म्हणून मी धर्मकर्माच्या सुत्रांच्या उलट जात नाही. मी पुत्र रूपाने 16 वर्षापर्यंत जीवन व्यतित करेन." त्यावर सुमती, म्हणाली केवढा हा अविचार 16 वर्षापर्यंतच आयुष्य !" असे म्हणून विलाप करू लागली. त्यावर श्रीचरणांनी सांगितले, "आई ! 16 वर्षापर्यंत तुम्ही, सांगाल तसे ऐकून राहीन. "प्राप्ते तु षोडशे वर्षे पुत्रं मित्रवदाचरेत्" असे शास्त्र वचन आहे. 16 वर्षे वय असलेल्या मुलाबरोबर मित्रा सारखेच वागले पाहिजे. आपल्या इच्छांचे दडपण त्याच्यावर आणू नये. मला लग्न करण्यासाठी बंधन घालू नये. मला यति

होऊन स्वेच्छेने विहार करण्याची परवानगी द्यावी. माझ्या या संकल्पाच्या विरुध्द तुम्ही बंधन घातले तर मी घरात राहणार नाही." असे सांगून त्वरित दत्त प्रभु अदृश झाले.

सुमती महाराणी अवाक झाली. तिला कांहीच कळेनासे झाले. घडलेला सारा वृतांत तिने आपल्या पतीस विवरण करून सांगितला. तेवढयातच अप्पलराजू म्हणाले, "सुमती विचार करू नकोस, श्रीदत्त महाराज या प्रकारे आपल्या घरी भिक्षेस येतील असा विषय तुझ्या वडीलांनी सूचना म्हणून अगोदर सांगून =ठेवला होता. श्रीदत्त हे करुणेचा महासागर आहेत. श्रीवल्लभांचा जन्म होऊ दे, नंतर आपण विचार करू" अप्पल राजुच्या घरी अवधूत आले ही वार्ता सगळया गावात पसरली. पितृदेवांची अत्यंत प्रमुख असलेली महालय अमावस्येच्या दिवशी

ब्राह्मण जेवायच्या आधी अवधूतास भिक्षा दिली ह्या विषयाची चर्चा झाली. श्री बापन्नावधानी म्हणाले. "श्रीपाद श्रीवल्लभांचा जन्म होणार हे सगळेच म्हणतात ! अवधूतांना साष्टांग नमस्कार करणे विहीतच आहे ! त्यामध्ये सुमतीचा काहीच दोष नाही. पुत्ररूपाने जन्मल्यावर त्याला साष्टांग नमस्कार केल्यास बालकाचे आयुष्य क्षीण होते. परंतु अवधूत वेषात असतांना साष्टांग नमस्कार करणे चूक नाही." या प्रसंगाने पीठिकापुरातील सर्व ब्राह्मणांची इर्ष्या वाढली विशेषत्वाने नरसावधानी या नावाच्या पंडितांची. अमावस्येच्या दिवशी सगळेच पितृकार्यामध्ये निमग्न झालेले होते. भोक्त्याचा दुष्काळच होता, ही फार मोठी समस्याच पडली. श्री बापन्नार्यांनी अप्पलराजुच्या घरी मात्र निर्विघ्नपणे कार्य पार पडेल असे सांगितले. श्री राजशर्मा कालाग्नी शमनांचे (दत्ताचे) ध्यान करीत होते.

 

तितक्यात भोक्त म्हणुन तीन अतिथी आले. आणि पितृकार्य निर्विघ्नपणे पार पडले.

बाबा ! शंकर भट्टा ! त्या दिवशी वैश्यांना वेदोक्त्त उपनयन करण्याचा अधिकार आहे का ? नाही ? असा विषय चर्चेत मुख्यांश होता. ब्राह्मणांची परिषद जमली. बंगाल देशातील, नवद्वीपाहून आशुतोष या नावाचे पंडित पादगया क्षेत्रास आले होते. त्यांच्याकडे अत्यंत प्राचीन नाडी ग्रंथ होते. त्यांना देखील पंडित परिषदेचे आमंत्रण होते. बापन्नाचार्यांनी सांगितले, नियमनिष्ठेमध्ये ब्राह्मण, क्षत्रीय, वैश्य समानच असतात.

# श्रीपादांच्या जन्मसमयी दृग्गोचर झालेले अद्भूत दृष्य

इतक्यात मी म्हणालो "महाराज, श्रीपाद प्रभूंच्या लीला विस्तारपूर्वक सांगून मला धन्य करावे." अरे शंकर भट्टा ! नरसावधानी बापन्नार्यावर क्रोधित झाले व येनकेन प्रकारेण त्यांचा अपमान करण्याचे त्यांनी ठरविले . त्यांची (नरसावधानींची) बगलामुखी साधना विफल होण्याचे एकमेव कारण बापन्नार्यच आहेत असे त्यांच्या मनाने ठामपणे घेतले होते. तांत्रिक प्रयोगाने बापन्नार्यांने त्यांची मंत्रसिध्दि निष्प्रभ केली असा कुप्रचार करण्यास त्यांनी सुरवात केली. नाडी ग्रंथात श्रीपाद प्रभूंच्या अवताराविषयी जे विवरण होते ते त्यांना विचलित करीत होते. नाडीग्रंथ हा मुलत: अविश्वसनीय आहे. बापन्नार्यांनी मत्स्याहारी ब्राह्मणास भोजन दिले, हा अनाचार घडला असा नरसावधानी यांनी वाद मांडला.

 

मनुष्य पूर्णब्रह्माचा अवतार कदापि होऊ शकत नाही. तर तान्हे बाळ श्रीपाद श्रीवल्लभ सर्वांतर्यामी, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान असे श्रीदत्त प्रभूंचे कसे बरे अवतार होऊ शकतील ? श्रीपाद प्रभूंनी अगदी लहान असताना केलेला प्रणवोच्चार, पाळण्यात असताना केलेला शास्त्र प्रसंग, आणि वयास न शोभणारे प्रज्ञेचे प्रदर्शन नरसावधानींना पटले नाही. एखादा विद्वानब्राह्मण श्रीपादाच्या शरीतात प्रवेश करून असे बोलतो आहे असा त्यांनी प्रचार केला. श्री कुक्कुटेश्वराच्या मंदिरात असलेले स्वयंभू तेच खरे दत्तात्रय आहेत. तेच वर प्रदान करणारे आहेत. या बालकास दत्तस्वरूप मानने चुकीचे आहे .असा नारसावधनी यांनी सर्वांचा समज करून देण्याचा प्रयत्न केला.

श्रीपादांच्या जन्मानंतर सतत नऊ दिवसापर्यंत ज्या जागेवर त्यांना निजवत असत त्या जागी एक तीन फण्यांचा नाग आपला फणा उभारून बाळावर छाया करीत असे. श्रीपाद मातेच्या गर्भातून साधारण बालका प्रमाणे जन्मास न येता ज्योति स्वरूपाने अवतरले होते. जन्म होता क्षणीच महाराणी सुमती मच्र्छित झाल्या. प्रसुतीगृहातून मंगल वाद्यांचा ध्वनी येऊ लागला. थोडया वेळात आकाशवाणी झाली व सर्वांना बाहेर जाण्याचा आदेश झाला. श्रीपादांच्या सानिध्यात चार वेद, अठरा पुराणे आणि महापुरुष ज्योति रूपाने प्रगट झाले व पवित्र वेदमंत्रांचा घोष बाहेर सर्वांना ऐकू येऊ लागला. थोडया वेळाने सर्वत्र शांतता पसरली. या अद्भूत घटना बापन्नार्यांना सुध्दा अगम्य व आश्चर्यकारक वाटल्या.

# श्रीपादांच्या बाललीला

श्रीपाद आता एक वर्षाचे झाले होते. ते आठ दहा महिन्यांचे असतानाच त्यांचे आजोबा बापन्नार्यांबरोबर पंडितपरिषदेस जात असत. आजोबा आपल्या नातवाला बरोबर घेऊन जात. नरसावधानी आपल्या घरी राजगिऱ्याचे पीक काढीत. राजगिऱ्याची भाजी अत्यंत रुचकर असते. गावातील लोक नरसावधानींना ती भाजी देण्याची विनंती करीत. परंतु ते ती भाजी कोणालाच देत नसत. कोणाकडून काही विशेष काम करून घ्यायचे असल्यास त्याला ते ती भाजी देत व इच्छित काम करून घेत. श्रीपादांनी एकदा आपल्या आईस राजगिऱ्याची भाजी करण्यास सांगितले. ती भाजी सुध्दा नरसावधानींच्या घरचीच त्यांना हवी होती. परंतु हे काम कठीण होते. श्रीपाद लहान असतानाच स्वेच्छेने चालत

नरसावधानींच्या घरी जात असत. त्यांच्या घरी शास्त्राविषयी चर्चा करीत, तसेच चित्र-विचित्र लीला करीत. पीठिकापुरत एका महापंडिताचा मृत्यु झाला होता. त्या पंडिताचा प्रेतात्मा श्रीपादाकडून विचित्र-कार्य करवून घेत आहे. या बालकास योग्य ते उपचार न करता बापन्नाचर्य व राजशर्मा हे दोघे या बालकास दत्तावतारी समजत आहेत, असे नरसावधानी सर्वांना सांगत. पीठिकापूर हे पादगया क्षेत्र असून पितृदेवांचे प्रधान स्थान आहे. विगत आत्म्यांशी संपर्क साधून संभाषण करण्याचे सामर्थ्य असलेले तत्त्ववेत्ते येथे राहात असत. श्रीपादांच्या शरीरात कोणत्यातरी महापंडिताचा आत्माच वास करीत आहे आणि त्यांच्याकडून अगम्य अशा लीला करवून घेत आहे, अशी धारणा पीठिकापुरम मध्ये दृढ होत होती.

# तिरुमल दासांवर श्रीपादांचा दिव्य अनुग्रह

तिरूमलदास पुढे म्हणाले ‘ मी मलयाद्रीपुरमहून पीठिकापुरम येथे आलो तेव्हा श्रीबापन्नार्य आणि राजशर्मा यांच्या घरचा रजक होतो. नरसावधानीच्या घरचा जो रजक होता तो वृध्दावस्थेने मरण पावला होता. त्या रजकाचा मुलगा वायसपूर अग्रहार (सध्याचेकाकिनाडा) येथे निघून गेला होता. यामुळे त्यांच्या घरचे रजकाचे काम मला मिळाले होते. मी लहानपणापासून बापन्नार्युलुच्या सहवासात असल्याने माझ्यातील सतप्रवृत्ती जागृत झाली होती व अध्यात्माची ज्योत प्रज्वलित झाली होती. ज्या दिवशी मी नरसावधानींना पहात असे त्या दिवशी मला पोटाचा विकार होऊन अन्न ग्रहण न करण्याइतकी माझी दीन अवस्था होई. नरसावधानीचे कपडे मी स्वत: न धुता

माझा मुलगा रविदास ते धूत असे. सात्विक प्रवृतीच्या लोकांचेच कपडे मी स्वत: धूत असे.

नरसावधानींचे कपडे मी स्वत: न धूता ते माझा मोठ मुलगा रविदास धूतो, ही वार्ता त्यांच्या कानी गेली. त्यांचे कपडे मी स्वत: धूवावे अशी त्यांनी आज्ञा केली. ती आज्ञा मानून मी नरसावधानीचे कपडे स्वत: धुऊ लागलो. मी कपडे धूत असताना श्रीपादाचे नाम स्मरण करीत असे. मी धुतलेले कपडे घेऊन रविदास नरसावधानींकडे गेला. मी धुतलेले कपडे जेंव्हा सगळयांनी घातले, तेंव्हा कोणालाच काही झाले नाही. परंतु नरसावधानींनी ज्या वेळी ते कपडे घातले, तेंव्हा त्यांना त्यांच्या अंगावर विंचू, गोम सरपटत असल्यासारखे वाटले. त्या कपडयामध्ये त्यांचे शरीर अग्नीवर ठेवल्याप्रमाणे पोळू लागले. नरसावधानींनी मला

 

बोलवले व ते रागाने म्हणाले, कोणत्यातरी क्षुद्र विद्येचा, मंत्राचा प्रयोग मी कपडयावर केला आहे. त्या अपराधाबद्दल त्यांनी माझी न्यायाधिशाकडे तक्रार केली. परंतु चतुर न्यायाधिशांनी मला निर्दोष जाहीर करून सोडून दिले. मी आनंदात घरी आलो. थोडयाच वेळात श्रीपाद प्रभू एका सोळा वर्षाच्या युवकाच्या रूपात आमच्या घरी आले. श्रीपाद प्रभू वाटेल त्या रूपात येऊन भक्तांना दर्शन देत असत. मी आश्चर्याने म्हणालो, "महाराज आपण उत्तम अशा ब्राह्मण कुलामध्ये जन्मलेले आहात, तेंव्हा आमच्या सारख्या रजकांच्या वस्तीत येणे कांही योग्य नाही." तेव्हा प्रभू म्हणाले "नरसावधानीसारखे पापाचे गाठोडे डोक्यावर वाहणारे ब्राह्मण खरे तर रजकांपेक्षा कमी दर्जाचे असतात. परंतु तुझ्यासारखे ब्राह्मणांची ओढ असलेले रजक त्यांच्यापेक्षा श्रेष्ठच असतात." श्रीपादांचे ते शब्द ऐकून मी त्यांच्या

 

चरणांवर नतमस्तक झालो आणि ढसा ढसा रडलो. श्रीप्रभूंनी माझ्याकडे अमृतदृष्टीने पाहिले व आपल्या दिव्य हाताचा स्पर्श करून मला उठवले. नंतर त्यांनी आपला उजवा हात माझ्या शिरावर ठेवला आणि त्याच क्षणी मला पुर्वीचे जन्म आठवले . माझ्यातील योग शक्तींना चालना मिळाली. कुंडलिनी शक्ती सुध्दा जागृत झाल्याचा अनुभव येऊ लागला. श्रीपाद प्रभू हळू हळू पाऊले टाकीत अंतर्धान पावले.

श्रीपाद प्रभूंनी आपल्या आईजवळ राजगिऱ्याची भाजी करून देण्याचा हट्ट केला. त्यांना नरसावधानींच्या घरातील भाजी हवी होती. परंतु ती गोष्ट अशक्य वाटत होती. या वेळी बापन्नार्य म्हणाले, "श्रीपादा ! उद्या सकाळी मी तुला नरसावधानींच्या घरी घेऊन जातो. तू स्वत: त्यांना राजगिऱ्याची भाजी

 

देण्याची विनंती कर. परंतु जर त्यांनी ती भाजी देण्यास नकार दिला तर त्याभाजीसाठी पुन्हा कधी हट्ट करू नकोस." दुसऱ्या दिवशी बापन्नार्य बालक श्रीपादाला घेऊन नरसावधानीकडे गेले. त्यांच्या घरी जाताच बापन्नार्य श्रीपादांना म्हणाले, "श्रीपादा ! मोठ्यांना नमस्कार करून त्यांचे आशिर्वाद घ्यावेत. नरसावधानी बाहेर ओसरीवर बसले होते. त्यांची लांब शिखा पाठीवर रुळत होती. ती नरसावधानींना अत्यंत प्रिय होती. श्रीपादांनी नरसावधानींकडे बघितले व दोन हात जोडून त्यांना नमस्कार केला. श्रीपादांची तीक्ष्ण नजर नरसावधानींच्या पाठीवर विसावलेल्या शिखेवर पडली आणि काय आश्चर्य ती आपोआप गळून खाली पडली. ती पाहून नरसावधानी अगदी गोंधळून गेले. या वेळी

श्रीपाद म्हणाले, "आजोबा ! नरसावधानी आजोबांची अत्यंत प्रिय असलेली शिखा गळून पडली. आता त्यांच्याकडे राजगिऱ्यांची भाजी मागणे योग्य होईल काय ? चला आपण घरी जाऊ." श्रीपादांनी राजगिऱ्याची भाजी पुन्हा कधीही विचारली नाही.

श्रीपादांच्या नमस्कारामुळे झालेले नुकसान नरसावधानींच्या लक्षात आले. ते ध्यानात बसले असता त्यांच्या शरीरातून त्यांच्या सारखेच दिसणारे एक तेजोवलय बाहेर पडले. नरसावधानींनी त्या तेजोवलयास विचारले "तू कोण ? कोठे चाललास ?" त्या तेज:पुंज नरसावधानी सारखे दिसणाऱ्या आकृतीने उत्तर दिले "मी तुझ्यात राहणारे पुण्यशरीर आहे. तू आतापर्यंत कितीतरी वेद पठन केलेले आहेस. स्वयंभू दत्तात्रेयांची

आराधना केलीस, परंतु साक्षात श्री दत्तात्रेयांचे अवतार श्रीपाद श्रीवल्लभांचा अपमान केलास. तुला तुझ्या शिखेवर, राजगिऱ्याच्या भाजीवर असलेले प्रेम, आसक्तीच्या एक लक्षांश प्रेम जरी श्रीपादांच्या विषयी असते तर तुझ्या जन्माचे सार्थक झाले असते. परंतु मोहपाशांनी स्वत:स बांधून घेऊन मोक्षाची एक दिव्य संधि घालवलीस . तू लवकरच दरिद्री होशील. त्या दारिद्रयाचे हरण करण्यासाठी श्रीपाद प्रभूंनी तुला "शाकदान" मागितले होते. त्यांना जर तू ते दान दिले असतेस, तर तुला आता येणारे दारिद्रय न येता उत्तम ऐश्वर्य प्राप्त झाले असते. तू स्वत: आपल्या हातांनी ही संधि दवडलीस. श्रीपाद प्रभू करूणेचे सागर आहेत. हा अवतार संपल्यावर ते दुसरा नृसिंहसरस्वती नांवाने अवतार ग्रहण करतील. त्यावेळी तू एक दरिद्री ब्राह्मणाच्या रूपात जन्म घेशील. त्या जन्मात सुध्दा तू

घरी राजगिऱ्याची भाजी पिकवशील. त्यावेळी योग्य समय पाहून मी पुन्हा तुझ्या शरीरात प्रवेश करीन. त्यावेळी श्रीपाद प्रभू तुझ्या घरी भिक्षेसाठी येतील. तू प्रेमाने वाढलेली भिक्षा घेऊन तुला ते ऐश्वर्य प्रदान करतील. सध्या मात्र मी तुझे शरीर सोडून जात आहे. श्रीपाद प्रभूंनी केलेला नमस्कार तुला नव्हता तर तुझ्यातील पुण्य स्वरूपात वास्तव्य करणाऱ्या मला होता. त्यांनी मला, तुला सोडून देऊन त्यांच्या स्वरूपात लीन होण्याची आज्ञा केली होती. त्यानुसार मी श्रीपादाच्या स्वरूपात लीन होण्यास जात आहे. आता तुझ्या शरीरात केवळ पाप पुरुषच उरला आहे." असे बोलून तो पुण्यात्मा श्रीपादांमध्ये विलीन झाला.

कालांतराने नरसावधानींची प्रकृती क्षीण होत गेली. लोक त्यांच्या शब्दांचा निरादर करू लागले. त्यांच्या चेहऱ्यावर

विलसणारे विद्वत्तेचे तेज लोप पावले. याच वेळी पीठिकापूरात विषूचि (कॉलराची) साथ पसरली. यात अनेक ग्रामवासी या रोगास बळी पडले. दूषित पाण्यामुळे हा रोग बळावत असल्याचा निष्कर्ष गावातील वैद्यांनी काढला. भयभीत झालेल्या ग्रामवासियांनी यामहामारीच्या रोगावर शास्त्रीय रीतिने निर्मूलन पध्दती काढावी अशी प्रार्थना श्री बापन्नार्यांना केली. श्री बापन्नार्यांनी आपल्या अंतर दृष्टीने जाणले की महामारी जलदोषाने झालेली नसून वायुमंडल कलुषित झाल्याने झाली आहे. परंतु बापन्नार्यांचे हे मत गावातील वैद्यांना पटले नाही. ग्रामस्थानी ग्रामदेवतेस पशुबली देऊन तांत्रिकाकडून विविध प्रकारच्या पूजा, महामारीच्या निर्मूलनासाठी केल्या. पशूचा बळी दिल्याने त्यांच्यातील प्राणशक्ती बळजबरीने

 

बाहेर काढली जाते व तिला मंत्रोच्चाराने वश करून घेतात. प्राणशक्तीस वृध्दिंगत करण्यासाठी योगाच्या प्रक्रिया किंवा सात्विक आराधनेचा अवलंब करणे अधिक योग्य आहे असे श्री बापन्नार्यांचे मत होते. त्यांनी ग्रामवासियांना असे सुचविले परंतु अंधश्रध्देने त्यांनी पशुबळी देण्याचे थांबवले नाही. गावातील कांही मंडळींनी पशुबळीचा विषय श्रीपाद प्रभूंपुढे काढला. त्यावर श्रीपाद म्हणाले "ग्रामदेवतेस विनंती केली आहे की तिने पशुबळीचा स्वीकार करू नये." श्रीपादांच्या आज्ञेनुसार ग्रामदेवता समुद्रस्नान करण्यास गेली आहे. आता दूध उतू घालून देवतेस नैवेद्य अर्पण केल्यास या रोगराई पासून तुमची सुटका होईल. कालिकेचे रूप धारण केलेली ग्राम देवता शांत होईल. ही

 

वार्ता गावातील सर्व लोकांना कळविण्यासाठी एका चर्मकारास बोलावून चर्मवाद्यावर दवंडी पिटविण्यास सांगितले. दवंडी कोणी पिटायची असे विचारल्यावर श्रीपाद म्हणाले विषुचि रोगाने ग्रस्त वेंकय्या याने दवंडी पिटावी, असा माझा निरोप त्यास सांगा. ते सर्व ग्रामवासी वेंकय्याजवळ गेले, तो मरणासन्न होता. त्याला हा निरोप देताच तो मुरच्छित पडला. एका घटकेनंतर जेव्हा तो शुध्दिवर आला तेव्हा तो पूर्णपणे बरा झाला होता. ही बातमी हा हा म्हणता संपूर्ण पीठापुरममध्ये चर्चेचा विषय झाली. व्यंकय्याने गावात फिरून चोहिकडे दवंडी पिटली. बापन्नार्यांनी आपल्या सेवकास, पाण्याने भरलेले एक मोठे भांडे त्यांच्या समोर आणून ठेवण्यास सांगितले. वायुमंडलातील विषारी

किटाणूंचा नाश करण्यासाठी योग्य त्या मंत्राचे संधान केले. आणि तत्काळ हवेतील विषारी किटाणू पाण्यात टप टप येऊन पडले. अशा प्रकारे वायुमंडल शुध्द झाले आणि महामारी रोगाचे निर्मुलन झाले.

श्रीपादांच्या जन्मतिथीस (वाढदिवसाच्या दिवशी) राजशर्मा पत्निसह श्रीपादांना घेऊन, बाळाचे आजोबा श्री बापन्नार्य यांच्याकडे आले. ज्या ज्या वेळी बापन्नार्यांनी श्रीपादांच्या चरणावरील शुभचिन्हे पहाण्याचा प्रयत्न केला, त्या त्या वेळी त्यांना कोटी कोटी सूर्याच्या तेजस्वितेचा अनुभव येई व ती शुभचिन्हे त्या तीव्र प्रकाशात दिसत नसत. याचे त्यांना राहून राहून आश्चर्य वाटे. परंतु त्या दिवशी उष:काली साळीच्या कोंडयावर दिव्य असे पदचिन्ह दिसले. त्यांनी आपली कन्या

 

सुमतीस विचारले, "बाळ या कोंडयावरुन कोण गेले. तुमचा लाडका नातूच येथून गेला. आणखी कोण बाबा" सुमतीने उत्तर दिले. ते पदचिन्ह षोडशवर्षीय कुमाराच्या पदचिन्हासारखे होते. आजोबांनी श्रीपादांना आपल्या मांडीवर घेतले व त्याच्या चरण कमलांचे ते निरिक्षण करू लागले. या वेळी त्यांना दिव्य प्रकाश न दिसता मीच साक्षात दत्तात्रेयांचा अवतार आहे असे सूचित करणाऱ्या सुस्पष्ट अशा चिन्हांचे दर्शन झाले. त्या दिव्य चरणांचे बापन्नार्यांनी कौतुकाने चुंबन घेतले. हा बालक श्री दत्तात्रेयाचा अवतार असल्याचा त्यांचा निर्धार दृढ झाला. त्याच वेळी त्यांच्या मुखातून श्री दत्ताच्यास्तुतीपर पद आपोआप निघाले. त्या दिव्य चरणांच्या दर्शनाने बापन्नार्यांच्या अंगी अष्टभाव सिध्द झाले. त्यांच्या डोळयातून आनंदाश्रू वाहू लागले. ते

श्रीपादांच्या गालावर ओघळले आणि मोत्याच्या बिंदु सारखे चमकत होते. आजोबानी आपल्या उपरण्याने हळुवारपणे श्रीपादाच्या गालावरील ते थेंब पुसले. या वेळी श्रीपाद म्हणाले. आजोबा तुम्ही सौरमंडलातून शक्तिपात करून ती शक्ति श्रीशैल्यस्थित श्री मल्लिकार्जुन शिवलिंगात आकर्षित केली होती. त्याच वेळी सूर्यमंडलातील ती शक्ति गोकर्ण महाबळेश्वरी व पादगया क्षेत्री स्थित असलेल्या स्वयंभू श्रीदत्तात्रेयांच्या ठायी सुध्दा आकर्षित झाली. गोकर्ण महाबळेश्वर क्षेत्रास अधिक शक्तिसंपन्न करण्याचा संकल्प आहे. प्राणी मात्रातून जे अनिष्ट स्पंदन बाहेर पडतात त्या स्पंदनाना माझ्यात लय पावून, जे माझे साधक, आश्रित आहेत त्यांच्या प्रति शुभ स्पंदनांचे प्रसारण व्हावे असा माझा संकल्प

आहे. गोकर्ण महाबळेश्वर हे परमेश्वराचे "आत्मलिंग" आहे. त्याच्या केवळ दर्शनाने मुक्ति साध्य होते. तसेच श्रीशैल्याच्या दर्शनाने सुध्दा मुक्तिचे फळ प्राप्त होते. येथील मल्लिकार्जुनास शक्तिसंपन्न करण्याचा संकल्प आहे. तुम्ही सत्यऋषी आहात. मी यतीच्या रूपात होतो तेव्हा आईने मला नमस्कार केला, त्यामुळे मी अल्पायुषी होणार असे आपले मत होते. परंतु आईने मला श्रीपाद रूपात नमस्कार केला म्हणून मी अल्पायुषी होणार असे म्हणालो तेंव्हा आपल्या दोघांचेही म्हणणे खोटे होऊ नये म्हणून मी केवळ सोळा वर्षे पर्यंत तुमच्या घरी राहण्याचे ठरविले आहे. संसार बंधनातून मुक्तीची इच्छा करणाऱ्या मुमुक्षूंना अनुग्रह देण्याचे कार्य पुढे आहे. मी चिरंजीव

 

असावे असा तुमचा संकल्प आहे, तो मी पूर्तीस नेईन. श्रीपाद श्रीवल्लभ हे स्वरूप गुप्त करेन. नृसिंह सरस्वती हा अवतार घेतला तरी श्रीपाद श्रीवल्लभ रूप हेच नित्य सत्य रूप म्हणून राहील. नृसिंह सरस्वतीचे अवतारकार्य पूर्ण करून श्रीशैल्यास असलेल्या कदलीवनात तीनशे वर्षे पर्यंत तपश्चर्या करून प्रज्ञापूर (अक्कलकोट) येथे स्वामी समर्थ रूपात प्रकट होईन. तेथील वटवृक्षामध्ये माझी प्राण शक्ति प्रवेश करवून मल्लिकार्जुन शिवलिंगात विलिन होईन.

बापन्नार्यांना हे सगळे आश्चर्यकारक व अद्भूत असे वाटले. आजोबांच्या घरी पहिल्या वर्षीचा वाढदिवस अति आनंदात व थाटाने साजरा झाला. पीठिकापुरमला त्या

 

दिवशी आणखी एक आश्चर्य घडले. नरसावधानी, देवळाचे पुजारी आणि अजून कांही मंडळी कुक्कटेश्वराच्या मंदिरात दर्शनाला गेले असताना, त्यांना तेथे स्वयंभू दत्तात्रेयांची मूर्ती दिसली नाही. मंदिरातील मूर्ती दिसेनाशी झाल्याची वार्ता गावात दावानलासारखी पसरली. नरसावधानींच्या विरूध्द असलेला एक तांत्रिक मूर्ती अदृश्य होण्याचे कारण नरसावधानींच आहेत असे मोठ्या तावातावाने म्हणू लागला. नरसावधानी क्षुद्र विद्येचे उपासक आहेत त्यांनीच मूर्ती अदृश्य केली, असा प्रचार गावात करण्यास त्याने सुरुवात केली. पिठपुर पीठापुरमच्या ब्राह्मणांनी नरसावधानींच्या घराची झडती घेण्याचे ठरविले . ते ब्राह्मण श्री बापनार्यांना भेटले व झालेला प्रकार सांगितला. तेव्हा बापन्नार्य त्या ब्राह्मणास म्हणाले, सत्य प्रत्ययास येईपर्यंत मौन राहावे. योग्य वेळी या प्रश्नाचे समाधान होईल. नरसावधानींच्या

घराची झडती घेऊन संशयित स्थळी खोदकाम केल्यावर तेथे मानव कपाल व क्षुद्र विद्येस उपयोगी पडणाऱ्या कांही वस्तु सापडल्या, परंतु श्रीदत्तात्रेयांची मूर्ती मात्र मिळाली नाही. श्री नरसावधानी मूर्तीच्या चोरीच्या आरोपापासून मुक्त झाले. परंतु ते क्षुद्र विद्येचे उपासक असल्याचे सिध्द झाले. दिवसेंदिवस त्यांची प्रकृति क्षीण होत होती. त्यांच्याकडे एक वांझ गाय होती. तिला बैलाप्रमाणे शेतीच्या कामासाठी वापरीत व वेळेवर दाणा-पाणी सुध्दा देत नसत. एके दिवशी, नरसावधानींच्या विरूध्द असलेल्या तांत्रिकाने त्या गायीच्या शरीरात क्षुधा शक्तीचे आवाहान केले. त्यामुळे त्या गायीने खुंटाचे बंधन तोडून टाकून ती घरात शिरली व घरच्या लोकांना शिंगाने मारू लागली. नरसावधानींनी अतिप्रेमाने लावलेला राजगिऱ्याच्या भाजीचा मळा तिने उध्वस्त केला. त्या गायीच्याजवळ जाऊन तिला दोरीने बांधणे

कोणासच शक्य झाले नाही. त्याच दिवशी नरसावधानींच्या घरी त्यांच्या आईचे श्राध्द होते. श्राध्दाचा संपूर्ण स्वयंपाक झाला होता. श्राध्दाच्या ब्राह्मणांचे भोजन झाले होते. घरच्या मंडळीचे मात्र जेवण अजून झाले नव्हते. त्या गायीने सारे अन्न व वडे खाऊन टाकले. याच वेळी बालक श्रीपाद प्रभु आपल्या वडिलांना नरसावधानींच्या घरी घेऊन जाण्याचा हट्ट करू लागले. श्रीराज शर्मा त्यांना घेऊन नरसावधानींच्या घरासमोर जाऊन उभे राहिले. तेवढयात ती गाय नरसावधानींच्या घरातून बाहेर आली. तिने अंगणात उभे असलेल्या श्रीपादांना तीन प्रदक्षिणा घातल्या व नंतर त्यांच्या चरणी नतमस्तक झाली व त्याच अवस्थेत गतप्राण झाली.

या प्रसंगानंतर गावातील लोक अनेक मते व्यक्त करू लागले. गायीने खाल्लेल्या वडयामध्ये विष होते व ते खाल्याने गाय मरण पावली. आता नरसावधानींना गोहत्येचे पातक लागेल असे नाना लोकापवाद उठू लागले. यामुळे नरसावधानी त्रस्त झाले होते. त्या गायीने श्रीपादांना तीन प्रदक्षिणा घातल्या व नंतर त्यांच्या चरणांवर मस्तक ठेऊन प्राण सोडले. त्या कारणाने श्रीपाद हे दैवी अवतार असल्याची सर्व लोकांची खात्री झाली. राजशर्मांना आयुर्वेद शास्त्राचे ज्ञान होते. ते नरसावधानींच्या विनंतीनुसार त्यांचा औषधोपचार करीत होते. परंतु त्यांच्या दुर्धर रोगावर औषधाचा कांही परिणाम दिसून येत नव्हता. नरसावधानींची प्रकृती खालावतच गेली आणि त्या रोगातच त्यांचा एके दिवशी देहांत झाला.

नरसावधानींच्या मृत्यूमुळे गावातील लोक श्री राजशर्मानी त्यांना उत्तम औषध दिले नाही. त्यामुळे ते आपल्या जीवास मुकले असे बोलू लागले. कांहीजण म्हणू लागले की श्रीपाद श्रीवल्लभ नरसावधानीकडे रोज जात असत. ते जर दत्तावतारी असते तर नरसावधानींचा मृत्यू कसा झाला ? अनेकांनी गोहत्येचे पातकच त्यांच्या देहांताचे कारण असल्याचा निर्वाळा दिला. नरसावधानींच्या कुटुंबियांचे सांत्वन करण्यासाठी श्री राजशर्मा व श्रीपाद गेले असताना नरसावधानींच्या पत्नीने त्यांचा हात धरून म्हटले "अरे बाळा श्रीपादा ! चिमुटभर सौभाग्याचे वाण घेण्यासाठी मी दूर दूर पर्यंत हळदी कुंकुवास जात होते. तू दत्तात्रेयच आहेस तर नरसावधानी आजोबाना जिवंत करणे तुला शक्य नाही का ?" असे म्हणून ती माउली रडू लागली. नवनीतासम मृदु हृदय असलेल्या श्रीपाद प्रभूंनी त्या मातेचे अश्रु पुसले. शवयात्रा सुरू झाली.

 

राजशर्मा व श्रीपाद त्या अंतिम यात्रेत सहभागी झाले. नरसावधानीच्या ज्येष्ठ पुत्राने पित्याच्या चितेस अग्नी देण्यासाठी अग्नी हातात घेतला. त्याच वेळी श्रीपादांच्या नयनांतून दोन थेंब बाहेर पडले. याच वेळी मेघगर्जनेसारख्या आवाजात श्रीपाद म्हणाले "अहाहा ! मृत झालेल्या पित्याच्या शरीरास अग्नी देणारे पुत्र तर पाहिले. परंतु जिवंत पित्यास अग्नी देणाऱ्या पुत्रास पाहिले नाही." हे वक्तव्य ऐकून स्मशानात जमलेले सारे लोक निस्तब्धतेने श्रीपादांकडे पाहू लागले. श्रीपादांनी चितेवर असलेल्या नरसावधानींच्या भ्रूमध्यावर अंगुष्ठाने स्पर्श केला, त्या दिव्य स्पर्शाने नरसावधानींच्या अंगात चैतन्य स्फुरू लागले आणि आश्चर्य असे की कांही क्षणातच ते चितेवरून खाली उतरले. त्यांनी श्रीपाद प्रभूंना साष्टांग नमस्कार केला. नंतर ते सर्व लोकांबरोबर घरी परतले. त्यांना सजीव घरी आलेले पाहून त्यांच्या

पत्नीस अत्यंत आनंद झाला. श्रीपादप्रभूंच्या अंगुष्ठ स्पर्शाने नरसावधानींना कर्मसूत्राचे सूक्ष्म ज्ञान आले. त्यांच्या घरातील मृत झालेली वांझ गाय, ही गत जन्मातील नरसावधानींची माता होती. त्यांच्या घरी असलेला बैल हे त्यांचे पिताश्री होते. या गोष्टीचा बोध नरसावधानींना झाला. मरते समयी त्या गायीने श्रीपाद प्रभुंना आपले दुध त्यांनी प्यावे अशी विनंती केली होती. पुढच्या जन्मी जेंव्हा वांझ म्हैस म्हणून ती जन्माला येईल त्यावेळी श्रीपाद प्रभु नृसिंहसरस्वती अवतारात तिचे दुग्धपान करतील. हे श्रीपादानी गायीस दिलेले वचन नरसावधानींना कळले. ज्या तांत्रिकाने नरसावधानींवर प्रयोग केला होता, त्याचा मृत्यू लवकरच होणार असून, पुढच्या जन्मी तो ब्रह्मराक्षसाच्या योनीत जन्म घेणार असून, त्याच्यावर यतिरूपात असलेल्या श्रीपादांचा अनुग्रह होईल असे सूक्ष्म लोकातील विषय

नरसावधानींना श्रीपादाच्या कृपाप्रसादाने ज्ञात झाले. त्यांना स्वत:च्या पुढील जन्माची माहिती सुध्दा कळली. पुढील जन्मात त्यांच्या घरी यतीरूपाने श्रीपाद प्रभु येऊन त्यांच्याकडून राजगिऱ्याच्या भाजीची भिक्षा स्वीकारून, राजगिऱ्याचे पीक स्वहस्ते नष्ट करून, त्याच्या मुळाशी असलेला सोन्याच्या नाण्यांनी भरलेला हंडा त्यांना देतील. ही भविष्यवार्ता नरसावधानींना श्रीपादांच्या अंगुली स्पर्शाने कळली होती.

श्रीपादांचा चेहरा अतिशय सात्विक, सुंदर, दैदिप्यमान असा होता. त्यांची तुलनाच होऊ शकत नाही. श्रीपाद प्रभुंनी नरसावधानी आणि त्यांच्या पत्नीस केलेला उपदेश, त्यांचा अनुग्रह केलेली विधाने मी तुला उद्या सांगेन. आता आपण त्यांचे स्मरण करीत भजनात रंगून जाऊ या. ज्या ठिकाणी त्यांचे नामस्मरण, भजन,

 

कीर्तन होते, त्या ठिकाणी श्रीपाद प्रभु सूक्ष्म रूपाने संचरण करीत असतात, हे अक्षर सत्य आहे

तिरुमलदासासारख्या भक्ताच्या सत संगतीने आनंदाने आम्ही पुलकित झालो.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जयकार ॥**

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -7

## खगोल वर्णन

## श्रीपाद श्रीवल्लभ चरित्रामृताचा महिमा

पहाटे श्री तिरुमल दासांनी आपले आन्हिक उरकून सांगण्यास सुरुवात केली. ते म्हणाले "अरे शंकर भट्टा ! श्रीपाद वल्लभांचे दिव्य चरित्र अद्भुत, अतर्क्य व अपूर्व असे आहे. तुझ्या वर त्यांचा अपार स्नेह असल्या कारणाने त्यांचे दिव्य चरित्र लिखाण करण्याचे महद्भाग्य तुला लाभले आहे. असा हा दिव्य योग श्रींच्या संकल्पाने तुला लाभला आहे."

 

# श्रीपादाचे एकाच वेळी अनेक ठिकाणी प्रकट होणे

नरसावधानी मृत्युमुखातून बाहेर पडल्यावर त्यांच्यातील आकर्षण शक्ती क्षीणावली. पूर्वी साधना करीत असतांना ज्या मनुष्याचे ते ध्यान करीत तो कितीही दूर असला तरी आकर्षित होऊन त्यांच्या जवळ येत असे. ती शक्ति सुध्दा आता क्षीणावली होती. जे लोक पूर्वी त्यांना घाबरत होते, ते आता अजिबात घाबरेनासे झाले. वेळ पडल्यास त्यांचा उपहास करून त्यांना दुखवीत असत. त्यांची आर्थिक स्थिति सुध्दा खालावत चालली होती. दोन वेळच्या पोटभर जेवणाची सुध्दा कांही वेळा भ्रांत पडत असे. अशा कष्टमय अवस्थेत ते आक्रोश करीत घराबाहेर आले. त्यावेळी महाचार्य बापन्नाचार्युलु त्यांच्या नातवास कडेवर घेऊन आपल्या घराकडे जात होते.

राजशर्माच्या घराकडून वळसा घेतल्यावर जो मार्ग येई तो थेट बापन्नाचार्युलुच्या घराकडे जात असे. श्रीपाद बालपणी आपल्या घरापेक्षा अधिक वेळ आपल्या आजोबांच्या घरीच राहात. श्री नरसिंह वर्मा व श्री वेंकटप्पा श्रेष्ठी यांच्या घरी सुध्दा स्वेच्छेने जात. श्रीपादांशी बोलावे असे नरसावधानींच्या मनात आले. त्या गोंडस आणि लडिवाळ अशा दिव्य बालकास एकदा तरी कडेवर घेऊन लाड करावे असे त्यांना वाटले. नरसावधानींची दृष्टी श्रीपादावर पडली. श्रीपादांनी नरसावधानीकडे पाहून मंद स्मित केले. ते स्मित हास्य अत्यंत मोहित करणारे होते. नरसावधानी भिक्षेसाठी श्रेष्ठींच्या घरी गेले. तेथे श्रीपाद श्रेष्ठींच्या मांडीवर खेळत असलेले दिसले. नरसावधानींकडे पाहून श्रीपाद मिस्किलपणे हसले. नरसावधानी भिक्षा घेऊन ते नरसिंह वर्माच्या घरी गेले. तेथे त्यांना श्रीपाद नरसिंह वर्माच्या

खांद्यावर खेळत असलेले दिसले. नरसावधानीकडे पाहून श्रीपाद पुन्हा मिस्किलपणे हसले. एकाच वेळी बालक श्रीपाद, श्रेष्ठींच्या घरी, वर्माच्या घरी व आजोबा बापन्नाचार्युलु यांच्या घरी होते. नरसावधानींना हे स्वप्न आहे का विष्णुमाया आहे ? हे कळतच नव्हते

गावातील लोक नरसावधानींचा छळ करू लागले. पादगया क्षेत्रातील स्वयंभू दत्ताची मूर्ती अदृष्य होण्यामागे नरसावधानींच्या हात आहे, अशी लोक निंदा करू लागले. या लोकनिंदेने पीडित होऊन नरसावधानी भ्रमिष्ठासारखे घरी परतले. त्यांना अशा स्थितीत पाहून त्यांची पत्नी अत्यंत दु:खी झाली. तिच्या मनातील वेदना प्रकट करण्यासाठी ती देवघरात गेली. तेंव्हा तिने पाहिलेले दृश्य आश्चर्यकारक होते. त्यांच्या देवघरात श्रीपाद बसलेले होते. त्यांना पाहून त्या पती-पत्निला

अतिशय आनंद झाला. त्या उभयतांनी श्रीपादांना राजगिऱ्याच्या भाजीचे भोजन करण्याचा आग्रह केला. परंतु श्रीपादांनी जेवण्यास नकार दिला. काल, कर्म आणि कारण या तिन्हींचा एकाच वेळी संयोग झाल्यास असे अलभ्य योग जुळून येतात. विवेकवंत अशा योगांचे लाभ करून घेतात. तर अविवेकी या लाभास मुकतात. श्रीपाद प्रभुंनी त्या पती-पत्निच्या विनंतीस होकार दिला, परंतु या जन्मीसाठी नसून पुढल्या जन्मीसाठी. पुढल्या जन्मी ते महाराष्ट्राच्या पुण्य भूमीत श्रीनृसिंहसरस्वतीच्या अवतारात त्यांच्या घरी अवश्य भोजन घेतील असे त्यांनी वचन दिले होते. एखादे समयी सूर्य चंद्राच्या गती बदलणे साध्य होईल, परंतु प्रभूंच्या वचनाच्या विरूध्द जाणे पंचभुतासहित कोणत्याच जीवास शक्य नसते. जग जरी हिंदोळले, युग जरी पालटले, तरी श्रीपादांच्या लीला नित्य, सत्य व नित्य नूतन आहेत. देवघरात बसून

श्रीपाद प्रभुंनी नरसावधानी आणि त्यांच्या धर्मपत्नीस हितोपदेश केला. हा उपदेश दत्तभक्ताना अत्यंत उपयोगी असा आहे.

## नरसावधानी व श्रीपाद वल्लभांच्या मध्ये झालेला संवाद व श्रीपाद प्रभूंचा उपदेश

प्रश्न :- तू कोण आहेस ? देवता ? यक्ष ? मांत्रिक ?

उत्तर :- मी मीच आहे. पंचभूतात्मक सृष्टीतील अणुरेणूमध्ये विद्‌यमान असलेली अदृश्य शक्ति ती मीच. पशु पक्ष्यासहित समस्त प्राणीमात्रामध्ये मातृ व पितृ स्वरूपाने स्थित आहे तो मीच.सकल सृष्टीचा गुरुस्वरूप पण मीच आहे.

 

प्रश्न :- तू श्रीदत्त प्रभूंचा अवतार आहेस का ?

उत्तर :- नि:संशयाने मी दत्तच आहे. तुम्ही शरीरधारी असल्याने तुम्हाला माझी ओळख पटण्यासाठी मी शरीर धारण केले आहे. वास्तवात मी निराकार व निर्गुण आहे.

प्रश्न :- म्हणजे तुला आकार व गुण नाही एवढेच ना ?

उत्तर :- निराकार असणे सुध्दा एक आकारच आहे. तसेच निर्गुण असणे हा देखील एक गुणच आहे. साकार व निराकार, सगुण व निर्गुण यांचा आधार तो मीच आहे आणि त्याच्या पलिकडे आहे असे जाण.

प्रश्न :- सर्वस्व तूच असताना प्राणीमात्राना सुख-दु:ख का संभवतात ?

उत्तर :- तुझ्यात असलेला "तू" जीव आहेस व तुझ्यात असलेला "मी" परमात्मा आहे. तुझ्यात कर्तृत्वभावना असेपर्यंत "तू", "मी" होऊ शकत नाही. जो पर्यंत तुझ्यात कर्तृत्वभावना असेल तो पर्यंत सुख-दु:ख, पाप-पुण्य अशा द्वंद्वातून तुझी सुटका होऊ शकत नाही. तुझ्यातला "तू" नष्ट होऊन तुझ्यातील "मी" उच्च दशेत असेन, तेव्हा तू माझ्या निकट असशील. जसे जसे तू माझ्या निकट येशील तसा तसा तू सुख-दु:ख, पाप-पुण्य या द्वंद्वातून मुक्त होशील. तू माझ्या आश्रयी असता सुख संपन्न होशील.

 

प्रश्न :- जीवात्मा व परमात्मा हे वेगवेगळे आहेत असे काहींचे म्हणणे आहे, जीवात्मा व परमात्म्याचे घनिष्ट संबंध आहे असे काहींचे म्हणणे आहे, तर जीवच परमात्मा आहे असे काहींचे म्हणणे आहे यातील खरे काय ?

उत्तर :- तू वेगळा व मी वेगळा अशी भिन्नत्वाची भावना असली तरी हरकत नाही. तुझ्यातला अहंकार नाश पावल्यावर आपण दोघे द्वैतात स्थित असता आनंदाची प्राप्ती होईल.माझ्या अनुग्रहा मुळे सगळे चालत असून, तू केवळ निमित्तमात्र आहेस या तत्वाचे अनुसरण केल्याने सुध्दा आनंद स्थितीस पावशील. मोहाचा क्षय झाल्याने द्वैत

स्थितीमध्ये असतानासुध्दा तू मोक्षसिध्दी पावशील. तुझ्यात आणि माझ्यात अत्यंत सामिप्य असताना मी तुझ्या द्वारे स्वत:स व्यक्त करतो. माझ्यातील सर्व शक्ती तुझ्या द्वारे अभिव्यक्त होत असताना, तुझ्यातला अहंकार नाश पावून, मोहक्षय झाल्याने या विशिष्ट असलेल्या अद्वैत स्थितीमध्ये पण आनंदाची प्राप्ती होईल. मोह नसल्यामुळे हा सुध्दा मोक्षच होय. तुझा अहंकार पूर्णपणे नाश पावल्याने, कर्तृत्वाची भावना नाहीशी होईल. तुझ्यात "तू" नसून, केवळ "मी"असलेल्या त्या स्थितीत मनाच्या कल्पनेने आकलन न होणाऱ्या ब्रह्मानंदाचा अनुभव करत असतो. म्हणून, अद्वैत स्थितीत असला तरी मोक्ष प्राप्ती करू शकतो. द्वैत स्थितीत असला तरी,

विशिष्टाद्वैत किंवा अद्वैत स्थितीत असला तरी मोक्षसिध्दी/ब्रह्मानंदस्थिती मात्र एकच. ती स्थिती मन-वाचा यांस अगोचर आहे. केवळ अनुभवाने जाणले जाते.

प्रश्न :- अवधूत स्थितीत असलेले काही जण ते स्वत: ब्रह्म असल्याचे सांगतात, तर तू अवधूत आहेस का ?

उत्तर :- नाही, मी अवधूत नाही. मी ब्रह्म आहे. आणि ब्रह्म सर्वस्व असल्याचे अवधूतांचे अनुभव आहेत. तर मी ब्रह्म असून मी सर्वांतर्यामी असल्याची स्थिती माझी आहे.

प्रश्न :- तरी या किंचित भेदाचे रहस्य मला उमजले नाही.

उत्तर :- समस्त संसार बंधनांतून मुक्त झालेले अवधूत माझ्यात लीन होऊन ब्रह्मानंद सुखाचा अनुभव घेतात. त्यांच्यात व्यक्तित्व नाही. व्यक्तित्व नसल्याने ते संकल्प रहित असतात. या सृष्टीच्या महासंकल्पात, महाशक्तीत मी आहे. जीव म्हणविणाऱ्या मायाशक्तीत पण मी आहे. माझ्यात लीन झालेले अवधूत सुध्दा "तू परत जन्म घे" अशी माझी आज्ञा झाल्यास त्यांना जन्म घेणे भाग आहे. संकल्पयुक्त सत्य-ज्ञानानंद स्वरूप माझे आहे.

 

तर संकल्परहित सत्य-ज्ञानानंद स्वरूप त्यांचे आहे.

प्रश्न :- बीजास भाजल्याने परत अंकुरित होत नाही तसेच ब्रह्मज्ञान प्राप्त करून ब्रह्ममय झालेल्यांना परत जन्म घेणे कसे बरे साध्य होईल.

उत्तर :- भाजलेल्या बीजांचे पुनरंकुरित न होणे हा सृष्टीचा धर्म आहे. भाजलेल्या बीजांना पुनरंकुरित करणे हे सृष्टीकर्त्याचे शक्तीसामर्थ्य आहे. खरे पाहता माझा अवतार या सिध्दांताद्वारे सत्यधर्म निरूपण करण्या पूर्वी झाला आहे.

प्रश्न :- दत्त प्रभू ! श्रीपादा ! विवरण करावे.

उत्तर :- भूत, भविष्य, वर्तमान हे अवस्थात्रय तसेच सृष्टी , स्थिती लय इत्यादी त्रयांचे अतिक्रमण करून वडील अत्रीमहर्षी प्रसिध्द झाले. सृष्टीतील कोणत्याही जीवाविषयी किंवा कुठल्याही वस्तूविषयी असूया, द्वेष लेषमात्र नसल्या कारणाने, माता अनसूया विख्यात झाली. ब्रह्मा, विष्णू, रुद्र यांस आधार व अतीत असलेल्या त्या परमज्योती स्वरूपाचे दर्शन प्राप्त करण्यासाठी अत्री महर्षीने घोर तपश्चर्या केली. त्या परमज्योती स्वरूप परमात्म्याने आपल्या अमृतदृष्टीने सृष्टीतील प्रत्येक प्राण्यास व वस्तूस अवलोकन करून अनुग्रह करावा या हेतूने, अनसूया मातेने तपाचरण केले होते. कर्मसूत्रांप्रमाणे पाप-पुण्यांस अनुसरून सुख-दु:ख प्राप्त होत असल्या कारणाने, महापापाचे फळ स्वल्प व स्वल्प पुण्याचे फळ अधिक व्हावे या संकल्पाने अनसूया

प्रार्थना करीत असे. कठीण अशा लोहखंडास, जिवंत व खाण्यास योग्य अशा चण्यामधे आपल्या तपोबलाने मातेने रूपांतर केले. खनीजातील चैतन्य निद्रा अवस्थत असते. तरू-गुल्मादी मध्ये अर्धनिद्रावस्थेत असते. पशुमध्ये पूर्णचैतन्याची स्थिती असते. खनिज म्हणून जन्मास येवून मरण पावणे, नंतर, वृक्षेतर जन्म घेऊन तदनंतर, पशु जन्म पावून शेवटी मनुष्य जन्म घेतलेल्या मानवाने, विवेक, ज्ञान व वैराग्यवंत होवून त्याच्यात सुप्त असलेल्या परमात्मशक्तिस जागृत करून मोक्ष प्राप्त केला पाहिजे. प्रकृतीतील परिणामक्रमाचा धर्म परमात्म्यांच्या अनुग्रहाने बदलू शकतो असे मातेने सिध्द केले. त्रिमूर्तीच्या रूपात असलेले चैतन्य जागृत अवस्थेत असल्याकारणाने, निद्रावस्थेत बदलून, त्यांना लहान बालकांचे रूप दिले. त्रिमूर्तिंच्या शक्ति एकवटून अनघादेवी रूप धारण केले. दत्तात्रेयांचा अवतार घेवून

 

अनघादेवीचा अर्धांगिनी म्हणून स्वीकार केला. श्रीपाद श्रीवल्लभावतारी, वामभागी अनघादेवी व दक्षिण भागी दत्तात्रेय असून अर्धनारीश्वर रूपाने प्रभुंचा जन्म झाला. अशा महोत्तर सृष्टीस आपल्या संकल्पमात्राने सृजन करण्याचे शक्तिसामर्थ्य असलेल्या प्रभूस आवश्यकतेनुसार सृष्टी धर्मांमध्ये बदल घडविणे सहज शक्य आहे, असे तू जाण.

प्रश्न :- श्रीपादा ! सृष्टी धर्मामध्ये बदल घडविण्याचे सामर्थ्य असलेला तू माझ्या दारिद्र्याचे हरण करू शकत नाही का ?

उत्तर :- अवश्य तुझे दारिद्र्य हरण करीन. परंतु तुझ्या पुढच्या जन्मी. थोडेफार दारिद्र्य भोगल्यावर! राजगिऱ्याचा विषय अगदी क्षुल्लक होता. तरी तुला

राजगिऱ्यावर इतका मोह होता. आई, वडील किंवा आजोबा कोणाकडून याचना केली नव्हती. माझ्या सारख्या बालकाचा आहार असणार तो किती ? राजगिऱ्याची इच्छा झाल्याबरोबर तू दिले असते तर आजची स्थिति उदभवलि नसती. पण आता ती वेळ गेली. तुझ्या मनातील मालीन्य दूर करण्यासाठी तुझे हे जीवन पुरणार नाही. प्रत्येक मनुष्य आपले पुण्यफल आयुष्य, ऐश्वर्य, कीर्ती, धन, सौंदर्य इत्यादी रूपाने पावतो. पापाचे फल म्हणून दारिद्रय, अल्पायुषी, कुरूप, कुख्याती इत्यादी पावतो. तुझ्या पुण्याचा अधिक भाग काढून तुला आयुष्य दिले, जेणे करून तुझे पुण्य खर्च झाले. आता तुझे पाप जास्त असल्या कारणाने दारिद्रय भोगले पाहिजे. तरी स्वयंभू दत्ताची आराधना केल्या कारणाने, दारिद्रय असले तरी,

दोन वेळचे अन्न तुला लाभेल असा तुला माझा आशिर्वाद आहे.

प्रश्न :- हे श्रीपादा ! वर्णाश्रम धर्माप्रमाणे वर्तन करावे असा शास्त्रांचा निर्धार आहे. तुमच्या आजोबांनी वैश्यांना पण वेदोक्त पध्दतीने उपनयन करता येईल, असा जो निर्णय दिला, तो चुकीचा नाही का ?

उत्तर :- सत्यऋषिश्वरांच्या निर्णयात खोट शोधण्याचा प्रयत्न केल्यामुळे तुझी जिव्हा छाटून टाकली पाहिजे. आजोबा म्हणजे तुला कोण वाटतं ? ते साक्षात भास्कराचार्य होत ! विष्णूदत्त व सुशीला, स्वार्थ म्हणजे काय ठऊक नसलेले परम पवित्र अशी दंपती. त्यांना

 

माझे माता-पिता म्हणून जन्मास घालावे असा आदेश मी काल व कर्मदेवतांना दिला. नरसिंह वर्म्यांचे पूर्वज श्री लक्ष्मी नृसिंह स्वामींचे अनन्य भक्त . सिंहाचली होत असलेल्या यज्ञ-यागात विशिष्ट अन्न दान केलेले पवित्र घराणे. मी पीठिकापुरी जन्म घेण्यापूर्वीपासून एका क्रमपध्दतीने ही घटना घडवून आणली. त्या तीन घराण्याशी असलेले ऋणानुबंध एका जन्मात फेडले जाऊ शकत नाहीत किंवा एका अवतार काळात समाप्त करण्या सारखे नाही. माझे वरदहस्त त्यांच्यावर वंशोवंशी असेल. माझ्या छत्र-छायेत ते निश्चिंत राहतील.

# भक्तास श्रीपादांचे अभय

आता माझ्या विषयी बोलायचे असले तर काहिही किंमत नसलेला राजगिरा तू मला देऊ शकला नाही. मी भोजन केल्यास लाख ब्राह्मण भोजनाचे पुण्य तुला लाभले असते. तू खराच दुर्दैवी आहेस. धर्म कुठले , अधर्म कुठले या विषयी वाद असेल तर शास्त्रांचा आश्रय घेतला पाहिजे. शास्त्राप्रमाणे आचरण करावे किंवा करू नये ह्या विषयी मिमांसा होत असेल तेंव्हा, निर्मल अंत:करण असलेले सत्पुरुषांचे म्हणणे शास्त्र ठरते . ते म्हणतील ते वेदवाक्यासमान असून धर्म सम्मत असते. त्यांनी अधर्माने निर्णय द्यायचा प्रयत्न जरी केला तर, धर्मदेवता, त्यांना अधर्म मार्गाने परावृत्त करून धर्म सम्मत असलेले निर्णय देण्यास बाध्य करते. हिंसा करणे पाप आहे असे शास्त्र सांगते. पण श्रीकृष्ण

परमात्म्याच्या समक्ष झालेले युध्द धर्मयुध्द झाले. कौरव पांडवांचे युध्द धर्मयुध्द व युध्द झालेले स्थल धर्म क्षेत्र म्हणून प्रख्यात झाले. यज्ञ करणे पुण्यफलप्रद आहे. परंतु, परमात्म्याचे स्वरूप असलेल्या शिवास आवाहन न करता केलेल्या दक्षाच्या यज्ञाचे शेवटी युध्दात रूपांतर झाले. दक्षाचे शिर धडा वेगळे झाले नंतर त्याला अजाचे शिर लावण्यात आले. रोग्यास पित्त प्रकोप झाल्यास, वैद्य लिंबू, आवळा इत्यादींनी उपचार करतो. शरीराचा जर एखादा भाग नासल्यास, तो भाग शस्त्राने छेदून, रोगाचे निदान करतो. मी पण तसाच आहे. माझ्यात देवतांचे अंश आहेत तसेच राक्षसांचे अंश पण आहेत. मी उन्मतासारखा, पिशाच्यासारखा, राक्षसासारखा पण व्यवहार करतो.

माझ्या अंतर्गत जीवाविषयी अत्यंत करुणा असल्यामुळे, तुमचे स्वभाव, तुमचे शुभाशुभ कर्म यास अनुसरून मी वर्तन करीत असतो. अनन्य शरणागत झालेल्या माझ्या भक्तांचे हात मी सोडीत नाही. दूर देशी असलेल्या माझ्या भक्तास माझ्या क्षेत्री आणतो. ऋषींचे कुळ व नदीचे मूळ विचारू नये. आदी पराशक्ति कन्यकापरमेश्वरीचे वैश्यकुळात अवतरण झाले नाही का ? सिध्द असलेल्या मुनीत वैश्य मुनी नाहीत का ? ब्राह्मण, क्षत्रीय, वैश्यच नव्हे तर शूद्र जरी निष्ठेने नियम पालन करणारा असेल तर वेदोक्त उपनयनास अधिकारी आहे. उपनयन संस्काराने तिसरे नेत्र (ज्ञान नेत्र) उघडले पाहिजे. अंत:करण शुध्द होऊन ब्रह्मज्ञानात मन मग्न झाले पाहिजे. तुझे मन शाक ज्ञानाविषयी पूर्णपणे मग्न झाले आहे. ब्रह्म हे काय बाजारात विकत मिळणारी वस्तू आहे ? या जन्मी ब्राह्मण म्हणून

 

जन्मास आलेला पुढच्या जन्मी चांडाळ जन्म पावू शकतो. तसेच या जन्मी चांडाळ म्हणू न जन्मास आलेला पुढच्या जन्मी ब्राह्मण म्हणून जन्मास येऊ शकतो. ब्रह्मवस्तु कुल, मत, देश, काल यांच्या अतीत असलेले रहस्य आहे असे तू जाण. देव भावप्रिय असून बाह्य प्रिय नाही. तुझ्या भावास अनुसरून दैव कार्य करीत असते. ब्रह्मज्ञानाचा उपदेश करीत असता मी ब्राह्मण असतो. भक्तांचे योगक्षेम व अनुग्रह करण्यासाठी दरबारात असतो तेंव्हा क्षत्रीय असतो. प्रत्येक जीव आपापल्या पाप-पुण्य कर्माप्रमाणे फळ पावतो. प्रत्येक जीवाचा लेखा-जोखा माझ्या जवळ आहे. तोलून मापून पाप-पुण्याचे फल वाटप करताना मी वैश्य आहे. भक्तांचे कष्ट आपल्या शरीरावर घेवून त्यांना सुख-शांती प्रदान करण्याचा सेवाधर्म मी धारण केला असता शूद्र असतो. जीव मृत्यू पावल्यावर, चिताग्नी देऊन त्याच्या शरीरास

भस्मीभूत करून उत्तम गती प्राप्त करून देत असताना मी डोम असतो. आता तू मला सांग मी कोणत्या कुळाचा आहे ?

प्रश्न :- श्रीपादा ! क्षमा करा. मी अज्ञानी आहे. आपण साक्षात दत्तप्रभू आहात. समस्त जीवांचा आश्रय तूच आहेस. खरे पाहता या सृष्टीची रचना कशी झाली याचे विवरण करून मला कृतार्थ करावे

**लोकालोक वर्णन :-**

उत्तर :- आजोबा, स्वर्गात 88 हजार गृहस्थ मुनींचा वास असतो. पुनरावृत्ती होणे त्यांचा धर्म असून धर्म प्रचारासाठी बीजरूपाने ते विद्यमान असतात.

परमात्म्याच्या अनिर्वचनीय अशा शक्तीच्या एका स्वल्प अशा अंशाने जगत सृष्टी रचण्यासाठी ब्रह्मदेवाची उत्पत्ति झाली. परमात्म्यापासून क्रमाने सर्वव्यापी असे जल निर्माण झाले. परमात्म्याच्या तेजाने, त्या जलात कोट्यावधी सुवर्णकांतियुक्त्त अंड उत्पन्न झाले. त्या अंडात एक अंड आपण निवास करीत असलेले ब्रह्मांण्ड आहे. यातील आतले भाग अंधकारमय असून तेथे परमात्म्याचे तेज मूर्तीमान झाल्याने अनिरुध्द हे नाव विख्यात झाले. त्या अंडयातील अंधकार परमात्म्याने आपल्या तेजाने नाहीसा केला. हिरण्यगर्भ, सूर्य, सविता, परंज्योती अशा अनेक संज्ञानी वेदांत त्यांचे वर्णन आले आहे. त्रेता युगात पीठिकापुरत भारद्वाज महर्षींनी, एक कोटी ब्रह्मांण्डात भरलेल्या दत्तात्रेयांच्या तेजास उद्देशून सवितृकाठकाचे आयोजन केले होते. सत्यलोकात निरामयस्थान नावाचे एक स्थान आहे. त्रिखंड सोपानात

वसु, रुद्रादित्य नावाने पितृगणांचा येथे वास आहे. निरामय स्थानाचे संरक्षक म्हणून ते कार्यरत असतात. कारण ब्रह्मलोक म्हणविणाऱ्या या स्थानात, चतुर्मुख ब्रह्माचे निवास स्थान आहे. त्यास विद्यास्थान किंवा मूल प्रकृति स्थान असे जाणले जाते. त्यावर प्रख्यात असलेले श्रीनगर आहे. त्याच्यावर महा कैलास, त्यावर कारण वैकुंठ आहे. सत्यलोकात पुराणपुर नावाचे विद्याधर स्थान आहे. तपोलोकात अंजनापतिपुर मध्ये साध्यांचा वास आहे. जनलोकात अंबावतिपूर येथे सनक सनंदनादि ऋषींचा निवास आहे. महर्लोकात ज्योतिष्मतिपुरा मध्ये सिध्दादि गणांचा वास आहे. स्वर्गलोकात अमरावतीपुरा मध्ये देवेंद्रादि देवता गणाचे वास्तव्य आहे. खगोलाशी संबंधित ग्रह-नक्षत्रादि असलेले भुवर्लोकात रथंतरपुरामध्ये विश्वकर्मा नावाचा देव-शिल्पीचा वास आहे. आजोबा ! भूलोकात दोन भाग

आहेत. मानवांचा निवास असलेल्या एका भागास भूगोल असे म्हणत. ह्याच्या शिवाय, महाभूमी म्हणविणारा दुसरा भाग आहे. ही महाभूमी भुगोलकाच्या दक्षिणेस पाच कोटी ब्रह्माण्ड योजन दूर स्थित आहे. मर्त्यलोक म्हणजे, भूलोक व भुवर्लोक असून त्यात महाभूमीचा पण समावेश आहे. पाताळात, अतल, वितल, सुतल, रसातल, तलातल, महातल आणि पाताल अशा प्रकारचे सात लोक आहेत. थोडक्यात, यास स्वर्ग, मर्त्य, पाताळ असे म्हणत.

आपण राहतो या भूगोलाच्या खालच्या बाजूस महाभूमी आहे, जिचे मध्यभागात उंचवटा असून चक्राकार आहे. त्यामुळे त्याच्या उपरितलावर सूर्य चंद्र सदैव झळकत असत. सतत प्रकाशमान असल्याकारणाने, तेथे कालमानाचे निर्णय नाही. या महाभूमीवर सप्त समुद्र, सप्त द्वीप आहेत. जंबुद्वीप या महाभूमीवर आहे.

 

भूलोक व भुवर्लोक यांची संयुक्त संज्ञा मर्त्यलोक अशी आहे. भूलोकात महाभूमी व भूगोल असे दोन प्रकार आहेत.

सृष्टीच्या प्रारंभी समस्त लोक जलमय होते. प्रजापतीने सृष्टी रचण्याच्या हेतूने तपाचरण केले तेंव्हा जलावर तरंगत असलेल्या पुष्कर पर्णाचे दर्शन झाले. प्रजापतीने वराह रूप धारण करून पुष्कर पर्णाजवळ पाण्यात बुडी मारली. खाली त्यास महाभूमी आढळली. तेथून थोडी ओली माती काढून आपल्या धारदार सुळयांनी त्या मृत्तिकेचे दोन भाग पाडले. एक भाग पाण्यावर आणून पुष्कर पर्णावर ठेवल्याने "पृथ्वी " झाली. आजोबा ! ह्याला भूगोल असे म्हणत. महाभूमीपासून भुगोलाचे अंतर 5 कोटी ब्रह्मांण्ड योजने आहे. महाभूमीचा विस्तार 50 कोटी योजने आहे. जंबुद्वीप नावाचे द्वीप या

महाभूमी वर आहे. त्याच्यात नवखंड आहेत. देवखंडी देवता व गभस्त्यखंडी भूतांचा निवास आहे. पुरुषखंडी किन्नर, भरतखंडी मानव, शरभखंडी सिध्द, गंधर्वखंडी गंधर्व, ताम्रखंडी राक्षस, शेरूखंडी यक्ष व इंदूखंडी पन्नगांचा निवास आहे. महाभूमीवर असलेल्या जंबुद्वीपाच्या दक्षिणेस असलेले भरतखंडी, भरतपुरी, वैवस्वत मनू भूऋषी व मानवासमवेत राज्य करीत आहेत. महाभूमीवर जंबुद्वीप असल्याप्रमाणे भूगोलावर सुध्दा जंबुद्वीप आहे. माझा श्रीपाद श्रीवल्लभावतार पीठिकापुरी होण्या अगोदर 100 वर्षांपूर्वी या महाभूमीत माझे आगमन झाले. महाभूमीवर असलेल्या जंबुद्वीपाचा विस्तार लक्ष योजन आहे. जंबुद्वीपावर केवळ भरत खंडी वैवस्वत मनू आहेत. इतर खंडात देवयोनींचा वास आहे. कोवळया उन्हासारखा प्रकाश असून तेथे दिवस किंवा रात्र याचे भेद नाही. लवण समुद्राचे लक्ष योजने, लक्ष

 

द्वीपाचे दोन लक्ष योजने, ईक्षुरस समुद्राचे दोन लक्ष योजने, कुश द्वीपाचे चार लक्ष योजने, सुरा समुद्राचे चार लक्ष योजने, क्रौंच द्वीपाचे आठ लक्ष योजने, सर्पी समुद्राचे आठ लक्ष योजने, शाकद्वीपाचे 16 लक्ष योजने, दधी समुद्राचे 16 लक्ष योजने, शल्मली द्वीपाचे 32 लक्ष योजने, क्षीर समुद्राचे 32 लक्ष योजने, पुष्कर द्वीपाचे 64 लक्ष योजने, शुध्दजल समुद्राचे 64 लक्ष योजने, चलाचल पर्वताचे 128 लक्ष योजने, चक्रावळी पर्वताचे 256 लक्ष योजने, लोकालोक पर्वताचे 512 लक्ष योजने, तपोभूमिचे 1250 लक्ष योजने असा विस्तीर्ण आहे. लोकालोक पर्वताच्या पलिकडे सूर्य रश्मी जाऊ शकत नाही. म्हणून लोकालोक पर्वत व अंडांत या मध्ये अंधकार पसरलेला असतो. अंडांताचे विस्तार कोटी योजने आहे. वराहावतार किंवा नृसिंहावतार भूमीस व्याप्त करणारे असे अवतार

नाहीत. वराह म्हणजे सुकर नसून एक सूळा असलेला खड्गमृग आहे.

**द्वीप, द्वीपाधिपती, द्वीपाधि देवतांचे वर्णन :-**

महाभूमीत असलेल्या जंबुद्वीपास स्वयंभू मनूने चक्रवर्ती म्हणून प्रथम पालन केले. त्यांचे सात पुत्र सात द्वीपांचे अधिपती झाले. प्लक्ष द्वीपाचे मेधातिथी, शल्मल द्वीपाचे वपुष्मंत, कुश द्वीपाचे ज्योतिष्मंत, क्रौंच द्वीपाचे द्युतिमंत, शाक द्वीपाचे हव्य, पुष्कर द्वीपाचे सवन हे पहिले चक्रवर्ती होत. प्लक्ष द्वीपातील चातुर्वर्ण - आर्यक, कुरर, विंदक, भाविन या नावाने प्रसिध्द आहे. चंद्राकृतीत असलेले विष्णू त्यांचे आराध्य दैवत आहेत. शल्मल द्वीपी कपिल, चारणक, पीत व कृष्ण असे चार वर्ण आहेत. त्यांचे आराध्य देव विष्णू आहे. कुश द्वीपात

 

दमी, शुष्मीण, स्नेह व मंदेह असे चार वर्ण आहेत. त्यांचे आराध्य देव ब्रह्मा आहे. क्रौंच द्वीपात, पुष्कर, पुष्कल, धन्य व पिष्य असे चार वर्ण असून त्यांचे आराध्य दैवत रुद्र आहे. शाक द्वीपात मंग, मागध, मानस व मंद असे वर्ण असून सूर्यभगवानाची ते उपासना करीत. पुष्कर द्वीपात मात्र चातुर्वर्ण नाही. सगळे देवतांच्या सारखे, रोग व शोक मुक्त असून आनंदाने कालक्रमण करतात. त्यांचे आराध्य दैवत ब्रह्मा आहे. आपल्या भूगोलात, जंबुद्वीपामध्ये, भरत वर्ष, किंपुरुष वर्ष, हरि वर्ष, केतुमाल्य वर्ष, इलावृत वर्ष, भद्राश्व वर्ष, रम्यक वर्ष, हिरण्यक वर्ष, कुरु वर्ष या नावांचे भाग आहेत. महाभूमी गोलाकार असून, मध्यभागी, कासवाच्या पाठी प्रमाणे ऊंच आहे. ह्या उंचवट्यास भूमंडळ असे म्हणत. भूगोल मात्र लिंबा सारखे असते. महाभूमी मेरु रेखेस वळसा घेऊन

ब्रह्मांडाच्या टोकापर्यंत व्यापून आहे. भूगोल मात्र ज्योतिश्चक्राच्या समानांतरावर मध्यभागी स्थित आहे. महाभूमीच्या मध्यभागी असलेले मेरु रेखेच्या भोवती जंबुद्वीप आहे. त्याच्या भोवती, सप्तसमुद्र द्वीपादि आहेत. भूगोलाच्या उत्तरार्धास देव भाग व दक्षिणार्धास असुर भाग असे म्हणत. महाभूमीच्या मध्यभागी मेरू देदिप्यमान असून, जीवांस पालन करणाऱ्या मनूचे निवास स्थान आहे. भूगोल जीवांचे निवास स्थान आहे. महाभूमीच्या भोवती असलेले चक्रवाळ पर्वतशिखरी ज्योतिश्चक्र स्थित आहे. भूगोल मात्र यापेक्षा भिन्न आहे.

सप्त कक्षांनी आवृत्त असलेले ज्योतिश्चक्र भूगोलाची रोज एक प्रदक्षिणा करीत आहे. महाभूमीत, शीतोष्ण वातादि कमी असून सदैव प्रकाशमान असल्या कारणाने, नित्य दिवस असल्याने काळाचे व्यत्यास नाही. भूगोलात

ह्याच्या विपरीतआहे. महाभूमी केवळ पुण्यफल अनुभवण्यास प्राप्त करण्या योग्य आहे. स्थूल शरीराने अप्राप्य आहे. भूगोल पुण्य मिळविण्यासाठी असलेली कर्मभूमी असून स्थूल शरीरधारी राहण्याची भूमी होय. महाभूमीवर मनु प्रलया शिवाय दुसरे प्रलय उद्भवत नाही. भूगोलात, युग प्रलय, महायुग प्रलय, मनु प्रलय इत्यादी घडतात.

महाभूमीस, धात्री, विधात्री अशी नावे आहेत. भूगोलास, मही, ऊर्वी, क्षिति, पृथ्वी , भूमी अशी नावे आहेत. आजोबा ! पाताळ लोकाविषयी सांगतो, ऐका ! अतल येथे पिशाच्च गण, वितल लोकात गुह्यक, सुतल लोकात राक्षस, रसातलात भूत, तलातलात यक्ष, महातलात पितर व पाताळात पन्नगांचा वास आहे.

## लोकांतील निवासी, लोकाधिपती व खंडांचे विवरण :-

वितल लोकाचा व नवनिधींचा अधिपती कुबेर आहे. हा ब्रह्मांडाचा कोषाधिपती असून, उत्तर दिशेस अलकापुरी येथे याचा वास आहे.

वितल लोकाच्या मेरूच्या पश्चिमेस योगिनीपुरात मय राहतो. हा राक्षसांचा शिल्पी असून त्याने त्रिपुरासुरांस आकाशात ऊंच विहार करण्यास योग्य असे त्रिपुर निर्माण करून दिले.

सुतलातील वैवस्वतपुरात, यमाचे आधिपत्य आहे. हा दक्षिण दिशेचा अधिपती आहे. या नगरात प्रवेश करण्यापूर्वी, अग्निहोत्रा नदी आहे. या नदीस वैतरणी

असे म्हणतात. पुण्यवंतास ही नदी सुलभ रीतिने ओलांडता येते तर पापात्म्यांस अति कष्टदायक ठरते.

रसातलात पुण्यनगर येथे निॠति नावाचा दैत्य राज्य करतो. हा नैॠत्य दिशेचा अधिपती आहे. तलातल लोकात धनिष्ठापुरात पिशाच्च गणाबरोबर, वेताळाचे राज्य आहे. महातलात कैलासपुरी, सर्वभूत गणासहित कात्यायनीपती ईशान आहे. ते ईशान्य दिशेचा अधिपती होय. पाताळात वैकुंठ नगर आहे. त्यात श्रीमन्नारायण, पाताळात असलेल्या असुरांसहित, वासुकी इत्यादी सर्पश्रेष्ठांबरोबर, शेषशायी होऊन विराजमान आहेत. ह्यास श्वेतद्वीपात असलेले कार्यवैकुंठ असे म्हणत.

पाताळ लोकात त्रिखण्डसोपान आहे. प्रथम खंडात अनंग जीवांचा निवास आहे. द्वितीय खंडात प्रेत गणांचा वास

 

आहे. तृतीय खंडात यातनामय शरीर प्राप्त झालेले जीव दु:खाने आक्रोश करीत असतात.

महाभूमीमध्ये सप्त समुद्र, सप्त द्वीप आहेत. यांच्या मध्यभागी, जंबूद्वीप आहे. जंबूद्वीपाचे नव खण्डामध्ये विभाजन झाले असून, दक्षिणेस असलेल्या खण्डास भरत खण्ड असे म्हणत. भरतखण्डात भरतपुर येथे, स्वयंभू मनू राहत असे. अनेक पुण्यजीव, ऋषी इत्यादी, स्वयंभू मनूच्या राज्यात वास करीत. ते लोकांचे तसेच धर्माचे यांचे पालन करीत. महाभूमिवर सप्तद्वीपाभोवती, चराचर, चक्रवाळ लोकालोक असे पर्वत स्वर्गलोकापर्यंत व्यापून आहेत. हे कांती किरणांस आपल्यामधून कधीच प्रसारित होऊ देत नाहीत.

महाभूमीच्या खाली सात अधोलोक आहेत. ह्यास सप्त पाताळ असे म्हणत. अतल लोकात पिशाच्चांचा निवास आहे. वितल लोकात अलकापुरीत कुबेर असतो व योगिनीपुरात राक्षसांसमेत मय असतो. सुतल लोकात राजा बळी आपल्या परिवारासह असतो. वैवस्वतपूर यमाचे निवास स्थान असून येथील नरकात, पापी जीव यातना भोगतात. रसातल लोकात पुण्यपूर येथे निऋती भूत गणासहित निवास करतो. तलातल लोकात धनिष्ठापुरात वेताळ राहतो व कैलासपुरी रुद्र. महातलात पितृदेवांचा वास आहे. पाताळात श्वेतद्वीपवैकुंठ आहे. यात नारायणाचे निवास आहे. मेरूस लागून अधोभागी, अनंगजीव, प्रेतगण व यातनादेह असतात. निरालंब सूच्यग्रस्थानात महापातकी असत. भोजनांती "रौरवे अपुण्यनिलये पदमार्बुद निवासिनाम् । अर्थिनाम् उदकम्

 

दत्तमक्षय्यमुपतिष्ठति ॥" म्हणून उत्तरापोषणात उदक यांस प्रदान करीत असतो.

## लोकाचे नाव, त्यांचे विस्तीर्ण विवरण :-

भूलोकात असलेले भुगोल व महाभूमी भिन्न आहेत. याचे स्पष्टपणे समजून घे. भूगोल बिंदुच्यावर ऊर्ध्व धुरव स्थानापर्यंतच्या प्रदेशात मेरुरेखेस प्रकाशमान करणारे सूर्य लोक होय. हे सूर्यदेवतेचे लोक असून सूर्यग्रह मंडल नव्हे. याच प्रमाणे, चंद्र लोक, अंगारक लोक, बुध लोक, गुरु लोक, शुक्र लोक, शनैश्चर लोक, राश्यादी देवता लोक, नक्षत्र देवता लोक, सप्तऋषी लोक, ऊर्ध्व ध्रुव लोक, असे आहेत. याशिवाय आणखी अवांतर लोक सुध्दा आहेत.

 

भूमध्य बिंदूपासून सूर्य लोक, लक्ष ब्रह्मांड योजन आहे. हे सूर्य ग्रहाचे अधिपती असलेले सूर्य देवतेचे स्थान आहे. भूमध्य बिंदू पासून चंद्र लोक, दोन लक्ष ब्रह्मांड योजने, अंगारक लोक 3 लक्ष ब्रह्मांड योजने, बुध लोक 5 लक्ष ब्रह्मांड योजने, गुरु लोक 7 लक्ष ब्रह्मांड योजने, शुक्र लोक 9 लक्ष ब्रह्मांड योजने. शनैश्वर लोक 11 लक्ष ब्रह्मांड योजने, राश्यादि देवता लोक 12 लक्ष ब्रह्मांड योजने, नक्षत्रादि देवता लोक 13 लक्ष ब्रह्मांड योजने, सप्तऋषी लोक 14 लक्ष ब्रह्मांड योजने, ध्रुव लोक 15 लक्ष ब्रह्मांड योजने आहे. याप्रमाणे, भूमध्य बिंदूपासून विविध अंतरावर, स्वर्गलोक, महर्लोक, जनलोक, तपोलोक, सत्य लोक आहेत. भूमध्य बिंदू पासून ब्रह्मांडास भोवती भिंती सारखे म्हणजे, अंडांतापर्यंत, 24 कोटी, 50 लक्ष ब्रह्मांड योजनांचे अंतर आहे. भूमध्य बिंदूपासून, अंडांताच्या बाहेर पर्यंत, 25 कोटी, 50 लक्ष

ब्रह्मांड योजनांचे अंतर आहे. भुलोक, भुवर्लोक व स्वर्लोक प्रलयकाळी नाश पावतात. स्वर्लोकावरील महर्लोक, थोडेफार नाश पावून थोडे स्थिर राहतात. त्यावर असलेले जन, तप व सत्य लोक ब्रह्माच्या आयुष्याच्या अंती नाश पावतात. स्वर्ग म्हणजे, स्वर्लोक, महर्लोक, जन लोक, तपोलोक, सत्यलोक व अंडांतापर्यंतचा प्रदेश.

## दत्त म्हणजे कोण ?

आजोबा ! दत्त तत्व तुला अनुभवायचे असेल तर लक्षवेळा जन्म घेतले पाहिजे. कोटयानुकोटि ब्रह्मांडास व्याप्त करून त्यांचे अतिक्रमण करून असलेले एकमेव तेजोमहाराशी म्हणजे दत्त असे समज. ते दत्तप्रभूच तुझ्या समोर असलेले श्रीपाद श्रीवल्लभ आहेत असे जाण.

श्री चरणांनी केलेला हितोपदेश ऐकून नरसावधानी व त्यांची पत्नी चकित झाले. एक वर्षाच्या बालकाने साधिकाराने, येवढे महत्वपूर्ण व गहन असे विषय सांगणे व स्वत: दत्त असल्याचे निरूपण ऐकल्यावर नरसावधानी व त्यांच्या पत्नीस राहवले नाही. ते ढसढसा रडू लागले. त्या दिव्य शिशूचे श्रीचरण स्पर्श करावे अशी इच्छा व्यक्त केली. त्यास श्रीपादांनी नकार दिला. नरसावधानी व त्यांची पत्नी जागच्या जागी खिळुन राहिले.

श्रीपाद पुढे म्हणाले - मी दत्त आहे. कोटयानुकोटि ब्रह्मांडात व्याप्त असलेले एकमेव तत्वमीच आहे. दिग् हेच वस्त्र म्हणून दिगंबर आहे. जे कोणी त्रिकरणशुध्दीने दत्त दिगंबरा ! श्रीपाद श्रीवल्लभ दिगंबरा !

नरसिंहसरस्वती दिगंबरा ! म्हणून भजन, कीर्तन करतात तेथे मी सूक्ष्म रूपाने सदैव असतो. माझे मातामह असलेले श्री बापन्नार्य, परप्रांतातून पादगया क्षेत्री श्राध्दादी कर्म करण्यास आलेल्या लोकांस सेवाथावाने भोजन व राहण्याची सोय करीत असताना कांही लोकांना आक्षेप घेतला कोठे आहेत तुमचे स्वयंभू दत्त ? अदृश्य झाले ना ? तेंव्हा श्रीपाद म्हणाले, "तो दत्त मीच आहे. मी जन्म घेतलेल्या पवित्र गृहात राहण्यास आलेले नक्कीच पवित्र होतील.पितृदेवतांस अवश्य पुण्य लोकांची प्राप्ती होईल. जीवित असलेले जीवांचे, तसेच मरण पावलेल्या जीवांचे योगक्षेम वहन करणारा प्रभू मीच आहे. मला जन्म मरण दोन्ही समान आहेत. तरी तू स्वयंभू दत्ताची आराधना केल्याचे फळ हेच का ? अशी व्यथा तुझ्या मनात आहे. तुझ्यावर असलेले आळ नाहीसे करण्यास स्वयंभू दत्ताचे दर्शन शीघ्र होईल.

आणि मूर्तीची प्रतिस्थापना होईल. तुला मी आयुष्य दिले. दत्त ध्यानी असू दे. पुढच्या जन्मी तुला अनुग्रह होईल असे आश्वासन देतो. या जन्मी माझ्या पादुकांस स्पर्श करण्याचे महापुण्य तुला नाही. कोटयानुकोटि ब्रह्मांडाचे सृजन , रक्षण व लय करणारा एकैक प्रभू असा मी माझ्या वरद हस्तांनी तुला आशिर्वाद देतो." महा भयंकर अशा ध्वनीनी श्रीचरणांचे शरीरातील अणु परमाणू विघटित होऊन, श्रीपाद अदृश्य झाले.

बाबारे ! शंकरभट्टा ! श्रीपादांनी स्वत: त्यांच्या नामाच्या शेवटी दिगंबरा नाम जोडून जप करण्याचे मर्म या प्रकारे निरोपिले. त्यांचे सर्व व्यापक तत्व, निराकार असलेले ते तत्व, साकार रूपात असे अवतरीत झाले हे आपल्या कल्पनेच्या बाहेर आहे. लहान मुलाच्या रूपाने, गोंडस

रूप धारण करून आलेल्या त्या जगत्प्रभूच्या लहानपणापासून करीत असलेल्या लीलांना अंत कोठे ?

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जयकार ॥**

 

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -8

## दत्तावताराचे वर्णन

## आत्मसाक्षात्कार कसा घडतो ? ब्रह्मज्ञानासाठी तप करणारे खरे ब्राह्मण

दुसरे दिवशी तिरुमलदास आपले नित्य नैमित्यिक अनुष्ठान झाल्यावर म्हणाले "अरे शंकरभट्टा आत्मसाक्षात्कार जेव्हा होतो त्यावेळी पंधरा कला आपआपल्या भुता मध्ये लय पावतात त्या त्या देवता मूलभूत शक्ती असलेल्या चैतन्यात लीन होतात. आत्मज्ञान, कर्म इत्यादी ब्रह्म स्वरूपात लय पावत

असतात. अशा ब्रह्मज्ञानासाठी जो परिश्रम करीत असतो, तो खऱ्या अर्थाने ब्राह्मण होय. प्राण, विश्वास, आकाश, वायु, अग्नी, जल, भूमी, इंद्रिये, मन, अन्न, बल, विचार, मंत्र, कर्म, लोक, लोकांतील विविध नावे त्यांना अग्नि सोळा कळा असे म्हणतात. श्रीपाद प्रभू षोडश कलांनी परिपूर्ण असे परब्रह्मावतार आहेत."

## अन्न हेच मन होय - सात्विक अन्नाच्या सेवनाने मनाचे निर्मलत्व प्राप्त होते

विधात्याने प्रथम प्राणांची सृष्टी केली. प्राण म्हणजे संपूर्ण विश्वात विद्यमान असलेली प्राण शक्ती होय. त्या प्राण शक्तीस सूक्ष्मात्मा, हिरण्यगर्भ या नावाने सुध्दा संबोधिले जाते. प्राणमय कोषामध्ये स्थित जीवधातु शक्तीला शक्ती शरीर असे म्हणतात. प्राणमय

चैतन्यास संतुलितरीत्या प्रवाहित केल्यास मनुष्यांचे भौतिक दु:खांचे निवारण होते. मनुष्याचा स्थूल देह रोगी होण्यापूर्वी प्राणमय शरीर रोगग्रस्त होते. त्याच्या नंतर स्थूल शरीर रोगग्रस्त होते. सृष्टीच्या प्रारभांचा निश्चय झाल्यावर पंचमहाभूतांचा अविर्भाव झाला. या पंचभूतांचे आकलन करण्यासाठी पंचेंद्रियांची रचना झाली. ह्यांचे संधान करून व्यवस्थित काम करण्यासाठी पंचेंद्रियांची योजना झाली. या दहा इंद्रियावर मनाचा ताबा असतो आणि मन हे आहारा पासून बनते म्हणून मनुष्याने आपल्या आहारा विषयी अत्यंत सावध असले पाहिजे. कारण आहाराच्या सूक्ष्म भागानेच (सुक्ष्मांशाने) मनातील भावना प्रकट होतात. जसे आहाराचे गुण त्याप्रमाणे आपले विचार होतात. मनातील विचाराच्या धारेस क्रमबध्द करून नियंत्रित करणे यालाच "मंत्र" असे म्हणतात. यज्ञ-यागादिकांचे विधिपूर्वक आचरण करीत

त्या त्या कर्मकांडात सांगितलेले मंत्रोच्चारण विधिपूर्वक करणे ह्यास "कर्म" असे म्हणतात. विश्वनिर्मितीचा आधार कर्मच आहे. नामरूप विवर्जित जग असू शकत नाही. आपल्यामधील प्रत्येक इंद्रियास एक एक देवता असतात. या देवतेच्या प्रभावाने ती ती इंद्रिये कार्य करीत असतात. समाधिस्त असलेल्या योग्यास जेंव्हा आत्म साक्षात्कार होतो त्यावेळी सोळा कला, मूलतत्वात लय पावतात. योग्याच्या भौतिक इंद्रियातील चैतन्य शक्ती विश्वातील चैतन्य शक्तीमध्ये लीन पावते. कर्मेंद्रिये व ज्ञानेंद्रियाने युक्त असलेला मनुष्य कर्म न करता राहू शकत नाही.

# अहंकार नष्ट झाल्याशिवाय मोक्षाची प्राप्ति होत नाही

मनुष्याच्या अहंकारामुळे कर्माचरण घडत असते. अहं म्हणजे मन आणि बुध्दि हे अज्ञानाच्या आवरणांनी आच्छादित झालेले अशुध्द चैतन्यच होय. आत्मसाक्षात्कार झालेल्या योग्यास जन्मांतराचे कर्मफल शेष राहात नाही. अहंकार पूर्णपणे नामशेष झाल्याशिवाय आत्मसाक्षात्कार होत नाही. योग्यास जेंव्हा आत्मसाक्षात्कार होतो तेंव्हा श्रौत कर्म आणि त्याच्या प्रतिफलाचे ज्ञोंच्द्र महद अहंकार असून, मायाजालासहित शाश्वत परमात्म्यामध्ये लीन होऊन व्यक्तित्व रहित होतो. परमात्मा व्यक्तित्व सहित शक्ती स्वरूप होऊन राहिला आहे. कर्म व त्याच्या फलाचा नाश पाऊन योगी सिध्दावस्थेस प्राप्त करतो. जरी योगी कर्म फलाचे भोग स्थूल देहाने भोगत असला तरी देहाभिमान नसल्या

कारणाने, तो सतत मुक्तावस्थेत स्थित असतो. परमात्मा योग्यांच्या द्वारे आपल्या दिव्य लीलांचे प्रकटीकरण करीत असतो. योगीक शक्तीचा अहंकार एखाद्या योग्यास झाला असेल तर सर्व शक्तींचे हरण करून त्याचा गर्व हरण करण्याचे सामर्थ्य परमात्म्यात असते. श्री बापन्नार्यांनी श्रीशैल्य क्षेत्री असलेल्या श्री मल्लिकार्जुन आणि गोकर्ण क्षेत्री स्थित महाबळेश्वर व इतर कांही ठिकाणी सौर मंडलातून शक्तीपात केला होता. स्वयंभू दत्ताची उत्सव मूर्ती तसेच अर्चन मूर्तीत सुध्दा शक्तीपात केला होता. अग्निसंबंधित असलेल्या या शक्तीस शांती विधान करावे लागते. तसे न केल्यास अर्चकासह अर्चना करविणारे सुध्दा अर्चना मूर्तीच्या प्रखर तेजाने शिक्षेस पात्र होऊन त्यांना अनिष्ट फल प्राप्त होते. स्वयंभू दत्त मूर्ती मध्ये झालेल्या शक्तीपाताचे रहस्य केवळ अंतर ज्ञानी असलेले योगीच जाणू

शकतात. श्रीशैल्य मल्लिकार्जुन स्थानी शक्तीपात, हजारो लोक उपस्थित असताना श्री बापन्नार्यांच्या अध्वर्यत्वाने झाला होता. सूर्य मंडळातील तेज बाहेर पडून सर्वांच्या समक्ष मल्लिकार्जुनाच्या लिंगात ते लीन झाले. श्रीपाद श्रीवल्लभ यांचा अवतार व हा शक्तीपात ही दोन अत्यंत गोपनीय अशी दैवी रहस्ये आहेत. ती केवळ महायोग्याना सांगण्यासारखी व त्यांनीच जाणण्या योग्यआहेत. श्रीशैल्यात झालेल्या शक्तीपात शांती विधान करण्यात आले. यात हजारोंच्या संख्येने अन्नदान झाले. त्या योगाने जठराग्नि शांत झाला. उग्रत्वाची शक्ती शिथिल होऊन शांती तत्वात लीन झाल्यामुळे सर्व कार्य शांत व शुभप्रद झाले. पिठापूर येथील स्वयंभू मूर्तीवर झालेल्या शक्तीपातास प्रत्यक्ष साक्ष व दाखला नसल्याकारणाने तेथे शांती विधान किंवा अन्नदान झाले नाही. श्री बापन्नार्यांनी अन्नदान करण्यास सुचविले असता,

पिठापूरातील ब्राह्मण पंडितांनी तर्क, विर्तक करून श्री बापन्नार्याची सूचना फेटाळून लावली.

## श्रीपाद षोडश कला परिपूर्ण

काळ आपल्या गतीने चालला होता. श्रीपादांचे वय आता दोन वर्षाचे झाले. या दोन वर्षाच्या कालावधीत श्रीपादांनी आपण षोडश कलांनी परिपर्णअसल्याचे अनेक बाललीलाद्वारे दाखवून या युगातील महा अवतार असल्याचे निदर्शनास आणले होते. वयाच्या सोळाव्या वर्षी श्रीपाद प्रभूंनी पिठापूर सोडले. त्यानंतर ते चौदा वर्षे पर्यंत कुरवपूर व आणखी कांही क्षेत्रात राहिले. परंतु त्यांची शरीरयष्टी सोळा वर्षाच्या किशोराप्रमाणेच होती.

## श्री दत्तात्रेयांचे षोडश अवतार :

सोळा या संख्येस एक वैशिष्ट्य आहे. श्री दत्तात्रेयानी पूर्व युगात सोळा अवतार धारण केले होते. ते असे 1) योगीराज, 2) अत्रिवरद, 3) दिगंबरावधूत, 4) कालाग्निशमन, 5) योगीजन वल्लभ, 6) लीला विश्वंभर, 7) सिध्दराज, 8) ज्ञानसागर, 9) विश्वंभरावधूत, 10) मायामुक्तावधूत, 11) आदिगुरु, 12) संस्कारहीन शिवस्वरूप, 13) देवदेव, 14) दिगंबर, 15) दत्तावधूत, 16) श्यामकमल लोचन.

श्रीदत्त प्रभू भोग व मोक्षाचे दाते होत. त्यांची आराधना करण्यासाठी केवळ त्यांच्या पादुकांची आराधना केली असता पुरे. चारी वेद श्वान रूपाने त्यांच्या पादुका जवळ साऱ्या अपवित्रतेस पवित्र करीत त्यांच्या चरण कमली

पडून असतात. श्री दत्तात्रेयांच्या पवित्रतेची कल्पना करण्यास मानव तर काय देवता व सप्तऋषी सुध्दा असमर्थ होत. युगांतरी जेंव्हा वामनावतार झाला तेंव्हा त्याचे समकालीन असलेले श्री वामदेव महर्षींचा सुध्दा जन्म झाला. त्यांच्या जन्म समयी मातेच्या गर्भातून केवळ शिर बाहेर आले व चारी दिशेंचे अवलोकन करून पुन: गर्भात निघून गेले. तेंव्हा देवता व ऋषीगणांनी प्रार्थना केल्यावर श्री वामदेवानी पुन्हा जन्म घेतला. ते जन्मत: शुध्द ब्रह्मज्ञानी होते.

त्याचप्रमाणे श्रीपादांच्या जन्म समयी सुध्दा घडले. ते केवळ ज्योती स्वरूप होते. याप्रमाणे दोन वेळा जन्म घेतल्याने ते आजन्म द्विज होते. ते संपूर्ण, अखंड, अनंत, अद्वैत, सच्चिदानंदघन असल्या कारणाने या अवतारात त्यांना गुरू अशी व्युक्त नव्हती. वास्तवात, ते

त्रिमूर्तीचे संयुक्त रूप नसून त्रैमूर्तीच्या अतीत असलेले एक विशिष्ट तत्व होते. म्हणून त्या त्रैमूर्तिस अतीत असलेले चतुर्थतत्व असल्याचे सुचविण्यासाठी त्यांनी चतुर्थीस अवतार घेतला. मातेच्या गर्भातून बाहेर येऊन पुन्हा गर्भस्थ झाले असता, महायोगी, सिध्द पुरुष व देवतांच्या प्रार्थनेस प्रसन्न होऊन पुन्हा जन्मल्यामुळे ते आजन्म ब्रह्मज्ञान संपन्न होते. चित्रा नक्षत्राचा अधिपति अंगारक (मंगळ) आहे. तो ग्रह पाप (नीच) स्थानी असता सकल जीव राशीस अमंगलप्रद ठरतो. सकल अमंगळाचे हरण करून शुभमंगलत्व प्रदान करण्यासाठी प्रभूंनी चित्रा नक्षत्रामध्ये जन्म घेतला. चित्रा नक्षत्र असतांना श्रीपाद प्रभुंचे पूजन केल्यास विशेष फलप्रद ठरते. श्रीपाद प्रभू साक्षात धर्मशास्ते आहेत. ते हरी-हरात्मज श्री अय्यप्पा स्वामी असल्याचे सुचविण्यासाठी त्यांनी तूळ राशीमधे जन्म घेतला. ते जाणत नाहीत असे

धर्मशास्त्रच नाही. धर्म संकटात सापडलेल्या मनुष्याने त्यांची प्रार्थना केल्यास त्यास धर्म पथप्रदर्शनाचा लाभ होतो. सूर्य हा ग्रहांचा अधिपति आहे. सिंह लग्नामध्ये जन्म घेतल्यामुळे ते सकल विश्वाचे नाथ व दरबार भरण्यासाठी जन्म घेतलेले जणुकांही चक्रवर्तीच आहेत असे सूचित होते.

श्रीदत्तप्रभूपासून त्रिमूर्ती आणि त्रिमूर्तीपासून तीन कोटी देव व त्यांच्या पासून तेहतीस कोटी देवता उत्पन्न झाल्या. म्हणून केवळ श्रीदत्त नामस्मरणाने सकल देवतास्मरण केल्याचे फल प्राप्त होते.

श्रीदत्तप्रभूंच्या ब्रह्ममुखास ऋषी पूजन करावे. विष्णुमुखास, श्री सत्यनारायण व्रत व विष्णु सहस्त्र

नामाने पूजन करावे. त्यांच्या रुद्रमुखास, रुद्राभिषेकाने अभिसिंचन करावे. श्रीदत्तप्रभूंच्या ब्रह्ममुखाच्या जिव्हेवर सरस्वतीचा निवास आहे. विष्णूमुखाच्या वक्षस्थळी लक्ष्मीचा वास आहे. रुद्रमुखाच्या वामभागी गौरीचा वास आहे. सृष्टीतील सकल स्त्री देवता शक्ती श्रीपादाच्या वामभागी व पुरुष देवता शक्ति दक्षिण भागी विराजमान आहेत. तिरुपतीमधील सप्त गिरीवर अवतरलेले श्री वेंकटेश्वर स्वामी हे साक्षात श्री दत्तप्रभूच. "वें" कार हे अमृत बीज व "कट" हे ऐश्वर्य बीज होय. म्हणून श्री वेंकटेश्वर हे अमृत व ऐश्वर्याचे प्रदाते आहेत. "वें" म्हणजे पाप व "कट" म्हणजे खंडन करणारा किंवा हरण करणारा असा अर्थ आहे. श्री वेंकटेश्वर आणि श्रीपाद श्रीवल्लभ खरे पाहता एकच असून अभिन्न आहेत. तेंव्हा मी म्हणालो "हे तिरुमलदास ! पूर्वी वर्णाश्रमधर्म काटेकोरपणे पालन करावा असे विद्वज्जनांचे म्हणणे

 

होते. परंतु श्रीपाद प्रभूंचे मत याच्या विरूध्द होते असे मला वाटते. तर माझ्या या शंकेचे समाधान करावे अशी विनंती."यावर तिरुमलदास म्हणाले "अरे ब्राह्मणांने ब्रह्मज्ञानाच्या अन्वेषणात (प्राप्तीसाठी) जीवन घालविले. तरच तो सद्‍ब्राह्मण म्हणवला जातो. विहित धर्म, कर्माचा त्याग करून दुराचारी झाल्यास तो दुष्ट ब्राह्मण होईल. त्याचे दुराचार वाढून तो गो हत्या व गो-मांस भक्षण करण्यास प्रवृत झाल्यास त्याच्यातील ब्राह्मणत्व लोप पाऊन त्याचे ब्राह्मतेज संपूर्णपणे क्षीण होते. त्याच्या शरीरातील जीवन कणांमध्ये बदल घडून तो चांडाळत्वास प्राप्त होतो. तेंव्हा तो ब्राह्मण होऊ शकत नाही. क्षत्रियाने ब्रह्मज्ञानाच्या आकांक्षेने निरंतर तपाचरण केल्यास ब्राह्मणत्व प्राप्त करू शकतो. क्षत्रियांच्या शरीरात जन्मजात असलेल्या जीवनकणात तपाचरणाने बदल घडून, त्याला ब्राह्मणत्व प्राप्त होते.

या प्रमाणे विश्वामित्रांना ब्राह्मणत्व प्राप्त झाले होते. शनीग्रहाचे तीन राशीत म्हणजे साडेसात वर्षे पर्यंत चलन असते. तेंव्हा प्रत्येक मनुष्याच्या शरीरातील जीवनकणांमध्ये बदल घडतो. जुन्या जीवन कणांचा नाश होऊन नूतन जीवन कणांचे सृजन होत असते. याची मनुष्यास कल्पना सुध्दा येत नाही."

## क्षत्रियांचे लक्षण

क्षत्रियाने क्षात्रधर्माचा त्याग करून शांतीरस प्रधान असलेले कृषी, गोसेवा, वाणिज्य, अशा धर्माचे पालन करून स्वकर्म सोडल्यास त्याच्यातील क्षात्रतेज टिकून राहत नाही. त्याच्या मन, बुध्दि व शरीरात अनेक बदल घडून येतात आणि तो वैश्यत्वास पावतो. ब्राह्मणाने क्षात्र धर्माचे अवलंबन केले असता परशुरामासारखा होतो.

पूर्वी द्रोणाचार्य आणि कृपाचार्‍य जन्मत: ब्राह्मण असले तरी त्यांनी क्षात्र धर्माचे पालन केले नव्हते का ? कुसुम श्रेष्ठी वैश्य असला तरी त्याने क्षत्रिय वृत्तीचे अवलंबन केले नव्हते का ? जन्मत: शुद्र असून श्रीपाद प्रभूंच्या कृपेने मला ब्रह्मज्ञान प्राप्त झाले नाही का ? निरंतर प्रयत्नाने (तपाचरणाने) शूद्र सुध्दा वैश्य, क्षत्रिय किंवा ब्राह्मण होऊ शकतो. केवळ एका विशिष्ट वर्णात जन्म झाला म्हणजे यम, धर्म, शिक्षा आचरीत आहे किंवा नाही असे नसून, आपआपल्या शुभ कर्माच्या फलावर आपला वर्ण अवलंबून आहे. जन्मत: शूद्र असलेल्या मला पुढचा जन्म ब्राह्मणाचा मिळू शकेल. तसेच जन्मत: ब्राह्मण असलेल्यास पुढचा जन्म शुद्राचा सुध्दा मिळू शकतो. सामाजिक कारणासाठी वर्ण व्यवस्था करण्यात आली. परमात्म्याचे मुख ब्राह्मणत्व, बाहू क्षत्रियत्व, ऊरु वैश्यत्व व पाद शुद्रत्वाचे सूचक आहेत असा श्रीपादांनी

 

एक पर्याय सांगितला. तू माझ्या अतिथ्याचा स्वीकार केलास. माझ्या घरचे भोजन हे ब्राह्मणाच्या घरचेच भोजन होय.

## कर्मरहस्य

निरंतर श्रीपादांचे नामस्मरण व ध्यान केल्याने येथील परिसरातील वातावरण शुभप्रद आणि पवित्र अशा स्पंदनाने भरले आहे. जन्मत: नरसावधानी ब्राह्मण असले तरी त्यांच्या घरात भौतिक, मानसिक व अध्यात्मिक स्पंदने विषपूरित असल्याकारणाने तेथील वायुमंडल कलुषित झाले होते. या कारणानेच श्रीपाद प्रभूंनी त्यांच्या अतिथ्याचा स्वीकार केला नाही. यातील हे रहस्य आहे बरे का ! जीव परिणाम क्रमाने किंवा विपरिणाम क्रमाने कर्मसुत्राच्या अनुसार जन्म घेण्यास

 

वर्ण आवश्यक आहे. नाही का ? यासाठी वर्णाश्रमाची योजना झाली. जॉन, हा जर्मनी देशाचा रहवासी असून सुध्दा त्याला ब्रह्मज्ञानाची अत्यंत जिज्ञासा लागली होती. परिणाम क्रमाच्या शेवटच्या अवस्थेत त्याला कुरवपुरी श्रीपाद प्रभूंचे दर्शन झाले व अमोघ अशा अनुग्रहाची प्राप्ति झाली. नरसावधानी पीठिकापुरमध्ये असून सुध्दा श्रीपाद, श्री दत्तात्रेयांचे अवतार आहेत हे जाणण्यास त्यांना कित्येक वर्षे लागली. हे जाणल्यानंतर सुध्दा साधनाक्रमाशिवाय श्री दत्तांच्या अनुग्रहास प्राप्त होणे अशक्य होय.

यावर मी म्हणालो "स्वामी आपले म्हणणे असे आहे की प्रत्येक जीवकणांमध्ये बदल घडत असतो. तर प्रत्येक जातीस एक आत्मा आहे काय ? पार्वती देवी ही

हिमपर्वताची कन्या असे म्हणातात. असे म्हणण्याचे कारण काय ?''

यावर तिरुमलदास म्हणाले ''प्रत्येक जातीस एक आत्मा असतो. तो शक्तीच्यारूपात असतो. ती शक्ती , दिव्यात्मा असल्या श्रीदत्तप्रभूंच्या मधून बाहेर आलेली आहे. सदैव या शक्तीचा संबंध परमात्म्याशी असल्या कारणाने, ती महाशक्ति होय. जात या शब्दाचा अर्थ तू जो समजतोस तसा नाही. जिवंत व्यक्तिमध्ये जसे चैतन्यवंत असे जीवकण असतात, असा आहे. त्याचप्रमाणे सामुहिक/सांघिक व्यक्तित्वामध्ये असलेल्या प्रत्येक व्यक्तीचे शक्ति -सामर्थ्य गुणगण अंतर्लीन होऊन असतात.

तसेच प्रत्येक गावास, प्रत्येक शहरास, प्रत्येक राष्ट्रास एक आत्मा असतो. आपण राहतो त्या भूमीस सुध्दा आत्मा आहे. भूमीची जी अधिष्ठान देवता तीस आपण भूमाता" असे म्हणतो. तीच्यातील आत्म्याचे, परमात्म्याचे अंश असल्या कारणाने ती मानसिक संबंध असलेली महाशक्ती आहे. तसेच हिमपर्वताच्या ठायी अधिष्ठित असलेल्या देवताशक्तीस हिमवंत असे संबोधित करतो. त्या हिमवंताची पुत्री हेमवती होय. सर्वसाक्षी सूर्य भगवानांचे पुत्र यमधर्म असे मानल्यास, जीवराशीच्या शुभाशुभ कर्मानुसार न्याय करून पाप्यांना शिक्षा करणारी देवता शक्ति आहे असा अर्थ होतो.

जगातील सारे प्राणीमात्र, आपआपले कार्य करण्यासाठी सूर्यापासून उर्जा प्राप्त करतात. आकाशात विराजमान असलेले सूर्य बिंब वेगळे व त्याच्यात अधिष्ठित असलेले

 

देवता स्वरूप देवतात्मा वेगळे. श्रीपाद वल्लभ वयाच्या तिसाव्या वर्षी गुप्त होतील असे मी तुला सांगितले होते. ते अनंत कोटी ब्रह्मांडात असलेल्या अणु-रेणु मध्ये विलीन होतील. ते सर्वांतर्यामी आहेत ना ? पुन्हा विलीन होणे म्हणजे काय ? असा प्रश्न तू विचारू शकतोस. ते सर्वांतर्यामी असले तरी त्यांच्या शक्तीच्या प्रभावापासून थोडया अंतरावर कोटयावधि ब्रह्मांडे आहेत. त्या ब्रह्मांडातील परिभ्रमणांचे व्यवस्थीकरण करण्याच्या उद्देशाने त्यांच्या शक्ति प्रभावाने त्या ब्रह्मांडास आपल्या जवळ आकर्षित करतात. संपूर्ण सृष्टीत परिणाम दशेत एखादी विपत्कारी स्थिती उत्पन्न झाली असता श्री दत्तात्रेयांचा अवतार होते. चुंबक लोहाचे आकर्षण करते. परंतु लोहावर मालिन्य असल्यास चुंबकाची आकर्षण करण्याची शक्ति अत्यंत बलहीन होते. मलिनत्वास नाहीसे करून, सृष्टीतील प्रत्येक अणुचे

आकर्षण करून, विश्वपरिणामास नूतन दिशा देण्याचा संकल्प जेंव्हा होतो त्यावेळेस मात्र असे अवतार होतात.

## पंच कन्यांचे विवरण

तेंव्हा मी म्हणालो "स्वामी ! अहिल्या, द्रौपदी, सीता, तारा, मंदोदरस्तथा । पंचकन्याम् पठेन्नित्यम् महापातक नाशनम् ॥"-असे म्हणतात. हा विषय मला सुलभ रीतिने समजत नाही म्हणून ह्याचे विवरण करावे ही प्रार्थना.

तिरुमलदास यावर म्हणाले - "अहल्येवर इंद्र मोहित झाला होता व तिला प्राप्त करण्यासाठी त्याने मायेचा उपयोग केला, कुक्कुट रूप धारण करून त्याने बांग दिली. पहाट झाली असे समजून गौतम ऋषी

अनुष्ठानास बाहेर गेले. पतिव्रता असल्या कारणाने इंद्र अहल्येस स्पर्श करू शकत नव्हता. इंद्र देवता देवशक्तिसंपन्न असल्या कारणाने, त्याने अहल्ये मायेची अहल्या उत्पन्न करून त्या मायेच्या अहल्येशी समागम केला. माया अहल्येच्या शरीरातील जीवाणू इंद्राच्या तीव्र अशा इच्छामुळे उत्पन्न झाली होती. माया अहल्या व इंद्र समागमी असता गौतमाने पाहिले व क्रोधित होवून त्या दोघांस शाप दिला. अहल्या म्हणाली "हे मुनीवर, आपण हे काय केले ?" अध्यात्मात अहल्या गौतमापेक्षा उच्च स्तरावर होती. अहल्येच्या शापामुळे गौतम ऋषी 12 वर्षंपर्यंत भ्रमिष्ठ होऊन तदनंतर शिवार्चना करून स्वस्थ झाले. अहल्येची मनशक्ती जड झाल्याने तिचे शरीर पण जडत्व पावून शीळा झाली. श्रीरामाच्या चरण धुळीने अहल्येचे शाप विमोचन झाले. म्हणून अहल्या परम पवित्र आहे असे जाण."

शापग्रस्त झालेला इंद्र पंच पांडव म्हणून जन्मास आला. पाच रूप, पाच मन असले तरी, त्यांस आधारभूत असलेला आत्मा एकच ! हा एक विचित्र असा विषय आहे. शचीदेवीचा आविर्भाव यज्ञकुंडात द्रौपदीच्या रूपाने झाला. ती अयोनिजा आहे.

खऱ्या सीतेस अग्नीदेवाने आपल्या गर्भात लपविले व मायेच्या सीतेस रावणाने लंकेस नेले. अग्निप्रवेश केल्यावर मायेची सीता गुप्त झाली व खरी सीता बाहेर आली. म्हणून सीता महापतिव्रता आहे असे जाण.

भूचक्रात 12 राशीमध्ये 27 नक्षत्रे आहेत. या 27 नक्षत्रांची जी अधिष्ठात्र देवता आहे तिचा जन्म तारादेवी म्हणून झाला. ती भर यौवनात असताना, गुरु ग्रहाचे अधिष्ठात्र

देवता असलेले बृहस्पती , मोहित झाले व तिच्याशी विवाह केला. वृध्द पति यौवनवतीस तृप्त करू शकत नाही. हा विषय धर्म विरुध्द आहे. म्हणून विवाहसमयी केलेले शपथेचे उल्लंघन झाल्यास क्षती नाही. तारादेवीच्या मनात बृहस्पती विषयी कधीच पती असल्याचे भाव उत्पन्न झाले नाहीत. तारादेवीच्या मनात पतीचे भाव उत्पन्न करण्याची जबाबदारी बृहस्पतींची होती. तसे न करता सकल धर्मांचे ज्ञाते असलेले बृहस्पतीने, धर्म विरुध्द आचरण केले. तारादेवीच्या शरीरातील जीवाणूंचे तिच्या मन:प्रवृती प्रमाणे बदल घडले. तिच्या मनात चंद्राचे रूप स्थिर झाले असून तिचे हृदय चंद्राधीन झाले होते. ह्या प्रमाणे बदल घडलेली तारादेवी व पूर्वी बृहस्पतीस विवाह केलेली तारादेवी भिन्न होत. म्हणून तारा-चंद्र यांचे मिलन हे धर्म विरूध्द नाही. सृष्टी नियमाप्रमाणे 27 नक्षत्रांतून भ्रमण करणे हा

 

चंद्राचा धर्म होय, गुरु ग्रहाचा नव्हे. जर गुरुग्रहाने असे केल्यास, धर्म विरूध्द होईल. कुठल्याही धर्म विरूध्द कार्याची अधोगती होते. म्हणून 27 नक्षत्रांची अधिष्ठान देवता तारादेवी, चन्द्र मंडलाचे अधिष्ठान देवता असलेल्या चंद्रास पावणे हाच धर्म होय. बाबारे ! ह्या धर्मसूक्ष्मास अनुसरून तारादेवी महापतिव्रता होय.

भीष्माचार्य शरशय्येवर असता, युधिष्ठिरांस हितोपदेश केला. भीष्म म्हणाले "कुकर्म घडत असता, शक्यतो त्याचा विरोध केला पाहिजे किंवा अधर्म घडत असलेल्या त्या स्थलाचा त्याग केला पाहिजे." यावर द्रौपदी खुदकन् हासली. त्यावर भीष्म म्हणाले, "ज्या वेळी द्रौपदीचा मानभंग झाला, तेंव्हा माझे वागणे अनुचित होते. कारण त्यावेळी मी दुर्योधनाच्या आश्रयात होतो. त्याच्या अन्न सेवनाने, माझे रक्त कलुषित झाले होते व बुध्दी भ्रष्ट

 

झाली होती. आता ते कलुषित रक्त माझ्यात नसून, बुध्दी कल्मषरहित झाली असून, ज्ञानोदय झाला आहे.''

जीव परिणाम दशेत अनेक जन्म घेत असतो. थोडया जन्मात स्त्री तर थोडया जन्मात पुरुष होतो. मानव जन्माव्यतिरिक्त , पशू-पक्ष्यादिंचा सुध्दा जन्म घेतो. जन्मांतरी, मंदोदरीचा पुरुष जन्म होता, त्या जन्मामध्ये तिला एक चंचल स्वभावाची, एक दुष्ट स्वभावाची व एक मृदु स्वभावाची, अशा तीन पत्नी होत्या. इहजन्मी, चंचल स्वभावाची पत्नी वानर होऊन वाली झाला, दुष्ट स्वभावाची पत्नी राक्षस होऊन रावण झाला व मृदु स्वभावाच्या पत्नीचा बिभीषण म्हणून जन्म झाला. कल्पांतरी, हे तिघे मंदोदरीचे पुरुषजन्म असता तिचे पत्नी होते. तर ती या जन्मी, चंचल वृत्ती असलेला वाली ह्याची पत्नी झाली व त्या पासून अंगदाचा जन्म

 

झाला. तदनंतर, दुष्ट प्रवृत्ती असलेल्या रावणाचीभार्या झाली. रावण संहारानंतर, मृदुस्वभाव असलेल्या विभीषणाची पटराणी झाली. तर वालीची पत्नी असताना, रावणाची पत्नी असताना व बिभीषणाची पत्नी असताना तिच्यातले जीवाणू भिन्न होते. म्हणून मंदोदरी सुध्दा महापतिव्रता होय !

तेंव्हा मी म्हणालो - "स्वामी ! स्त्रीस एकच पती किंवा पुरुष एकपत्निव्रत असला पाहिजे असे म्हणतात तर बहुभार्या किंवा बहुभर्तृत्व निंदनीय आहे ना ?"

**कर्मचक्र परिणाम :**

तिरुमलदास म्हणाले - "तुझे म्हणणे खरे आहे. एखाद्या पुरुषाने विनाकारण पत्नीस त्रास दिला तर

सप्तजन्मपर्यंत बाल विधुर होतो असे सांगीतले आहे. एखादा पुरुष चार-पाच स्त्रियांशी विवाह केल्याने, पुढील जन्मी, हा पुरुष स्त्री जन्म घेतो व त्या चार-पाच स्त्रिया, त्यांची कामवासना व संस्कार क्षीण न झाल्याने, पुरुष जन्म घेऊन त्या स्त्रीचा उपभोग घेतात. एकाजन्मी असे झाल्यास व्यभिचार दोष घडतो. जर विविध जन्म घेऊन प्रत्येक जन्मी, एकाशी विवाह केल्याने दोष नाही. हा कालचक्राचा प्रभाव आहे. असल्या कित्येक आश्चर्यकारक घटना या महाचक्रात घडत असतात. स्त्री जन्म घेतल्यास त्या जन्मासंबंधित धर्माचे आचरण केले पाहिजे. पुरुष जन्म घेतल्यास त्या जन्मा संबंधित धर्माचे आचरण केले पाहिजे."

पती-पत्नीमध्ये कलह उत्पन्न करणाऱ्या व्यक्तीचा पुढचा जन्म स्त्री अथवा पुरुष न होता, नपुंसक होतात व

संसारसुखास वंचित होऊन दु:खी होतात. मांसाहार निषिध्द आहे. समजा एखादी व्यक्ति एका शेळीचा वध करून चार-चौघाबरोबर मांसाहार करते. त्या शेळीस प्राणोत्क्रमण समयी अत्यंत पीडा होते तिचे पीडित स्पंदन वायुमंडलात वावरत असतात. बाबारे ! वायुमंडलात पीडामय व आनंदमय स्पंदने असतात. सत्कर्मांमुळे आनंदमय स्पंदने व दुष्कर्मांमुळे पीडामय स्पंदने उत्पन्न होतात. मृत शेळीने मारून खाल्लेल्या चार-चौघा मानवांचा सूड घ्यावा अशा इच्छेने प्राण त्याग झालेल्या कारणाने, मानव जन्म घेते व मांसभक्षण केलेल्या मानवांचा, शेळींचा जन्म होतो. म्हणून, मानवांनी क्षमागुणाचे अवलंबन केले पाहिजे. सात्विक व्यक्ति शेळीस पाहिल्यावरही त्याचे मांस भक्षण करू इच्छित नाही. जरी ती शेळी पुर्वजन्मी मारलेल्या

मनुष्यास क्षमा करील तर त्या शेळीस प्राणदान केल्याचे पुण्य लाभून तिचे कर्मचक्र थांबते.

पीठिकापुरीच्या रहिवाश्यांचे सामुहिक पुण्य व सामुहिक पाप एकाच वेळेस फलित झाल्याने, श्रीपाद श्रीवल्लभांच्या जन्मास कारणीभूत झाले. पुण्यवान लोकांनी श्रीपादांस श्री दत्तप्रभू असल्याचे जाणले व अधिक पुण्यफल प्राप्त करते झाले तर पापी जन श्रीपाद श्रीदत्त असल्याचे नाकारून अधिक पापाचे भागिदार होते झाले. श्री दत्ताची आराधना करीत असून श्रीपादांची निंदा करणाऱ्यांस रौरवादि नरकाची प्राप्ति होते. विषय न समजल्यास मौन धारण करणे उचित होय. पण त्या दिव्य भव्य अशा मंगल स्वरूपावर निंदापवाद लादणे योग्य नव्हे. त्यांच्या मुखांस मंगलारती करीत पायांवर खिळे ठेकणारे असे लोक सुखव्याधींनी ग्रस्त होतील.

 

एवढेच नव्हे, श्री दत्तात्रेयांनी आपल्याअनुग्रहाने एका विचित्र अशा योगशक्तिचा समावेश केला. पुण्यवान जनांस केवळ नामस्मरणाने अप्रयत्नांने सर्व मनोरथ पूर्ण होत तर पापीजन श्रीपादांची निंदा केल्याने त्यांच्यावर नाना प्रकारचे विघ्न व अनिष्ट कोसळत. श्रीपादांचे अग्नि स्वरूप आहे. त्यांनी धारण केलेले अग्नि वस्त्र होय. ते पवित्र योगाग्नि स्वरूप असून त्यांच्या पादुकांचा महिमा वर्णन करण्यास युगेही कमी पडतील. वेद - उपनिषद सुध्दा त्यांच्या पादुकांचे वर्णनकरण्यास असमर्थ आहेत. किती युग झाले ? किती कल्प लोटले ? केवढे वेळा स/ष्टी, स्थिति, लय क्रम पूर्ण झाले ? पण श्री दत्त ते श्री दत्तच. ते अद्वितीय असून साक्षात श्रीपाद श्रीवल्लभ आहेत ! सृष्टीतील प्रत्येक अणु या परम सत्याचे साक्षीदार आहेत.

## स्वयंभू दत्ताची पुन:प्रतिष्ठा.

श्री पीठिकापुरास एका अवधूताचे आगमन झाले. ते उन्मत्त अवस्थेत असलेले सिध्दपुरुष होते. त्यांचे वागणे अती विचित्र होते. कोणास आशिर्वाद द्‍यायचे असले तर शिवी-गाळी करीत असा त्यांचा विचित्र स्वभाव होता. कोणाची स्तुती केली तर त्या व्यक्तीचे पुण्य क्षीण होत असे.

पीठिकापुरवासीयांनी त्या सिध्दास स्वयंभू दत्त कोठे आहेत असे विचारले. तेंव्हा ते सिध्द पुरुष म्हणाले की, श्री दत्त सकल पुण्यक्षेत्रात स्नान करून सध्या एका नदीत आहेत. भक्तांनी खूप शोधायचा प्रयत्न केल्यावर एका नदीत स्वयंभू श्री दत्ताची मूर्ती सापडली. एका शुभ मुहूर्तावर त्या मूर्तीची पुन:प्रतिष्ठा, सर्वमंगलप्रद अशा

सुमती महाराणी व ब्रह्मतेज असलेले श्री आप्पलराज शर्मा यांनी केली. त्या महोत्सवाचे अध्वर्यू श्री बापन्नार्य होते.

## विद्यारण्यांचे प्राकटय :

मंदिरात मूर्तीची पुन:प्रतिष्ठा झालेल्या दिवशी, श्री बापन्नार्यांनी, त्या सिध्दपुरुषास आपल्या घरी भिक्षेस येण्याची विनंती केली. आजोबांच्या घरी त्या सिध्दास श्रीपादांचे दर्शन झाले. केवळ दोन वर्षाच्या त्या बालकास पाहिल्यावर, त्या सिध्दाच्या मनात पुत्र वात्सल्य उत्पन्न झाले. श्रीपाद, मातुल श्री वेंकटप्पा यांच्या खांद्यावर बसून त्यांच्या शिखेशी चेष्टा करीत, सिध्दांकडे दृष्टी करून हासले. ते हास्य पाहून सिध्दास समाधी लागली. समाधी तून व्युत्थान झाल्यावर, श्रीपाद म्हणाले "माधवा

! तुझ्या इच्छेप्रमाणे हिंदू साम्राज्याची स्थापना, माझे वय 16 वर्षाचे झाले असता, बुक्कराय करील. तू हरिहर-बुक्कराय यांच्या पाठीशी सदैव असले पाहिजे. विद्यारण्य महर्षि या नावाने तुझी ख्याती होईल. तुझ्या सहोदर सायणाचार्यांच्या वंशात येणाऱ्या शताब्दात गोविंद दिक्षिताचा जन्म होणार आहे. तो गोविंद दिक्षित कोणी नसून तूच असशील ! राजर्षी होऊन तंजावूर संस्थानात महामंत्रीचा पदभार सांभाळून कृतकृत्य होशील."

असे ऐकल्यावर आनंदाने सिध्दाच्या डोळयातून अश्रूधारा वाहू लागल्या. त्याने श्रीपादांना आपल्याजवळ घेतले. इतक्यात श्रीपादांनी त्या सिध्दाच्या चरणांचे वंदन केले. सिध्दाने आश्चर्य व्यक्त करताच श्रीपाद म्हणाले -"तू विद्यारण्य या नावाने श्रुंगेरी पीठाधिपती होशील. तुझ्या शिष्य परंपरेत तिसरा शिष्य कृष्णसरस्वती म्हणून तूच

असशील. तुझ्या मनात माझ्या विषयी पुत्र भाव उत्पन्न झाल्या कारणाने माझ्या पुढील नृसिंहसरस्वती या नावाने होणाऱ्या अवतारात काशी क्षेत्री कृष्णसरस्वती होऊन तू मला संन्यास दीक्षा देशील. तू संन्यास धर्माचा उध्दार करशील. यास काशी विश्वेश्वर व माता अन्नपूर्णा ह्यांची साक्ष असेल.

वशिष्ठ शक्ति पराशर त्र्यार्षेय प्रवरान्वित पाराशर गोत्रोद्भव ऋग्वेदांतर्गत , वाजपेययाजी माधवाचार्य हे विद्यारण्य महर्षी नावाने ख्यात होतील. बाबारे ! उद्या तुला आणखी चरित्र सांगिन असे म्हणून तिरुमलदासांनी, त्या दिवशीचे निरुपण तेथेच थांबविले.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जयकार ॥**

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -9

## कर्मफल मिमांसा

आज गुरुवार आहे. सकाळी सूर्योदयासमयी, गुरुंचा होरा चालू आहे. मी व तिरुमलदास एका खोलीमध्ये ध्यानस्थ बसलो होतो. सूर्याची कोवळी किरणे खोलीत डोकावत होती. काय आश्चर्य ! त्या कोवळया सूर्य किरणांत श्रीपाद श्रीवल्लभांचे आम्हां दोघांस दर्शन झाले. सूर्य किरणांच्या प्रवेशाने आम्ही भानावर आलो. परम पूजनीय, अत्यंत मंगलप्रद असलेले 16 वर्षाचे श्रीपाद श्रीवल्लभांचे रूप दर्शन घडणे केवळ परमप्रभूंच्या अव्याज करुणेचे फळ होय. क्षणभर दर्शन देवून ते रूप अंतर्धान

पावले.

श्रीपाद प्रभूंना नैवेद्य म्हणून चणे ठेविले होते. सूर्य किरणांच्या स्पर्शाने ते चणे लोहखंडात रूपांतर पावले. ह्याचे मला आश्चर्य वाटले व मन दु:खी पण झाले. प्रभूंचे दर्शन आणि चणे लोहखंडात रूपांतरित होणे हे काही विशेष सूचक आहे का ? अशी माझ्या मनात शंका उद्भवली.

श्री तिरुमलदासांनी पुढे सांगण्यास सुरवात केली. "बाबारे ! शंकरभट्टा ! आज दुपारी माझे आतिथ्य स्वीकारून तू कुरवपुरास जा, अशी श्रीदत्तप्रभूंची आज्ञा झाली. भर दुपारी प्रभू दत्त क्षेत्रात भिक्षा करीत असतात. हा काळ अतिशय शुभप्रद आहे." मी म्हणालो "स्वामी ! रोज श्रीदत्तप्रभूंचे स्मरण, दत्तकथा प्रसंग श्रवणाने काळ

 

घालवित होतो. आज नैवेद्य म्हणून दाखविलेले चणे लोहखंड झाले ह्यांची खंत वाटते. माझ्या या संशयाचे निरसन करून मला कृतार्थ करावे ही प्रार्थना."

श्री तिरुमलदास म्हणाले - "बाबारे ! कांही शताब्दिनंतर कली प्रबळ झाल्याने, नास्तिकत्व वाढेल. नास्तिकत्वाचे निर्मूलन करून आस्तिकत्वाची स्थापना करण्यासाठी , प्रभू चित्र विचित्र लीला दाखवून अनुग्रह करतील. भविष्यात धर्मसंस्थापनेसाठी सगळया कार्यक्रमात बीज रूपाने या श्रीपाद श्रीवल्लभांच्या अवतारात अनुग्रह करतील."

खनिजांमध्ये चैतन्य निद्रावस्थेत असते. खनिजस्थितीत प्राण अंतर्लीन होऊन राहतो. खनिजामध्ये अनेक रसायनिक प्रक्रियामुळे प्राणाची उत्पत्ती होते. प्राणामध्ये

मन अंतर्लीन असते. प्राणरूपात चैतन्य अर्ध-निद्रावस्थेत असते. हे तुला वृक्षामध्ये स्पष्ट दिसेल. मादक द्रव्याच्या सेवनाने, मनुष्य त्याच्या देहात ह्या स्थितीचा अनुभव करतो.

प्राणशक्ती रूपाने व्यक्त झालेले चैतन्य तत्व परिणामक्रमाने विकसित होऊन मनाच्या माध्यमाने कर्म करण्यास अभ्यस्त होते. ही स्थिति तुला पशुमध्ये आढळते. पशूचा पूर्ण विकास तोच मनुष्य म्हटला जातो. मनुष्यात मन:शक्ती पूर्णपणे कार्यरत असते. तर मनास अतीत असलेले अतिमानस एक आहे. ते अंतर्लीन स्थितीत असते. मानव योगसाधनेने परिपूर्ण होतो. तो मूलाधारात सुप्त असलेल्या चैतन्यास सहस्रारात नेऊन सविकल्प, निर्विकल्प समाधि स्थितिस प्राप्त करून घेतो. परम ज्योतिस्वरूप असलेल्या श्रीगुरुशी तादात्म्य

स्थितिचा अनुभव घेतो. त्या स्थितिमध्ये अनिर्वचनीय आनंदाचा अनुभव घेतो. तर त्याची वर्तनूक मात्र महासंकल्पास अनुसरून असते. म्हणून तो कर्मबंधनापासून अलिप्त असतो. त्या महासंकल्पाचे स्वरूप अचिंत्य, अगम्य व कल्पनातीत असून महाप्रचण्ड वेगवान असते. अतिमानस हे केवळ श्री प्रभूंचे आहे. प्रत्येक क्षणात कोटयावधी प्रार्थना श्री प्रभू स्वीकार करतात. धर्मसम्मत असलेल्या प्रार्थनास तात्काळ प्रचीति देऊन दु:ख निवारण करतात. धर्मबध्द असलेल्या प्रत्येकांचा इच्छा पूर्ण करतात. मानवाच्या मनाचा वेग कूर्मगतीवत् असून श्री प्रभूंच्या अतिमानसाचा वेग महाप्रचण्ड व कल्पनातीत आहे. महाप्रचण्ड वेग असलेल्या प्रकाशाचा वेग पण त्यांच्या अतिमानस वेगापुढे कमी पडेल. मानव किंवा कुठल्याही प्राण्याने केलेली लहानशी प्रार्थना, प्रभूंच्या दिव्य तेज:पुंजा द्वारे

प्रभूस पोहोचते. समस्त दृश्यादृश्य शक्तींचा आधार प्रभूच आहेत. सर्व लोक प्रकाशमान होण्याचे कारण त्यांच्या शरीरातून बाहेर पडणारे ज्योतिपुंज असून दुसरे काही नाही. अनेक कोटि ब्रह्माण्डात प्रकाशमान असणारे सूर्य, नक्षत्रादींचे संयुक्त्त प्रकाश सुध्दा त्यांच्या तेजा पुढे सूर्यास दिवटी दाखविल्या समान होय. बाबारे ! हेच श्रीपाद श्रीवल्लभांचे खरे-खुरे तत्त्व होय. अनंत शक्ति , अनंत ज्ञान, अनंत व्यापकत्व, असलेल्या त्या निर्गुण, निराकार स्वरूपास सृष्टीबद्दल असलेल्या अव्याज अनंत करूणे पोटी, सगुण साकार मनुष्य देह धारण करून, श्रीपाद श्रीवल्लभांच्या रूपात दर्शन देत आहेत. हे जाणण्यासाठी मानवास परिपूर्णता आली पाहिजे.

# श्रीपाद श्रीवल्लभांचे दिव्य स्वरूप

मानवाची देवाविषयी ओढ अनिवार्य आहे तसेच देव सुध्दा अनंत परिमितीना लांघून निम्नस्तरात जन्म घेतात. ह्यास अवतरण असे म्हणतात. ही एक निरंतर चालू असलेली योगक्रिया आहे. सृष्टी मध्ये सत्याची एकदा स्थापना झाली की ती स्वयंसिध्द, प्रयत्नरहित कार्यरत असते. सत्य, ज्ञान अनंत स्वरूप असलेले श्रीपाद श्रीवल्लभ हे अनेक सत्यास सृष्टी मध्ये स्थापना करण्याच्या संकल्पाने दिव्य, भव्य अवतार घेतात. ते साक्षात दत्तप्रभू होत. मी म्हणालो - "स्वामी ! आपल्याशी चर्चा करीत असता, मला किती तरी नवीन विषयांचा उलगडा झाला. तरी श्री गुरु स्वरूपाचा अंत लागत नाही. त्यांचे हे दिव्य व भव्य चरित्र कसे लिहावे व त्यांना कसली व्याख्या द्यावी हे समजत नाही. मी

मूर्ती प्रतिष्ठेबद्दल ऐकले आहे. आपण सत्याच्या प्रतिष्ठेबद्दल बोलत आहात. तरी माझ्यावर कृपा करून सत्याबद्दल विस्तारपूर्वक सांगावे अशी विनंती." श्री तिरुमलदास म्हणाले "बाबारे ! तुझ्याकडून श्रींचे चरित्र लेखन कार्य व्हावे असा संकल्प पूर्वीच झाला असून, तुझ्या संपर्कात येणाऱ्या श्रीपादांचे भक्त शिरोमणी ते अनुभव तुला सांगतील या विषयास लेखणीबध्द कर, तुझ्या व्याख्यांची इथे आवश्यकता नाही. श्रींचे चरित्र स्वतः श्रीच तुझ्या लेखणीच्या माध्यमातून लिहून घेतील. ह्या उपर विचार करणे व्यर्थ आहे."

मनुष्य नाना प्रकारचे अन्न सेवन करतो. सेवन केलेले अन्न आपोआप पचन होऊन शरीरास शक्ती प्रदान करते. या पाचन क्रियेमध्ये, मनुष्याचा प्रयत्न नसून शरीराचे काम आहे. मनुष्याचे कर्तव्य केवळ अन्न संग्रह

करून ग्रहण करणे एवढेच. भोजन केल्यावर अन्न पचवणे हे शरीराचे कर्तव्य होय. म्हणजे, तुझे कर्तव्य अन्न मिळविणे असा विधिचा निर्णय आहे. भोजन केलेले अन्न पाचन करण्याचे कर्तव्य शरीराचे आहे. मनुष्यात मन असल्या करणाने, तो स्वेच्छेचा अनुभव घेतो. म्हणून खरे-खोटे, बरे-वाईट दोन्ही घडण्याची शक्यता आहे. शरीरास ती स्वेच्छा नाही. जेवलेले अन्न पचन करून शरीरास शक्तिसंपन्न करणे हेच शरीराचे कर्तव्य आहे, असा विधिचा निर्णय आहे. मनुष्यास इच्छा असो किंवा नसो, त्याच्या प्रयत्नाशिवाय शरीर आपले कर्तव्य पार पाडत असते. शरीरा संबंधित सत्याची स्थापना झाल्या कारणाने, अप्रयत्नाने, मनुष्याच्या संकल्पाचा प्रमेय नसून ते सतत चालू असते. प्रकृती म्हणजे, सृष्टीमधील सगळया क्रिया-प्रतिक्रिया, या सत्याच्या आधाराने घडतात. सूर्योदय-सूर्यास्त, ऋतुचक्र,

ग्रह-नक्षत्रादींचे चलन या सत्याच्या आधारावर घडलेच पाहिजे. हे अनुल्लंघनीय शासन आहे. म्हणजे ह्याच्या विपरीत करण्याचे स्वातंत्र्य त्यांना नाही. सर्व व्यापकत्व असलेले प्रभू सृष्टीमधील प्राणिमात्राविषयी करुणेमुळे सृष्टी विधान सुरळित करतात. कृतयुगामध्ये संकल्पमात्रे सकल सिध्दी प्राप्त होत तर त्रेतायुगामध्ये यज्ञ-यागाने, द्वापर युगामध्ये मंत्र, शस्त्रास्त्राने सकल सिध्दी प्राप्त होत तर कलियुगामध्ये प्रामुख्याने तंत्र प्रयोगाने, कलियुगी यंत्राने सकल सिध्दी प्राप्त होतात. युगधर्मास अनुसरून व मानवाच्या शक्ति –युक्तींचा स्तर या आधारावर सृष्टी विधानाच्या सरळीकरणाचा निर्णय होतो.

तीन अहोरात्र निरंतर श्रीपाद श्रीवल्लभांचे स्मरण केल्याने, त्यांचे ध्यान करणाऱ्यास, श्रीपाद सशरीर दर्शन

देऊन धन्य करतात. मानवाच्या पतनास लाख मार्ग असतील तर देव त्यांच्या उध्दारासाठी दहा लाख मार्गांनी अनुग्रह करतो. श्री दत्तप्रभू त्यांचे अंशावतार, सिध्द, योगी, महासिध्द यांच्या करवी, या सृष्टीचे पालन करीत असतात.

पूर्वयुगातील श्री दत्त हेच श्रीपाद आहेत का ? अशी शंका तुझ्या मनात बीजरूपाने असल्या कारणाने, श्रीपादांनी तुझ्या शंकेचे निवारण करण्यासाठी नैवेद्यास दाखविलेले चणे लोहखंडात रूपांतर केले. माता अनसूयाने लोहखंडाचे खाण्यायोग्य चणे केले होते. मी प्रत्यक्ष दत्त आहे हे दर्शविण्यासाठी असे केले. तुझ्या कुंडलीत गुरु व्याधी स्थानात आहे. गुरु ग्रहास चण्यांचा संबन्ध आहे. गुरु ग्रहामुळे तुझ्यावर येणाऱ्या विपत्ती, बीज रूपाने असून, त्या अंकुरित न होण्यासाठी चण्यांचे लोहखंडात परिवर्तन

करून तुझ्या निदर्शनास आणले. श्रीपादांच्या दिव्य मानस चक्षूंनी अवलोकन न केलेली कुठलीही वस्तू या सृष्टीत उत्पन्न होत नाही. तसेच, त्यांच्या दिव्य दृष्टीस आल्याशिवाय कुठलाही प्राणी या सृष्टीत जन्म घेत नाही, हे परम सत्य आहे. सत्यवस्तू संबंधित ज्ञान सुप्रतिष्ठीत असल्या कारणाने, त्या ज्ञानाची प्राप्ती झालेले, या लोकातून अंतर्धान झाले तरी नाश नाही. त्या ज्ञानास प्राप्त करण्यायोग्य मानव या सृष्टीमध्ये जन्म घेतल्यावर, ते ज्ञान आपोआप त्यास होते. दैवशक्ती , चिरंजीव मुनि, अवतारी पुरुष हे सगळे अविनाशी तत्वाचेच अंश आहेत. मानव विनाशी तत्वाचे अंश आहेत. अविनाशी तत्त्वाचे ज्ञान, स्थिती, गती, शक्ति एका विशिष्ट प्रकारे असले पाहिजे असा नियम नाही. ते स्वेच्छा तत्त्व आहे परिपूर्ण आहे. ते अत्यंत प्राचीन व नित्य नूतन आहे. कारण नसलेले कार्य होणे असंभव

आहे. सर्व कारणांस व सर्व कार्यास एकमेव असे तत्वच आधार आहे. ते अतीत व अगम्य आहे. त्यालाच दत्त तत्त्व असे म्हणतात. त्या दत्तप्रभूंनी या कलियुगात आपल्या संपूर्ण कलांनी परिपूर्ण, प्रथम श्रीपाद श्री वल्लभांचा अवतार या पीठिकापुरत घेतला. अशा श्रीपाद श्रीवल्लभांचे वर्णन करण्यास सहस्र फणी आदिशेषास सुध्दा सामर्थ्य नाही.

बाबारे ! श्रीपाद श्रीवल्लभ, श्री नृसिंह सरस्वतींचा अवतार घेणार असल्याचे बरेचवेळा सूचित केले होते. हिरण्यकयू श्यपाने विचित्र असा वर प्राप्त केल्यावर आता त्याचा मृत्यू असंभव आहे असे वाटत होते. दिलेल्या वरदानाविरुध्द न जाता, कल्पनातीत अशा विधानाने श्री नृसिंह भगवानानी हिरण्यकश्यपाचा वध करून, परमभक्त असलेल्या प्रल्हादाचे रक्षण केले. प्रभू

स्तंभामध्ये विराजमान आहेत असा प्रल्हादणे निर्धार केला. प्रभू स्तंभातून प्रगटले. देव आहे किंवा नाही ? असा संशय या कलीयुगात बहुतेकांच्या मनात येतो. कलीयुगातील हिण्यकश्यपांचा मद नाश करून प्रल्हादासारख्या भक्तांचे रक्षण करण्यासाठी श्री दत्त प्रभुंचा श्री नृसिंहसरस्वतींचा अवतार होणार आहे. देव आहे हे सिध्द करण्यासाठी नरसिंह अवताराचे वैशिष्ट्य . श्रीपाद श्रीवल्लभ व श्री नृसिंहसरस्वतींचे अवतार दैवदूषण करणाऱ्यांचे मद नाश व देवभक्ती करणाऱ्यांचे, डोळयास पापणीसारखे, रक्षण करणे, या दोन प्रधान उद्देश्याने झाले. श्रीपाद श्रीवल्लभांस साध्यासाध्य असे काही नाही.

तिरुमलदास बोलत होते, मी ऐकत होतो. माझ्या मनात एका संशयाने घर केले. मी भूर्जपत्रावर श्रीपाद

श्रीवल्लभांचे चरित्र लिहित होतो. भविष्यकाळात, लोक कुठल्या पत्रावर स्वामींचे चरित्र लिहितील बरे ! शालिवाहन शकाच्या अंतर्गत सध्याचे व्यवहार चालू आहेत. हूण शक प्रचारात येणार असल्याचे स्वामींचे म्हणणे आहे. खरे पाहता श्रीकृष्णाचे निर्याण कधी झाले ? हे कलियुग कोणत्या दिवशी कुठल्या घटिकेस/विघटिकेस आरंभ झाले. भविष्यकाळातील लोकांच्या कालगणने प्रमाणे, भविष्यात उपयोग होणाऱ्या पत्रावर जर श्रीपाद श्रीवल्लभ लिहून दाखवित असतील तर श्रीपाद खरेच श्रीदत्ताचे अवतार आहेत ह्याचा मला विश्वास होईल.

माझ्या मनातला सशंय तिरुमलदासांच्या पुढे व्यक्त न करता, ते जे सांगत होते ते ऐकण्याचे सोंग करीत लोहखंडात परिवर्तित चण्यांकडे मी बघत होतो.तेवढयात

तिरुमलदासांचे कंथस्वर क्षीण होऊन वाकशक्ति नष्ट झाली. कानठळया बसतील असा भयंकर ध्वनी झाला. तो ध्वनी ऐकल्यावर मला बधिरत्व प्राप्त झाले.

एका क्षणात मला बधिरत्व व तिरुमलदासांना मूकत्व प्राप्त झाले. तिरुमलदास बोलण्याचा प्रयत्न करीत होते पण त्यांच्या मुखातून शब्द निघत नव्हते. मी ऐकण्याचा प्रयत्न केला तरी मला काहींच ऐकू येत नव्हते. मनात सारखा एकच विचार होता - नको ते संशय मनात आले व परिणाम बधिरत्वाचि प्राप्ती. आयुष्यभर आता बधिर म्हणून असावे का ? काय माझे नशीब ! मी काय करू ? इतक्यात नैवेद्यासाठी ठेवलेले चणे, अर्थात, लोहखंड, तेलुगु भाषेत "श्रीपाद राजं शरणं प्रपद्ये" अशा अक्षरात रूपांतरीत झाले. त्याच्यावर पांढरे शुभ्र असे पत्र दिसून आले. आम्ही बघता बघता, त्या पत्राचा आकार वाढून

दीर्घचतुरस्र झाला. भूर्जपत्रा पेक्षा अतिशय पातळ, स्पर्शास मृदु वाटत होते. त्यावर, काळया रंगाचे सुंदर अक्षर उमटले. तेलुगु लिपीत त्यावर असे लिहिले होते - श्री कृष्णाचे निर्याण, खिस्त पूर्वी 3102 साली, फेब्रुवारी 18 तारखेस रात्री 2 वाजून 27 मिनिटे, 30 सेकदास झाले. प्रमादी नाम संवत्सर, चैत्र शुध्द प्रतिपदा, शुक्रवार, अश्विनी नक्षत्र, श्रीकृष्ण निर्याणानंतर, कलियुगाचा प्रवेश झाला. हे विचित्र पाहिल्यावर माझ्या अंगास दर-दरून घाम फुटला. अति स्वेदनाने, शरीर शक्तिहीन झाले. शरीर कंपायमान झाले. श्रीपाद श्रीवल्लभ अदृश्य रूपाने येथेच आहेत असा मनाचा निश्चय झाला. मनात विचार आला कि "काय माझे दुर्दैव ! कुरवपुरास जाणे आता एका स्वप्ना सारखे आहे. श्रीपाद नरसिंहावतार धारण करून माझा वध केला तर काहींच आश्चर्य नाही. वस्त्र धुवून, पिळून वाळत टाकतात तसे, शंकर भट्टास धुवून

 

वाळत टाक अशी आज्ञा तिरुमलदासास झाली तर मी काय करू ? तिरुमलदास नक्की मला वस्त्रासारखे दगडावर आपटून पिळुन वाळत टाकतील. ब्रह्मज्ञाना संबंधित विषयांचा, आपण आत्मज्ञानी आहोत याचा आव आणून, क्वचित गुरु आपल्या शिष्य वर्गास बोध करीत. द्रव्यार्जन हेतुने एखाद्या शिष्याची प्रशंसा पण करतील. तो शिष्य अमक्या गुरुने माझी प्रशंसा केली या अहंकाराने मिरवित असतो. गुरु-शिष्य दोघेही दोषाचे भागीदार होत. रजक कुलात जन्म झालेल्या तिरुमलदासांच्या करवी, ब्रह्मकुलोत्पन्न अशा मला ब्रह्मज्ञानाचा बोध होणे, हा श्रीपादांचा चमत्कार होय. परिसरातील इतर रजक आपल्या वृत्तीमध्ये निमग्न होते. त्यांच्यामध्ये या गहन चरित्रा विषयी चर्चा करण्याची किंवा जाणून घेण्याची इच्छा पण नव्हती. आता मला श्रीपादांच्या शरणी जावे लागेल."

मी तिरुमलदासांच्याकडे पाहिले. त्यांचे मुख ब्रह्मतेजाने झळकत होते. माझ्या मनास असे वाटले की तिरुमलदास ब्राह्मण असून मी रजक आहे. त्यांचा चेहरा प्रसन्न वाटत होता. नैवेद्यात दाखविलेले चणे लोहरूप त्यजून यथावत झाले. श्रीपादांनी मला क्षमा केली असे वाटत होते. कांही क्षणांत ते शुभ्र पत्र (कागद) अदृश्य झाले. तिरुमलदास म्हणाले - "बाबारे ! शंकरभट्टा ! कलियुग लोहयुग आहे. कल्मषपूरित असे हे युग आहे. माझ्या देहावसानानंतर, कांही काळ मी हिरण्यालोकात वास करून श्रीपादांच्या आज्ञेनुसार पुन्ह महाराष्ट्र देशात जन्म घेणार आहे."

"स्वामी ! श्रीपादांनी तुम्हास पण मृत्यूनंतर जन्म घेण्यास आज्ञा केली ? अवश्य हा वृतांत विस्तारपूर्वक

कथन करून कृतार्थ करावे अशी विनंती." तिरुमलदास म्हणाले "एकदा मी श्रीपादांच्या मातामहांच्या घरी त्यांचे धुतलेले वस्त्र घेवून गेलो. सुमती महाराणीचे मामा श्रीधरावधानी श्रीपादांस कडेवर घेवून खेळवित होते. "दत्त दिगंबर ! दत्त दिगंबर ! दत्त दिगंबर ! अवधूता !" असा घोष करीत होते. श्रीपादांचे वय दोन वर्षांचे होते. ते किलकारी करीत खेळत होते. ते दृश्य मनोहर होते. अनायासे माझ्या मुखातून "श्रीपादवल्लभ ! दत्तदिगंबर !" असे निघाले. श्रीधरावधानींनी माझ्याकडे वळून पाहिले. इतक्यात, श्रीपाद "नृसिंह सरस्वती ! दत्त दिगंबर !" असे म्हणाले. ते साक्षात पूर्वीचे दत्तप्रभू असून, प्रस्तुत श्रीपाद श्रीवल्लभ व पुढे नृसिंह सरस्वतींच्या रूपाने येणार याची सूचना आपल्या विशिष्ट शैलीत त्यांनी सांगितली होती.

# समर्थ सद्‌गुरु शिर्डी साईबाबाच्या रूपाने अवतरतील

श्रीपाद म्हणाले "आजोबा ! नृसिंह सरस्वतीचा अवतार महाराष्ट्र देशात घेण्याचा माझा संकल्प आहे. तिरुमलदासांस सुध्दा महाराष्ट्र देशात येण्यास सांगत आहे." श्रीधरावधानी अवाक झाले. मी म्हणालो - "कुठल्याही जन्मी, कोणत्याही रूपात असताना सदैव माझे रक्षण करण्याचा भार तुमच्यावर आहे. मला तुमच्या बाळकृष्ण रूपावर अतिशय प्रीति आहे." श्रीपाद म्हणाले "तिरुमलदासा ! तू महाराष्ट्र देशात गाडगे महाराज या नावाने रजक कुलात जन्म घेशील. दीन दलित व दुःखी जनांच्या सेवेत पुनीत होशील. धीशीला नगरीत "साई बाबा" या नावाने यवन वेषात माझा समर्थ सद्‌गुरु रूपात अवतार होईल. तुला यवन वेषात समर्थ सद्‌गुरु असलेल्या माझ्याकडून अवश्य अनुग्रहाची प्राप्ति

 

होईल. तुला बाळकृष्ण रूपांवर प्रीति असल्या कारणाने, "गोपाला ! गोपाला ! देवकीनंदन गोपाला !" या नाम मंत्राचा जप करशील. या शरीराच्या पतनानंतर, क्वचित काळ हिरण्यलोकी राहून तदनंतर, गाडगे महाराज होऊन लोकहित करशील. हे तुला माझे वरदान व अभयदान !" श्रीधरावधानी या सगळया संदर्भात मायेच्या आवरणात होते. त्यांना काही कळले नाही. सुमती महाराणीच्या हाकेसरशी, त्यांच्यावर असलेले मायेचे आवरण दूर झाले. श्रीपाद सामान्य बालक आहेत अशी त्यांची धारणा झाली. मी म्हणालो "स्वामी ! श्री कृष्णाने भगवद्गीतेत सांगितले होते की कर्माचे फल अनिवार्य आहे. तर श्रीपाद या नियमाचे उल्लंघन न करता कर्म नाश कसे बरे करतील ?"

# सद्गुरु, सत्पुरुषांस, योगियांस दिलेल्या दानाचे फळ

तिरुमलदास म्हणाले-"श्रीकृष्णाने कर्माचे फळ भोगल्या शिवाय चुकत नाही असे म्हटले खरे, पण ते कर्मफल जागृतावस्थेत भोगावे असे म्हटले नाही. ते स्वप्नावस्थेत सुध्दा भोगू शकता. स्थूल शरीराने 10 वर्ष भोगावयाचे कर्म, मानसिक त्रासामुळे, स्वप्नामधिल मानसिक व्यथेमुळे कांही घटिकेत भोगून कर्मराहित्य प्राप्त करू शकतो, सत्पुरुषांस, योगियांस दान-धर्म केल्याने, दैवी कृपे मुळे पाप कर्मांचा क्षय होतो. देवतामूर्ती पुण्यस्वरूप असून त्यांच्या ठाई करुणा असल्या कारणाने, आपले पाप कर्मफल त्यांच्यावर ओढून घेतात व त्यांचे पुण्य आपणास देतात."

 

पुण्यपुरुषांस केलेल्या दान-धर्मामुळे, किंवा त्यांची सेवा केल्याने पण अशी अदला बदली होते. समर्थ सद्गुरुंचे ध्यान केल्याने ध्यानाच्या माध्यमातून अदलाबदली होते. सद्गुरु त्यांच्या शिष्याकरवी सेवा घेऊन सेवेच्या माध्यमाने शिष्याचे पाप कर्म आपल्या वर ओढुन घेतात व आपले तप:फल शिष्यामध्ये संक्रमित करतात. परंतु पाप कर्माचे फळ भोगल्या शिवाय चुकत नाही. देव, सत्पुरुष, सद्गुरु, अवतारपुरुष, महातेजोमय असून अग्नीस्वरूप असतात. त्यांनी स्वीकार केलेल्या पाप कर्मांस दग्ध करण्याची शक्ति त्यांच्यामध्ये असते. त्यांना आपण अर्पण केलेल्या पत्र, फल पुष्पादिंच्या माध्यमाने सुध्दा पाप पुण्याची अदला बदली घडत असते. आपली आर्तता, भक्ति , शरणागती जेवढी तीव्र असते तेवढयाच तीव्रगतीने ही अदला बदली घडत असते. कांही वेळा श्रीपाद त्यांच्या आश्रितांचे पाप

कर्मफल, निर्जीव असलेले दगड-धोंडयावर फिरवित. त्या दगड-धोंडयास फोडून, किंवा नाना विचित्र मार्गाने त्या पापकर्मांचे निर्मूलन करीत. यास अनुसरून एक दृष्टांत सांगतो. लक्षपूर्वक ऐक.

श्रीपादांच्या जन्मापासून त्यांना पुरेसे दूध मिळत नव्हते. सुमती महाराणी आपल्या पुत्रास पुरेसे स्तनपान करवू शकत नव्हती. त्यांच्या घरी एक गाय होती. त्यांच्या घरी असलेल्या कालाग्नीशमन दत्तास नैवेद्यापुरते एवढेच दूध द्यायची. बाकी दूध आपल्या वासरास पाजायची. त्या गाईची ही एक विचित्र प्रवृत्ती होती.

कालाग्नीशमन दत्तास नैवेद्यासाठी ठेवलेले दूध, कधी कधी, नैवेद्य दाखवायच्या अगोदर श्रीपाद पूजा मंदिरात जावून प्राशन करायचे. असे घडल्या दिवशी, श्री

आपलराज, गुळाचा खडा नैवेद्य दाखवून उपवास करायचे. पतिचा उपवास घडल्या दिवशी सुमती महाराणी पण उपवास करायची. एखादे समयी, नैवेद्य दाखवेपर्यंत श्रीपाद थांबले त्या दिवशी, ते दूध श्रीपाद प्राशन करीत. त्यांच्या वंशात जन्मलेल्या अपूर्व व दिव्य शिशूस पुरेल एवढे दूध आपण देवू शकत नाही, या विचारांनी माता-पिता चिंतित होते. वेंकटप्पय्या श्रेष्ठी व नरसिंहराय वर्मा यांनी, भरपूर दूध देणारी एक गाय आपलराजांस दान देण्याचा प्रयत्न केला. ते सारे प्रयत्न व्यर्थ झाले. कारण दान स्वीकार न करण्याचे आपळराजांचे व्रत होते. दान घेतल्याने पाप संग्रह होतो असा त्यांचा अभिप्राय होता. ते वेद शास्त्र संपन्न असून केवळ वेद सभा असल्यास त्यातून मिळाली तेवढी दक्षिणा स्विकार करीत होते. पौरोहित्यापासून उत्पन्न कमी होते. फक्त वेंकटप्पय्या श्रेष्ठी व नरसिंहराय वर्मा यांच्याकडे पौरोहित्यास जात

असत. ते दोघे दक्षिणा जास्त देण्याचा प्रयत्न केल्यास त्यांच्यावर राग करायचे. आपलराज आपले सासरे श्री सत्यऋषिश्वर (श्री बापन्नार्य) यांजकडून पण काही घेत नसत. कार्तिक पौर्णिमेस सुमती महाराणीचा जन्म दिवस असल्या कारणाने श्वसुरगृही भोजन करीत. वैशाख शुध्द तृतियेस आपलराजांचे जन्मदिवशी पण श्री बापन्नार्यांच्या घरी भोज करीत. कालांतराने श्रीपाद जयंती अर्थात गणेश चतुर्थीस पण त्यांच्या घरी जेवायचे.

कुटुंबाच्या या दुस्थितीचा विचार करून एके दिवशी सुमती महाराणी आपल्या पतीस म्हणाली "नाथ ! आमच्या माहेरचे संपन्न असून नैष्ठिक श्रौत्रीय संस्काराचे आहेत. मल्लादी वंश श्रीमंत असून आमचे माहेर आहे. त्यांच्याकडून एका गायीचा स्वीकार करण्यात मला काही दोष वाटत नाही. श्रीपादांना पोटभर दूध

 

देण्याची पण आपली स्थिति नाही. आपण या विषयाचा शांत पणे विचार करावा ही विनंती." आपलराज म्हणाले "सौभाग्यवती ! तुझे म्हणणे बरोबर आहे. सत्यऋषिश्वर पापरहित असून त्यांच्याकडून गाय घेतल्याने दोष घडत नाही. पण या विषयास शास्त्र सम्मती असणे आवश्यक आहे. श्रीपादांच्या जन्मापूर्वी पासून आजपर्यंत आश्चर्यकारक घटना घडत आल्या. श्रीपाद दत्ताचे नवावतार असल्यास, आपल्या घरी असलेल्या गायीने भरपूर दुध दिले असते नाही का ! किंवा तुझ्या स्तन्य क्षीराची समृद्धी झाली नसती का ! बरे ! मोठा मुलगा श्रीधरराज शर्मा आंधळा व लहान मुलगा रामराज शर्मा पंगू आहेत. श्रीपाद त्यांचे अंग वैकल्य नाहीसे करून त्यांना विमुक्त करू शकतात ना ! तू या विषया बाबतीत तुझ्या वडिलांशी चर्चा कर, येऊन जाऊन माझ्या

नियमांच्या उल्लंघनाची पाळी माझ्यावर आणता हे उचित नव्हे."

सुमती महाराणीने या विषयाचे निवेदन आपल्या वडिलांसमोर केले. बापन्नार्य मंदहास्य करीत म्हणाले "अम्मणी ! हे सगळे श्रीपादांचे लीला विलास आहेत. श्रीपाद समस्यांचे परिष्कार करण्यातच नसून समस्या उत्पन्न करण्यात पण पटाईत आहेत. श्रीपाद दत्त असल्याचे योगदृष्टीने मी जाणले आहे." आपल्या घरी गोसमृद्धी आहे. गाय देण्यास केवळ माझी सम्मती नसून, महानंदप्रद पण आहे. दत्तप्रभूंस गोक्षीर अत्यंत प्रीतिकर आहे. तुझ्या पतीच्या म्हणण्याप्रमाणे शास्त्रसम्मती आवश्यक आहे. अहो ! काय विधि वैपरीत्य आहे ! श्वसुराकडून संपती लुबाडण्यासाठी नाना परीचे प्रयत्न करणाऱ्या जामातांची या जगामध्ये कमी

नाही. पण माझा जामात अग्निहोत्रासमान आहे. त्यांचे नियम भंग करण्यास प्रयत्न करणारे आपण वेडे ठरतो . सृष्टीतील पंच महाभूतांनी स्पष्ट रीतीने आमोदन केल्याशिवाय तुझा पती गोदान स्वीकार करणार नाही. श्रीपाद त्यांच्या ज्येष्ठ बंधूंना अंगवैकल्यापासून विमुक्त केल्यास तुमच्या कुटुंबाशी असलेले त्यांचे ऋणानुबंध संपतील. ऋणविमुक्त झालेले दत्त तुमच्या घरी पुत्रा प्रमाणे राहू शकत नाहीत. जगद्गुरु होवून लोकोध्दारासाठी घर सोडून जाईल. म्हणून चुकुन सुध्दा त्यांचे अंगवैकल्य दूर करण्याची इच्छा श्रीपादासमोर इच्छा दर्शवू नको. सगळे कालाधीन आहे. काळ श्रीपादांच्या आधीन आहे. श्रीपादांनी संकल्प केला तर तुझ्यात क्षीर समृद्धी होईल. परंतु श्रीपादांचे तुझ्याशी असलेले ऋणानुबंध संपतील. ऋणानुबंधातून विमुक्त झालेले श्रीपाद आपल्या कुटुंबास सीमित नसून विश्व

गुरुत्वाचे कर्तव्य पालनासाठी आपले घर सोडून पलायन करतील. श्रीपादांचा संकल्प झाल्याने घरातील गाय तिची विचित्र प्रवृत्ति सोडून पुष्कळ दूध देईल. मग ही समस्या राहणार नाही. म्हणून तू थोडा काळ धीर धर. दत्तांनी उत्पन्न केलेल्या समस्येचा परिष्कार दत्तच करतील." मी म्हणालो - "स्वामी ! श्रीपादांच्या बंधूस अंग वैकल्य येण्याचे कारण काय ? वंशपरंपरेने आलेले कर्म दोष आहे का ?"

तिरुमलदास म्हणाले "श्री दत्ताचा अवतार सायं संध्ये समयी झाला. श्रीपादांचा उष:काली झाला. पुढे होणाऱ्या नृसिंह सरस्वतींचा अवतार भर दुपारी, अभिजित लग्नावर होणार आहे. दत्तांची लीला अगाध आहे. सायं संध्येनंतर तिमिराचे आवरण येते. जीवन निद्रावस्थेत असते. म्हणून दत्तअवतारात योगसाधनेच्या

परिणामक्रमानुसार समस्त जीवांचे भार वहन करून जीवांस सुख निद्रा दिली . कोठे जावे, काय करावे, परिणामस्वरूप कोणत्या दिशेस जावे या उद्‌विग्न मन:स्थितीत जीव असतो, हाच गाढ अंधकार आहे. जीवास नकळत परिणाम सिध्दि प्राप्त करून देणे दत्तावताराचे वैशिष्टय. जीव कुठले प्रयत्न न करता किंवा किंचित प्रयत्नाने त्यांना नकळत अंत:चैतन्याच्या ठिकाणी अगाध परिणाम प्राप्त करतो हे केवळ भूमंडळास सीमित नाही. श्रीपादांचे आगमन उष:काली झाले. उष:समयी, सूर्य भगवान सगळी शक्ति एकाच वेळी प्रयोग करून जीवांस पुनित करीत असतो. श्रीपादांचे सूर्या हे प्रतीक आहे. जीवांतील विविध शक्ति जागृत होवून नाटय करीत वैविध्याने परिणामस्थिती प्राप्त करण्याचे हे प्रतीक आहे.

 

मध्यांदिन मार्तंडाचे चण्ड-प्रचण्ड स्वरूप आहे. आत्मा सूर्य आपल्या संपूर्ण शक्तीचा समृद्धीने दशदिशांस प्रसार करतो तसे जीवांस जागृत करण्यासाठी नृसिंह सरस्वती अवतारचे प्रयोजन आहे. हा विषय त्यांच्या विश्व व्याप्त चैतन्याचा विषय होय. दत्तावतारात व श्रीपाद श्रीवल्लभांच्या अवतरांमध्ये काळरात्र होती. तिचे केवळ महांधकाराचे स्वरूप होते. त्याचे प्रतीक म्हणून ज्येष्ठ बंधू असलेले श्रीधरराज शर्मांचा जन्म झाला. ती रात्र उलटल्यावर, होती ती स्थिति म्हणजे, संशय, नास्तिकवाद, कुतर्क, वक्रभाष्य वगैरे. ह्याचे प्रतीक म्हणून, लहान बंधू श्रीरामराज शर्मा यांचा जन्म झाला. कुठलाही जीव, अंधकारा सादृश तामस वृत्तीचे निरसन करून, संशय, कुतर्क, वक्रभाष्य इत्यादिंचे त्याग

 

केल्यावर, श्रीपाद श्रीवल्लभांचा अनुग्रह प्राप्त करतो. ह्यातले रहस्य हेच होय. हे जगातील प्राण्यांच्या परिणाम दशेस संबंधित विषय आहेत."

वंशपरंपरेने आलेले कर्मदोष सुध्दा आहेत. श्री आपलराज शर्मा वेलनाड्डु मंडलातील वैदिक ब्राह्मण होते. तरी त्यांच्या कुटुंबास ग्रामाधिपत्य होते. श्रीपादांचे पितामह आईनविल्ली या ग्रामाचे अधिकारी होते. त्यांच्या कुटुंबात ज्येष्ठ पुत्रास अधिकार देण्याची परंपरा होती. श्रीपादांच्या पितामहांचे नाव श्रीधररामराज शर्मा होते. ग्रामाधिकार असलेल्या ब्राह्मणामध्ये आपल्या नावास "राज" या शब्दास जोडण्याची प्रथा होती व ब्राह्मण असल्याचे सुचविण्यासाठी शर्मा या शब्दास जोडत. ग्रामात पीक पिकले किंवा पिकले नाही तरी, कराच्या रकमेची भरपाई जमिनदारांना करणे अनिवार्य होते. ग्रामाधिकाऱ्यावर कर

वसूल करून देण्याची जबाबदारी होती. श्रीधर रामराज शर्मांना त्यांच्या आवडी निवडींस बाजूला सारून जमिनदारांच्या आज्ञेनुसार, वेळ प्रसंगी हिंसेच्या प्रयोगाने कर वसूली करावी लागे. हे त्यांचे ग्रामाधीकारी या नात्याने कर्तव्य धर्म होते.

पण दैवाच्या दृष्टीने हे पाप कार्य होते. आपलराजांच्या ज्येष्ठ भ्रात्यास ग्रामाधिपत्य प्राप्त झाले. पितामहांच्या पापकर्मामुळे, मोठा असलेला श्रीधरराज शर्मा व धाकटा श्रीरामराज शर्मा या उभयतांस अंग वैकल्य प्राप्त झाले. श्रीपाद श्रीवल्लभ साक्षात श्री दत्तावतार असले तरी पितामहांच्या स्वल्प पाप कर्मांचे प्रभाव त्यांना पण अनुभवावे लागले, म्हणून त्यांना दूधाची समस्या उद्भवली. विश्व प्रभूंनी रचलेला नियम सर्वांस लागू होतो.

 

स्वत: अवतरित होवून कर्म फल त्यांनी पण भोगून आपले मार्गदर्शन केले.

श्री वेंकटप्पयय्या श्रेष्ठी व श्री वत्सवाई नरसिंह वर्मा, श्रीपादांस आपल्या पौत्राप्रमाणे मानीत, म्हणून श्रीपादांच्या दुधाची समस्या नाहीसी करण्याचा बराच विचार केला. श्री वर्मा श्रेष्ठीस बोलावून म्हणाले की या समस्येचा परिष्कार तुम्ही करावा. श्री नरसिंह वर्म्यांच्या येथे गायत्री या नावाने प्रसिध्द अशा गाईची संतती होती. त्यांतील सर्वशुभ लक्षण असलेल्या एका गाईंस श्रेष्ठीनी वर्म्याकडून क्रय केले. विक्रय केलेल्या धनास वर्मांनी आपल्या जवळ जपून ठेवले . पौरोहित्याच्या निमित्ताने आपलराज वर्म्यांच्या घरी आले. गोविक्रय केलेने धन वर्म्यांनी आपलराजांस दक्षिणा म्हणून दिली. साधारण पणे पौरोहित्यानिमित्त मिळणाऱ्या दक्षिणेपेक्षा हे अधिक

होते. आपलराज शर्मा यांनी धर्माप्रमाणे जेवढे द्रव्य दक्षिणा म्हणून घ्यायचे होते तेवढेच घेवून उरलेल्या धनाचा अस्विकार केला. वर्म्यांनी पण दिलेली दक्षिणा परत घेण्यास नकार दिला. सुक्षत्रीय वंशात माझा जन्म झालेला असून दान दिलेले द्रव्य परत घेवू शकत नाही असे म्हणाले. हा विवाद श्री बापन्नार्यापर्यंत पोहोचला. ब्राह्मण परिषद बोलावण्यात आली. परिषदेत श्री बापन्नार्यांनी घोषणा केली की "आपलराज शर्मांनी अस्विकार केलेले हे धन ज्यांना घ्यावयाचे असेल त्यांनी घ्यावे." अनेक ब्राह्मण ते धन आपणास मिळावे या हेतूने त्यांच्यात चढा-ओढ सुरु झाली. हे सगळेच बघण्यास विचित्र वाटत होते.

तेवढयात तरुण असलेला पापय्या शास्त्री या नावाचा ब्राह्मण म्हणाला "श्रीपाद दैवांशसंभूत अवतारी पुरुष

नाही. देव असल्यास अशी विचित्र परिस्थिती कशी काय आली ? श्री दत्तच असल्यास त्यांच्या दोघा भावांचे अंगवैकल्यापासून रक्षण का बरे केले नाही ? ज्या कांही घटना घडल्या त्या केवळ कल्पना आहेत. तिळाचे पर्वत करून सांगणे महापाप आहे. मी दत्तभक्त आहे. श्वेतार्करक्षा पण गुरुंकडून प्राप्त करून घेतली आहे. दर रोज किती तरी जप करतो. मी कुठलेही दान घेतल्याने मालिन्य येत नाही. योग्य असलेला अशा मला हे धन द्यावे." ब्राह्मण परिषदेने पापय्या शास्त्रीस ते धन द्यावयाचा निर्णय केला. ते धन एका चांगल्या गाईस विकत घेण्यास पुरेसे होते.सभा समाप्त झाल्यावर विजय गर्वाने पापय्या शास्त्री घरी गेला. तेथे त्याचे मामा आले होते. कुशल प्रश्न, इष्ट गोष्टी झाल्या. भोजन करून जाण्यास पापय्या शास्त्रींनी त्यांना विचारले. पर्यायाने वर्षातून एकदा भोजन करतो. सध्या भाच्याकडे जेवण

करणे जमणार नाही असे सांगून घाई-घाईने तेथून निघुन गेले.

मामा निघून गेल्यावर, पापय्या शास्त्री विचार करीत बसले होते. त्यांची पत्नी जवळ येवून म्हणाली "स्वामी ! आता आलेले तुमचे मामा हूबे-हूब, गेल्या वर्षी वारलेल्या मामांसारखे दिसतात नाही का ?" पापय्या शास्त्री हादरुन उठले . त्यांना एकच मामा होते. ते पण गत वर्षी निधन पावले. आता आलेले हे मामा कोण ? माझी बुध्दी केवढया भ्रमात फसली ? मामाच्या नात्याचे इतर काही नाती असले तरी शंभर टक्के या मामा सारखे दिसणारे कोणी नव्हते. मृत झालेल्या मामांचा प्रेतात्मा तर नाही ना मी पाहिला ? त्याच्या हृदयाचे ठेके वाढत चालले. भूत प्रेत पिशाचांच्या मंत्र-तंत्रा विषयी त्याला काही ज्ञान नव्हते. त्याचे उपास्य दैवत असलेल्या दत्तांच्या

 

अनुग्रहाचे पतन तर होत नाही ना ? येणारा पुढचा काळ कष्ट दायक तर नाही ना ? मामांनी जाता-जाता "शीघ्र आपण भेटू याची अपेक्षा करतो" असे म्हटलेले वाक्य सतत त्याच्या मनास भेडसावू लागले. लौकरच आपण मरण पावून परलोकात आपल्या मामास भेटणार का ? या विचारांनी त्याचे मन जड झाले. "ॐ द्रां दत्तात्रेयाय नम:" मंत्राचा जप त्याने सुरु केला. त्या दिवशी मंत्र जप करणे सुध्दा एकाग्र चित्ताने होत नव्हते. श्री कुक्कुटेश्वराच्या मंदिरात स्वयंभू दत्तात्रेयांचे दर्शन घेण्यास गेला. दत्त मूर्तीचे ध्यान करण्यास बसल्यावर ध्यानात शिर नसलेली दत्त मूर्ती दिसली. तिथे पण जप करण्यास बसल्यावर मन स्थिर नव्हते. अर्चकाने प्रसाद दिल्यावर असे वाटले की विषपूरित कलशातून काढून दिले कि काय. अर्चक हसत हसत कांही म्हणत होते. परंतु पापय्या शास्त्रीस असे ऐकू येत होते की हा प्रसाद

ग्रहण करून लौकर मरण पाव. ते घरी परत आले तेंव्हा त्यांना त्यांच्या पत्नींच्या कपाळावर कुंकू दिसले नाही.

मी जिवंत असताना कपाळावरचे कुंकू का बरे काढलेस असे म्हणून तिच्यावर चिडले. रुपया एवढे कुंकू कपाळावर मिरवित असता पापय्या शास्त्रींचे चिडणे तिला थोडे विचित्रच वाटले. पापय्यांस वेड लागले असे म्हणून पिठापुरीत अफवा उठली . किंवदंती, अफवा यांचे प्रमाण पिठापुरत जास्त होते. पापय्यास मानसिक व भूत चिकित्सा सुरु झाली. त्यांना वेड नाही असे पापय्या पदोपदी सांगत होते, तरी लोक मानण्यास तयार नव्हते. वेडा पण कधी कधी तर्कयुक्त भाषण करतो असे म्हणायचे. पापय्याच्या पत्नीस एक उपाय सुचला. तिच्या पतीने अज्ञानवश श्रीपादांची निंदा केली याचे कर्म भोग आहेत असा तिचा निर्धार झाला. पाषाणातील देवास

शरण जाण्या ऐवजी सशरीर असलेले श्रीपादांच्या शरणी जावे असा तिने विचार केला.

ती श्रीपादांच्या घरी गेली. श्रीपादांना तिने कडेवर घेवून लाड केले. कोणी नसल्याची संधी साधुन तिने श्रीपादांना आपली दु:स्थिती सांगितली. श्रीपाद म्हणाले "आत्या ! या सगळयाचा एक लहान उपाय आहे. तू माझ्या मातेसमान असल्या कारणाने तुला मी हे रहस्य सांगतो. तू काही वेळ न घालवता नूतन गृहाचे निर्माण कर, तू व मामा वास्तूपूजा करून त्या नूतन गृहात प्रवेश करा. लागलीच सगळे काही बरे होईल."

श्रीपादांची अशी आज्ञा झाल्यावर तिने असे सांगण्यास सुरुवात केली की, ही विपदा भाडयाच्या घरात राहत असल्यामुळे तिच्यावर कोसळली. म्हणून शिघ्रातिशीघ्र

 

स्वत:चे घर बांधायचे असे तिने आपल्या बांधवास पटवून दिले. मग काय विचारता. कोणी एकाने पापय्यास एक जीर्ण झालेले घर भूदान म्हणून दिले. लागलीच घरातील सगळी संपत्ती, धन इत्यादिंचा विक्रय करून जीर्ण घरास पाडून नूतन गृह निर्माण कार्य सुरु झाले. गृह निर्माणासाठी रुण रुण रुण ऋण सुध्दा घ्यावे लागले. पर्वतशिला आणून त्यांची शकले करून गृह निर्माणात वापरण्यात आली. नूतन गृह प्रवेश केल्यावर, पापय्या शास्त्री स्वस्थ झाले.

बाबारे ! शंकरभट्टा ! पापय्याची मृत्यू दशा चालू होती. त्यांचे अपमृत्युच्या संकटापासून श्रीपादांनी रक्षण केले. त्याला मानसिक त्रास, अपमान, धनव्यय इत्यादी कष्ट देवून कर्म ध्वंस केला. तेवढेच नव्हे, पापय्याच्या पापकर्मांचे शिलांमध्ये आकर्षित करून, त्या शिलांचे

 

शकलेकरवून पाप कर्मांचा नाश केला. कर्मध्वंस करण्यास सिध्द, अवधूत विविध व चित्र-विचित्र मार्गांचे अवलंबन करतात. स्वस्थ झालेल्या पापय्या शास्त्रीस श्रीपाद म्हणाले "तू केवढा बुध्दीहीन आहेस. तू मन:पूर्वक आराधना करीत असलेला श्री दत्त सशरीर रूपाने तुझ्या समोर उभा असला तरी तू ओळखले नाहीस, म्हणजे तुझे केवढे दुर्भाग्य. कुक्कुटेश्वर मंदिरात असलेली पाषाणमूर्ती तुझे रक्षण करील असा तुझा निर्धार होता. म्हणून तुझे संचित पाप पर्वत शिळांवर फिरवून त्यांची शकले करवून तुझे कर्मफळ नाहीसे केले. तुला नूतन गृह करून दिले. सशरीर असलेल्या या दत्तांस शरण आला असता तर तुझे संचित संस्कार या शरीरावर ओढुन घेवून तुझे कर्म क्षय केले असते. भक्ताच्या भावनेनुसार भगवंताचे अनुग्रह फल असते." ही लीला घडल्यावर पापय्याने श्रीपाद श्रीवल्लभच दत्ताचे अवतार आहेत असे ओळखले.

 

श्रीपादांच्या दूधाच्या समस्ये विषयी, श्री श्रेष्ठी व श्री वर्मा चिंतित होते. हा विषय घेवून ते श्री सत्य ऋषीश्वर (श्री बापन्नार्य) यांजकडे जावून म्हणाले, "हे राजर्षी ! आपण राजा जनकाप्रमाणे संसारात असून ब्रह्मज्ञानी आहात. ब्रह्मामध्ये लीन आहात. आमची एक लहानशी इच्छा आहे. ती आपण पूर्ण करावी. श्री बापन्नार्य म्हणाले" इच्छा व्यक्त केल्याशिवाय कसे बरे वचन देवू. नि:संकोच तुम्ही मला तुमची इच्छा सांगा. तुमची इच्छा धर्मबध्द असल्यास निश्चित पूर्ण करेन." श्री श्रेष्ठी म्हणाले "मी श्री वर्म्यांकडून गायत्री नावाच्या गाईच्या संतति मधली एक शुभ लक्षणांनी युक्त अशी एक गाय विकत घेतली. आमचे कुलपुरोहित असलेले श्री आपलराज शर्मा यांस ती गाय देण्याचा विचार केला

 

होता. त्या गाईचे क्षीर श्रीपादांच्या सेवेत उपयोगी यावे या शिवाय आमची दुसरी इच्छा नाही."

श्री श्रेष्ठींचे म्हणणे झाल्यावर, श्री बापन्नार्य म्हणाले "बरे ! बरे !, तुम्ही असे करा, ती गाय माझ्या गोठ्यात आणून बांधा, मी ती गाय आपलराजांस देण्याचा प्रयत्न करतो. शुभलक्षणी गाय आपलराजांच्या घरी असणे, दात्यास व ग्रहीतास शुभप्रद व श्रेयस्कर आहे." गोमातेस बापन्नार्यांच्या घरी आणले. गोदान घेण्यास आपलराजांनी नकार दिला.

हिमालयात सतोपथ नावाचा एक प्रांत आहे. त्या प्रांतातून युधिष्ठिरादिंनी स्वर्गारोहण केले. तेथे श्री सच्चिदानंदावधूत नावाचे महात्मा होते. त्यांचे वय कांही शताब्दींच्या पेक्षा जास्त होते. ते कैवल्यश्रुंगी येथे

 

असलेले श्री विश्वेश्वरप्रभूंचे शिष्य होते. श्री विश्वेश्वर प्रभू स्वत: पीठिकापुरी श्रीपाद श्रीवल्लभ रूपाने असून, त्यांचे बाल्य रूपाचे दर्शन घेवून, कृतार्थ व्हावे असा आदेश श्री सच्चिदानंदास झाला. श्री सच्चिदानंदावधूत पीठिकापुरस आले. श्री बापन्नार्यांनी त्यांचे आदराने स्वागत केले. त्यांच्यापुढे श्रीपादांच्या दुधाची समस्या आली, तेंव्हा त्यांनी ठामपणे सांगितले की आपलराज शर्मांनी गोदान घेतले पाहिजे. श्रीपाद श्रीवल्लभ साक्षात दत्त प्रभू असून, व्यर्थ असलेल्या नियमांच्या बंधनात पडून गोक्षीर अर्पण करण्याचे महद्भाग्य आपल्या हातून दवडू नये असे ठासून सांगीतले.

ब्राह्मण परिषदेने श्रीपाद श्रीवल्लभ श्री दत्त असल्याचा पुरावा मागीतला. पंच महाभूतांचे साक्ष तुम्हाला देतो असे अवधुतांने सांगीतले.

 

## श्रीपाद हे श्री दत्त असल्याचे पंच महाभूतांची साक्ष

यज्ञारंभ होताक्षणी भूमातेने साक्ष दिली. श्रीपाद श्री दत्त असल्याकारणाने आपलराज शर्मा यांनी गोदान स्वीकार करावे. श्वसुरांपासून जामातास प्रीतिपूर्वक दिलेले, "दान" होत नाही म्हणून सत्य ऋषीश्वरांनी श्री श्रेष्ठीकडून दान घ्यावे व भेट वस्तू म्हणून जामातास द्यावे. हे भूमातेचे वचन होते. यज्ञारंभ झाल्यावर, यज्ञस्थळ सोडल्यास इतर स्थळी पाऊस पडत होता. ही दुसरी साक्ष. यज्ञातील हविर्भाग स्वीकारण्यास स्वत: अग्निदेव आले व गोदान घेतल्याने दोष नाही असे सांगितले. ही तीसरी साक्ष. यज्ञ मंडपाव्यतिरिक्त , इतर स्थळी, वायूदेवाने आपला प्रताप दाखविला. ही चवथी साक्ष. आकाशातून दिव्य वाणी झाली की श्रीपाद साक्षात श्री दत्त आहेत. ही पाचवी

साक्ष. असे पंच महाभूत साक्षी झाल्यावर आपलराजांनी गोदानाचा स्वीकार केला. गोदानाचे फळ श्रेष्ठीस प्राप्त झाले. त्या कारणाने, गाईच्या विक्रीची किंमत नरसिंह वर्माने आपलराज शर्मा यांस देण्याचा निर्णय झाला. अशा प्रकारे, अवधूतांच्या सन्निध्यात श्रेष्ठी व वर्म्यांस अपूर्व अशा पुण्याचा लाभ झाला.

भविष्य काळात कोकनद (काकिनाडा) या नावाने वायसपुर अग्रहार प्रसिध्द होईल. श्यामलांबापुर (समर्लाकोटा) श्री पीठिकापुर एकत्र होऊन महानगराचे स्वरूप धारण करील. जगातील सगळया देशांचे, सगळया धर्माचे किंवा पंथाचे लोक कुठल्या तरी जन्मी, एके दिवशी पीठिकापुरी येतील व श्रीपादांचे दर्शन घेतील. श्रीपादांचे चरित्र संस्कृत भाषेत लिहिले जाईल. "श्रीपाद श्रीवल्लभ चरित्रामृत " हा ग्रंथ श्रीपादांच्या आशिर्वादाने

प्रसिध्द होईल. भूर्जपत्रात लिहिलेले ग्रंथ श्रीपादांच्या संकल्पाने अदृश्य रूपाने श्रीपादांच्या जन्मस्थानी सात मनुष्यांच्या उंची इतके खोल निक्षिप्त राहतील. त्यांच्या जन्मस्थानी श्री पादुकांची स्थापना व मंदिराचे निर्माण होईल. श्रीपादांस गोदान केलेले महा पुण्यशाली वेंकटप्पय्या श्रेष्ठी खरोखर धन्य आहेत. त्यांच्या कुटुंबात धन-धान्याची समृध्दी असेल. ते हिरण्यलोकात थोडा काळ राहून पुन्हा महाराष्ट्र देशात ऐश्वर्यवंत वैश्य कुळात जन्म घेवून श्री नृसिंह सरस्वती अवताराचे सुध्दा दर्शन घेतील. बाबारे ! शंकरभट्टा ! हे गोदान अत्याधिक विशेष शुभप्रद आहे. तू कुरवपुर प्रयाणाची तयारी कर. श्रीपाद श्रील्लभ सदैव तुझी रक्षा करतील.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जयकार ॥**

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -10

## नरसिंह मूर्तीचे वर्णन

मी तिरुमलदासांची आज्ञा घेवून कुरवरपुराच्या दिशेस माझे प्रयाण सुरु केले. श्रीपादांच्या लीला मनात आठवल्या की अंग रोमांचित होई. मार्गात थोडे दूर गेल्यावर मला एक अश्वत्थ वृक्ष दिसला. दुपारची वेळ झाल्याने मी भुकेने व्याकुळ झालो होतो. जवळपास ब्राह्मणांचे घर असल्यास माधुकरी मागून विश्रांतीसाठी पवित्र

असा अश्वत्थ वृक्ष आहे असा विचार करीत निघालो. त्या अश्वत्थाखाली कोणीतरी विश्रांती घेत असल्याचे मला दिसले. जवळ जाऊन पाहीले तर त्या मनुष्याने यज्ञोपवीत धारण केलेले होते.

मी अश्वत्थाजवळ गेलो तेंव्हा त्या व्यक्तीने आदराने मला बसण्यास सांगितले. त्यांचे नयन करूणारसाने भरले होते. त्यांच्या समोर एक झोळी होती. त्यात खाद्‌य पदार्थ काही नव्हते. परंतु एक ताम्र पात्र तेवढे होते. ते सतत श्रीपाद श्रीवल्लभांचे नाम स्मरण करीत होते. मी त्यांना प्रश्न केला "महाशय ! आपण श्रीपादांच्या दिव्य चरणांचे आश्रित आहात का ? तुम्ही त्या महापुरुषाचे दर्शन घेतले का ?"

ते म्हणाले "माझा जन्म सद्वैश्य कुलात झाला असून मला सुब्बय्या श्रेष्टी असे म्हणतात, आमच्या वंशाचे नाव "ग्रंथी" आहे. आमच्या पूर्वजा पासून सद्ग्रंथ पारायणाची परंपरा आहे. म्हणून आमच्या घराण्यास ग्रंथी असे नाव पडले. माझ्या लहानपणी मला माता-पित्याचा वियोग झाला. माझ्या घरी धन समृद्धी आहे. मी दूर देशांस जावून अनेक प्रकारचे व्यापार करतो. या निमित्ताने पुष्कळ वेळा कांचीपुरास जाण्याचा योग आला. तेथे चिंतामणी या नावाच्या एका वेश्येचा परिचय झाला. खूप धन तिच्यावर खर्च केले. मळयाळ (केरळ) देशात पालक्काड या प्रांतातून बिल्वमंगल या नावाचा ब्राह्मण सुध्दा व्यापाराच्या निमित्ताने

कांचीपुरमला येत असे. तो सुगंधी द्रव्यांचा अरबी नागरिकांना विक्रय करून त्यांजकडून रत्नराशी व तुरंग (घोडे) घ्यायचा. कधी कधी आम्ही दोघे जण मिळुन व्यापार करीत होतो. दुर्दैवाने, आम्ही दोघे वेश्येच्या संगतीत भ्रष्ट झालो." अरबांशी थोडा काळ आमचा व्यापार चांगला चालला. त्या नंतर अरबांनी आमच्याकडून उच्च जातीच्या अश्वासाठी अधिक धन घेवून निम्नजातीचे घोडे आम्हांस दिले जेणे करून व्यापारामध्ये आमचे नुकसान झाले. आमच्या कडून चांगले घोडे, राजे महाराजे विकत घेत. व्यापारात नुकसान झाल्याने आमची संपत्ती नष्ट झाली. माझी पत्नी मनोव्यथेने मरण पावली. मला एक मंदबुध्दी असलेला पुत्र होता. त्याचा अकालमृत्यू झाला. बाबारे !

 

सगळया तीर्थांत श्रेष्ठ आणि विख्यात असलेले पादगया तीर्थ क्षेत्रात असलेले पीठिकापुर आमचे मूळ गांव. मी अज्ञानी असताना देव-ब्राह्मणांचे अनिष्ट करीत होतो. ऋण वसूली करण्यास निर्दयतेने वर्तत होतो. श्रीपादांचे पिता श्री आपळराजांच्या घरी आईनविल्लीहून त्यांचे बंधूगण भेटण्यासाठी आले. त्या सगळयांच्या भोजनाची सोय करण्यासाठी त्यांच्या जवळ पुरेशे धन नव्हते. ते दानाचा स्वीकार करित नसत. श्री वेंकटप्पय्या श्रेष्टींच्या घरातून आणलेल्या भिक्षेने उदर निर्वाह व उचित व्यवहार करित. श्रेष्टींचे कुल पुरोहित असल्या कारणाने, भिक्षे ऐवजी धनाचा स्वीकार करित नसत. नाइलाज म्हणून त्यांनी एक वराह येवढया रकमेचे जिन्नस आमच्या दुकानातून उधार नेले. बंधूगण गेल्यावर

माझी रक्कम परत करण्याचे आपळराजांस मी बजावले होते. हातांत एक कवडी पण नाही मला जेंव्हा धन मिळेल तेंव्हा मी अवश्य परत करीन असे राज शर्मा म्हणाले. मी चक्री-व्याज घेण्यात तरबेज होतो. काळ लोटला. व्याजावर व्याज चढवून खोटे हिशेब दाखवून 10 वराहा देणे बाकी आहे असे राज शर्मास कळविले. तेवढे धन मला देण्यास राज शर्मांना आपले राहते घर विकावे लागले. त्या काळातल्या दरा प्रमाणे ते घर मी विकत घेतल्यास राजशर्मांना 1-2 वराहा दील्याने हिशेब बरोबर असे मी अनेकाना सांगितले होते. राजशर्मांना गृहविहीन करणे हाच माझा संकल्प होता. माझा हा दुष्ट विचार लक्षात येताच वेंकटप्पयांनी माझी निर्भत्सना केली. "अरे दुरात्म्या ! धनाच्या

मदाने मनास येईल तसे वागत आहेस. आमच्या कुल पुरोहिताचा अपमान झाल्यास आमचा अपमान झाल्या सारखे. तू तुझी वागणुक बदल नाही तर घोर आपत्ती संभवेल. अग्निहोत्रापेक्षा पवित्र असलेल्या राज शर्मांस तू असले कष्ट देतोस या कारणाने रौरवादी नरकास जाशील."

एकदा श्रीपाद श्रेष्टींच्या घरी असताना मी श्रेष्टींना व्यंगाने म्हणालो-राज शर्मा जर माझे ऋण फेडू शकत नसतील तर त्यांच्या पुत्रांपैकी एकास माझ्या दुकानात चाकरी करण्यास पाठवावे किंवा त्यांनी स्वत: चाकरी करण्यास यावे. एक मुलगा आंधळा तर दुसरा पंगू, तिसरा हा श्रीपाद मात्र. तीन वर्षाचा माझे ऋण कसे बरे

फेडले जाईल ? असे ऐकून श्रेष्टींचे मन दुखावले. त्यांच्या नेत्रांतून अश्रूधारा वाहू लागल्या. श्रीपादांनी आपल्या दिव्य हस्ताने त्यांचे अश्रू पुसून म्हणाले "आजोबा ! मी असताना भय कसले ? हिरण्याक्ष व हिरण्यकश्यपांचा संहार मीच केला तर सुब्बय्याचे ऋण फेडण्यास मला कठीण काय ?" असे म्हणून माझ्याकडे वळुन म्हणाले "अरे ! तुझे ऋण मी फेडीन. चल तुझ्या दुकानात. दुकानात सेवा करून ऋणाची निवृत्ती करीन. ऋण फिटल्यावर मात्र तुझ्या घरी लक्ष्मी राहणार नाही. विचार कर."

बाल श्रीपादाना घेऊन वेंकटप्पय्या श्रेष्ठी सुब्बय्याच्या दुकानात आले. ते सुब्बय्यास

म्हणाले "श्रीपादांच्या ऐवजी मी तुमच्या दुकानात काम करतो चालेल का ? सुब्बय्याने नकारार्थी मान हालविली इतक्यात दुकानात एक जटाधारी आला. तो सुब्बय्या श्रेष्टींचे दुकान शोधित होता. त्याला एक तांब्याचे भांडे विकत घ्यावयाचे होते. तो श्रेष्टींना म्हणाला" मला एका तांब्याच्या पात्राची अत्यंत गरज आहे. किमत थोडी जास्त असेल तरी चालेल. सुब्बय्याच्या दुकानात बत्तीस तांब्याची पात्रे होती परंतु तो खोटेच म्हणाला "माझ्याकडे एकच तांब्याचे पात्र आहे त्याला दहा वराह देऊ शकत असल्यास तुला ते मिळेल. तो संन्यासी चटकन कबूल झाला. त्याची एकच अट होती की ते पात्र वेंकटप्पय्या श्रेष्टींच्या मांडीवर बसलेल्या श्रीपादांनी आपल्या हातांनी त्या

संन्याशास द्यावे. त्या अटी प्रमाणे श्रीपादांनी स्वहस्ते ते पात्र त्या संन्याशास दिले. श्रीपाद प्रभु पात्र देताना हसत होते. ते म्हणाले " अरे तुझी इच्छा आता पूर्ण झाली ना ? तुझ्या घरी लक्ष्मी स्थीर राहील. तू तुझी संन्यास दीक्षा सोडून देऊन स्वगृही जा ! तुझ्यासाठी तुझी पत्नी आणि मुले वाट पहात आहेत. तो जटाधारी संन्यासी अत्यंत आनंदित होऊन निघून गेला. वेंकटप्पय्या श्रेष्टी आणि अप्पळराजू शर्मा यांचा अपमान करावा अशी सुब्बय्याची इच्छा होती ती पूर्ण झाल्याने त्याच्या मनात थोडा अहंकार निर्माण झाला होता आणि त्यांतच तो म्हणाला, "आजच्या विक्रीत मला विशेष धनलाभ झाला. अप्पळराजू कडून यायचे असलेले दहा वराहाचे कर्ज

फिटल्यासारखे मला वाटले. या क्षणी श्रीपाद राय ऋणातून मुक्त झाले." वेंकटप्पय्या म्हणाले, "हे जे तू सांगतो आहेस ते गायत्रीच्या साक्षीने सांग." सुब्बय्याने तसे केले. श्रीपाद प्रभु आणि वेंकटप्पय्या श्रेष्टी घरी गेल्यानंतर सुब्बय्याने आत जाऊन पाहिले तर एकतीस भांडयापैकी केवल एकच भांडे तेथे होते. श्रीपाद प्रभुच्या लीला अनाकलनीय, अचिंत्य होत्या. त्यांच्या समक्ष जे बोलू ते वचन खरे होत असे. साक्षात् दत्त प्रभुंच्या करकमलानी तांब्याचे भांडे घेणारा जटाधारी धन्य होता. श्रीपाद प्रभुंकडून अनुग्रहाच्या स्वरूपात तांब्याचा किंवा तांबे असलेल्या धातुचा एक तुकडा मिळाला तरी दान घेणाऱ्याला भाग्याचे असते तेंव्हा प्रत्यक्ष तांब्याचे पात्र मिळविणारा तो जटाधारी किती भाग्याचा

आणि सुब्बय्या किती दुर्दैवी त्याला येणे असलेले दहा वराहाचे देणे श्रीपादांनी आपल्या लीलेने दिले परंतु त्या क्षणापासून त्याच्या कडे असलेली लक्ष्मी क्षीण होऊ लागली. एकतीस भांडयांच्या ठिकाणी केवळ एकच भांडे राहिले होते. सुब्बय्यांने अप्पळराजू कडून दहा वराह येणे आहे असा खोटाच हिशोब दाखविला होता. त्या पापाचे फल अशा स्वरूपात त्याला मिळाले होते.

शंकरभट्ट म्हणाले "अरे सुब्बय्या सूर्योदयापुर्वीचा आणि सूर्यास्तापुर्वीचा काल अत्यंत पवित्र असतो. प्रात:संध्येच्या समयी आणि सांयसंध्येच्या वेळी अग्नीहोत्र करणे विशेष फलदायी असते. प्रात:काळी सूर्य भगवान सर्व शक्तींच्या स्त्रोताने

 

सिध्द असतात. संध्यासमयी या सर्व शक्ति पुनरपि सूर्यात विलिन होतात."

यावर सुब्बय्या म्हणाला "महाराज ! दान स्वीकारल्यास पुण्य कमी होते असे मी ऐकले होते. परंतु ते स्विकारले नाही तर पाप लागते असे आपल्याकडून ऐकले होते या दुहेरी वाक्यांचा अर्थबोध होत नाही. तसेच श्रीपाद स्वामी श्री दत्तात्रेयांचे अवतार असे म्हणतात तेच नरसिंह स्वामींचा अवतार शंकराचा अवतार असे काहीजण म्हणतात. शिवामध्ये अनुसयेचे तत्त्व कसे अंतर्भूत आहे ते समजत नाही. कृपया या सर्वांचा खुलासा करावा. परंतु या प्रश्नांचा खुलासा करण्या अगोदर सर्वांना भूक लागली असल्याने जेवणाचा बेत ठरला

आश्चर्याची गोष्ट अशी की त्या लहानशा जागेमध्ये एका तांब्यांच्या भांडयाशिवाय दुसरे काहीच नव्हते. दोन केळीची पाने सुब्बयांने आणली. शंकरभट्ट नदीवर जाऊन शुचिर्भूत होऊन आले. जेवणासाठी भात आणि दोडक्याच्या वरणाचा बेत होता. केळीची पाने जेवणासाठी घेतली व पळसाच्या पानांचे द्रोण तयार केले. त्या जटाधारी संन्याशाने डोळे मिटून क्षणभर ध्यान केले आणि जवळच्या ताब्यांच्या पात्रातूत द्रोणात पाणी टाकले. त्यानंतर त्याच भांडयातून दोडक्याचे चवदार वरण वाढले व नंतर भात वाढला. ते अमृता समान जेवण करून आम्ही तृप्त झालो. रिकाम्या भांडयातून प्रथम पाणी नंतर अन्न येणे हा एक दैवी चमत्कारच होता. भोजनानंतर ते भांड रिकामेच होते."

# शनीवार प्रदोषसमयी केलेल्या शिवार्चनाचे फलित

श्रीपादस्वामी सकल देवता स्वरूप आहेत. शनिदेव कर्मकारक आहेत. ग्रहामधील छायाग्रह राहू-केतूतील राहू, शनिमुळे फल देतो. केतू मंगळामुळे फल देतो. कर्मकारक असणारा शनि कर्म साक्षी असणाऱ्या सूर्याचा पुत्र असल्याने शनिवारची सांयकाळ शक्तिमान असते चतुर्थी आणि त्रयोदशी राहुस बलवान असतात. शनित्रयोदशीच्या महापर्व काळात सायंकाळी शिव आराधन केल्यास मानवाच्या पूर्वजन्मात केलेल्या पापांचे फल नष्ट होते. श्रीपाद श्रीवल्लभांचा अवतार मंगळ ग्रहाच्या चित्रा नक्षत्रावर झाला

असल्याने त्या नक्षत्रावर श्रीपाद प्रभूंची पूजा केली असता सर्वग्रह दोषाचे शमन होते. युध्द, आपदा, शस्त्रास्त्रांनी येणारा अकाल मृत्यू , ऋणग्रस्ततेतून उद्भवणारी संकटे याचे कारण मंगळ ग्रह असतो. चित्रानक्षत्रावर किंवा मंगळवारी श्रीपाद स्वामी अरुणवर्णाप्रमाणे प्रकाशमान होतात. कर्ज म्हणजे पाप. अऋण म्हणजे पाप नसणारा (पाप राहित). त्या दिवशी श्रीपाद प्रभू साक्षात अरुणाचलेश्वराचे रूप असतात. वेंकटप्पय्या श्रेष्टी, नरसिंह वर्मा, आणि बापनार्युलु, शनिप्रदोषाच्या दिवशी शिवाराधनेत सहभागी होत. त्या दिवशी अप्पळराज शर्मा यांनी सुध्दा मोठ्या श्रध्दाभावाने त्या आराधनेत भाग घेतला होता. अखंड लक्ष्मी सौ. सुमती महाराणी शिव स्वरूपातील अनुसयामहातत्त्वाचे

 

ध्यान करीत असे. त्या महातपाचे फलस्वरूप म्हणूनच श्रीपाद स्वामींचा अवतार झाला. या कारणाने वेंकटप्पय्या श्रेष्ठी, नरसिंह वर्मा अथवा बापनार्युलु कडून धन स्वीकारले ते दान होत नाही. परंतु त्यांच्या कडून धन न स्विकारल्यास महापाप आहे असे श्रीपाद स्वामी आपल्या पित्यास न बोलता सांगू इच्छित होते. श्रीपाद प्रभु सकल देवतांचे स्वरूप आहेत. सर्व देवतांच्या अतीत असणारे हे महान तत्त्व आहेत. त्यांचे दर्शन, स्पर्श, आणि संभाषण ज्या भाग्यवतांना लाभले ते धन्य होत.

श्रीपाद वल्लभांच्या असाधारण लीलेने त्यांनी आपल्या पित्यास ऋणमुक्त केल्याची वार्ता पीठिकापुरम गावात दावानलासारखी पसरली.

तीन वर्षांच्या श्रीपादांनी अप्पळराजूंना ऋणमुक्त केल्याने त्यांच्या नेत्रातून पुत्र स्नेहाने अश्रुधारा वाहू लागल्या. महाराणी सुमती आपल्या पुत्रास हृदयाशी कवटाळून किती तरी वेळ तन्मय अवस्थेत होती. या वेळी त्यांच्या घरी वेंकटप्पय्या श्रेष्ठी, नरसिंह वर्मा, बापनार्य आणि सुब्बय्या आले होते. सुब्बय्याने सर्व वडिलधाऱ्या मंडळीसमोर श्री राजशर्मांचे ऋण (देणे) फिटले असे सांगितले. यावर श्रीपाद प्रभु म्हणाले "पित्याला ऋणमुक्त करणे पुत्राचा धर्मच असतो."

कोणीतरी जटाधारी येऊन दहा वराह देऊन तांब्याचे भांडे घेऊन गेला त्यामुळे माझे कर्ज कसे फिटले असे राजशर्मांनी विचारले. अशा

 

प्रकारे अनेक रसपूर्ण क्रिया प्रतिक्रिया झाल्या. बापनार्युलुंनी श्रीपादांना विचारले की "ते जटाधारी संन्याशी कोण होते ते तुला माहित आहे का ?" यावर श्रीपाद म्हणाले, "त्या जटाधारी बद्दलच नाही तर सगळया जटाधारी संन्याशांबद्दल मी जाणतो.

## श्रीपाद स्वामी कोण ? आणि त्यांचे स्वरूप

बापनार्युलु श्रीपादांना म्हणाले "तू तीन वर्षाचा बालक आहेस परंतु मोठ्या माणसा सारखा बोलतो आहेस. सर्वांबद्दल माहिती असावयास तू सर्वज्ञ आहेस काय ?" यावर श्रीपाद म्हणाले, मी तीन वर्षाचा आहे असे तुम्हाला वाटते

 

परंतु मला तसे वाटत नाही. माझे वय अनेक लक्ष वर्षांचे आहे. मी या सृष्टीच्या पूर्वी होतो. प्रलयानंतर सुध्दा राहणार आहे. सृष्टीच्या निर्मितीच्या वेळी मी होतो. माझ्या शिवाय सृष्टीची उत्पत्ती, स्थिति आणि लय होऊच शकत नाही. मी साक्षीभूत होऊन सर्व व्यवहाराचे अवलोकन करतो. यावर बापनाचार्युलु म्हणाले. "श्रीपादा ! लहान मुलांनी आपण चंद्रमंडळात आहोत असा केवळ विचार केल्याने आपण चंद्रमंडळात असतो असे नाही. प्रत्यक्ष अनुभव असावयास हवा. सर्वज्ञान, सर्वव्यापकत्व, सर्वशक्तित्व हे केवळ जगन्नियंत्याचे लक्षण आहे."

यावर श्रीपाद म्हणाले "मी सर्वत्र स्थित असणारे आदितत्त्व आहे. त्या त्या प्रसंगानुसार त्या त्या ठिकाणी आवश्यकतेनुसार मी व्यक्त होतो. साकार रूपात नसलो तर मी नाही असे होत नाही. जीवाच्या ठिकाणी मी अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय, आनंदमय कोषात स्थित असतो. माझ्या अस्तित्वामुळे या पंचकोषांचे सर्व कार्यकलाप होत असतात. मी विशिष्ट कोषात आहे अशी अनुभूति तुला दिली तर त्या कोषात मी असल्याची जाणीव होते. मी तुला माझा अनुभव दिला नाही याचा अर्थ मी तेथे नाही असा मात्र होत नाही. मी सर्वव्यापी आहे. सर्व ज्ञान विज्ञान माझ्या चरणाशी लीन आहेत. माझ्या केवळ संकल्पाने ही सर्वसृष्टी निर्माण झाली. मी सर्वशक्तिमान आहे. यात

आश्चर्य काय आहे ? यावर अप्पळराज शर्मा म्हणाले" बाळा, बालपणापासून तू म्हणजे आम्हाला एक कोडे आहेस. तू पुन्हापुन्हा, "मी दत्तप्रभु", "मी दत्तप्रभु" असे म्हणतोस "नृसिंहसरस्वती" या नावाने पुन्हा एकदा अवतरीत होईन असे म्हणतोस. लोक तर कावळे आहेत. पीठिकापुरम मधील ब्राह्मण तर नरकलोकातील लोखंडी कावळयांपेक्षा सुध्दा भयंकर आहेत. ते या सगळयाला मनचांचल्य आणि बुध्दिभ्रष्टता असे म्हणतात. आपण ब्राह्मण आहोत. आपण विधियुक्त धर्मकर्माने आचरण करणे चांगले आहे. या खेरीज तुला देवाचा अंश असलेला अवतारी पुरुष आहे असे म्हणणे म्हणजे केवळ अहंकाराने म्हणतो आहोत अस ते मानतात.

यावर श्रीपाद प्रभु म्हणाले "तात, आपण सांगता ते मी अमान्य करीत नाही परंतु खरे ते सांगितले पाहिजे ना ? पंचभूताकडून साक्ष देण्याची वेळ आल्यास मी दत्तप्रभु नाही असे सांगणे म्हणजे असत्य भाषणाचा दोष लागणार नाही का ? नभोमंडलातील सूर्याला तू सूर्य नाहीस असे म्हटल्याने तो सूर्य नाही असे होईल का ? सत्य देशकालाबाधित असते. आपल्या पीठिकापुरम मधील ब्राह्मण स्वत: देहधारी मनुष्य समजून जसे मनुष्यत्वाचा अनुभव घेत आहेत त्या प्रकारे मी सुध्दा सर्वज्ञत्व, सर्वशक्तित्व , सर्वांतर्यामित्व असलेला दत्त आहे हे तत्व मी सारखे, पदोपदी सर्वांच्या अनुभूतिस आणून देत आहे. युगामागून

 

युगे जाऊ शकतात. अनेक जगत, सृष्टी स्थिती, लयाला जाऊ शकतात. परंतु साक्षात दत्त असणारा मी दत्त नाही असे कसे होईल ?"

यानंतर बापनार्युलु म्हणाले "श्रीपादा ! जटाधारी दृष्टीआड झाल्यावर सुब्बय्याकडे असलेल्या एकतीस तांब्यांच्या भांडयापैकी एकच उरले. तू काही चमत्कार करून ते अदृष्य केलेस काय ?" यावर श्रीपाद प्रभु म्हणाले सर्व घटना काळाच्या, कर्माच्या अनुसार कोणत्यातरी कारणाने घडत असतात. कारणा शिवाय कार्य होऊ शकत नाही. हा निसर्गाचा अनुल्लंघनीय नियम आहे. हे सुब्बय्या पुर्वजन्मी जंगल प्रदेशातील दत्त पुजारी होते. परंतु जंगलामध्ये दत्तदर्शन

क्वचितच घेत असत. त्यांच्यात स्त्रीवासना अत्यंत प्रबळ होती. स्त्रीलोलुप असणारा हा पूजारी प्राचीन कालातील पूर्वपरंपेरतील पूजेतील मोठी तांब्याची दत्तमूर्ती विकण्याच्या विचारात होता. त्या प्रमाणे एके दिवशी त्याने ती मूर्ती विकली व आलेले धन वाम मार्गाने खर्च केले. लोकांमध्ये मात्र श्री दत्ताची मूर्ती चोरीस गेल्याचे वर्तमान पसरविले. जटाधारी बनून आलेला संन्याशी पुर्वीच्या जन्मात लौकिक व्यवहारात अडकलेला सोनार होता. त्याने धनाच्या आशेने त्या दत्तमूर्तीस वितळविले होते. या जन्मी तो जन्मदरिद्री होऊन जन्माला आला. दत्तमूर्तीची पूजा अनेक वर्षे केल्याच्या पुण्याइने त्या पुजाऱ्यास श्रीमंत अशा श्रेष्ठी कुलात जन्म मिळाला. या दोघांनी ती मूर्ती

 

विरघळऊन त्याचे बत्तीस तांब्याचे भांडे बनऊन विक्रय केला होता. त्या सोनाराच्या घरी नरसिंह देवाची आराधना करत असत. नरसिंह देवाच्या मूर्ती समोर ही तांब्याची भांडी घडवली होती. दैवाच्या संकल्पाने नृसिंहाच्या बत्तीस अवताराच्या अंशानी त्या तांब्याच्या भाडयांत प्रवेश केला होता. या जन्मात पूर्व जन्माचे ज्ञान होऊन त्या सोनाराने माझी अनन्य भक्तीभावाने सेवा केली. त्याची दारिद्रय दूर करण्यासाठी त्याने मनापासून माझी प्रार्थना केली. मी प्रसन्न होऊन दर्शन दिले आणि पीठिकापुर येऊन माझ्या हातून तांब्याच्या भांडयाचा स्विकार करण्यास सांगितले होते. तसेच दहा वराह श्रेष्ठीला देऊन मला बांधविमुक्त कर असे सांगितले होते. तो तसे करून धन्य झाला.

त्याची आर्थिक समस्या दूर होण्याचा त्याला मी आशिर्वाद दिला होता. त्याच्या देणेदाराचा त्रास चुकविण्यासाठी त्याने जटाधारी संन्याशाचा वेश घेतला होता. मला जटाधारी बद्दल सर्वच माहिती आहे ना ? हा सुब्बय्या श्रेष्ठी आमच्या कुटुंबाकडून खोटेपणाने दहा वराह वसूल करून घेणार होता. त्याला दहा वराह मिळतील अशी व्यवस्था मी केली. परंतु याच्या बदल्यात त्याचे सर्व पुण्य फल नष्ट झाले. हे सुब्बय्या ! चिंतामणी बरोबर तू केलेले तुझे सर्व श्रुंगार चाळे मला माहीत आहेत. तुझी कथा माझ्या कथामृतात हास्यास्पद होईल. तू झोळी घेऊन लहान मुलांना लागणारे खाण्याचे पदार्थ विकून आपला उदर निर्वाह चालवशील. तुझ्याकडून घेतलेल्या पैशांनी माझ्या माता पित्याने त्यांच्या

 

नातेवाईकांच्या भोजनाची व्यवस्था केली होती. तुझ्या पेक्षा जास्त मला वाण्याचा हिशोब समजतो. जेवणातील वरणभात व दोडक्याची भाजी करण्यातच तुझे पैसे संपून गेले होते. बाकीच्या खर्चासाठी माझ्या वडिलांच्या कष्टाचे पैसे खर्च झाले होते. तुला अन्नान्न दशा आली म्हणजे तुझ्याकडे असलेल्या तांब्याच्या पात्रातून तुला पाणी, वरणभात व दोडकेच प्राप्त होतील. ते तू खाऊन इतराना खाऊ घालण्या इतपतच मिळतील." असे श्रीपाद प्रभु तीव्रतेने म्हणाले. श्रीपाद प्रभूंचे मुखमंडल दिव्य प्रखर तेजस्वी असे दिसत होते. त्यांचे डोळे अग्नीच्या गोळंयाप्रमाणे लाल दिसत होते. ते पुढे म्हणाले "ए सुब्बय्या श्रेष्ठी ! आज रात्री तुझ्या घराच्या दक्षिण दरवाज्या जवळ एक म्हैस

 

येईल. तुझा अंतकाळ जवळ आल्याचे तुला कळावे यासाठी यमधर्मराजाने पाठवलेला तो निरोप आहे. मी तुझ्यावर एक अनुग्रह करीत आहे. तू स्वत:च्या हाताने स्वयंपाक करून दोडक्याचे वरण आणि भात त्या म्हशीला खाऊ घाल. त्या म्हशीची ही एकच इच्छा तू पूर्ण कर. ते अन्न खाल्यावर तुझ्या ऐवजी ती म्हैस मरून जाईल. परंतु त्या क्षणापासून तू खूप गरीब होत जाशील. तू झोळी घेऊन मी सांगितलेले काम कर. त्यानंतर तुझी अन्नान्न दशा झाल्यावर मी अनुग्रह केलेल्या तांब्याच्या भांडयाचा तुला उपयोग होईल." असे कडक शब्दात श्रीपाद प्रभु म्हणाले. त्यावेळी वेंकटप्पा श्रेष्ठी रागात असलेल्या श्रीपादाना पाहून भयभीत झाले. त्यांनी श्रीपादांना असे रागात आलेले

कधी पाहिले नव्हते. तेंव्हा श्रीपाद म्हणाले "आजोबा ! घाबरलात का ? मी नरसिंह मूर्तीच आहे. तुम्हाला वर देऊन तुमच्यावर कृपा करीत आहे. वाणी कुळातील लोकांना शाप देईन असे आपणास वाटले काय ? माझी बहीण वासवीने तिच्या कुलातील लोकांना त्यांच्या सौंदर्यात थोडी त्रुटि असण्याचा शाप दिला होता. मी श्रीपाद त्याच तत्त्वाचा ! सर्व वाणी निर्धन होतील असा शाप देईन अशी आपणास भिती वाटली काय ? आपण घाबरू नका दैवाला जातकूळ असे कांही नसते तसेच भक्तांना सुध्दा जाती कुल नसते. आर्य वैश्यांचा आणि माझा अनुबंध फार जुना आहे. बापनार्य पुर्वीचे लाभाद महर्षीच ना ? वाण्यांमध्ये लाभाद महर्षी गोत्र नष्ट झाले आहे. बापनार्यांच्या सर्व

वंशजाना (अगदी कली युगाच्या अंतापर्यंतच्या) माझे आशिर्वाद आहेत. त्यांच्यावर माझा वरदहस्त सतत राहील. तुम्हाला दिलेली झोळी वेगळीच आहे. त्यात दत्त मिठाई भरून आहे. कितीही दिली तरी कमी होत नाही. परंतु ती कोणाला डोळयानी दिसणारी नाही. नृसिंहाच्या बत्तीस अवतारातील सर्व लक्षणे माझ्या ठयी विराजमान आहेत. बापनार्याची तेहतीसावी पिढी चालू असताना माझ्या जन्मस्थळी महा संस्थानाचे निर्माण होऊन त्यात माझ्या पादुकांची स्थापना होईल. तुमच्या वंशातील कोणत्याही पुरुषाने श्रीपाद श्रीवल्लभांच्या दिव्य भव्य रूपाची नवविधा भक्तीच्या कोणत्याही मार्गाने आराधना केल्यास श्री दत्तात्रेयांचे श्वान अदृष्य रूपात त्यांचा सांभाळ करतील. वेद,

 

पुराण, उपनिषदे ही सर्व श्वान रूपात अदृष्य असून सदैव रक्षण करतील. इतक्यात वेंकटप्पय्या श्रेष्ठींनी श्रीपाद प्रभूंना प्रेमाने जवळ घेतले. त्यांच्या डोळयातून आनंदाश्रु वाहू लागले. बापनार्याच्या तोंडातून शब्द फुटत नव्हते. सुमती माता हे सर्व स्वप्न आहे का वैष्णवी माया अशा संदेहात पडली. अप्पलराज शर्मांचे मन स्तंभित झाले. श्रीपादांचे दोन्ही मोठे भाऊ त्याच्याकडे भीत भीत बघत होते हा आमचा धाकटा भाऊ की दत्त प्रभू ? ही काय भानगड आहे असा विचार ते करू लागले.

नरसिंह वर्मांनी श्रीपादाला आपल्या मांडीवर घेतले. श्रीपाद वर्मांना म्हणाले "आजोबा आपण दोघे उद्या घोडागाडीतून आपली जमीन

 

पहाण्यास जाऊ या. तेथील भूमाता मला कित्येक दिवसापासून तुझ्या पादस्पर्शाने मला पावन केंव्हा करणार ? अशी आर्ततेने प्रार्थना करते आहे." "आर्तत्राण परायण" हे माझे वचन आहे. तेंव्हा वर्मा म्हणाले, "अरे श्रीपादा, माझे एक छोटे सांगणे आहे. आपल्या पीठिकापुरम जवळ आमची जमीन आहे ना ? तेथेच एक छोटे गांव वसवून तेथील लोकांकडून शेती करवून घ्यावी. गावकऱ्यांना कमी पैशात शेती कसायला देऊन जमिनदारीचा व्यवहार पहाण्यासाठी तुझ्या वडिलांना कुलकर्णीपद द्यावे असा माझा विचार आहे. परंतु सध्या हे कुलकर्णीपद आपल्याकडे नाही ना ?" यावर श्रीपाद हसून म्हणाले "आजोबा तुम्ही तुमच्या जमिनदारीचा विचार केला परंतु माझ्या जमिनदारीचा विचार नाही

केला. हे मला मान्य नाही. अगोदर वडिलांना कुलकर्णी पद करा म्हणाव. त्यानंतर तू कुलकर्णीपद संभाळायच आहे असे वर्मा म्हणाले. घंडीकोटा श्रीपाद श्रीवल्लभ राजशर्मा अमुक गावाचा कुलकर्णी होता एवढेच केवळ इतिहासात शिल्लक राहील. जे कुलकर्णीपण मी करणार आहे ते विश्वात्मक आहे. माझे हिशोब मला आहेत. दररोज कोटयावधी पुण्य राशींची उलाढाल होताना दिसत आहे. माझ्या अवताराचे प्रयोजन विश्वकुंडलिनीला हलऊन टाकायचे आहे. मानवात असल्या प्रमाणे गावाला, शहराला, पुण्य क्षेत्रांना सुध्दा कुंडलिनी असते. सांध्र सिंधुवेद यांचे ज्ञान ज्यांना आहे अशानाच अवगत होऊ शकणारे हे योग रहस्य आहे. पीठिकापुरची कुंडलिनी बापनार्युलु, वेंकटप्पय्या श्रेष्ठी आणि वत्सवायी

 

यांच्या तेहतिसाव्या पिढीमध्ये जागु शकते,आत्ताच काय घाई आहे ? दैववशाने तुम्हाला लाभलेल्या या महापुण्य काळातील प्रत्येक क्षणाचा सदुपयोग करून घ्यावा."

श्रीपाद प्रभूंच्या या वक्तव्यानंतर त्यांनी पीठिकापुरला कायमचे राहावे असा नरसिंह वर्मानी प्रयत्न केला होता.

## श्रीपाद प्रभूंचे वैभव

माझ्यात अज्ञान जवळ जवळ भरलेले आहे. श्रीपाद श्रीवल्लभ, "मी स्वत: श्रीकृष्ण आहे" असे म्हणत त्यावेळी सामान्य लोकांना ते हास्यास्पद वाटे. त्या

अज्ञानातूनच मी प्रश्न केला "श्रीपादा ! तू स्वत:ला श्रीकृष्ण म्हणवतोस तर अष्टभार्या सोळा सहस्त्र गोपिका सुध्दा या अवतारात आहेत काय ?" यावर मंद हास्य करून श्रीपाद प्रभू म्हणाले "माझ्या अष्टविधा प्रकृतीच अष्टभार्या आहेत. या माझ्या शरीरातून दशादिशांमध्ये शक्तीस्वरूप असणारी स्पंदने क्षणाक्षणाला प्रवर्तित होत आहेत. अशा प्रकारे प्रत्येक क्षणाला एका एका कलेमधून शरीर, मन आणि आत्मतत्वामधून **(10x10x10 = 1000)** एक हजार स्पंदने प्रवर्तित होतात. या प्रकारे सोळा कलांमधून एकूण सोळा हजार स्पंदने प्रवर्तित होतात. याच माझ्या सोळा हजार गोपिका आहेत. पूर्वावतारात त्या सर्व कला मानवरूपात अविर्भुत झाल्या होत्या. या अवतारात त्या सगळया निराकार रूपात स्पंदनशील आहेत. विविध देवतांद्वारा माझी पूजा आराधना करण्यात कांही चूक नाही. ती माझीच

आराधना आहे. माझ्यातील शिवस्वरूप, विष्णूरूप, आणि ब्रह्मस्वरूप यांची आराधना करता येते. या प्रमाणे विविध देवतांमधील स्वरूपांची आराधना करू शकतात. वेगवेगळया साधन पध्दती, साधकाच्या विविध साधनाअवस्था, काल, कर्म, कारण या अनेक जीवांच्या अवस्थांवर प्रभाव टाकीत असतात.

## नरसिहांची 33 रूपे

नरसिंह राजवर्म्याला त्या रात्री नृसिंहाने तेहतीस रूपात दर्शन दिले होते. ती रूपे अशी -

1) कुंदपाद नरसिंह मूर्ती 2) कोप नरसिंह मूर्ती 3) दिव्य नरसिंह मूर्ती 4) ब्रह्मांड नरसिंह मूर्ती 5) समुद्र नरसिंह मूर्ती 6)

विश्वरूप नरसिंह मूर्ती 7) वीर नरसिंह मूर्ती 8) रौद्र नरसिंह मूर्ती 9) वृ्च्र नरसिंह मूर्ती 10) बिभीत्स नरसिंह मूर्ती 11) धूम्र नरसिंह मूर्ती 12) वह्नि नरसिंह मूर्ती 13) व्याघ्र नरसिंह मूर्ती 14) बिडाल नरसिंह मूर्ती 15) भीम नरसिंह मूर्ती 16) पाताळ नरसिंह मूर्ती 17) आकाश नरसिंह मूर्ती 18) वक्र नरसिंह मूर्ती 19) चक्र नरसिंह मूर्ती 20) शंख नरसिंह मूर्ती 21) सत्व नरसिंह मूर्ती 22) अद्भूत नरसिंह मूर्ती 23) वेग नरसिंह मूर्ती 24) विदारण नरसिंह मूर्ती 25) योगानंद नरसिंह मूर्ती 26) लक्ष्मी नरसिंह मूर्ती 27) भद्र नरसिंह मूर्ती 28) राज नरसिंह मूर्ती 29) वल्लभ नरसिंह मूर्ती. या नंतरच्या तीसावे नरसिंह मूर्ती म्हणून श्रीपाद वल्लभांना पाहिले.

 

31 व्या अवतारात श्री नृसिंह सरस्वती अवतारात आणि 32 व्या नरसिंह मूर्ती रूपात प्रज्ञापुरचे (अक्कलकोटचे) स्वामी समर्थ यांना पाहिले

## श्रीनिवासांचा वृतांत

कन्या मासामध्ये श्रावण नक्षत्रावर द्वादशीच्या दिवशी सोमवारी सिध्दयोगावर श्रीवेंकटेश अर्च्य रूपात प्रकट झाले. वैशाख शुध्द सप्तमीला विलंबी नाम संवत्सरा मध्ये त्यांनी कुबेरा कडून धन सहाय्य घेऊन ऋणपत्र लिहून दिले. श्री पद्मावती देवी मृगशीरा नक्षत्रावर जन्मली. तर श्रीनिवास श्रवण नक्षत्रावर अवतरले. वैशाख शुध्द दशमीला उत्तरा फाल्गुनी नक्षत्रावर श्रीनिवासांचा

पद्मावती बरोबर विवाह संपन्न झाला. श्रीनिवास प्रभू सुध्दा भारद्वाज गोत्रा मध्ये अवतरले. पांडवाच्या वंशातील सुधन्वाला नागकन्ये द्वारा झालेला पुत्र आकाश महाराज. याचा भाऊ तोंडमान. वसुधानु हा आकाश महाराजांचा मुलगा. श्रीनिवास प्रभूनी अगस्ती महर्षीच्या सल्यानुसार अर्धे राज्य तोंडमानला दिले व अर्धे राज्य वसुधानुला वाटून दिले. त्या रात्री त्या सर्वांनी श्रीपाद प्रभुंच्या दिव्य नामाचे संकीर्तन केले. दुसऱ्या दिवशी श्रीपादाच्या आश्चर्यकारक लीलांचे वर्णन सांगण्याचे आश्वासन देऊन सुब्बय्या श्रेष्ठी जवळ असलेल्या कुटीमध्ये शंकरभट्टास घेऊन गेले. त्या कुटीत दोन ताडपत्रीच्या चटया होत्या. चार कुत्रे त्या कुटीचे रक्षण करीत होते.

## श्रीपादांच्या स्मरणाने प्राप्त होणारे फळ

श्रीपाद प्रभूंच्या हृदयंगम लीलांच्या केवळ स्मरण मात्राने अनेक जन्मातील साठलेल्या पापांच्या राशी भस्म होऊन जातात.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जय जयकार ॥**

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -11

# सुब्बय्याश्रेष्ठी, चिंतामणी, बिल्वमंगल यांचा वृतांत

## दत्त आराधनेद्वारा सर्व दैवतांच्या आराधनेचे फळ श्रीपादांचा जन्म - अत्यद्भुत ज्योतिर्मय

दुसऱ्या दिवशी सकाळी सुब्बय्या श्रेष्ठीनी सांगण्यास प्रारंभ केला. ते म्हणाले "श्री दत्त प्रभू सर्व देवतांचे स्वरूप आहेत. दत्ताराधना केली असता सर्व देवतांच्या आराधना केल्याचे फल प्राप्त होते. सर्व देवतांमध्ये

दत्तप्रभूच अंर्तभूत आहेत. श्री सुमती माता अनसूया तत्त्वामधील परमशिवाची शनि प्रदोष समयी आराधना करीत असे. त्यामुळे श्री दत्त प्रभूंमधील शिवतत्व अनसूया तत्त्वात प्रतिबिंबित होऊन अनसूया माते समान असलेल्या सुमती मातेच्या उदरी श्रीपाद श्रीवल्लभांच्या रूपात अवतरले. ही एक अद्भुत योगप्रक्रियाच होती. मातापित्याच्या संयोगाशिवाय योगनिष्ठेमध्ये असताना अप्पळराज शर्मा व सुमती मातेच्या नेत्रांमधून योग ज्योती प्रकट होऊन त्यांचा संयोग होऊन सुमती मातेच्या गर्भात प्रवेश करून नऊ महिन्यानंतर केवळ ज्योती रूपाने ते बाहेर प्रकटले. वास्तविक पहाता श्रीपाद ज्योतीस्वरूपच होते. त्यांनी तिसऱ्या वर्षी आश्चर्य कारक लीला करण्यास सुरवात केली. कालांतराने श्रीपाद प्रभूंना एक बहिण झाली. तिचे विद्याधरी असे नांव ठेवले होते. विद्याधरीच्या

 

जन्मदिवशीच बापनाचार्युलुचे एक दूरचे बंधु मल्लादी रामकृष्णावधानुलु नांवाचे एक महान पंडित त्यांच्या घरी आले. त्यांना चंद्रशेखर नांवाचा एक मुलगा होता. घंडीकोटा यांच्या घरी महालक्ष्मीच जन्मली. ती मल्लादी घराण्यात सून म्हणून चांगली आहे असे ते नातेवाईकांत मुक्तकंठाने सांगू लागले. श्रीपाद प्रभूंना सुध्दा हे नाते पसंत होते. त्यांच्या संकल्पानुसार यथाकाली विद्याधरी आणि चंद्रशेखर यांचा विवाह मोठ्या थाटात पीठिकापुरम मध्ये संपन्न झाला.''

श्री विद्याधरी नंतर राधा नावाच्या बहिणीचा जन्म झाला. तिचा विजयवाटिका या क्षेत्रातील विश्वनाथ कृष्णावधानुलु या एका सद्ब्राह्मणाशी विवाह संपन्न झाला. राधानंतर श्रीपाद प्रभुना अजून एक बहिण झाली. तीचे नांव सुरेखा असे होते. तिचा विवाह मंगलगिरी

 

येथील ताडपल्ली दत्तात्रेय अवधानुलु नावाच्या एक विद्वान सच्छील युवका बरोबर झाला.

श्रीपादांच्या लीला अकल्पनीयच आहेत. त्या लीलांचे स्मरण केले असता पाप नष्ट होते. गोदावरी मंडलात, ताटंकपूर (तणुकु) नावाचे गाव आहे. तेथे अनेक वाजपेयांमध्ये पौंडरिक महायाग करणारा परम पवित्र असा एक वंश आहे. ते वाजपेय याजी आहेत. पीठिकापुरम मधील मल्लादिंचा आणि वाजपेय याजींचा अगदी निकटचा संबंध असल्याने वाजपेय याजी "इदं ब्रह्म्य मिदं क्षात्रम्" या सिध्दांतावर विश्वास ठेवणारे आहेत. ते वशिष्ठ, शक्ति , पराशर ऋषि प्रवरान्वित पराशर गोत्रामधून आलेले ऋग्वेदी तर मल्लादी यजुर्वेदी होते. कन्नड देशात ऋग्वेद पाठ करणाऱ्या बालकांसाठी शिकविणारे उत्तम गुरु नव्हते. त्यामुळे ताटंकपुरातून

वाजपेय याजी मायणाचार्युलु यांना बोलाऊन होयशाला येथे नेहमीसाठी वास्तव्यासाठी नेले. तेंव्हा पासून त्यांना होयशाला ब्राह्मण असे संबोधू लागले. यांनी ब्राह्मणवृत्ती आणि क्षात्रवृत्ती समानतेने स्वीकारली. सनातन धर्माच्या रक्षणासाठी त्यांनी अनेक अडचणींचा सामना केला. मायणाचार्यांना दोन पुत्र होते. एक माधवाचार्य आणि दुसरा सायणाचार्य. हे दोघे महान पंडित होते. सायणाचार्यांनी वेदांवर भाष्य लिहिले. माधवाचार्यांनी महालक्ष्मीच्या अनुग्रहासाठी तीव्र तप केले. "विशेष कृपा कटाक्षाची" याचना केली. तेंव्हा लक्ष्मी देवी म्हणाली "ते या जन्मात साध्य होणार नाही." तेंव्हा माधवाचार्य म्हणाले "माते ! मी संन्यास घेत आहे आणि संन्यास म्हणजे मनुष्याचा दुसरा जन्मच असतो. त्या नंतर देवीने हवा असलेला वर दिला. या वराच्या योगाने लोखंडास स्पर्श करताच त्याचे सोने होत असे. त्यांचेच

संन्यासाश्रमातील नाव विद्यारण्यस्वामी असे होते. श्रीपाद प्रभूंचा अनुग्रह त्यांना प्राप्त झाला होता. यांच्या तिसऱ्या पिढीत संन्यास आश्रमाच्या परंपरेतील श्रीकृष्ण सरस्वती हे श्रीपाद प्रभूंच्या पुढच्या अवतारात - नृसिंह सरस्वतींच्या अवतारात संन्यास दीक्षा देणारे गुरु होतील अशी भविष्य वाणी केली होती. त्यांची भोगातील इच्छा नष्ट न झाल्यामुळे त्यानंतरच्या शतकात सायनाचार्यांच्या वशांत गोविंद दीक्षित या नावाने जन्माला येतील. ते तंजावर प्रांताच्या महाराजांचे महामंत्री पद सुशोभित करतील. त्यांच्या कर्तव्यनिष्ठेची सारी कडे प्रशंसा होईल. ही भविष्यवाणी म्हणजे श्रीपाद प्रभूंचा सत्य संकल्पच होता. अनेक देवतांच्या आराधना करताना या देवतांमध्ये दत्तप्रभूंचे चैतन्य प्रतिबिंबित झालेले असते. ते साधकाच्या अभीष्टाची परिपूर्ती करते. दत्तप्रभूंचा आश्रित असणारा, ज्या दैवतेचा अंश आहे

त्याच्याकडून कोणते काम किती प्रमाणात करून घ्यावयाचे हे दत्तप्रभूंच ठरवित असतात. ध्रुवाने कठोर तप करून श्री महाविष्णूंना प्रसन्न करून घेतले. त्यांनी ध्रुवाला पितृवात्सल्य प्रदान केले. श्रीदत्तप्रभू सगुणतत्त्वाच्या, निर्गुणतत्त्वाच्या अतीताच्या आधाराचे परमतत्त्व तेच, चरमतत्त्व तेच, आदितत्त्व तेच, आदि अंतरहित तत्त्व तेच आहेत. हे सर्व अनुभवानेच जाणून घ्यावे लागते. शब्दांनी समजाऊन सांगण्याचा हा विषय नाही. एखादे काम होणे किंवा न होणे, दुसऱ्या पध्दतीने होणे हे सर्व सामर्थ्य श्रीपाद वल्लभांच्या अवताराचे रहस्य आहे."

# श्रीपादतत्व

श्रीपाद श्रीवल्लभ स्वतः त्यांच्या घरी असलेल्या कालाग्नि शमन दत्त यांची आराधना करीत असत. एकदा बापनार्युलुनी श्रीपादांना या विषयी विचारले. ते म्हणाले "श्रीपादा ! तू दत्त आहेस का दत्त उपासक आहेस ? तत्काळ श्रीपाद प्रभू म्हणाले" मी दत्त म्हणतो तेंव्हा मी दत्तच असतो. मी दत्त उपासक आहे असे म्हणतो तेंव्हा दत्त उपासकच असतो. मी श्रीपाद वल्लभ म्हणताना श्रीपाद वल्लभच असतो. मी जो संकल्प करतो तेच होत असते. मी जशी कल्पना करतो तसेच होत असते हेच माझे तत्त्व." आजोबाना हे सर्व आश्चर्यजनक वाटत होते. श्रीपाद पुढे म्हणाले "तुम्ही आणि मी एकच आहोत. पुढील जन्मात अगदी तुमच्या सारख्याच रूपात मी अवतार घेणार आहे. तुमच्यामध्ये संन्यास घेण्याची

प्रबळ इच्छा आहे परंतु तुम्ही या किंवा पुढच्या जन्मी संन्यास ग्रहण करणे हे माझ्या संकल्पात नाही. तंतोतंत तुमच्या सारख्या रूपाने अवतार घेऊन तुमची कर्म बंधने, वासना यांचा नाश करण्याचे मी ठरविले आहे." श्रीपादांनी, आजोबांच्या भ्रुमध्यात स्पर्श केला. ते कूटस्थ चैतन्याचे स्थान आहे. त्याना कांही क्षणातच हिमालयात निश्चल तप समाधीत असणाऱ्या बाबाजींचे दर्शन झाले. ते कांही वेळातच प्रयाग महाक्षेत्रातील त्रिवेणी संगमात स्नान करीत असल्याचे आणि त्यानंतर श्रीपाद श्रीवल्लभांचे रूप दिसले. ते स्वरूप कुक्कुटेश्वराच्या देवालयातील स्वयंभू दत्तात विलिन झाले. त्यांच्यातील अवधूत स्वरूप निघाले. त्यांना बापनार्यांची कन्या सौभाग्यवती सुमती महाराणी भिक्षा घालीत असल्याचे दिसले. त्या अवधूताने श्रीपाद श्रीवल्लभांचे बालरूप धारण केले व सुमती महाराणीच्या मांडीवर तान्ह्या

बाळाच्या रूपात झोपलेले बापनार्यांना दिसले. मातेच्या मांडीवरील बाळ पहाता पहाता सोळा वर्षाच्या मुलात रूपांतरीत झाले. त्या युवकाने त्यांच्याकडे दृष्टी टाकीत हुबेहुब बापनार्या सारखेच रूप घेतले आणि ती मूर्ती संन्याशाची होती. दोन नद्यांच्या संगमावर स्नान करून आपल्या शिष्यासह ताठ मानेने चालू लागले. तो संन्यासी बापनार्यांकडे वळून म्हणाला "मी कोण आहे या विचारात असल्या सारखे दिसत आहात. मला नृसिंह सरस्वती म्हणतात. हे गंधर्वपूर आहे" असे म्हटल्यावर कांही क्षणातच आपले वस्त्र नदीवर पसरले आणि त्यावर बसून श्रीशैल्याला गेले. तेथील कर्दळीवनातील महापुरुषांनी, महा योग्यांनी त्यांना साष्टांग नमस्कार केला. त्या सर्वांनी, महाप्रभूंनी त्या वनात यावे यासाठी अनेक शतका पासून तप केले होते. प्रभूंच्या दर्शनाने ते धन्य झाले होते. अनेक वर्षांच्या तपश्चर्येनंतर ते

कोपीनधारी वृद्धाच्या रूपात दिसले. तीच तेजस्वी नजर त्यांनी बापनार्युलुवर रोखून धरली. ते पुढे म्हणाले "ह्या माझ्या रूपाला स्वामी समर्थ असे म्हणतात. थोडया वेळातच त्यांनी प्राणत्याग केला व प्राणशक्ति वटवृक्षात गेली. त्यांचा दिव्यात्मा श्रीशैल्यावरील मल्लिकार्जुनाच्या शिवलिंगात विलीन झाला. महापवित्र अत्यंत शक्तीवंत असलेल्या त्या शिवलिंगातून मेघ गंभीर स्वरात आवाज आला "बापनार्या ! तू धन्य आहेस. अनंत, केवल अज्ञान स्वरूप, अविनाशी असणारा मी तुझ्या एका क्रियाशक्ति योगामुळे सूर्य मंडळातून शक्तिपात करून या ज्योतिर्लिंगात आकर्षित झालो. या ज्योतिर्लिंगात विलीन असणारे सोळा सहस्त्र दिव्य पुरुष सर्वदा माझी सेवा करीत असतात. या ज्योतिर्लिंगाच्या दर्शनाला येणाऱ्या भक्तांना हे दिव्य पुरुष भौतिक आणि अध्यात्मिक प्रगतीमध्ये सहाय्य करतात. त्रिमूर्ती स्वरूप असणारा मी

श्रीपाद श्रीवल्लभ, नृसिंह सरस्वती आणि स्वामी समर्थ या रूपात तुला अनुग्रहित करीत आहे." असे शब्द बापनार्यांना ऐकू आले. या प्रसंगाने बापनार्युलु स्तब्धच झाले. त्यांना समोर निरागस चेहऱ्याचा हसरा तीन वर्षाचा बालक श्रीपाद दिसला. त्यांचे सर्व अनुभव दिव्य आणि मधूर होते. त्यांनी प्रेमाने श्रीपादाला उराशी कवटाळून धरले. त्या वेळी तेदव्य तन्मय अवस्थेत गेले. तसा किती वेळ गेला ते कळलेच नाही. डोळे उघडले तेंव्हा अग्निहोत्र करण्याची वेळ झाली होती. ते त्यासाठी उठले , बापनार्यांचे अग्निहोत्र कार्य सुध्दा अभिनव होते. शमीच्या किंवा पिंपळाच्या लाकडाने अग्नि निर्माण करतात, परंतु बापनार्य समिधा अग्निकुंडात घालून वेदमंत्रोच्चारण करून अग्नि निर्माण करीत. अप्पलराजू शर्मा सुध्दा याच प्रकारे अग्निहोत्र करीत असत. त्यांच्या वंशात अग्निपूजा होती. प्रज्वलित झालेल्या अग्निकुंडात

उतरून आहुती घालीत. हे विशेष उत्सवाच्या वेळी करीत. या प्रकारे अग्निपूजा करताना त्यांच्या वस्त्राना व शरीरास कोणताही त्रास होत नसे. हे महद आश्चर्य होते.

## श्रीपाद प्रभूंचे अघटित सामर्थ्य

बापनार्युलुनी अग्निहोत्रासाठी त्या दिवशी कित्येक वेळा वेदमंत्र म्हटले परंतु अग्नि कांही प्रज्वलीत होईना, ते घामाने ओले चिंब झाले परंतु अग्नि मात्र निर्माण झाला नाही. श्रीपादांनी आपल्या आजोबांची ही अवस्था दुरून पाहिली. ते अग्निकुंडाकडे पाहून म्हणाले "अरे अग्निदेवा ! तुला आज्ञा करतो. आजोबांच्या देवकार्यामध्ये अडथळा आणू नकोस." अग्नि तत्काळ निर्माण झाला. बापनार्युलुनी कलशातील पाणी अग्नि कुंडात घातले परंतु विझण्या ऐवजी अधिकच भडकला. आजोबा हा चमत्कार

पाहून अचंबित झाले. श्रीपाद प्रभू म्हणाले आजोबा, माझ्या अवताराला तुम्ही, वेंकटप्पय्या श्रेष्ठी, नरसिंह वर्मा, कारण आहात. म्हणून तुम्ही, माझ्या वडिलानी वेंकटप्पय्या कडून, नरसिंह वर्माकडून धनसाहाय्य किंवा धनेत्तर साहाय्य स्विकारल्यास ते दानामध्ये येत नाही. त्याप्रमाणे ते सहाय्य न घेतल्यास दैव द्रोह सुध्दा होऊ शकतो. त्या सहाय्याला परमेश्वराची कृपा समजावी. मला जन्म देणारी मातृमूर्ती सुमती महाराणी, मल्लदीचीच नव्हे तर वेंकटप्पय्या श्रेष्ठी, वत्सवाहीं कुटुंबाची माहेरवासिण आहे, असे समजावे. हा माझा दंडकच आहे. श्रीपाद या सर्व गोष्टी सांगताना सुमती महाराणी आणि अप्पळराज शर्मा तेथेच होते. तसेच श्री वेंकटप्पय्या श्रेष्ठी आणि नरसिंह वर्मा सुध्दा तेथे होते. या वेळी श्रीपाद प्रभू म्हणाले "माझ्या संकल्पाशिवाय बापनार्यासारखे महा तपस्वी सुध्दा अग्नि निर्माण करू

 

शकत नाहीत. माझे वडील अग्निकुंडांत आल्यावर अग्नि आपला प्रताप दाखवितो. माझा संकल्प जर बदलला तर वेंकटप्पय्या श्रेष्ठी सुध्दा निष्कांचन होतील. अगणित भूमी असणाऱ्या नरसिंह वर्म्यांना उभे राहण्यापुरती सुध्दा जागा मिळणार नाही अशी त्यांची अवस्था होईल. तुम्ही सर्व माझ्या संकल्पामुळे या अवस्थेत आहात. मी भिकाऱ्याला महाराजा करू शकातो तसेच महाराजाचे भिकाऱ्यात रूपांतर करू शकतो. माझी भक्ति करणाऱ्या भक्ताला तो जी इच्छा करेल ते मी देऊ शकतो. परंतु देण्या अगोदर तो सांभाळू शकेल का ते मी पहातो. त्याच्या शक्ति सामर्थ्याने लोकांच्या उपकारासाठीच तो ते वापरतो का नाही या बद्दल मी त्याची परिक्षा करतो. मला गरज भासेल तेंव्हा पृथ्वीचे आकाशात आणि आकाशाचे पृथ्वीत रूपांतर करू शकतो. बापानार्युलु कृतयुगात लाभाद महार्षि असताना त्यांचा मंगल महर्षि

नावाचा एक शिष्य होता. तो दर्भ कापताना चुकून हाताला जखम झाली आणि त्यातून रक्त वाहू लागले. त्या रक्ताची गाठ होऊन, सुगंधित विभूती मध्ये ते बदलेले. अहा ! मी किती मोठी सिध्दी प्राप्त केली असे त्याच्या मनात येऊन गर्व झाला. एवढयात परम शिव प्रत्यक्षात तेथे अवतीर्ण झाले. त्यांनी स्वत:चा हात हलविला हिमगिरीवरून बर्फ पडावा तशी विभूती शिवाच्या हातातून पडत होती. परमशिव म्हणाले "त्रेतायुगात भारद्वाज ऋषी पीठिकापुरम सवितृकाठकायन यज्ञ करणार आहेत. त्या महाचयनामध्ये जमा झालेल्या विभूती पैकी केवळ लवमात्र तुला दाखविले. एवढयाने मंगलमहर्षीचा गर्व पार गळून पडला. श्रोतेगण, अवाक होऊन श्रीपाद प्रभू जे सांगत होते ते ऐकत राहिले. श्रीपाद म्हणाले, "ह्या पीठिकापूरच्या परिसरात पाउल ठेवणेच अनंत जन्माचे

पुण्य फल आहे. माझ्या या अवतार समयी तुम्ही माझ्या बरोबर असणे, न सांगता येण्यासारखे विशेष आहे. माझी शक्ति अनुभवाला, प्रत्ययाला यावी म्हणजे प्रथम तुम्ही उत्तम साधक बनावयास हवे. तेंव्हाच माझी शक्ति , करूणा, वात्सल्य, रक्षण, पापविमोचन तुम्हास अनुभवास येईल. माझी जन्मभूमी असलेल्या या बापनार्यांच्या घरात माझ्या पादुकांची प्रतिष्ठापना होईल. मी पीठिकापुरम मध्ये पहाटेच्या समयी आई सुमतीच्या मांडीवर दुध पिईन. दुपारच्या वेळी आई मला दुध भाताचे मधुर असे घास खाऊ घालील. रात्रीच्या वेळी सुमती माता मांडीवर घेऊन गव्हाच्या रव्याचा शिरा खाऊ घालेल. मी पीठीकापुरम मध्ये असताना गंधर्वपुरात नृसिंह सरस्वतीच्या रूपात असेन. दुपारच्या वेळी नक्कीच गंधर्वपुरात भिक्षा घेईन. अंर्तदृष्टी असणाऱ्या भक्तांना हे स्पष्ट दिसून येईल. माझ्या जन्मभूमीत

माझ्या श्रीपादुकांची स्थापना होणार आहे. महापुरुष, महायोगी, सर्व देशांतील लोक मुंग्यासारखे हजारोच्या संख्येने माझ्या दर्शनास दरबारात येतील. ते दत्त दिगंबरा, दत्त दिगंबरा, श्रीपाद वल्लभ दिगंबरा, नृसिंह सरस्वती दत्त दिगंबरा असा तन्मयतेने जयघोष करीत नृत्य करतील. मी काल पुरुषाला अनुमती देताच तत्क्षणी न होणारी कार्ये क्षणात घडतील. माझ्या नावाने एक महा संस्थान निर्माण होईल. माझा प्रभाव जसाजसा वाढत जाईल तसे तसे पीठीकापुरमचे महात्म्य वाढून सारे गाव लोकांनी व्यापून राहील. विक्रीसाठी थोडी सुध्दा जागा शिल्लक राहणार नाही. मला ज्यानी येथे यावे असे वाटेल त्याना मी बळजबरीने आणीन. कितीही मोठा धनवान असो अथवा महायोगी असो माझ्या संकल्पाशिवाय पीठीकापुरमला येऊ शकणार नाही. हे निश्चित. माझ्या निजतत्वास समजून, जाणून आनंदी

व्हा. हा क्षण पुन्हा येणार नाही. सर्व देवता शक्ति माझ्याच स्वरूपात आहेत. कोणी मला दक्षिणा समर्पित केली तर ती मी शतगुणाने, शतपटीने त्यांना त्यांच वेळेला परत देतो. धर्माविरुध्द न जाता धनार्जन करणाऱ्यांच्या मनोकामना मी पूर्ण करतो. सत्कर्माच्या आचरणाने मोहाचा नाश होतो. व मोक्षाची प्राप्ति होते." श्रीपादांचे हे अमृत वचन ऐकून सर्वजण धन्य झाले.

दुसरे दिवशी नृसिंह वर्मा आपल्या घोडा गाडीतून श्रीपादांना आपले शेत, जमीन दाखविण्यास घेऊन गेले. वर्मांना फार मोठी जमीन होती. त्या जमिनीत अनेक प्रकारची पिके होती. त्यातील दोडक्याच्या वेलाला फूल येत नसे. कधीकाळी आले तरी सुकून जाई, गळून जाई. त्याजागी फळ येत नसे. एखाद्या वेलास फळ लागलेच ते इतके कडू असे की तोंडात घालवत नसे. नरसिंह वर्मांनी

 

ही गोष्ट श्रीपादांना सांगितली. ते प्रसन्नतेने म्हणाले, आमच्या घरी सर्वांना दोडक्याचे वरण आवडते मलासुध्दा आवडते. पूर्वीच्या काळी एक दत्तोपासक या भूमीवर तप करीत असे. ही पवित्र भूमी साक्षात दत्त स्वरूप असलेल्या माझ्या चरण स्पर्शासाठी तळमळत होती. तिची तळमळ तुम्हाला कळावी यासाठी तिच्या भाषेत या प्रकाराने व्यक्त करीत होती. या भूमातेची इच्छा मी पूर्ण करीन. या भूमीला माझा पादस्पर्श झाल्यावर हिच्या भूमीतत्वात परिवर्तन घडेल. चांगल्या रुचीचे दोडके ही भूमाता आपणास देईल. आजोबा तुम्ही निर्भयपणे आमच्या घरी, येथे पिकलेले दोडके पाठवा . घरच्यांच्या बरोबर मी सुध्दा ते जेवणात घेईन.

त्या दिवसा पासून दोडक्याचे पीक भरपूर येऊ लागले. ती दोडकी सुध्दा उत्तम प्रकारची व रुचकर होती. श्रीपाद

प्रभू घोडा गाडीतून उतरुन कांही वेळ त्या भूमीवर फिरले. तेवढयात तेथे कांही चंचु (तेथील आदिवाशी) युवक युवती आल्या. त्या सर्वानी श्रीपाद प्रभूंना मोठ्या श्रध्दाभावाने प्रणाम केला. श्रीपादांच्या दिव्य मुखकमला भोवती त्यांना एक दिव्य कांतीचे तेजोवलय दिसले. श्रीपाद तेंव्हा म्हणाले, "आजोबा ! हे सर्व चंचुलोक नरसिंह अवताराशी संबंधित आहेत. ते महालक्ष्मीला बहिणीसारखे मानून तिची आराधना करतात. तुम्ही नरसिंह स्वामींचे भक्त आहात. तुम्ही यांना शरण गेल्यास तुम्हाला नरसिंहाच्या दर्शनाचे भाग्य लाभेल. श्रीपाद गंमतीने असे म्हणत आहेत असे नरसिंह वर्माना वाटले. ते म्हणाले "अरे चंचु युवकानो, तुम्ही नरसिंह देवाना पाहिलेत का ? त्यांचा ठावठिकाणा सांगु शकाल काय ? त्यावर एक चंचु युवक म्हणाला ते कोणते मोठे अवघड काम ? सिंहाचा चेहरा माणसाचे शरीर असलेला एव युवक या जंगलात

 

फिरत असतो. त्याचे आमची बहिण चंचुलक्ष्मीवर प्रेम आहे. आमच्या छोटीला सुध्दा तो आवडतो. त्यांचा विवाह आम्ही करून दिला आहे. तुम्हाला हवे असल्यास चंचुलक्ष्मी आणि नरसिंहाला तुमच्या समोर आणून उभे करतो. येवढे बोलून चंचु युवक, युवती निघून गेले. नरसिंह वर्मा हे सारे आश्चर्याने पहात होते. तितक्यात रस्त्याच्या मध्यभागावरुन एक युवक युवति येताना दिसले. श्रीपादानी सुब्बय्या श्रेष्ठीला जवळ बोलावून घेतले व म्हणाले "ते दुरून येणारे दोघे कोण आहेत असे वाटतं ? ते येणारे बिल्वमंगल आणि चिंतामणी आहेत. थोडया काटक्यांचा ढीग करा आपण ते पेटवून गंमत पाहू या." नरसिंह वर्मांना तर घाम फुटला. ते येणारे बिल्वमंगल आणि चिंतामणीच होते. ते दोघे गुरुवायुर क्षेत्रातील श्रीकृष्णांचे दर्शन घेऊन येत असताना कुरूरअम्मा नावाच्या महायोगिनीचे दर्शन झाले. तिने

 

त्यांना सहजच "श्रीपाद श्रीवल्लभ दर्शन प्राप्तिरस्तु" असा आशिर्वाद दिला. तिच्या आशिर्वादाने त्यांच्यात भक्ति आणि वैराग्याचे बीज पडले. मंगलगिरीच्या नरसिंहाचे दर्शन घेऊन ते पीठीकापुरमला श्रीपाद प्रभूंच्या दर्शनासाठी येत आहेत. शंभर वर्षाची वृद्धा महायोगिनी होती म्हणून तिच्या आशिर्वादाच्या प्रभावाने श्रीपादांचे दर्शन त्याना इथेच झाले. काटक्या जळत असताना बिल्वमंगल आणि चिंतामणीला दहन संस्कार होत असल्यासारखा त्रास झाला. थोडया वेळासाठी त्यांच्याच शरीरातून त्यांच्याच आकाराच्या दोन काळया आकृती बाहेर येऊन अग्नित रूदन करीत पडल्या व भस्मसात झाल्या. यानंतर ते दोघे शुध्दिवर आले. तितक्यात चंचुलोक चंचुलक्ष्मीला घेऊन आले. नरसिंह देवाचे हात मागे बांधून चंचुलोकांनी त्यांना श्रीपाद प्रभूंसमोर आणून उभे केले होते. अशा चित्र विचित्र घटना पुर्वी कोणत्याच

युगात घडल्या नव्हत्या. श्रीपादाच्या अवतार कार्यातील अनेक लीला चमत्कार पूर्ण व अनाकलनीय आहेत. श्रीपादानी नरसिंह देवाला प्रश्न केला "पूर्वयुगातील नरसिंह तूच आहेस का ? ही चंचुलक्ष्मी तुझी पत्नीच ना ? हिरण्यकश्यपूचा वध करून प्रल्हादाचे रक्षण करणारा तूच ना ? त्यावर नरसिंह देव त्रिवार हो म्हणाले. त्याच वेळी चंचुलक्ष्मी आणि नरसिंह देवानी दोघांनी ज्योतिरूपात श्रीपादांच्या शरीरात प्रवेश केला. चंचुमंडळी अंतर्धान पावले. बिल्वमंगल महाभक्त होऊन बिल्वमंगल महर्षि झाला. चिंतामणी महायोगीनी झाली. चित्रविचित्र अशा घटना घडलेल्या नरसिंह वर्माच्या जमिनी असलेल्या गावास "चित्रवाडा" असे नांव पडले."

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

‖ श्री गुरुवे नमः ‖

‖ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ‖

अध्याय -12

# कुलशेखर वृतांत

श्री सुब्बय्या श्रेष्ठी किती तरी नविन विषय सहजपणे समजाऊन सांगत. त्यांच्या सांगण्याने ऐकणाऱ्यांचा आत्म विकास होत असे. ते सांगत असत की श्रीपाद वल्लभ साक्षात वेंकटेश्वर स्वामीच आहेत. कलीयुगात तेच कल्की अवतार धारण करणार आहेत. साधारण पणे कालगणनेनुसार कलियुगात चार लाख बत्तीस हजार वर्षे आहेत. परंतु सांध्र सिंधु वेदाप्रमाणे कलियुगात पाच हजार वर्षांचा काळ लोटल्यावर सामान्य प्रलय होऊन

सत्ययुगाची स्थापना होईल. या संबधात ब्राह्मणानी सांगितलेली माहिती श्रेष्ठीनी सांगितलेल्या माहिती पेक्षा निराळीच होती.

## श्वासाचा आयुष्याशी संबंध

कलीयुगामध्ये कलीची अंत:र्दशा पाच हजार वर्षात संपते. त्यानंतर थोडा काळ संधी काळ असतो. त्यानंतर कलीयुगात सत्ययुगाची अंतर्दशा प्रारंभ होते. कलीयुगात एकूण चारलाख बत्तीस हजार वर्षाचा काळ असला तरी अंतर्दशा, सुक्ष्मदशा, विदशा इत्यादी असतात हा योग शास्त्र समजाणाऱ्याना कळण्यासारखा विषय आहे ब्रह्मदेवाने प्रत्येकाला एकशेवीस वर्षे आयुष्यमान दिले आहे परंतु प्रत्येक व्यक्ति एकशेवीस वर्षे जगेलच असे नाही एकशे वीस वर्षात किती श्वास-प्रवास सामान्य

स्थितीमध्ये घेऊ शकतो तेवढे श्वास प्रश्वास दिले आहेत. मन चंचल असणारे रागिट स्वभावाचे, घाईघाईने धावणारे सदैव दुःखात अथवा उदास असणारे. दुष्टपणाने वागणारे लोक आपला श्वास कमी वेळात संपवून टाकतात. सर्वात कमी श्वास प्रश्वास घेऊन कासव तीनशे वर्षे जगतो. अत्यंत चंचल स्वभावाचे माकड अल्पकाळच जिवंत राहते. श्वास-प्रश्वास घेताना आपली सर्व इंद्रिये चांगल्या अवस्थेत असावयास हवी. योगीजन वायुंचे कुंभक करून श्वास शरीराच्या आतील भागात फिरत राहील असे करतात. यामुळे कितीतरी श्वास शिल्लक राहून ते दीर्घ कालापर्यंत जीवित राहतात. मनुष्याच्या शरीरात जिवाणू परिणाम क्रमाप्रमाणे बदलतात.

## श्रीपाद चरित्रामृतताच्या पारायणाचे फल

दहा वर्षापुर्वी असलेले शरीर आता सारखे नसते. जुन्या जीवाणुच्या ठिकाणी नवीन जीवाणू जन्म घेतात. नवीन शरीर भाग जन्मतो त्याप्रमाणे प्राणशक्ति सुध्दा अनेक बदलातून जात असते. जीवनदायक नवीन प्राणशक्ति निर्माण होते. रोगट, जुनी प्राणशक्ति नाश पावते. त्याच प्रमाणे मानसिक शक्ति सुध्दा अनेक बदलातून जात असते. जुनेभाव बदलून नष्ट होऊन नवीन भाव निर्माण होतात.

नवीन जन्मलेल्या मानसिक गोष्टीमध्ये दैवीशक्ति , दैवीकृपा प्राप्त करण्याचे सामर्थ्य असते त्या द्वारे मन, प्राण आणि शरीर सुध्दा होऊ लागते. श्रीपाद श्रीवल्लभ चरित्रामृतासारखे ग्रंथ साक्षात परमेश्वर स्वरूप आहेत. या ग्रंथातील प्रत्येक अक्षरामध्ये सिध्दशक्ति , योगशक्ति

, अंतर्निहित असते. असे ग्रंथ मानसिक रीतीने, वाचिक रीतीने अथवा मानस-वाचिक दोन्ही मध्ये समन्वय होऊन पठन केल्याने श्रीपाद प्रभूंचे दिव्य मानस चैतन्य आकर्षित होते. ग्रंथाचे पारायण करणाऱ्या भक्तांचे शारिरीक, मानसीक प्राण, रूग्ण, बाधा, कष्ट या संबंधित समस्त स्पंदने श्रीपाद प्रभूंच्या मानसिक चैतन्यात विलिन होतात. तेथे ते शुध्द होऊन दिव्य अनुग्रहपुरित स्पंदनांच्या रूपाने साधकाकडे परत येतात. अशा परिस्थितीमध्ये साधकाला इह-पर सुखाची प्राप्ति होते.

## सत्पुरुषाना अन्नदान केल्याची फळे

 

ग्रंथाचे पारायण केल्यावर कमीत कमी अकरा सत्पुरुषांना जेऊ घालावे अथवा त्याच्या खर्चा एवढी रक्कम दत्त क्षेत्रामध्ये दान करावी. सत्पुरुषाना भोजन दिल्याने साधकाला आयुष्य लाभते. त्याला अजून थोडया काळापर्यंत पुरणारे अन्नधान्य अव्यक्त रूपात उद्भवते. एवढेच नाहीतर सत्पुरुष संतुष्ट झाल्यावर शांती, पुष्टी, तुष्टी, ऐश्वर्य इत्यादीच्या संबंधातील भोग, योगाच्या स्पंदनाचा अव्यक्त पणे उद्भव होतो. कालांतराने अव्यक्त अवस्थेतील बीजे व्यक्त स्थितीमध्ये अंकुरित होऊन महावृक्षामध्ये विराजित होतात. वनवासात असताना द्रौपदीकडून अन्नाचा एक कण स्वीकारून श्रीकृष्ण परमात्म्याने दुर्वास महर्षि आणि त्यांच्या दहा हजार शिष्याना पोटभर जेवण दिले. श्रीगुरुना श्रध्दाभावाने समर्पित होऊन समस्त अव्यक्तातील बीजरूपात

 

असणारे, कालांतराने व्यक्त स्थितीत साधकाला हवे असलेले समस्त भोगभाग्य प्रसाद रूपाने प्राप्त होतात.

सांदिपनी ऋषीच्या आश्रमात विद्याग्रहण करण्यासाठी राहिले असतांना श्रीकृष्ण आणि सुदामा एकदा दर्भ तोडून आणण्यासाठी वनात गेले. श्रीकृष्ण थकल्यामुळे सुदामाच्या मांडीवर डोके ठेऊन ते थोडावेळ निद्रिस्त झाले. सुदामाला भुक लागली होती. गुरुमातेने दोघांसाठी थोडे पोहे दिले होते. ते तो श्रीकृष्णास न सांगता एकटाच खाऊ लागला. झोपेचे सोंग घेतलेले झोपेतून उठल्या प्रमाणे आव आणून म्हणाले "सुदामा भूक लागली आहे. घरून येताना गुरु माऊलीने मुलाना भूक लागेल म्हणून कांही तरी खायला दिले का ?" सुदामाने नाही म्हटले. श्रीकृष्ण सुदामाला म्हणाले, "तू कांही तरी खात असल्या सारखे वाटले मला." सुदामा म्हणाला "मी विष्णुसहस्त्र

नाम म्हणतो आहे." श्रीकृष्ण म्हणाले "ओ हो ! असे काय ! मला एक स्वप्न पडले की आपणा दोघांसाठी गुरु माउलीने पोहे दिले, ते तू मला न देता एकटाच खात आहेस. एवढयात सुदामा म्हणाला, "श्रीकृष्ण ! थकला आहेस ना ? त्यातून दुपारची वेळ या वेळी पडलेल्या स्वप्नाचे कांही फळ नसते असे शास्त्र सांगते." श्रीकृष्ण स्मित हास्य करून गप्प राहिले.

कालांतराने सुदामा गरीब होऊन अत्यंत भाग्यहीन झाला. त्याने आपले कष्ट नाहीसे करण्यासाठी कितीतरी वेळा विष्णुसहस्त्र नामाचे पठण केले परंतु कांही विशेष फायदा झाला नाही.

शेवटी श्रीकृष्णाचा अनुग्रह झाला. त्याने सुदामाने आणलेले पोहे खाल्ले आणि त्याला विशेष अशा राज्य

वैभवाचा प्रसाद दिला. श्रीकृष्णाने सुदामाच्या मांडीवर डोके ठेऊन थोडावेळ विश्रांती घेतली होती. त्याची परतफेड म्हणूनच सुदामाला आपल्या मांडीवर झोपऊन त्याच्या पायातील काटे काढून त्याचे पाय दाबून दिले. कर्मसूत्र किती गुढतेने कार्य करते हे प्रभुनी ह्या द्वारे सूचित केले.

## मल्ल युध्दात प्रविण असणाऱ्याचा गर्व हरण

श्रीपाद प्रभू चार वर्षांचे असताना पीठीकापुरममध्ये मल्याल देशातील एक मल्ल आला. त्याचे नांव कुलशेखर असे होते. तो सप्तगिरी बालाजीचा भक्त होता. प्रत्येक राज्यातील मल्लयोध्दयांना जिंकून जयपताका घेऊन पीठीकापुरमला आला. पीठीकापुरमच्या मल्ल योध्दयांना आपण कुलशेखर कडून मार खाऊन अपमानित होणार

 

असे निश्चित वाटत होते. त्या मल्लापैकी कांही जणांचा श्रीपाद प्रभूंवर दृढ विश्वास होता. तेच आपणास या संकटातून सोडवतील या श्रध्दाभावाने ते श्रीपाद प्रभूकडे गेले आणि शरणागती मागितली. श्रीपाद प्रभूंनी त्या सर्व मल्लांना अभय वचन दिले. पीठीकापुरम मध्ये एक कुबडा युवक होता तो आठ ठीकिाणी वाकडा होता व अशकत सुध्दा होता तो कांही काम करू शकत नव्हता तरी त्याला श्रेष्ठींनी पगार देऊन ठेऊन घेतले होते. तो श्रीपादाचा भक्त होता व सतत त्यांची आपली विकृती दूर करण्यासाठी प्रार्थना करीत असे. त्यावर श्रीपाद त्या युवकास, भीमास, म्हणाले होते योग्य वेळ येताच मी तुझे काम करीन. श्रीपाद त्या मल्लांना म्हणाले "आपला भीम आहे ना ? कुलशेखरासमोर जाण्यास तो योग्य आहे. भीमासारखे आपल्या पाठीशी असताना आपणास काय भय ? भीमाची श्रीपाद प्रभूंवर अढळ श्रध्दा होती."

ठरल्या प्रमाणे भीम आणि कुलशेखराचे मल्लयुध्द सुरु झाले. अनेक लोक हा अद्भूत सामना पहाण्यास जमा झाले. कुक्कटेश्वराच्या मंदीरातील प्रांगणात मल्लयुध्द सुरु झाले. कुलशेखराच्या प्रत्येक माराबरोबर भीमाचे शरीर बलवान होत होते. तो ज्या ठिकाणी भीमास मारीत होता त्याच ठिकाणी तितक्याच जोरात त्याला मार लागत होता. कुलशेखर थकला. भीमाचे कुबड जाऊन तो बलवान झाला. कुलशेखर श्रीपाद प्रभूंना शरण आला. श्रीपाद प्रभू म्हणाले कुलशेखरा, मानवी शरीरावर एकशे आठ मर्मस्थाने असतात या सर्वांचे ज्ञान तुला आहे. भीमाचा केवळ माझ्यावर विश्वास आहे. मीच त्याचा रक्षक आहे. हे ज्ञान त्याला आहे. तू अहंकाराने फुगला आहेस आजपासून भीमाची सारी दुर्बलता तुला देतो आहे. तुला अन्न वस्त्राला कमी पडणार नाही तुझ्या

शरीरातील प्राण शक्ति घेऊन भीम अत्यंत बलवान झाला आहे. तिरुपतीला असणारा मीच आहे. कुलशेखरला क्षणभर श्रीपादांनी श्रीवेंकटेश्वराच्या रूपात दर्शन देऊन कृतार्थ केले. श्रीपादांच्या लीला अचिंत्य आहेत त्यांची करूणा प्राप्त करणे हाच आपल्यासाठी एक मार्ग आहे.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -13

## आनंदशर्मा यांचा वृतांत

श्री शंकरभट्ट सांगतात "मी सुब्बय्या श्रेष्ठी यांच्याकडून अनुमती घेऊन कुरवपूरच्या दिशेने प्रयाण सुरु केले. रात्रीच्या वेळी एका गावात आलो. माधुकरीसाठी कोणाच्या घरी जावे याच विचारात होतो. त्याच मार्गावरील एका घरासमोरील ओटयावर एक ब्राह्मण सुखासीन होऊन शेजाऱ्यांशी बोलत असलेले दिसले. त्यांचे डोळे तेजस्वी होते आणि त्यातून कारूण्य रस ओसंडून वहात होता. त्यांनी मला आदराने घरात बोलावले आणि जेवणास

वाढले. पोटभर जेवण झाल्यावर त्यांनीं सांगण्यास सुरवात केली ते म्हणाले "मला आंनद शर्मा असे म्हणतात. मी गायत्री मंत्राचे अनुष्ठान करतो. थोडया वेळापूर्वी गायत्री माता माझ्या अंत:दृष्टीला दिसली आणि म्हणाली एक दत्तभक्त येणार आहे त्याला पोटभर जेऊ घाल. दत्त प्रभूंचे दर्शन घेतल्याचे फळ तुला लाभेल. तिने सांगितल्या प्रमाणे आपले दर्शन घेऊन मी कृतार्थ झालो." यावर मी म्हणालो "मी दत्तभक्त आहे. सध्या दत्तप्रभू भूलोकात श्रीपाद श्री वल्लभ या नावारूपाने आहेत. हे ऐकून त्यांच्या दर्शनासाठी मी कुरवपुरला निघालो आहे. माझे नाव शंकरभट्ट आहे. मी कर्नाटकी ब्राह्मण आहे."

 

# कण्वमुनी आश्रम कथा

माझे बोलणे ऐकून आनंद शर्मा हसले व म्हणाले आमच्या वडिलांनी माझी मुंज केली तेंव्हा एक अवधूत आले होते. आमच्या घरातील सर्वांनी त्यांची उत्तम प्रकारे सेवा केली. गायत्रीमंत्रानुष्ठाना बद्दल त्यांनी बऱ्याच गोष्टी सांगितल्या. "पंचालकोन" भागातील श्री नृसिंहाचे दर्शन घेण्याचा त्यांनी आदेश दिला. माझे वडिल मला पंचालकोनला घेऊन गेले. तेथील नृसिंहाचे दर्शन घेतल्यावर ते ध्यानस्थ झाले. ते ध्यान सकाळ पासून रात्रीपर्यंत चालू होते. मला भीती वाटली व भूकही लागली होती. कोणी एका अनोळखी गृहस्थाने मला जेवण आणून दिले. तो महात्मा मला घेऊन दुर्गम असलेल्या जंगलातून एका डोंगरातील गुहेत गेला आणि तेथे तो अंतार्धान पावला. त्या गुहेत एक वृद्ध तपस्वी बसलेले

होते. त्यांचे डोळे अग्निगोलका प्रमाणे लाल होते. एकशे एक ऋषि त्यांची सेवा करीत होते. ते वृद्ध तपस्वी स्वत: कण्वमुनी होते. ती त्यांची तपोभुमी असून, सेवा करणारे त्यांचे शिष्य होते. ते युवक दिसत असले तरी हजारो वर्षाचे त्यांचे वय आहे. अवधूत रूपातील श्रीदत्त प्रभूंचे दर्शन घडल्यामुळे ते येथे येऊ शकले होते. मला संभ्रम पडून मी आश्चर्यचकित झालो आणि तोंडातुन एक शब्दहि निघेना. शरीर कापू लागले. तेवढयात कण्व महर्षि म्हणाले सध्या दत्तप्रभू पीठीकापुरमला श्रीपाद श्रीवल्लभांच्या रूपात आहेत. आमच्यावर जरा कृपादृष्टी पडू द्या असे त्यांना कळवा. तुला लवकरच श्रीपाद श्रीवल्लभांच्या पादुकांचे दर्शन होऊ दे असा आशिर्वाद देऊन त्यांनी माझ्या डोक्यावर आपला वरदहस्त ठेवला . मी क्षणभरात वडिलांजवळ आलो. त्यांची समाधि उतरली होती.

त्यानंतर आम्ही आमच्या गांवी आलो. मला कण्वमहर्षींच्या आश्रमात आलेला अनुभव श्रीदत्त प्रभूंचा नवा अवतार पीठीकापुरात आहे हे सुध्दा मी माझ्या वडिलाना सांगितले नाही.

## राजमहेंद्रीजवळील पट्टुसाचला पुण्यक्षेत्र

काळ चालला होता. कण्वमहर्षिच्या आशिर्वादाने मला ध्यानांत पादुकांचे दर्शन होत असे. एकदा आमच्या घरी कांही नातेवाइक आले. त्यांना पुण्यनदीत स्नान करून पुण्य क्षेत्रांचे दर्शन घेण्याची इच्छा होती. त्या नातेवाइकांनी माझ्या वडिलांना त्याच्या बरोबर येण्याचा आग्रह केला. तो त्यांनी मान्य केला व मलासुध्दा यात्रेसाठी बरोबर घेतले. राजमहेंद्री हे गोदावरी नदीच्या

तीरावरील एक महापुण्य क्षेत्र आहे. राजमहेंद्रीच्या उत्तर दिशेस असलेल्या डोंगरावर कांही ऋषि तपस्या करीत होते तर कांही पूर्वदिशेस असलेल्या पर्वतावर तपश्चर्या करीत होते. राजमहेंद्री पासून थोडे दूर असलेले "पट्टसाचला" पुण्यक्षेत्र गोदावरीच्या मध्यावर आहे. महाशिवरात्रीच्या या शुभदिनी काही ऋषि पट्टसाचला या क्षेत्री येत तर काही ऋषि राजमहेंद्रीतील कोटीलिंगक्षेत्रात वेदांचे स्वस्तिवाचन करीत. हे ऋषि परस्पर मध्य भागामधून पुर्वेकडून येत. पश्चिम उत्तर आणि दक्षिणे कडून येणारे ऋषिगण "येदुरूलपल्ली" या गावी जमत असत. या येदुरूलपल्ली ग्रामास अगदी जवळ असणाऱ्या मुनीकूडली ग्रामामध्ये विश्राम घेऊन परस्पर चर्चा करीत. माझ्या भाग्याने माझ्या वडिलांबरोबर मी मुनीकूडली ग्रामाचे दर्शन घेऊ शकलो. ही शेवटी श्रीदत्त प्रभूंचीच लीला.

# कलीयुगात श्रीदत्तात्रेयांचे प्रथम अवतरण-श्रीपाद श्रीवल्लभ

तेथे जमलेले ऋषिगण अत्यंत गहन असणारा वेदांत विषय, योग शास्त्र, ज्योतिष्य शास्त्र यांच्या चर्चेत सम्मिलित झाले होते. या चर्चेत भाग घेणारे सर्व महर्षी मुक्त कंठाने श्रीपाद श्रीवल्लभ पीठीकापुरम मध्ये अवतरित होऊन कलीयुगातील संपूर्ण प्रथम दत्तावतार आहेत असे घोषित करीत होते. भौतिक स्वरूपात त्यांचे दर्शन घेण्यासाठी सोय नसणारे ध्यानाच्या प्रक्रियेतून त्यांच्या त्यांच्या हृदयामध्येच दर्शन करीत होते. हा अवतार अत्यंत शांतमय असून करूण रसाने परिपूर्ण आहे असे ते म्हणाले.

माझे वडिल मला पीठीकापुरमला घेऊन गेले. आमच्या बरोबर आलेले पंडितवृंद पादगया तीर्थात स्नान करून कुक्कटेश्वर मंदिरामधील विविध देवतांचे दर्शन घेऊन पूजा करून वेदांचे पठण करून श्री बापनाचार्युलुच्या घरी जाण्यास निघाले. श्री बापनार्युलु श्री अप्पळराज शर्मा त्या पंडितवृंदा बरोबर वेद स्वस्तिवाचन करून आम्हाला भेटले. ते दृष्य अत्यंत मनोहारी होते. असे दिव्य भव्य दृष्य पहावयास मिळणे हे सुध्दा पुर्वजन्माचे सुकृतच.

## श्रीपाद प्रभुंचे दिव्य मंगल स्वरूप वर्णन

आम्ह सर्वांसाठी श्रीबापनार्युलुंच्या घरी मेजवानीचा थाट केला होता. त्या वेळी श्रीपादांचे वय पाच वर्षांहून कमीच होते. सुकोमल, लहान वयाचा तो दिव्य शिशु अत्यंत तेजोवंत, वर्चस्वी, सुंदर, अजाणबाहू, नेत्रद्वयात अनंत

प्रेम करूणा भरून असलेला असा होता. ज्याचे वर्णन करता वेद थकले तेथे माझ्या सारख्या पामराची काय कथा. मी त्यांच्या श्री चरणांना स्पर्श करून नमस्कार केला तेंव्हा त्यांनी आपला अभय हस्त माझ्या शिरावर ठेवला . जन्मजन्मांतरा पासून माझा अनुग्रह तुझ्यावर आहे. पुढच्या जन्मी वेंकटय्या या नावाने अवधूत होऊन निरताग्निहोत्री होऊन, दुष्काळ पडल्यावर पाऊस पाडण्याचे सामर्थ्य तुला प्राप्त होईल. तसेच सांसारिक लोकांना होणाऱ्या त्रासांचे शमन करण्यास समर्थ होशील. असा श्रीपाद प्रभूंनी आशीर्वाद दिला.

मी म्हणालो "श्रीपाद प्रभूंच्या लीला अद्भुत, अगम्य आणि अनाकलनीय आहेत. गायत्री मंत्राच्या साधनेतील रहस्य उलगडून दाखविण्याची कृपा करावी."

## श्रीपाद प्रभूंकडून गायत्री मंत्र सर्वाक्षर महिमा

आनंद शर्मा म्हणाले गायत्री शक्ति विश्वव्याप्त आहे. तिच्याशी संबंध स्थापित केला असता सूक्ष्म प्रकृती स्वाधीन होते. तिच्या योगाने भौतिक, मानसिक तसेच आत्म्याशी संबंधीत क्षेत्रातील सर्व प्रकारची संपत्ती प्राप्त होवू शकते. आपल्या शरीरात असंख्य नाडयाचे जाळे पसलेले आहे. यातील कांही नाडया जुळल्या असता त्यांना "ग्रंथी" म्हणतात. जपयोगात श्रध्दा / निष्ठा असलेल्या साधकांच्या मंत्रोच्चाराने या ग्रंथी जागृत होवून त्यातील सूप्त शक्तींचा प्रादुर्भाव होतो.

**"ॐ"** या अक्षराचा उच्चार केला असता मस्तकातील भाग प्रभावित होतो.

**"भू:"** या अक्षराच्या उच्चाराने उजव्या डोळयावरील चार बोटांचा कपाळाचा भाग जागृत होतो.

**"भूव:"** च्या उच्चारणाने मानवाच्या भृकुटीच्या वरील तीन अंगुलीचा भाग प्रभावित होतो.

**"स्व:"** या अक्षराच्या उच्चाराने डाव्या डोळयावरील कपाळाचा चार अंगुली इतका भाग जागृत होतो.

**"तत्"** च्या उच्चाराने आज्ञा चक्रामध्ये असलेली 'तापिनी' ग्रंथीतील सूप्त असलेली 'साफल्य' शक्ति जागृत होते.

**"स"** च्या उच्चाराने डाव्या डोळयातील सफलता नांवाच्या

ग्रंथीमध्ये सुप्त रूपाने असलेली 'पराक्रम' शक्ति प्रभावित होते.

"**वि**" चे उच्चारण केले असता डाव्या डोळयामधील 'विश्व' ग्रंथीमध्ये स्थित असलेली 'पालन' शक्ति जागृत होते.

"**तु**" या अक्षराच्या उच्चारणाने डाव्या कानात असलेल्या 'तुष्टी' नांवाच्या ग्रंथीतील 'मंगळकर' शक्ति प्रभावित होते.

"**र्व**" या अक्षराच्या उच्चाराने उजव्या कानात स्थित असलेल्या 'वरदा' ग्रंथीतील 'योग' नावाची शक्ति सिध्द होते.

**'रे''** चा उच्चार केला असता नासिकेच्या मुळाशी स्थित असलेल्या 'रेवती' ग्रंथीतील 'प्रेम' शक्तिची जागृती होते.

**''णि''** च्या उच्चाराने वरील ओठावर असलेल्या 'सूक्ष्म' ग्रंथीतील सुप्त शक्ति 'धन' संध्य जागृत होते.

**''यं''** या अक्षराच्या उच्चाराने आपल्या खालच्या ओठावर असलेल्या 'ज्ञान' ग्रंथीतील 'तेज' शक्तीची सिध्दि होते.

**''भर''** या अक्षर समुदायाच्या उच्चारणाने कंठत असलेल्या 'भग' ग्रंथीतील 'रक्षणा' शक्ति जागृत होते.

**''गो''** चा उच्चार केला असता कंठकूपात स्थित असलेल्या 'गोमती' नावाच्या ग्रंथीतील 'बुध्दि' शक्तीची सिध्दि होते.

 

**"दे"** च्या उच्चाराने डाव्या छातीच्या वरच्या भागात असलेल्या 'देविका' ग्रंथीतील 'दमन' शक्ति प्रभावित होते.

**"व"** चा उच्चार उजव्या छातीच्या वरील भागात असलेल्या 'वराही' ग्रंथीतील 'निष्ठा' शक्तीची सिध्दि करतो.

**"स्य"** याच्या उच्चारणाने पोटाच्या वरील बाजूस (ज्या ठिकाणी बरगडया जुळतात) सिंहिणी नावाची ग्रंथी असते. या ग्रंथीतील 'धारणा' शक्ति प्रभावित होते.

**"धी"** च्या उच्चारणाने यकृतात असलेल्या 'ध्यान' ग्रंथीतील 'प्राणशक्ति' सिध्द होते.

**"म"** या अक्षराच्या उच्चाराने आपल्या प्लिहा मध्ये असलेल्या 'मर्यादा' ग्रंथीतील 'संयम' शक्तिची जागृती होते.

**"हि"** च्या उच्चाराने नाभीमधील 'स्फुट' ग्रंथीतील 'तपो' शक्ति सिध्द होते.

**"धी"** या अक्षराच्या उच्चारणाने पाठीच्या मागील करण्याच्या खालील भागात असलेल्या 'मेघा' ग्रंथीतील 'दूरदर्शिता' शक्तीची सिध्दि होते.

**"यो"** च्या उच्चारणाने डाव्या भूजेत स्थित असलेल्या 'योगमाया' ग्रंथीतील 'अंतर्निहित' शक्ति जागृत होते.

**"यो"** च्या उच्चारणाने उजव्या भुजेमध्ये स्थित असलेल्या 'योगिनी' ग्रंथीतील 'उत्पादन' शक्ति जागृत होते.

**"न:"** या अक्षराच्या उच्चारणांने उजव्या कोपरामध्ये असलेल्या 'धारीणी' ग्रंथीतील 'सरसता' शक्तीची सिध्दि होते.

**"प्र"** या अक्षराच्या उच्चारणाने डाव्या कोपरात असलेल्या 'प्रभव' ग्रंथीतील 'आदर्श' नावाच्या शक्तीची जागृती होते.

**"चो"** या अक्षराच्या उच्चारणाने उजव्या मनगटात स्थित असलेल्या 'उष्मा' ग्रंथीतील 'साहस' शक्तीची सिध्दि होते.

**"द"** या अक्षराच्या उच्चारणाने उजव्या तळहातावर असलेल्या 'दृश्य' नांवाच्या ग्रंथीतील 'विवेक' शक्तीची जागृती होते.

**"यात्"** या अक्षर द्वयांच्या उच्चारणाने डाव्या तळहातावरील 'निरंजन' ग्रंथीतील 'सेवा' शक्ति सिध्द होते.

अशा प्रकारे गायत्री मंत्रातील चोवीस अक्षरांचा, चोवीस ग्रंथी आणि त्याच्या चोवीस प्रकारच्या शक्ति यांच्याशी निकटचा संबंध आहे. नऊ ही संख्या न बदलणारी असून ब्रह्मतत्वाची सूचक आहे. आठ ही संख्या माया तत्वाला सूचित करणारी आहे.

## "दो चपाती देव लक्ष्मी" ह्या वाक्याचे विवरण

श्रीपाद प्रभू त्यांना आवडणाऱ्या घरातून दोन पोळया (चपात्या) स्वीकार करीत असत. ते "दो चपाती देव लक्ष्मी" असे म्हणण्या ऐवजी "दो चौपाती देव लक्ष्मी" असे म्हणत. "दो" म्हणजे दोन ही संख्या चौ म्हणजे चार. "पतिदेव" या शब्दात जगत्प्रभु असलेल्या परमेश्वराची नऊ ही संख्या सुचित होते. "लक्ष्मी" शब्द माया स्वरूप असलेल्या आठ या संख्येची सूचना देतो. म्हणून 2498 संख्या अद्भूत संख्या मानली जाते. तेच गायत्री स्वरूप आहे. परमात्म स्वरूप आहे. पराशक्ति सुध्दा तेच आहे हे सुचविण्यासाठी या संख्या श्रीपाद प्रभू या पध्दतीने जोडीत असत. तेंव्हा मी म्हणालो "महाराज ! मला गायत्री मंत्रातील चोवीस अक्षरांबद्दल तुम्ही सांगितलेले थोडेसे समजले. 9 (नऊ) ही संख्या

 

परमात्मस्वरूप म्हणता व 8 (आठ ) ही संख्या माया स्वरूपाची म्हणता हे मला तेवढेसे समजले नाही."

## नवम संख्या विवरण

आंनद शर्मा म्हणाले "अरे शंकर भट्टा ! परमात्मा या विश्वाचा अतित आहे. तो कोणत्याही परिवर्तनाने बाधित होत नाही. "नऊ"(9) ही संख्या विचित्र आहे. 9 ला एकाने भागल्यास नऊच येतात. 9 ला 2 ने गुणल्यास 18 येतात. 1 आणि 8 ची बेरीज 9 च येते. 9 ला 3 ने गुणल्यास 27 ही संख्या येते. 2 आणि 7 ची बेरीज 9 च येते. या प्रकारे कितीही संख्येने गुणले आणि येणाऱ्या संख्येचे आकडे एकत्र केल्यास 9 हीच संख्या येते त्यामुळे 9 ही संख्या ब्रह्मतत्व सूचविते."

 

# गायत्री मंत्राचे विवरण

गायत्री मंत्र हा कल्पतरूप्रमाणे आहे. यातील ॐ कार भूमीतून वर येणारा कोंब मानला जातो. भगवंत आहे याचे ज्ञान परमेश्वरावरील निष्ठा ॐ कारच्या उच्चारणाने येते. हा कोंब तीन शाखांमध्ये भू: भुव: स्व: याच्या रूपाने वाढतो. "भू:" आत्मज्ञान मिळऊन देण्यास समर्थ आहे. "भुव:" जीव शरीर धारण करतो तेंव्हा करायचा कर्मयोग सुचवितो. "स्व:" समस्त द्वंद्वाला स्थिरत्व देऊन समाधी स्थिती देण्यास समर्थ करतो. भू: या शाखेतून "तत् सवितु: वरेण्यम्" या उपशाखा उद्भवल्या. शरीरधारकाला जीवाचे ज्ञान करून देण्यास "तत्" उपयोगी आहे. शक्तीला समुपार्जन (मिळविणे) करण्यासाठी "सवितु:" याचे सहकार्य होते. "वरेण्यम्"

मानवाला जंतुस्थितीतून दिव्य स्थितीला जाण्यास सहकारी होतो.

"भुव:" या शाखेतून "भर्गो, देवस्य धीमही" या तीन उपशाखा उत्पन्न झाल्या आहेत. "भर्गो" निर्मलत्व वाढवितो. "देवस्य" देवतानाच केवळ साध्य असलेली दिव्यदृष्टी मिळवून देतो. "धीमही" ने सद्गुणांची वृद्धी होते. "स्व:" यातून "धियो" मुळे विवेक, "योन:" मुळे संयम, "प्रचोदयात्" मुळे समस्त जीवसृष्टीचा सेवाभाव वाढीस लागतो.

या करीता गायत्री कल्पवृक्षच्या तीन शाखा आहेत. प्रत्येक शाखेत तीन-तीन उपशाखा हे समजले ना ? म्हणून 2498 ही श्रीपादांचे सूचन करणारी संख्या आहे. यातील "9" नउ संख्येचे विवरण तुला सांगितले.

## "अष्टम" (8) संख्येचे विवरण

आठ ही संख्या मायास्वरूप आहे हे अनघा माता तत्व आहे. आठास एकाने गुणले असता 8 च येतात. 2 ने गुणल्यास 16 येतात. यातील एक व सहा मिसळल्यास सात (7) येतात. हे आठ पेक्षा कमी आहेत. 8 ला 3 ने गुणल्यास 24 हीसंख्या येते. यातील 2 आणि 4 ची बेरीजकेल्यास 6 येतात. हे सातापेक्षा कमी आहेत. या प्रमाणे सृष्टीतील समस्त जीवराशी मधील शक्ति हरण सामर्थ्य जगन्मातेत आहे. कोणी कितीही मोठा असला तरी त्याला लहान करून दाखविण्याची शक्ति मायेत आहे. श्रीपाद श्रीवल्लभ गायत्री माता स्वरूप आहेत, ते अनघा देवी समवेत श्रीदत्त आहेत. त्यांची

 

मनोवाकायकर्माने आराधना करण्याने सर्व इच्छा पूर्ण होतात.

गायत्री मातेमध्ये प्रात:काळी हंसारूढ असलेली ब्राह्मी शक्ति असते. मध्याह्नकाळात गरुडारूढ असलेली वैष्णवी शक्ति असते. सायंकाली वृषभारूढ असलेली शांभवी शक्ति असते. गायत्री मंत्राची अधिष्ठात्रि देवता सविता आहे. त्रेतायुगात श्री पीठिकापुरात भारद्वाज महर्षिंनी सावित्र काठक चयन केल्याचे फळस्वरूप श्रीपाद श्रीवल्लभांच्या अवतार झाला. सवितादेवता प्रात:काळी ऋग्वेद रूपात असते रात्री अथर्व वेदरूपात असते. आपल्या डोळयांना दिसणारा सूर्य केवळ एक प्रतिकरूप आहे. योगी जेंव्हा महाउन्नत स्थितीला पोचतात तेंव्हा त्रिकोणाकार असलेल्या महाजाज्वल्यमान प्रकाशमान ब्रह्मयोनीचे दर्शन घेऊ शकतात. यातूनच

कोटयान् कोटी ब्रह्मांड प्रतिक्षणाला उत्पन्न होतात. आणि प्रतिक्षणी संरक्षण होत असते, प्रतिक्षणाला विध्वंस होत असतो. असंख्य असणाऱ्या खगोलातील सृष्टी , स्थिती, लय घडविणाऱ्या शक्तीचे "सावित्री" हे नांव आहे. असे असले तरी गायत्री आणि सावित्री या अभिन्न आहेत. जीवाची अध्यात्मिक उन्नती गायत्री मातेच्या अनुग्रहाने होते. इह लोकातील सर्व सुखोपभोगांचा अनुभव घेण्यासाठी, परलोकातील विमुक्त स्थितीतील दिव्यानंदाचा अनुभव येण्यासाठी दोहीमधे समन्वय होणे आवश्यक आहे. श्रीपादांच्या चरणाश्रितांना इह-पर लोक दोन्हींचा लाभ होतो. इतर देवता व श्री दत्तात्रेयांच्या आराधनेतील फरक हाच आहे. मला आनंदशर्मा महोदयांनी दिलेला सल्ला किती अपूर्व होता. तेंव्हा मी (शंकरभट्ट) म्हणालो महाराज तुम्ही किती धन्य आहात. श्रीपाद प्रभू जेंव्हा नृसिंह सरस्वती अवतार धारण

करतील त्या वेळी आपण त्यांचे गुरु होऊन संन्यास दीक्षा प्रदान कराल त्या जन्मात आपण श्री कृष्ण सरस्वती या नावाने संन्यास धर्माचे आचरण करीत असणार. यावर आनंदशर्मा म्हणाले, "भगवंताचा अवतारच भक्तासाठी असतो. ते मानवरूप धारण करून पृथ्वीवर येऊन आपल्या आदर्श आचार संपन्न जीवनाने सर्व मानवांना शिकवण देतात. ते स्वत: सर्वज्ञ असले तरी सुध्दा गुरुंचा स्वीकार करून समाजाला गुरुच्या आवश्यकतेचे महत्व आपल्या कृतीने समजाऊन देतात. अवतारी पुरुषाचे गुरु होण्याची क्षमता एखाद्यालाच लाभते. अवतारी पुरुष जन्माला यायचे म्हणजे त्या वंशात पूर्वीच्या ऐंशी पीढयांनी पुण्य संचय केलेला असतो. तसेच अवतारी पुरुषाचे गुरु होणाऱ्या व्यक्तीचा वंश परम पवित्र पुण्यवान असावा लागतो."

 

बापनाचार्युलु आणि मायणाचर्य यांच्या वंशाचे अनेक पिढयांपासून संबंध होते. मल्लादीच्या घरी मुलगी झाली तर वाजपेय याजुलुच्या घरची सून होणार आणि वाजपेय याजुलुच्या घरी मुलगी झाल्यास मल्लादींची सून होणार असे ते गंमतीने म्हणत असत. बापनार्याची मुलगी सकल सौभाग्यवती सुमती वाजपेय याजुलुच्या घरी दिली नाही. तिचा विवाह विधिलिखित अगोचर असलेल्या दिव्य "घंडिकोटा अप्पळराजु शर्मा" यांच्या बरोबर झाला.

साक्षात् दत्तावतार श्रीपाद श्री वल्लभांनी त्यांच्या मातेचा रक्त संबंध असलेल्या वाजपेय याजुलुचा सुध्दा उध्दार केला. माधवाचार्यांना श्रीपाद प्रभूंबद्दल अति वात्सल्य भाव होता. हेच पुढे विद्यारण्य महर्षि झाले. त्यांचे शिष्य मलयानंद, त्यांचे शिष्य देवतीर्थ, त्यांचे शिष्य यादवेंद्र

 

सरस्वती आणि यादवेंद्र सरस्वतींचे शिष्य श्री कृष्णसरस्वती. विद्यारण्य महर्षि आणि कृष्ण सरस्वती यांच्या मध्ये गुरु शिष्यांच्या तीन पिढया होतील. श्री विद्यारण्य हेच कृष्णसरस्वतीच्या रूपाने अवतरीत होतील आणि ते श्रीपादांच्या नंतरच्या अवतारातील गुरुपद शोभविणार आहेत.

श्रीपाद नित्य सत्य वचन बोलत. त्यानी उच्चारलेले प्रत्येक वाक्य सत्य होत असे. एकदा सुमती महाराणी श्रीपादांना स्नान घालीत होती. तेवढयात वेंकटप्पय्या श्रेष्टी तेथे आले. त्याना पाहून श्रीपाद म्हणाले "आपले गोत्र माडेय का ?" हे ऐकून उत्तर न देता श्रीपादांचे गोड बोलणे ऐकून हसले. वास्तविक पहाता श्रीपादांचे गोत्र भारद्वाज होते. श्रीपादांना वाटले वेंकटप्पय्या श्रेष्ठी सुध्दा आपले गोत्रज आहेत. स्नानानंतर सुमती देवीनी

गुंडीतील पाणी ओवाळून टाकले आणि "माडेया सारखा आयुष्यमान हो" असा आशिर्वाद दिला. माडेयाला सोळा वर्षाचे आयुष्य होते. पुढे शिवांच्या आशीर्वादाने तो चिरंजीव झाला. श्रीपाद प्रभू सोळा वर्षेपर्यंतच आईवडिलाजवळ राहणार, हे वर्म गर्भित पणे सुचविले होते. सोळा वर्षानंतर माडेयांनी गृहत्याग केला होता व ते चिरंजीव झाले. श्रीपाद प्रभु सुध्दा सोळा वर्षे आईवडिलांकडे राहिले नंतर जगद्गुरु झाले. नंतर यथाकाली गुप्त झाले. त्यांच्या शरीराला चिरंजीवित्व लाभले. आपण ज्या स्वरूपात श्रीपादांना पहातो त्याच स्वरूपात अत्रि-अनसूयेच्या कुमाराच्या रूपात ते अवतरले होते. असे त्यांनी आपल्या वक्तव्यात अनेक वेळा सांगितले होते.

## श्रीपादांची विविध रूपे

श्रीपाद प्रभू त्यांच्या योगशक्तिला बर्हिमुख करून स्त्रीरूपात दर्शन देत असत. तसेच त्यांच्या योगशक्तीचे दर्शन सुध्दा आपल्या साधकाना देत असत. हे किती अपूर्व होते. कुंडलिनी शक्ति अशी बहिर्मुख केवळ दत्तात्रय भगवानच करू शकत. सोळा वर्षाच्या वयाचे असतानाचे नवयोवन दंपतिरूप श्रीपाद प्रभूंनी, त्यांच्या माता-पिता, नरसिंह वर्मा पती-पत्नी, बापनार्युलु-राजमाम्बा, वेंकटप्पय्या श्रेष्ठी दांपत्य या सर्वांना आपल्या अद्भूत लीलाशक्तीचे स्वरूप दाखविले. श्रीपादांच्या सोळाव्या वर्षी त्यांचा विवाह करावा अशी त्यांच्या माता पित्यांची फार इच्छा होती. परंतु त्यांची निराशाच झाली. श्रीपादांनी सुमती मातेस अवधूत रूपात दर्शन दिले होते तेंव्हा सांगितले होते "माते ! तुझा मुलगा सोळा वर्षाचा होई पर्यंत तुझ्याजवळ राहील.

त्याच्या विवाहाचा संकल्प केला तर तो ऐकणार नाही. गृहत्याग करून निघून जाईल. त्यासाठी त्याच्या मना प्रमाणे वागावे. श्री अनघा-दत्त हे आदिदांपत्य आहेत त्यांना जन्म-मरण नाही. ते सर्वदा लीलाविहार करतात. ते श्रीपाद वल्लभांच्या रूपात, नृसिंह सरस्वतींच्या रूपात, स्वामी समर्थांच्या रूपात अर्धनारीश्वर होऊन राहतील."

## मंडलकाल अर्चना आणि श्रीपाद श्रीवल्लभ चरितामृताचे पारायण केल्याने मिळणारे फळ

श्रीपादांचा गणेश चतुर्थीस अवतार झाला हे विशेष आहे. "लाभ" हा गणेशाचा पुत्र एका युगात लाभाद महर्षि या नावाने नावाजला होता. तोच श्रीकृष्ण अवतारात नंद या रूपात जन्मास आला. श्री वासवी माता या भूमीवर

भास्कराचार्य या नांवाने अवतरल्या. "लाभ" श्रीपाद श्रीवल्लभांच्या अवतार कालात त्यांचे आजोबांच्या स्वरूपात जन्मास आले होते. आपल्या तत्वामध्ये विघ्नविनाशक तत्व स्थिर करून श्रीपाद प्रभु अवतरले. ते अवतरले तेंव्हा चित्रा नक्षत्र होते. त्या नक्षत्रा पासून सत्ताविसावे नक्षत्र (हस्त नक्षत्र) असताना कुरवपुरात अदृश्य झाले. जन्मपत्रिके प्रकारे 27 नक्षत्रात भ्रमण करणाऱ्या नवग्रहा पासून मिळणारे अनिष्ट फल निघून जाण्यासाठी श्रीपादांचे भक्त मंडल दीक्षा घेतात. एका मंडलामध्ये श्रध्दा भक्तीने श्रीपादांचे अर्चन केल्यास किंवा त्यांच्या दिव्य चरित्राचे पारायण केल्यास सर्व कामनांची सिध्दि होते. मन, बुध्दी, चित्त आणि अहंकार हे एका एका दिशेने आपली स्पंदने आणि प्रकंपने सोडीत असतात. त्यांचे प्रकंपन वेगवेगळया चाळीस दिशांमध्ये प्रसरण पावतात. या चाळीस दिशामधून होणारे प्रकंपन

थांबवून श्रीपाद प्रभूंकडे वळविले तर ते श्रीपादांच्या चैतन्यात विलिन होतात. तेथे ते आवश्यक बदल घडवून स्पंदनामध्ये रूपांतरीत होऊन साधकाकडे पुन्हा येतात. यानंतर साधकाच्या धर्मानुकूल सर्व इच्छा पूर्ण होतात. "अरे शंकरभट्टा ! तू श्रीपाद प्रभूंचे चरित्र लेखन करशील, असे अंत:दृष्टीने कळले आहे. लोकांमध्ये व्यवहारात असलेल्या पारायण ग्रंथात लेखकांची वंशावळी, केवळ मनांत नसताना रचली गेलेली स्तोत्रे वगैरे असतात. तू लिहिलेल्या प्रभूचरित्रामध्ये तुझ्या वंशावळीची आवश्यकता नाही. प्रभूंचे ध्यान करून तुझ्या अंतर्नेत्रामध्ये श्रीपादांना समोर आणून सर्वांना सुलभतेने समजेल अशा रीतीने रचना करशील तेंव्हा श्रीपादांचे चैतन्य तुझ्या लेखणी द्वारे जे विवरण करेल तेच सत्य होईल. या प्रकारे स्फूर्तीने लिहिलेला ग्रंथ किंवा उच्चारलेले मंत्र छंदोबध्द असण्याची आवश्यकता नाही.

 

कांही महाभक्तांना दैवी साक्षात्कार होऊन त्यांच्या त्यांच्या स्थानिक भाषेत स्तोत्र प्रार्थना स्फुरतील. त्या छंदोबध्द व्याकरण दृष्टया अगदी बरोबर असण्याची गरज नाही. भक्त जी पदे म्हणतील त्या पदामध्ये परमेश्वराने संतुष्ट होऊन वर दिलेला असल्याने त्यामध्ये परमेश्वराची अनुग्रह शक्ति असते. त्या पदांमध्ये असलेल्या स्तोत्रांचे आपण पठण केल्यास आपले चैतन्य तत्काळ भगवद् चैतन्याशी सामिप्य पावते. परमेश्वर भावप्रिय आहे. भाष्यप्रिय नाही. भावना म्हणजे शाश्वत शक्ति . श्रीपाद प्रभूंचे मल्लादी, वेंकटप्पय्या श्रेष्ठी आणि वत्सवाई या तीन कुटुंबांशी अत्यंत सख्य होते. एका सणाच्या निमित्ताने वेंकटप्पा श्रेष्ठीनी अप्पळराजू दांपत्यास त्यांच्या घरी आमंत्रित केले होते. त्या दिवशी श्रेष्ठी बरेच गंभीर दिसत होते. त्याला तसेच कारण होते. पीठीकापुरममधील एका

सुप्रसिध्द ज्योतिषाने श्रेष्ठीच्या मृत्यूची वेळ, दिवस, वार, तिथी सर्व सांगितले होते. त्यांचे ज्योतिष आतापर्यंत कधी खोटे ठरले नव्हते हेच कारण श्रेष्ठींच्या गंभीरपणाचे होते. त्या ज्योतिष्याने अशी प्रतिज्ञा केली होती की त्यांची भविष्यवाणी खोटी झाल्यास तो मुंडन करून गाढवावर बसून गांवभर फिरेल. अपमृत्यूटाळण्यासाठी अप्पळराजू शर्मा यांनी कालाग्नी शमनाची पूजा करून त्याचा प्रसाद श्रेष्ठींना आणून दिला. थोडयाच वेळात सुमती महाराणी भरजरी वस्त्रे परिधान करून श्रीपादास घेऊन श्रेष्ठींकडे आली. तेवढयात श्रेष्ठीच्या हृदयात असह्य वेदना होऊ लागल्याने ते मोठ्याने "आई" असे ओरडू लागले. सुमती त्यांच्याकडे धावतच गेली. त्या दिव्य मंगल स्वरूपातल्या साध्वीने आपल्या दिव्य श्रीहस्ताने श्रेष्ठीच्या हृदयावर स्पर्श केला त्याच वेळी श्रीपाद "जा" असे जोरात

ओरडले. श्रेष्ठींच्या घरात एक बैल होता त्याने तडफडून काही क्षणातच आपले प्राण सोडले आणि श्रेष्ठी वाचले. ही बातमी कळताच तो ज्यातिषी धावतच श्रेष्ठींच्या घरी आला. आपली भविष्यवाणी चुकल्याची त्याला खंत वाटली.

श्रीपाद त्या ज्योतिष्याला म्हणाले."तू ज्योतिषाचा खूप अभ्यास केला आहेस.परंतु सर्व ज्योतींची ज्योती मी असताना श्रेष्ठींना मृत्यूभय कसले. तू शिरोमुंडन करून गाढवावरून फिरायची गरज नाही. तुला पश्चाताप झाला हेच पुरे. तुझे वडिल जिवंत असताना त्यांनी श्रेष्ठींकडून कर्ज घेतले होते. ते परत न करता खोटेच गायत्रीची शपथ घेऊन सांगितले की त्यांनी ते परत केले. या पापामुळे त्यांना श्रेष्ठींच्या घरी बैलाचा जन्म घ्यावा लागला. हीन योनीत असलेल्या तुझ्या वडिलांना उत्तम

जन्माचा प्रसाद दिला. श्रेष्ठींच्या अपमृत्यूचे कर्मफल बैलाकडे वळविले. तू या बैलाचा दाह संस्कार करून अन्नदान कर. तुझ्या वडिलाचे वाइट कर्मफल नष्ट होऊन उत्तम गती प्राप्त होईल. श्रीपादांच्या सांगण्यानुसार त्या ज्योतिषाने केले.

पाद प्रभू अनेक प्रकारे प्राण रक्षण करू शकतात. श्रीपाद योगसंपन्न अवतार आहेत. त्यांना काहीच असाध्य नाही. उच्छवास, निश्वासाच्या गतीचे विच्छेदन केल्याने मुक्ति प्राप्त करून घेणे सोपे आहे. क्रियायोगी ज्यांची प्राणशक्ति , आज्ञा, विशुध्द अनाहत, मणीपूर, स्वाधिष्ठान मुलाधार चक्रात फिरऊन वरून खाली, खालून वर परिभ्रमण करतात. एका क्रियेला लागणारा वेळ एका वर्षामध्ये साधारण होणाऱ्या अध्यात्मिक विकासा एवढा असतो. रात्र दिवसाच्या एक तृतीयांश

वेळात एक हजार क्रिया झाल्या तर केवळ तीन वर्षात सहजतेने प्रकृती द्‌वारा दहा लाख वर्षात होणारा परिणाम दिसून येतो.

आनंद शर्माच्या चांगल्या गोष्टी ऐकून मला खूप माहिती मिळाली. सकाळचे अह्निक आटोपून श्री आनंद शर्मांचा निरोप घेऊन श्रीपाद श्रीवल्लभांच्या दर्शनासाठी कुरवपूर कडे निघालो.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -14

## दत्तदासांना अभय प्रदान

मी (शंकरभट्ट) थोडे दिवस प्रवास करून "मुंताकल्लु" या गावी पोचलो. वाटसरूना विचारले तेंव्हां कळले की अजून थोडया दिवसातच कुरवपूरला पोहोचेन. श्रीपाद प्रभूंच्या सगुणस्वरूपाच्या दर्शनाची मला ओढ लागली होती. ज्या मार्गावरून मी जात होतो त्याच मार्गावरून एक व्यक्ति हातात ताडीचे पात्र घेऊन येत होता. मला त्या ताडीचा वास असह्य होत होता. तो टाळण्यासाठी मी श्रीपाद प्रभूंचे स्मरण करीत वेगाने पुढे चाललो होतो. ती व्यक्ति

सुध्दा आपला वेग वाढवून माझ्याजवळ येऊन पोहोचली. त्याने विचारले "मी तुझ्याकडे येत असताना तू असे दूर जाणे योग्य आहे का ?"

मी तेवढयात म्हणालो "ए, तू कोण आहेस तुझे माझ्याशी काय काम आहे." यावर तो जोरात हसला. त्याच्या ताडीचा उग्र वास आला. मी कोण आहे ते जाणून घेण्या अगोदर तू कोण आहेस ? कोठून आलास ? कोणीकडे चाललास हे जाणून घेणे योग्य आहे. ताडी विकणारे सुध्दा वेदांतावर बोलण्या एवढे समर्थ आहेत वाटतं. त्याने रस्त्यावरून येणाऱ्या लोकांना हाका मारून बोलावून घेतले. तेथे लोकांचा जमाव झाला. त्यांना तो ताडीवाला गृहस्थ म्हणाला "मित्रानो, मी या प्रांतात ताडी विकणारा आहे. मी धर्माने जगतो. ताडीचे झाडच मला कल्पवृक्ष आहे. मी झाडावर चढून ताडी आणी पर्यंत

हा ब्राह्मण माझी वाट पहात उभा होता. मी ब्राह्मण असून सुध्दा ताडी पिण्याची मला सवय आहे. परंतु माझ्याकडे तुला देण्यास पैसे नाहीत. थोडी ताडी देऊन पुण्य प्राप्त कर असे तो म्हणाला. मी नाही म्हणालो. परंतु जेंव्हा मी तयार झालो तेंव्हा लोकांची ये, जा सुरु झाली. चार लोकांसमोर ताडी पिल्याने ब्राह्मणत्वाला दोष लागेल असे वाटून तो नाही म्हणतो आहे. आता माझा वचनभंग होऊन मी महापापी होणार, खरे पाहता, आमच्या कुलात ही खूप मोठी संधी आहे. अमूल्य अशी ताडी ब्राह्मणास पिण्यास देण्याने विशेष पुण्य लाभेल या माझ्या आशेवर याने पाणी फेरले. हे पूज्य लोकहो, तुम्ही या ब्राह्मणाला धर्मोपदेश करा आणि पापा पासून माझे या रक्षण करा. तेथे जमलेले सारे लोक ताडी विकणारे गौड लोकच होते. त्यांनी त्या ताडी वाल्यास दुजोरा दिला आणि त्या ताडी वाल्याने मला ताडी

बळजबरीने पाजविली. त्यानंतर सगळे लोक निघून गेले. मी अत्यंत दु:खी झालो. उत्तम ब्राह्मण कुलात जन्मून नीच अशी ताडी प्यालो. माझे ब्राह्मणत्व नष्ट झाले. परम पवित्र अशा श्रीपादाचे मुख कमल आता कसे पाहू ? जळलं माझं कर्म, नशीब माझे. माझ्या कपाळी विधिलेखच असा होता तेंव्हा वेगळे कसे होणार ?

माझे पाय लडखडु लागले. तोंडाला असह्य वास येत होता. माझ्या नशीबाला दोष देत, श्रीपादांचे नाव घेत चालू लागलो. मार्गात एक तपोभूमी दिसली. तेथे कोणी महात्मा राहात होते. त्या पवित्र भूमीत पाऊल टाकण्यास मला लाज वाटत होती. मी माझ्या रस्त्याने चाललो होतो. तितक्यात माझ्या पाठीमागून आवाज आला, "अरे शंकरभट्टा ! थांब, तुला आश्रमात घेऊन येण्याची दत्तानंद स्वामींची आज्ञा आहे." मी दैवाची लीला पाहून

 

चकित झालो. मला श्री दत्तानंद स्वामींच्या पुढे आणून उभे केले. करूणाभरित नेत्रांनी माझ्याकडे पाहून लवकर स्नान करून येण्यास त्यांनी सांगितले. स्नानानंतर मला मधुर फळे खाण्यास दिली. श्री स्वामींनी मला जवळ बोलावून म्हटले, "अरे शंकरभट्टा ! दत्तात्रेयांच्या नवव्या अवतारातील श्रीपाद श्रीवल्लभांची तुझ्यावर केवढी करूणा दृष्टी आहे. त्यांनी तुला आपल्या अमृत हस्तानी अमृत पाजवले. त्यांना तू गौड कुलातील ताडी विकणारा समजलास. त्यांनी दिलेल्या अमृताला भ्रमाने ताडी समजलास, किती ही भ्रामकता !"

मी पाहिलेले सर्व प्रसंग माझ्या नजरे समोर एक एक येऊ लागले. त्यानंतर अनंत चैतन्य शक्ति महासागरातील असंख्य लाटा माझ्यावर येऊन आदळत असल्याचा अनुभव येऊ लागला. अनंत अशा त्या सत्ता

 

शक्तिमध्ये अत्यंत हीन अत्यल्प असणारा माझा अहंकार नष्ट झाला. "मी" म्हणजे काय हे समजत नव्हते आणि समजणारे नव्हते. एका दिव्य आनंदामध्ये मी बुडून गेलो होतो. माझ्यामध्ये परिमित असणारा "मी" नष्ट होऊन समस्त सृष्टी स्वप्नच असल्या प्रमाणे वाटत होती.

तेवढयात स्वामींनी माझ्यावर मंगल जल प्रोक्षण केले. त्यांच्या दिव्य हस्ताने पवित्र भस्माचे माझ्या कपाळावर लेपन केले. मी प्रकृतीच्या आधिन झालो. काही क्षण मी दिव्यानंदाचा अनुभव घेत होतो. प्रकृतिस्थ असणारा मी लगेच स्थुलतत्वात फसत जात असल्याचे लक्षात आले.

श्री स्वामी म्हणाले, "पूर्वीच्या एका जन्मात तू गौड कुळात होतास. जास्त प्रमाणात ताडीचे सेवन करीत होतास. तुझी ताडी पिण्याची इच्छा बाकी होती. श्रीपाद

प्रभूंचा अनुग्रह नसता तर तुला ती वाइट सवय लागली असती व तू पतित झाला असतास. तुझ्या पत्रिकेत अनेक गंडातरे आहेत परंतु श्रीपाद प्रभूंच्या अमृत्यू दृष्टीने त्यांचा तुझ्या न कळत परिहार होतो. श्री गुरुंच्या महिमेचे कोण वर्णन करू शकतो ? वेद सुध्दा नेति, नेति म्हणत मौन झाले."

यावर मी म्हणालो "श्रीपाद प्रभू सारखे म्हणतात की ते नृसिंह सरस्वती रूपाने अवतार घेणार आहेत. त्यांच्या लीलांमधील गर्भित अर्थ जाणून घेण्याची माझी इच्छा आहे. हे ऐकून स्वामी म्हणाले "वेदऋषींचे तत्त्ववेत्तेपणाचे ते प्रमुख लक्षण आहे. अध्यात्म्यातील दडलेली सत्यवचने त्यांच्या सहज सोप्या शब्दांमध्ये संतानी सांगितली आहेत हेच आत्मसत्य. वस्तुतः कर्मकांडाला अनुसरून व्याख्या करताना आत्मसत्यालाच

 

सत्य, यज्ञ, जल, अन्न असे वेगवेगळे संबोधन केले आहे. अशा प्रकारांनीच सरस्वती शब्दाचे सुध्दा फार वैशिष्टय आहे. सरस्वती नदी अंतर्वाहिनी आहे. हिचे वर्णन करताना सत्यवाक्यांचा बोध करणारी, महार्णवाची माहिती समजाऊन देऊन आपल्याच चित्ताला प्रकाशित करणारी असल्याचे सांगितले आहे. श्री गुरु म्हणजे एकच एक प्रबोध शक्ति , प्रबोधिनी प्रवाह. त्यांची सत्यवाणी आपल्या चित्ताला प्रकाशित करते तसेच परमसत्य आणि अंतर्ज्ञान आपल्यात स्थिर करते. वेदातील "यज्ञ" हे अंत:प्रवृत्तीचे बाह्य प्रतीक आहे. यज्ञ द्वारा मानव त्याचे जे स्वत:चे असते ते देवाला अर्पण करतो. त्याला प्रत्युपकारा प्रीत्यर्थ देवता गोधन, अश्व देतात. गोधन म्हणजे तेज संपदा, अश्व म्हणजे शक्ति संपदा, या प्रमाणे देव आपणास तप शक्ति (प्रसाद) देतात. वेदातील

 

ज्ञान योग्य असणाऱ्यांनाच समजावे म्हणून अत्यंत गुप्त ठेवले आहे."

## औदुंबर वृक्षाला दिलेले वरदान, नृसिंह सरस्वतींच्या अवताराचे वैशिष्टय

श्रीमहाविष्णु हिरण्यकश्यपूचा संहार करण्यास औदुंबर वृक्षाच्या लाकडी खांबातून नरसिंहांच्या रूपात प्रकट झाले. त्यांनी प्रह्लादाचे रक्षण केले आणि हिरण्यकश्यपूच्या वधानंतर त्याला राज्यावर बसविले. कांही कालानंतर दुभंगलेल्या त्या खांबाला पालवी फुटू लागली आणि पुढे त्याचेच औदुंबराच्या वृक्षात रूपांतर झाले. प्रह्लाद विस्मित होऊन त्या औदुंबराच्या वृक्षाची पूजा करू लागला. प्रहलादाला एकदा औदुंबराच्या झाडाखाली ध्यानस्थ अवस्थेत बसलेल्या दत्तात्रेयानी

 

दर्शन दिले होते व ज्ञान बोध केला. प्रह्लादास द्वैतसिध्दांता विषयी आसक्ती असल्याचे जाणून घेऊन, श्री दत्त प्रभूंनी कलियुगात यतीवेश धारण करून दीन जनांचा उध्दार करशील असा आशिर्वाद दिला होता. परम पवित्र अशा औदुंबर वृक्षाने मनुष्याकृती धारण करून श्रीदत्तांच्या चरण कमलावर पडून मला सुध्दा वर द्या अशी प्रार्थना केली तेंव्हा श्रीदत्तात्रेय म्हणाले "प्रत्येक औदुंबर वृक्षाच्या मुळाशी मी सूक्ष्म रूपात राहीन. तुझ्या मधून नरसिंह देव प्रकट झाल्यामुळे कलियुगात मी नृसिंह सरस्वती नांव धारण करून अवतार धारण करीन. असे माझे वचन आहे."

स्वामींचे वक्तव्य ऐकून मी म्हटले "महाराज श्रीपीठिकापुरम येथे श्रीपाद प्रभूंचे दर्शन घेण्यासाठी

 

आणि त्याच्या बाललीला ऐकण्यासाठी मन सदैव लालचावलेले असते."

## श्रीपादांच्या अद्भूत लीला

स्वामी म्हणाले, "लहानपणी मला स्पष्ट बोलता येत नसे. शब्द तोतरे येत. त्यामुळे सगळी मुले माझी थट्टा करीत. मला एक अनामिक आजार झाला. पांच वर्षापासून तो वाढू लागला. एक वर्ष लोटल्यावर दहा वर्षे उलटल्या सारखे झाले. मी दहा वर्षाचा झालो तेंव्हा पन्नास वर्षाची लक्षणे दिसू लागली. त्यावेळी बापनार्युलु पीठीकापुरम येथे यज्ञ करीत होते. माझ्या वडिलांनी यज्ञासाठी मला नेले होते. त्या वेळी त्यांचे वय सहा वर्षापेक्षा जास्त नव्हते. यज्ञासाठी लागणारे तूप जमा करून ठेवले होते. ते एका वयस्क ब्राह्मणाच्या स्वाधीन

 

केले होते. तुपातील एक त्रितीयांश (1/3) भाग तो ब्राह्मण घरी लपऊन ठेऊन उरलेला दोन त्रितीयांश (2/3) भाग यज्ञासाठी आणीत असे. यज्ञाला प्रारंभ झाला परंतु तूप थोडया वेळातच संपत आले त्या वेळी तूप तयार करणे कठीण होते.

हा चिंतेचाच विषय होता. श्री बापनार्युलुनी श्रीपादांकडे हेतुपुरस्सर पाहिले. तेंव्हा श्रीपाद म्हणाले, "कांही चोर माझे धन अपहरण करण्याची योजना करीत आहेत. परंतु मी त्यांचे प्रयत्न सफल होऊ देणार नाही. योग्य वेळीच त्यांना शिक्षा देईन. त्याच्या घरी पत्नी बरोबर शनिदेवाने रहावे अशी आज्ञा करतो आहे." एवेढे बोलणे झाल्यावर श्रीपादांनी त्या वृद्ध ब्राह्मणाला बोलावून ताडपत्रीवर असे लिहून दिले "आई, गंगामाते ! यज्ञाच्या निर्वाहणासाठी लागणारे धृत द्यावे. तुझी बाकी माझे

 

आजोबा वेंकटप्पय्या श्रेष्ठी देऊन टाकतील ही श्रीपाद वल्लभांची आज्ञा" हे पत्र त्यानी श्रेष्ठीना दाखविले. त्यांनी ते मान्य केले. त्या वृद्ध ब्राह्मणाबरोबर चौघे ब्राह्मण पादगया तीर्थावर गेले. ते पत्र तीर्थराजाला समर्पित केले आणि त्यांनी नेलेल्या पात्रात तीर्थाचे जल भरून घेतले. वेदमंत्र म्हणत ते जल यज्ञस्थळी आणले. ते जल आणत असतांनाच सर्वांच्या समोर त्याचे शुध्द तूप झाले. त्या घृतच्या आहुतीनी यज्ञाची सांगता झाली. सर्वजण आनंदित झाले. वचनाप्रमाणे श्रेष्ठीनी त्या पात्रात तूप भरून गया तीर्थास समर्पित केले. घृत ओतताना त्याचे पाणी झाले होते.

माझ्या वडिलांनी माझी दु:स्थिती श्रीपादांना सांगितली. ते म्हणाले "थोडावेळ थांबा. रोगाचे निवारण होईल. तोतरेपणा काढून टाकीन. एक घर जळणार आहे. त्याचा

मुहुर्त ठरवायचा आहे. प्रभूंची विधाने अनाकलनीय होती. तेवढयात तो वृद्ध ब्राह्मण आला. तूप चोरल्यामुळे कांही हानी झाली का ते पहाण्यास आला. काही झाले तरी श्रीपादांच्या दर्शनाने चांगलेच घडेल असा त्याला दृढ विश्वास होता. श्रीपाद प्रभू त्यास म्हणाले, "आजोबा ! तुम्ही मुहूर्त शास्त्रात पारंगत आहात. एका घराला परशुराम प्रीती (नष्ट) करायची आहे त्यासाठी योग्य मुहूर्त काढायचा आहे" तेंव्हा तो वृद्ध ब्राह्मण म्हणाला गृहनिर्माणसाठी , भूमीपूजनासाठी मुहूर्त असतात परंतु गृहदाहाला मुहूर्त नसतात श्रीपाद म्हणाले "चोरी करायला, गृह दाहाला मुहूर्त कसे नसतात ?" तो वृद्ध ब्राह्मण म्हणाला तसे मुहूर्त असल्याचे मी ऐकले नाही. श्रीपाद म्हणाले "आजोबा ! किती शुभवार्ता सांगितलीत परम पवित्र अशा यज्ञासाठी जमविलेले तूप एका धूर्ताने चोरून नेले. अग्निदेवाला भूक आवरली नाही. धर्मानुसार

त्याना मिळावयाला हवे असलेले तूप न मिळाल्यामुळे ते घर जाळून आपली भूक भागवीत आहेत. अग्निदेवता आनंदाने उडया मारीत आहेत."

श्रीपाद प्रभूंचे बोलणे ऐकल्यावर त्या वृद्ध ब्राह्मणाच्या चेहरा पडला. श्रीपाद म्हणाले "तुझे घर भस्मसात झाले त्याचे थोडे भस्म घेऊन ये." श्रीपाद प्रभू अनुग्रह करून वरदान देतात तसेच संतापाने नष्ट करतात हे ब्राह्मणास माहित होते. तो काही एक शब्द न बोलता भस्म झालेल्या घराचे भस्म घेऊन आला. ते भस्म पाण्यात टाकून ते पाणी पिण्याची प्रभूनी मला आज्ञा केली आणि तीन दिवस पर्यंत असे करण्यास सांगितले. आम्ही श्री बापनार्युलुच्या घरी तीन दिवस राहिलो. आणि ते भस्मयुक्त पाणी पिले. माझा तोतरेपणा पूर्णपणे नाहिसा झाला आणि मी स्वस्थ झालो. श्रीपाद प्रभूंनी आपला

दिव्य हस्त माझ्या मस्तकावर ठेऊन शक्तिपात करून मला ज्ञानदान करून धन्य केले. त्यानंतर ते म्हणले "आजपासून तू दत्तानंद या नावाने प्रसिध्द होशील. गृहस्थाश्रम स्विकारून लोकांना तारशील. धर्मबोध करशील. तू आणि हा वृद्ध ब्राह्मण मिळून गेल्या जन्मी व्यापार करीत होता. व्यापारात वैषम्य आल्याने एकमेकांचा नाश करण्याचा दोघे प्रयत्न करीत होता. एके दिवशी या वृद्ध ब्राह्मणाला घरी बोलाऊन प्रेमाने खीर खाऊ घातलीस. त्या खिरीत विष कालवलेले त्या ब्राह्मणास माहित नसल्याने त्याने ती खीर पूर्ण खाल्ली आणि कांही वेळाने तो मरण पावला. तुला माहित नसताना या वृद्ध ब्राह्मणाने तुझे घर कांही लोकां करवी जाळले आणि ते जळून भस्म झाले. तुझी पत्नी त्या आगीत जळून मेली. घरी आल्यावर सर्वनाश झालेला पाहून त्या धक्क्याने हृदय बंद पडून तू मरण पावलास.

पूर्वजन्मात विष प्रयोग केल्यामुळे या जन्मी अशा विचित्र व्याधीस बळी पडलास. तुझे घर पुर्वजन्मी याने जाळले असल्याने त्याचे घर या जन्मी जळून खाक झाले. या लीलेने मी तुम्हा दोघांना तुमच्या कर्मबंधनापासून मुक्त केले" श्रीपाद प्रभूंचा अनुग्रह प्राप्त करून मी माझ्या घरी परतलो. त्यांच्या कृपेने वेदशास्त्र सम्पन्न पंडित झालो. त्या वृद्ध ब्राह्मणास नरसिंह वर्मानी नविन घर बांधून दिले. श्रीपादांच्या कृपाप्रसादाने दोघांचा कर्म बंधनाचा विच्छेद होऊन दोघांचे भले झाले. श्रीपाद प्रभूंच्या लीला अत्यंत दिव्य व अगाध आहेत.

दत्तानंद पुढे म्हणाले, "अरे शंकर भट्टा ! सर्व देवता तेजातून निर्माण झाल्या आहेत. अदिती माता हीच सर्व देवांची माता आहे. देवताच मानवाच्या प्रवृत्तीला,

विकासाला कारक आहेत. देवता मानवाला तेज देतात मानवाच्या आत्म्यावर दिव्य चैतन्य संपदेचा वर्षाव करतात. त्या सत्यपोषक असतात. तेच सत्य लोकाचे निर्माते आहेत. मानवाच्या संपूर्ण मोक्षाला, अव्याज आनंदाला कारणीभूत होतात.

## **ब्राह्मण-भूलोकीच्या देवता**

सर्व देवता मंत्र स्वरूप आहेत. हे विश्व देवाधीन आहे. अशा प्रकारे देवता मंत्राधीन आहेत. ते मंत्र सद्ब्राह्मणांच्या आधीन आहेत. म्हणून ब्राह्मण भूमीवर देवतासमान आहेत.

शब्द हा साधारण पणे पंचेद्रियांनी ग्रहण करता येतो. शब्द प्रकाश, गमन, स्पर्श, शितोष्ण, विस्मृति, बल प्रयोग, वेग, गमन वगैरे अत्यंत थोडया प्रमाणात असलेले प्राथमीक भाव निवेदन करण्यासाठी मानवाच्या उपयोगात येतात. भाषेची प्रगती होत असतांना क्रमाने भाषेमध्ये भावाची विविधता, निश्चितता वाढीस लागते. यासाठी अस्पष्टतेतून निश्चित असे निश्चलतत्व भौतिक अंशामधून, मानसिक अंशामध्ये, व्यक्तातून अव्यक्त भावना अशा पध्दतीने भाषेची वृद्धी होऊन वाढू लागते.

## पवित्र ग्रंथ पठण विशेष फलदायी

तुमचा श्रीपाद प्रभुंचे दिव्य चरित्र संस्कृत भाषेत लिहिण्याचा मानस अत्यंत स्तुत्य आहे. हा संस्कृत भाषेतील ग्रंथ कालांतराने तेलुगू भाषेत अनुवादित केला

जाईल. अनुवादित केलेल्या ग्रंथाच्या पठणाचे फल व मूळग्रंथाच्या पाठणाचे फल सारखेच आहे. श्रीपाद प्रभूंचे चरित्र कोणीही, कोठेही पठन केल्यास स्वत: श्रीपाद प्रभू तेथे सूक्ष्म रूपाने राहून ते श्रवण करतात. या संबंधीची एक कहाणी सांगतो. सावधान होऊन ऐक.

श्रीपाद सात वर्षाचे झाले. त्यांचा वेदोक्त विधिने उपनयन संस्कार झाला. त्या काळात संपन्न गृहस्थाच्या घरी असे कार्यक्रम असले म्हणजे चोहिकडे अत्यंत आनंदाचे वातावरण असे. बापनार्युलुच्या आनंदाला तर सीमा नव्हती. त्यांनी आपल्या जाती बांधवाना दत्तचरित्र ऐकण्यासाठी आमंत्रित केले होते. ते सर्वजण मोठ्या उत्सुकतेने दत्त चरित्र ऐकण्यास आले होते. दत्तदासानी दत्तचरित्र सांगण्यास सुरवात केली. (ते म्हणाले) "पूर्वयुगात अनसूया आणि अत्रिमहर्षी या परम

पावन दांपत्याला एका पुत्ररत्नाची प्राप्ति झाली. त्याचेच नाव दत्तात्रेय असे ठेवले होते. तेच परंज्योती दत्तात्रेय सध्या या कलियुगात श्रीपाद श्रीवल्लभ या रूपाने पीठीकापुरम मध्ये अवतरले. त्या महाप्रभूंचे आज उपनयन झाले. उपनयनानंतर दिव्य तेजस्वी असे आपले प्रभू अधिकच तेज:पुंज दिसू लागले. अशा दीनजन उध्दारक असणाऱ्या प्रभूंचे नित्य मांगल्य होऊ दे."

हीच कथा ते सारखी सांगत होते आणि श्रोते तन्मय होऊन ऐकत होते. असे त्रेपन्न (53) वेळा कथन झाले. दत्तदासांवर श्रीपाद प्रभूंची अमृत दृष्टी पडली. उपनयनानंतर श्रीपाद तेथे असलेल्या ब्राह्मणांना म्हणाले की ते लगेच मालदासरीच्या घरी जाणार आहेत. जाण्याचे कारण विचारले तेंव्हा श्रीपाद म्हणाले "विशुध्द अंत:करण असलेला दत्तदास माझे चरित्र सांगत आहे.

त्याने एकदा सांगितलेला कथाभाग एक अध्याय असे समजल्यास त्रेप्पन्न अध्याय पूर्ण झाले आहेत. माझ्या चरित्रातील त्रेप्पन्न अध्याय श्रध्देने पूर्ण करणाऱ्याला देण्यासाठी असलेले सद्य:फलीत लगेच त्याला द्यायचे आहे."

## श्रीपाद प्रभूंच्या भक्त वात्सल्याला जाती कुलाचा भेद नाही

श्रीपाद प्रभूंना दत्तदासांकडे जाण्यासाठी ब्राह्मणांनी अनुमती दिली नाही. तेंव्हा श्रीपाद क्रोधावेशाने म्हणाले "तुम्ही कोणालाही पंचम म्हणून नीच जातीच्या लोकांना वृूच्रतेने दाबून टाकीत आहात परंतु त्यांच्या वर माझा कृपा कटाक्ष जास्त असल्याने येणाऱ्या शताब्दींमध्ये ते उन्नत स्थितीत राहतील आणि तुमचे ब्राह्मणत्व, तुमचे

 

अधिकार, त्यांची सेवकवृत्ती धारण करून धर्मभ्रष्ट कर्मभ्रष्ट होतील. माझे वचन म्हणजे काळया दगडावरील रेघ आहे त्यातील एकाही अक्षरात बदल होणार नाही. तुम्हा ब्राह्मणा मधील जे धर्मबध्द होऊन दत्तभक्ति करीत आपले जीवन व्यतित करतील त्यांची मी डोळयात तेल घालून रक्षा करीन."

श्रीपादांच्या क्रोधावेशाला आई वडिलानी शांत करण्याचा प्रयत्न केला. थोडया वेळाने ते शांत झाले व त्यानी मौन धारण केले.

नेमके त्याच वेळी दत्तदासांच्या घरी श्रीपाद वल्लभांनी त्यांच्या दिव्य मंगल स्वरूपात दर्शन दिले. त्यानी प्रेमभराने समर्पण केलेली मधुर फळे स्विकारली. त्यांनी दिलेले दूध प्रेमाने घेतले. त्यांनी आपल्या दिव्य हस्तानी

सर्वांना मिठाईचा प्रसाद दिला आणि दत्तदासांच्या घरी असणाऱ्या प्रत्येकाला त्यानी आशिर्वाद दिला.

"बाबा शंकरभट्टा पाहिलेस का श्रीपाद प्रभुचे प्रेम. ते भावनेनेच संतुष्ट होतात. त्याना कुल, गोत्रासी, भौतिकातील परिस्थितीशी संबंध नसतो. दत्तप्रसाद अंत्य कुलातील व्यक्तीने जरी आपणास दिला तरी त्याचा भक्तीभावाने स्विकार करावा. त्याच्या कडे दुर्लक्ष्य केले अथवा प्रसाद अस्विकार केल्यास आपण कष्ट नष्टांना बळी पडतो."

## श्रीपादांची भक्तांना सांगितलेली बारा अभय वचने

1) माझ्या चरित्राचे पारायण होत असलेल्या प्रत्येक स्थळी मी सूक्ष्म रूपात असतो.

2) मनो वा काय कर्मणा मला समर्पित असलेल्या साधकांचा मी डोळयात तेल घालून संभाळ करतो.

3) श्री पीठीकापुरम मध्ये मी प्रतिदिन मध्याह्न काळी भिक्षा स्विकारतो. माझे येणे दैव रहस्य आहे.

4) सतत माझे ध्यान करणाऱ्यांचे कर्म, ते कितीही जन्मजन्मांतरीचे असले तरी मी ते भस्म करून टाकतो.

5) (अन्न हेच परब्रह्म-अन्नमोरामचंद्राय) अन्नासाठी तळमळणाऱ्यांना अन्न दिल्यास, मी त्या दात्यास नक्कीच प्रसन्न होतो.

 

6) मी श्रीपाद श्रीवल्लभ आहे. माझ्या भक्तांच्या घरी महालक्ष्मी तिच्या संपूर्ण कलेने प्रकाशित असते.

7) तुमचे अंत:करण शुध्द असले तर माझा कटाक्ष सदैव तुमच्यावर असतो.

8) तुम्ही ज्या देवता स्वरूपाची आराधना कराल, ज्या सद्गुरुंची उपासना कराल ती मलाचप्राप्त होईल.

9) तुम्ही केलेली प्रार्थना मलाच पोचते. माझा अनुग्रह/आशिर्वाद तुम्ही आराधिलेल्या देवतेच्या स्वरूपाद्वारे, तुमच्या सद्गुरुद्वारे तुम्हाला प्राप्त होतो.

10) श्रीपाद श्रीवल्लभ म्हणजे केवळ नामरूपच नाही.

सकल देवता स्वरूप समस्त शक्तीचे अंश मिळून माझे विराट स्वरूप, अनुष्ठानाद्वारेच तुम्हाला समजू शकेल.

11) श्रीपाद श्रीवल्लभ हा माझा संपूर्ण योग अवतार आहे. जे महायोगी, महासिध्दपुरुष माझे नित्य ध्यान करतात ते माझेच अंश आहेत.

12) तुम्ही माझी आराधना केली तर मी तुम्हाला धर्ममार्गाचा, कर्म मार्गाचा बोध करतो. तुम्ही पतित होऊ नये म्हणून सदैव मी तुमचे रक्षण करतो.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

# अध्याय -15

## **बंगारप्पा, सुंदरराम शर्मा वृतांत**

मी (शंकरभट्ट) श्रीदत्तानंदांकडून परवानगी घेऊन प्रवासाला सुरवात केली. रस्त्याने जाताना मला तहान लागली आणि मी जवळच्या एका विहिरीजवळ गेलो. पाणी काढण्यासाठी तेथे एक पोहरा सुध्दा होता. मी पाणी किती आहे ते पहावे या उद्देशाने आत डोकावले तेंव्हा मला एक विचित्र दृश्य दिसले. विहिरीच्या आतल्या बाजूला असलेल्या झाडाच्या फांदीला धरून एक व्यक्ति वर खाली कोलांटी उडया घेत होता. त्या अपरिचित

व्यक्तीने माझ्याकडे मोठ्या प्रेमपूर्ण नजरेने पाहिले आणि म्हणाला, "अरे शंकर भट्टा !" मला आश्चर्य वाटले माझे नाव त्याला कसे कळले असेल. मी त्याला उत्सुकतावश विचारले, "आपणास माझे नाव कसे कळाले." तो अपरिचित गृहस्थ म्हणाला "नुसते नांवच नाही तर तू श्रीपाद प्रभूंचा भक्त आहेस आणि त्यांच्या भेटीसाठी कुरुगड्डीस जात आहेस हे सुध्दा मी जाणतो. तुला भेटण्यासाठीच मी तुझी वाट पहात आहे."

त्याला बाहेर कसे काढावे या विचारात मी होतो. माझ्या हातातील दोरी मजबूत नव्हती. माझ्या मनातील भाव ओळखून तो पुण्य पुरुष म्हणाला, "प्रापंचिक बंधाने संसार कुपात पडलेला मानव तू बंधरहित असलेल्या या विचित्र योगप्रक्रिये मधील आत्मानंदात मग्न असलेल्या मला कसा बाहेर काढु शकणार ? माझा मीच उठेण .

आपल्याला शक्ति कमी पडल्यास श्रीपाद प्रभू करूणेने शक्तीचा अनुग्रह करतात."

असे म्हटल्यानंतर निमिषार्धात तो माझ्या शेजारी उभा होता. मी संभ्रमित झालो. तो म्हणाला "माझे नांव बंगारअप्पा. तू तहानलेला दिसतोस, मी तुझी तहान भागवतो" असे म्हणून त्याने त्या पोहऱ्याने भराभर पाणी काढले. आणि तो स्वत:च ते पाणी गटा गटा प्याला. परंतु आश्चर्य असे की पाणी तो प्याला तहान मात्र माझी भागली. याचे मला आश्चर्य वाटले. नंतर आम्ही दोघांनी प्रवास प्रारंभ केला. त्याने बोलण्यास सुरवात केली, "मी स्वर्णकार कुटुंबातील आहे. मी मंत्र तंत्रामध्ये प्राविण्य मिळविले होते. माझ्या मंत्राच्या सामर्थ्याने नावडत्या व्यक्तीस मारून टाकण्याची विद्या सुध्दा मला अवगत होती. भूत-प्रेत, पिशाच्च यांच्या

 

सहवासात सुध्दा मी राहिलो होतो. माझे नुसते नाव ऐकून लोक घाबरत. ज्या गावात मी जाई तेथील लोक मी भूत प्रेतांचे प्रयोग करू नये म्हणून मला विपुल धन आणून देत. माझ्या चेहऱ्यावरील साधारण मनुष्यांच्या चेहऱ्यावर दिसणारी प्रसन्न कळा लोप पाऊन भूत प्रेतांची असलेली विकृत कळा, क्रूरस्वभाव माझ्या चेहऱ्यावर दिसू लागला. माझ्या संचारामध्ये एकदा पूर्व पुण्याईने पीठीकापुरम लागले. श्रीदत्त प्रभूंच्या अवतारामधील पवित्र अशा नगरीत क्षुद्र असलेल्या कुतंत्राला, परस्पर कलहाला काही कमी नव्हते. श्री बापनार्युलु आणि श्रीपादां विषयी अनेक चित्र-विचित्र गोष्टी मी कर्णोपकर्णी ऐकल्या होत्या. मी सर्वात प्रथम बापनार्युलुंना मारून टाकावे असा विचार केला. मी एका ओढयाजवळ जाऊन ओंजळी ओंजळीने पाणी पीत होतो. मला मनुष्यांना मारण्याच्या अनेक विद्यांचे ज्ञान होते. त्या पैकी एक

ज्या व्यक्तीचा अंत करायचा तिचे ध्यान करून पाणी पिले तर ते त्या व्यक्तीच्या पोटात जात असे. मी त्या ओढयातील पाणी पीत असताना श्रीपाद प्रभु बापनार्यांच्या जवळ होते. श्रीपाद प्रेमाने बापनार्युलुच्या पोटावरून हात फिरवित तेंव्हा ताबडतोब ते पाणी उडून जाई. मी पाणी पिऊन पिऊन थकलो परंतु बापनार्युलुंवर त्याचा काहीच अनिष्ट परिणाम न होता ते पूर्वीसारखे सुरक्षितच राहिले. माझी विद्या का फळली नाही याचे मला दु:ख झाले.'

## श्रीपाद प्रभूंची क्षुद्रोपासकास शिक्षा

"मला एक सर्प मंत्र येत होता. त्या मंत्राच्या योगाने इच्छित व्यक्तीच्या घरी सर्प जाऊन दंश करीत असे. मी बापनार्युलुंचे ध्यान करून तो मंत्र उच्चारण केला. अनेक

सर्प बापनार्युलुच्या घरी गेले आणि घरी असलेल्या एका वेलावर पडवळाप्रमाणे लोंबकळू लागले. परंतु ते बापनार्युलुंना काहीच करू शकले नाहीत. दोन मुहूर्तांचा काळ झाल्यावर ते जेथून आले होते तेथे निघून गेले. माझा दुसरा प्रयत्न सुध्दा फसला होता. माझ्या अंकित असलेले भूत-प्रेत बापनार्युलुंच्या घराजवळ सुध्दा फिरकू शकत नाहीत. हा सर्व श्रीपाद प्रभूंच्या लीलांचा चमत्कार असल्याचे मला कळून चुकले. एवढे झाले तरी माझी राक्षसी प्रवृत्ती कमी झाली नाही. मी स्मशानात जाऊन श्रीपादांची कणीकेची बाहुली करून त्याला बत्तीस जागी बत्तीस सुया टोचल्या. या मारण प्रक्रियेत श्रीपादांच्या शरीरास बत्तीस ठिकाणी जखमा व्हाव्यात. एवढेच नाही तर त्या सुया द्रवरूप होऊन त्यांच्या शरीरात विषाचा फैलाव होऊन त्याने त्यांचा अंत व्हावा असा दुष्ट बेत माझा होता. परंतु हा प्रयत्न सुध्दा फसला. एका रात्रीच्या

वेळी माझ्या शरीरात पाणी भरत असल्याचे जाणवले. त्याने मला प्राणांतिक वेदना होऊ लागल्या. बापनार्युलुंच्या घरी सोडलेले सर्व सर्प माझ्या कडे येऊन मलाच दंश करू लागले. श्रीपादांच्या पिठाच्या बाहुलीला ज्या ज्या ठिकाणी सुया टोचविल्या होत्या त्या त्या ठिकाणी मला असहय वेदना होऊ लागल्या, नरकयातनांचा अनुभव येऊ लागला. मी श्रीपाद वल्लभांना मनापासून अंतर्मनाने शरण गेलो. माझ्या अंत:दृष्टीला श्रीपाद प्रभूंचे दर्शन झाले. ते म्हणाले "बंगारअप्पा ! तू केलेल्या महापापाला अनेक वर्षे इहलोकांत दु:ख भोगल्यानंतर नरकात सुध्दा दु:खाचा अनुभव घ्यावा लागला असता. परंतु मी तुझ्यावर कृपा करून या एका रात्रीत झालेल्या यातनांद्वारे कर्माचा नाश करीत आहे. तुझ्या सर्व क्षुद्र विद्यांचा सुध्दा नाश करीत आहे. तरीपण, कोणी तहानेने व्याकुळ झालेला

 

मानव तुझ्या अंत:दृष्टीस दिसल्यास तू स्वत: पाणी पिऊन त्याची तहान भागऊ शकशील. कोलांटी खात झुलणे ही एक योग प्रक्रिया आहे त्याचा अभ्यास करून तू आनंदाची प्राप्ति करून घेशील. आजपासून सात्विक प्रवृत्तीचा स्विकार करून जगशील. माझ्या मातापित्यांच्या घरी किंवा श्री बापनार्युलुंच्या घरात पाय ठेवण्यास सुध्दा बहु जन्मांचे पुण्य असावे लागते. तुला या जन्मात तरी तसे भाग्य नाही. जीवन देणारा परमेश्वर आहे म्हणून प्राण काढून घेण्याचा अधिकार सुध्दा त्याचाच आहे. माता पिता जन्मदाते असल्याने परमपूज्य असतात. त्यांचा वृद्धापकाळात अनादर करणाऱ्यांकडे माझा कृपा कटाक्ष नसतो. तू आपल्या क्षुद्र विद्येने किती तरी निष्पाप लोकांना अकाली मृत्यू दिलास. त्या पापाचे फळ तुला शंकरभट्ट नावाच्या कन्नड ब्राह्मणाची भेट होईपर्यंत राहील. नंतर नि:शेष

 

होईल. तो शंकरभट्ट माझे चरित्र लिहील असे श्रीपाद प्रभू मला म्हणाले होते. ही घटना घडली तेंव्हा श्रीपादांचे वय सात-आठ वर्षाचे होते. त्या दिवसापासून मी तुझी वाट पहात आहे. आज माझा चांगला दिवस आहे." असे बंगारप्पा म्हणाले. ही घटना गोंधळात टाकणारी होती. नंतर मी असंमजस पणे म्हणालो, "तुम्ही पाणी पिले तर दुसऱ्याची तहान कशी भागते. यातील मर्म काय ?" त्यावर बंगारप्पा म्हणाले, "एका योग प्रक्रियेने मी इतर जीवाच्या प्राणमय शक्तिमध्ये अनुसंधान साधतो. त्याद्वारे हे तादात्म्य भावनेने साध्य होते. रामायण काली किष्किंधा नगरीचा वानर राजा वाली यास एका योग प्रक्रिये द्वारे त्याच्या समोर युध्दास आलेल्या योध्दयाच्या शक्तीच्या दुप्पट शक्ति प्राप्त होत असे. या कारणानेच श्री रामानी झाडाच्या मागे लपून त्याचा वध केला होता."

 

विश्वामित्र महर्षींनी राम लक्ष्मणांना बला, अतिबला नांवाच्या दोन अत्यंत पवित्र मंत्रांचा उपदेश केला होता. या मंत्रातील स्पंदनाच्या प्रभावाने प्राणशक्तीची सिध्दि करता येते. मानवाच्या शरीराच्या शुध्दी क्रमाच्या बारा अवस्था आहेत. श्रीरामांचा देह बाराव्या अवस्थेत होता. श्रीपादांचा देह सुध्दा बाराव्या अवस्थेत असल्याने त्यांच्यातील अनंत शक्ति, अनंत ज्ञान, अनंत व्यापकत्व सहजसिध्द असे आहे.

## साधन मार्गातील सात भूमिकांचा विचार

मानव त्याच्या विकासात सप्त भूमिकेत असतो. पहिल्या भूमिकेत स्थूलदेहेंद्रिये, सूक्ष्मदेहेंद्रिये एकाच वेळी उपयोगात आणू शकतो. दुसऱ्या भूमिकेत सूक्ष्म देहेंद्रियांच्या आधारे सूक्ष्म प्रपंच अनुभवत छोटे छोटे चमत्कार करण्याचे सामर्थ्य प्राप्त होते. तिसऱ्या भूमिकेत सूक्ष्म शरीराच्या द्वारे दूर प्रयाण करू शकतो. तिसऱ्या व चौथ्या भूमिकांच्या मध्ये वशीकरण केंद्र असते. वशीकरणात असताना ज्या स्थितीत असतो त्याच स्थितीत आपण राहतो. गौतम ऋषींनी अहल्येस शाप दिला तेंव्हा ती आश्चर्यचकित झाली. तिला आपण शील चैतन्यात आहोत असा दृढ विश्वास होता. ती श्रीरामाच्या दर्शना पर्यंत त्याच स्थितीत राहीली. अहिल्येचे शरीर शिला स्थितीत गेले होते तसेच तिचे मन त्या स्थितीत गेले होते. म्हणजे ती तिसऱ्या व चौथ्या भूमिकेच्या मध्येच असलेल्या वशीकरण केंद्रात

 

राहिली. श्रीरामाची पायधुळ लागताच तीचे मनोपुष्प विकसित झाले. आणि ती स्वत:च्या सहज स्थितित आली. चवथ्या भूमिकेला पोहोचलेल्या आत्म्याला अतिशय विस्तारित योग शक्ति लाभते. यासाठी आपल्या योग शक्तींचा लोककल्याणार्थ अंतरात्म्याच्या बोधानुसार विनीयोग केला तर उच्चस्थिती प्राप्त होते. परंतु पाप कार्याला निमित्त होणारे तुच्छ स्वार्थ प्रयोजनासाठी ही शक्ति वापरली तर पतन अवस्थेला जाऊन शिला चैतन्यात पडण्याची भिती असते. त्यानंतर अनेक हजारो जन्मा नंतर मानव जन्माला येता येते. पाचव्या भूमिकेवर असलेले साधक संकल्पज्ञानी असतात. सहाव्या भूमिकेवरील साधक भावज्ञानी असतात. संकल्पज्ञानी साधक दैवी साक्षात्कारा बरोबर प्रापंचिक कार्यकलापसुध्दा चालवितात. भावज्ञानी साधकांना प्रापंचिक कार्यकलापाचा ध्यास फार कमी

असतो. सातव्या भूमिकेवरील साधक परमात्म्याच्या जवळ असलेल्या ज्ञानाची प्राप्ति करून घेऊ शकतात.

## अवतारी पुरुष व साधकातील भेद

बंगारप्पांनी सांगितलेल्या गोष्टी ऐकल्यावर माझ्या मनात कांही संदेह निर्माण झाले त्यांचे निराकरण करण्यासाठी मी (शंकरभट्ट) प्रश्न केला "महाराज, जीवनात केवळ परिणाम क्रम असतो का ? काय हे अवतारी पुरुषांना सुध्दा लागू पडते ?" यावर बंगाराप्पा म्हणाले "अवतारी पुरुष काळाच्या महिम्याने निर्माण होतात. मानव जेंव्हा भगवंत होतो तेंव्हा त्याला समर्थ सद्गुरु असे म्हणतात. देव मानव रूपात आले तर त्यांना अवतारी पुरुष म्हणतात. मच्छ पाण्यात वेगाने पोहू शकतो. कुर्म पाण्यात व जमिनविर दोन्ही ठिकाणी

राहू शकतो. वराह म्हणजे खड्गमृग भूमिवर सहजपणे चालू शकणारा प्राणी. सिंह हा जनावरात सर्वात श्रेष्ठ प्राणी. नरसिंह अवतारात भगवान विष्णुनी सिंहाचे मुख आणि मनुष्याचे शरीर असे रूप धारण केले होते. याचना प्रवृत्ती असणारा तमोगुणप्रधान असलेला वामन अवतार. रजोगुण युक्त असलेला परशुराम अवतार. सत्वगुण प्रधान असलेला तो रामावतार. त्रिगुणांच्या अतीत असलेला, निर्गुणतत्व प्रधान असलेला श्रीकृष्ण अवतार. कर्मप्रधान असलेला तो बुध्द अवतार. समस्त सृष्टीतील एकत्वातील अनेकत्व आणि अनेकत्वातील एकत्व स्वत:मध्ये समाऊन घेणारा, अत्यंत अद्भूत, अत्यंत विलक्षण युगावतार म्हणजे श्रीपाद श्रीवल्लभावतार. श्रीपाद प्रभूंशी ऋणानुबंध नसलेले योगसंप्रदाय, मते, धर्म, नाहीतच. श्रीपादांची स्थिती बुध्दीवानांना सुध्दा समजण्यासारखी नाही. त्यांच्या सारखे तेच आहेत. सर्व

सिध्दांतांचा, सर्व संप्रदायांचा त्यांच्यातच समन्वय आहे. या सृष्टीचा आदि बिंदु व अंतिम बिंदु सुध्दा तेच आहेत. स्पंदनशील असलेल्या जगद्व्यापाराचे निरीक्षण करणारे, संकल्प करणारे, क्षय करणारे तेच आहेत. हे गूढ असे देवाचे रहस्य आहे. सप्तऋषींना जे समजले नाही ते मी काय सांगु ? बाबा ! शंकरभट्टा तू धन्य आहेस. त्यांचे अव्याज कारुण्य लाभेल तो धन्य होय. अन्य जीव व्यर्थ होत.

## सत्कर्म व दुष्कर्मांचे फल विवरण

मी (शंकरभट्ट) विचारले "महाराज मला एक शंका आली आहे. समस्त कर्माचा बोध करून देणारा तोच असल्यावर लोकांमध्ये थोडयाना चांगले थोडयांना वाईट असे जन्माला का घालतो ?" त्यावर बंगारप्पा मोठ्याने हसले व म्हणाले,"तू चांगला प्रश्न विचारलास. सर्व सृष्टी द्वंद्वातूनच निर्माण झाली आहे. मृत्युचे भय नसेल तर जन्मदात्री आई सुध्दा मुलावर प्रेम करणार नाही. वेदांमध्ये पुरुष हा शब्द आत्मा या अर्थाने वापरला असला तरी आत्मा म्हणजे पुरुष नव्हे. पुरुष हा शब्द देहास सूचित करतो आणि आत्मा हा देह नाही. तो देहाहून निराळा असून अजन्मा, अव्यक्त , अचिंत्य, आणि विकाररहित आहे. मानवात व प्राणीमात्रात एकच आत्मा वास करतो. मनुष्य आणि देव यांच्यात मात्र भेद आहे. या भेदामुळेच मनुष्य देवत्व प्राप्त करण्यासाठी प्रयत्नशील असतो. या प्रयत्नामुळेच मानवाचा विकास

होतो. देवामध्ये केवळ चांगल्या सृजनात्मक शक्ति असतात असे नाही तर कांही विघटनकारक, विनाशकारक शक्ति सुध्दा असतात. त्या त्या शक्तींचा आवश्यकतेनुसार उपयोग करून सृष्टीचे चलन-वलन सुव्यवस्थित चालविण्याचे कर्म देव करीत असतात.

मनुष्यांच्या जन्मात सुख आणि दु:ख ही पूर्वकर्मानुसार येत असतात. दु:ख येत असल्याने मानवास सुखाचे महत्व कळते व तो सुख मिळविण्याचीच आकांक्षा करतो. सृष्टीमध्ये असे दिसून येते की अनेक दुष्ट, कुकर्मी, नास्तिक, जनतेला छळणारे लोक अत्यंत सुखाचे जीवन जगतात आणि सत्यवचनी, प्रामाणिक, सदाचारी सच्छील व्यक्तींना अनेक दुर्धर संकटांना तोंड द्यावे लागते. अशा विपरीत स्थितीचे कारण असे की कुकर्म करून सुध्दा अत्यंत सुखाचा उपभोग घेणाऱ्या लोकांनी पूर्वीच्या

जन्मांत काही सत्कर्मे केली असणार आणि त्याचे फलस्वरूप त्यांना आज असलेले सुख प्राप्त झाले आहे. तसेच अत्यंत प्रामाणिक सच्छील, सज्जन लोक आज जी दु:खे भोगताना दिसतात ती त्यांच्या पूर्वजन्मातील पाप कर्मांचे फलस्वरूपच. मनुष्यास आपल्या पाप अथवा पुण्याचे फळ तत्काळ मिळत नाही, त्यास काही वेळ लागतो. परंतु पाप किंवा पुण्य अत्यंत तीव्र स्वरूपाचे असल्यास त्याचे फळ लवकर मिळते. चांगले अथवा वाईट कर्म करणे मानवाच्या हाती असते. समाजात अधर्माची वाढ होऊन दुष्ट, दुराचारी लोकांकडून सज्जनांचा, संतांचा छळ होऊ लागतो त्या त्या वेळी भगवान सगुण रूपात अवतार घेऊन पापी, दुराचारी लोकांचा नाश करून, धर्माचे, संत सज्जनांचे रक्षण करतात.

हजारो वर्षांपासून आकाशात तारे, ग्रह, चांदण्या होत्या परंतु त्या सध्याप्रमाणे, सुव्यवस्थित नव्हत्या. कालांतराने या तारा मंडलातील अनेक तारे खाली पडून त्यांचे दगडात रूपांतर झाले. अनेक ग्रह एकमेकात मिसळून गेले. पृथ्वीसह सारे ग्रह सूर्याभोवती परिभ्रमण करतात. या ग्रहांच्या आकर्षण, विकर्षणानेच सृष्टी चलित आहे. ती सूर्याभोवती परिक्रमा करीत असते.

परमेश्वराविषयी आकर्षणाने लोक अस्तिक होतात व सत्कर्म करण्यास प्रवृत्त होतात. ज्या लोकांमध्ये परमेश्वरा विषयीचे आकर्षण नसते ते नास्तिक होऊन दुष्कर्मे करण्यास प्रवृत्त होतात. या दोन्ही प्रकारच्या कर्मांना ते स्वत:च आधार असतात.

## वेलुप्रभू महाराजांचा गर्वभंग

पीठीकापुरम या नगरीत वेलुप्रभू नावाचे एक महाराज राज्य करीत होते. ते वेश बदलून नगरात फिरून प्रजेची स्थिती अवलोकन करीत. एकदा त्यांना श्रीपाद श्रीवल्लभांना भेटण्याची इच्छा झाली. त्यानी आपल्या सेवकास अप्पळराज यांच्या घरी पाठवून आदेश दिला की श्रीपाद श्रीवल्लभ स्वामींना तत्काळ घेऊन यावे. घरात स्वामींचे आजोबा बापनाचार्युलु होते. सेवकानी त्यांना राजाज्ञा सांगितली. आजोबानी स्वामीना सांगितले पीठीकापुरमच्या महाराजाने तुला भेटीस बोलावले आहे. श्रीपाद म्हणाले "तात राजाच्या मनांत भक्तीभाव नाही. तो अहंकारपूर्ण वृत्तीने मला येण्याची आज्ञा करतो आहे. त्याला वाटते आपण महाराज आहोत आपली सत्ता सर्वांवर चालते. आपण म्हणू तसे झाले पाहिजे. परंतु माझे दर्शन एवढे सोपे नाही हे तो जाणत नाही. मी

 

महाराजांच्या भेटी साठी जाणार नाही." स्वामी राजाच्या सेवकाला म्हणाले "तुमचे महाराज केवळ या पीठीकापुरमचे राजे आहेत परंतु मी तर समस्त विश्वाचा चक्रवर्ती सम्राट आहे. तुमच्या महाराजाना सांगा की माझ्या दर्शनाची इच्छा असल्यास स्वत: आपण आमचे घरी यावे. येतांना गुरुदक्षिणा व चक्रवर्ती सम्राटास शोभेल असा नजराणा घेऊन यावे." हे स्वामींचे वक्तव्य ऐकून, अप्पळराज व त्यांचे पिता बापनाचार्यलु यांनी आपसात विचार विनिमय करून सेवकांना निरोप देऊन पाठवून दिले. सेवकांनी स्वामीचा निरोप राजास कळविला तो ऐकून महाराज अत्यंत संतप्त होऊन म्हणाले "मी या नगरीचा महाराजा आहे. माझ्या आज्ञेचे श्रीपाद श्रीवल्लभ कसे उल्लंघन करू शकतात ते मी पाहतो" एवढे वाक्य बोलताच भोवळ येऊन सिंहासना वरून खाली पडले. सारे सेवक सिंहासना जवळ धावले. त्यांनी राजास पाणी

पाजून सावध करण्याचा प्रयत्न केला परंतु त्याची सर्व शक्ति गेल्याप्रमाणे होऊन भयंकर अशा नरक यातना होऊ लागल्या. तत्काळ राजपुरोहित श्रीकोटसुंदर शर्मा यांना बोलावणे पाठवले. त्यांनी महाराजाची परिस्थिती पाहून स्वत: श्री दत्तात्रेयांची श्रध्दा भावाने पूजा करून, तीर्थ प्रसाद महाराजाना आणून दिला व विभूती कपाळी लावली. राजपुरोहित म्हणाले, "पाहिलात ना माझ्या अर्चनेचा परिणाम. आपण श्रीपाद श्रीवल्लभांच्या दर्शनाची इच्छा केली ती व्यर्थ आहे. कारण ते स्वत:च श्री दत्त प्रभूंचे अवतार आहेत. त्यांच्या पूजेने लहान सहान सिध्दि प्राप्त होतात. बापनाचार्युलुना सुध्दा त्यांच्या मुळेच मंत्र सिध्दि प्राप्त झाली आहे. श्री वेंकटशास्त्री हा धूर्त वैश्य स्वामींना अनेक सिध्दि प्राप्त आहेत असा प्रचार करीत असतो. महाराज आपण बलवान असला तरी श्री स्वामीना बांधून आणणे योग्य नाही व ते

 

आपल्या फायद्याचे नाही." महाराज राजपुरोहिताला म्हणाले "श्रीपाद श्रीवल्लभांनी कांही दुष्ट शक्तींचा उपयोग करून आम्हास त्रस्त केले आहे. यावर आपण कांही उपाय सुचवावा" राजपुरोहित म्हणाले "महाराज आपण विद्वान ब्राह्मणांकडून श्री दत्त पुराणाचे पारायण करून घ्यावे. स्वयंभू दत्तात्रेयांची पूजा करून समाराधना करावी आणि ब्राह्मणांना भूदान, सुवर्णदान, अन्नदान करावे. असे केले असता श्री दत्त प्रभू प्रसन्न होऊन आपली व्याधी पूर्ण बरी करतील." राजाने राजपुरोहितांच्या सांगण्या प्रमाणे विद्वान ब्राह्मणां करवी श्री दत्त पुराणाचे पारायण प्रारंभ केले. परंतु आश्चर्य असे घडले की पारायण सुरू केल्या पासून गावातील चोरांचा सुळसुळाट अधिकच वाढला. त्यांच्यावर आळा घालणे राजास कठीण झाले. महाराजांना त्या रात्रीच स्वप्नात आपले पितर दिसले. ते अगदी क्षीण अशक्त

 

आणि दीनवाणे दिसत होते. ते म्हणाले "अरे वेलू ! तू आम्हास श्राध्द भोजन देत नाहीस आमची या प्रेत योनीतून सुटका करण्यास कांही करीत नाहीस" महाराजा म्हणाले "तात ! मी शास्त्रानुसार श्राध्द कर्म करतो ना" पितर म्हणाले "परंतु ते आम्हाला काही मिळत नाही. ब्राह्मण मात्र खाऊन पुष्ट होत आहेत. राजाने व ब्राह्मणांनी दोघांनी श्रध्दायुक्त अंत:करणाने मंत्रोच्चारासह श्राध्द कर्म केल्यास आम्हास त्याची प्राप्ति होईल." पितरांच्या वक्तव्याने राजास रात्री निद्रा सुध्दा आली नाही. याच वेळी त्याची उपवर, सुंदर अशी कन्या भूत बाधेने पिडित होऊन, केस मोकळे सोडून विकट हास्य करीत घरातील सर्व वस्तु रागाने घरा बाहेर फेकू लागली. ती जेवणास बसली की अन्नात किडे दिसत व ते अन्न ती फेकून देई. तिच्या अंगावरील कपडयांना

एकदम आग लागे. अशा प्रकारे महाराजांना सर्व बाजूनी संकटानी घेरले. त्यांची स्थिती अत्यंत दयनीय झाली.

राजास सहाय्य करणाऱ्या राजपुरोहिताची स्थिती सुध्दा अत्यंत शोचनीय झाली होती. त्याची सौम्य सोज्वळ स्वभावाची पत्नी एकाएकी अत्यंत क्रोधित स्वभावाची होऊन पतीच्या शिरावरच भांडे आपटू लागली. त्याच्या मुलाने प्रत्यक्ष राजपुरोहितालाच दोरखंडाने घरातील एका खांबास बांधून ठेवले . त्याला जेंव्हा भूक लागली तेंव्हा त्याच्या समोर एक गवताचा भारा ठेऊन तो न खाल्ल्यास पोळविण्यास सुरवात केली. पारायणासाठी निवडलेले ब्राह्मण पारायण संपऊन जेवण करून घरी येताच त्यांना घरी धुमाकूळ घालणारी भूत प्रेते दिसत होती. ती पाहून बिचारे ब्राह्मण अगदी घाबरून जात. ती भूते ब्राह्मणाना म्हणत "तुमच्या महाराजांनी असंख्य

पापे केली. आम्हास आमच्या पतीपासून दूर करून आतोनात छळ केला. तुम्ही राजाने वाम मार्गाने मिळविलेले धन दान रूपात घेतले त्यामुळे आम्ही तुम्हास त्रास देतआहोत. ही सर्व परिस्थिती पाहून, ब्राह्मण, राज पुरोहित आणि स्वतः महाराज अगदी घाबरून गेले. त्यांना यातून कशी सुटका करून घ्यावी हे कळेना. अत्यंत भयभीत होऊन महाराज राजपुरोहितांना म्हणाले दत्त पुराणाच्या पारायणामुळे सर्व दु:खे नाहिशी होऊन सुख प्राप्ति होईल असे वाटले होते. परंतु सारे कांही विपरितच घडले. त्यांना आता श्रीपाद श्रीवल्लभ स्वामींच्या सामर्थ्याची कल्पना आली आणि आपण केलेल्या करणीवर पश्चाताप झाला. महाराज राजपुरोहित आणि ब्राह्मणास घेऊन श्री स्वामींच्या दर्शनास गेले. ते सर्वजण स्वामीना शरण गेले आणि क्षमा याचना केली. क्षमाशील, दयाघन अशा श्रीपाद राजांनी मोठ्या उदार

अंत:करणाने त्यांचे अपराध क्षमा केले. ते म्हणाले या सृष्टीमध्ये प्रत्येकजण हा सेवकच असतो. मी जेंव्हा प्रसन्न होतो तेंव्हा त्या सेवकाला सेवेचे जास्ती जास्त फळ प्रदान करतो. परंतु अप्रसन्न झाल्यास सेवेचे अगदी कमीत कमी फळ देतो. मंदिरातील स्वयंभू दत्त मीच आहे. कालाग्नी रूपात असलेले ते श्रीदत्तरूप माझेच आहे. मी जीवांच्या उध्दारासाठी या श्रीपाद श्रीवल्लभ रूपात अवतरलो आहे. श्रध्दायुक्त अंत:करणाने माझी भक्ति केल्यास मी प्रसन्न होतो. माझे आईवडिल सौ. सुमती आणि श्री अप्पळराज हे प्रत्यक्ष श्रीलक्ष्मी आणि भगवान विष्णुच आहेत. माझे आजोबा एका जन्मामध्ये "लाभाद" महर्षि होते. माझा जन्म गणेश चतुर्थीस झाला."

मी पुढील नरसिंह सरस्वतीच्या अवतारात माझे आजोबा श्री बापनाचार्युलुंसारखा दिसेन. मी त्या अवतारात जेंव्हा गंधर्वपूर या क्षेत्री निवास करीन त्या वेळी भूत, प्रेतांची त्यांच्या योनीतून सुटका करीन. विपुल धन, दौलत शक्ति सामर्थ्य असले तरी त्याचा गर्व करू नये. संपत्ती ही सत्यमार्गानी मिळविलेली असावी. वाम मार्गानी मिळविलेली नसावी. वाम मार्गानी मिळविलेली संपत्ती दु:ख, क्लेश, अशांती, वैमनस्य, आपपर भावासच कारणीभूत होते. प्रत्येकाच्या पाप पुण्याचा हिशोब चित्रगुप्ताकडे असतो. तुमचे पाप नष्ट होण्यासाठी मला शरण येऊन आर्तभावाने श्रीपाद श्रीवल्लभा, दत्तात्रेया, दिगंबरा, अशी हाक मारल्यास मी तुमच्या सर्व पापाचे दहन करून तुम्हास पुण्यात्मा करीन. हे महाराजा तू सत्य असलेले असत्य सांगितलेस आणि असत्य असलेले सत्य प्रतिपादन केलेस त्यामुळे तुला इतक्या संकटांना

तोंड द्यावे लागले. श्रीपाद श्रीवल्लभांचा योग्य सन्मान न करता त्यांची निंदा केल्याने श्री दत्त पुराण या ग्रंथाचे पारायण करून सुध्दा त्याचे फळ न मिळता नुसती संकटेच झेलावी लागली. श्रीदत्त प्रभू स्वत: श्रीपाद श्रीवल्लभ आहेत हे त्रिवार सत्य आहे.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

 

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

# अध्याय -16

## श्रीमन् नारायण वृतांत

मी श्रीपाद श्रीवल्लभांच्या चरित्राचे स्मरण करीत मार्गक्रमण करीत होतो. स्वामी कुरुगड्डीला (कुरवपुरला) असल्याचे कळल्यापासून माझ्या आनंदाला पारावार उरला नव्हता. त्यांच्या दर्शनाची ओढ क्षणोक्षणी वाढतच होती. मार्गात एक उसाचे शेत दिसले. शेतात एक शेतकरी आनंदात बसला होता. शेजारीच उसाचा रस गाळून त्याचा गुळ करण्याचे काम चालू होते. त्या शेतातील खाटेवर बसलेल्या शेतकऱ्याने मोठ्या

 

नम्रभावाने मला बोलाऊन उसाचा रस दिला. तो फारच मधूर रस होता. मी श्री श्रीपादांच्या दर्शनास जात असल्याचे ऐकून त्या शेतकऱ्यास खूप आनंद झाला तो शेतकरी मला म्हणाला आहो काका ! माझे नांव श्रीमन् नारायण मल्लादी. आमचे गांव मल्यादीपुरम होते परंतु कालांतराने त्याचे नांव मल्लादी असे अपभ्रंशाने पडले. श्रीपाद श्रीवल्लभांचे आजोबा श्री बापनाचार्युलू यांचे आडनाव सुध्दा मल्लादी असे होते ते ब्राह्मण होते परंतु आम्ही चौधरी आहोत. त्यांचे आणि आमचे अगदी जवळचे संबंध असताना आम्ही मल्लादीपूरम गांव सोडून पीठीकापुरम गावी आलो. त्या वेळी आमची परिस्थिती फारच बिकट होती. सारी स्थावर जंगम मालमत्ता विकून टाकून, अंगावरील एका कपडयाने आम्ही येथे पीठीकापुरमला आलो. श्रीबापनाचार्युलु यांनी आम्हास मोठ्या प्रेमाने जेऊ घातले त्यांचे शेत करण्याची आमची

 

इच्छा आम्ही त्यांना बोलून दाखविली. त्या दिवशी श्रीपाद घरी होते. ते म्हणाले बापनाचार्युलुंच्या घरातील अन्न हे देवाच्या प्रसादासारखे असते. देवाच्या कृपे शिवाय हा प्रसाद मिळत नाही. बापनाचार्युलुचे दर्शन मिळणे सुध्दा दुर्लभ आहे. तुमच्या पुण्याइनेच घडले आहे. बापनाचार्युलु आम्हास म्हणाले, "आम्ही आमचे शेत करण्यास दुसऱ्यांना दिले आहे. कांही कारण नसताना त्याना काढून टाकणे धर्माविरुध्द होईल. आता तुम्ही एक मूठभर उडिद एका कपडयात बांधून घेऊन पश्चिम दिशेंस जा. तुमच्या मनोकामना पूर्ण होताच ते कुळीथ (उडीद) टाकून द्या. परमेश्वर अत्यंत दयाळू आहे. तो खडकात असलेल्या बेडुकाला सुध्दा अन्न पुरवितो तो तुम्हाला अन्न पुरविणार नाही का ? तुम्ही आपल्या कार्यात यशस्वी व्हाल." आम्ही जेवण केले व निघताना धोतराच्या सोग्यात मूठभर कुळीथ बांधून

घेऊन पश्चिमेकडे तोंड करून निघालो. श्रीपाद श्रीवल्लभांच्या कृपेने प्रवासात अन्न पाण्याचा मुळीच त्रास झाला नाही. न मागताच आम्हास जेवण मिळत होते. हे केवढे आश्चर्य. चालत चालत आम्ही आंध्रप्रांत ओलांडून कर्नाटक प्रांतात प्रवेश केला. मार्गात आम्हास अनेक पर्णकुटया दिसल्या. त्यात राहणारे लोक वृद्ध होते. त्यांच्या जवळ धन संपत्ति वगैरे कांही नव्हती. एका पर्णकुटीत आम्ही प्रेवश केला तेथे एक वृद्ध जोडपे राहात होते. ते जातीने चौधरी होते. त्यांचा एकुलता एक मुलगा सर्प दंशाने मरण पावला होता. त्या मुलाची पत्नी कृष्णानदीत स्नान करीत असताना पाण्याच्या प्रवाहात वाहून गेली होती. त्याना संतान नव्हते. या वृद्ध दंपतीला आता कोणाचाच आधार उरला नव्हता. त्यांचे शेजारी मात्र त्यांच्या बरोबर मधुर भाषण करीत व वेळो वेळी त्याना मदत करीत असत. या वृद्ध जोडप्याने आमचे

उत्तम आदरातिथ्य केले व घरी ठेवून घेतले. जेव्हा जेव्हा आम्ही पुढे जाण्यासाठी निघत असू त्या वेळी काहीतरी अडचण येई व आमचे जाणे स्थगित होई. शेवटी एका शुभ मुहूर्तावर आम्ही निघालो परंतु त्याच वेळी त्या वृद्ध गृहस्थास उलटयांचा आणि जुलाबाचा त्रास सुरू झाला. तेव्हा आम्हास रहाणे भाग पडले. एकदोन दिवसात त्या गृहस्थास बरे वाटल्यावर आम्ही पुढच्या प्रवासास निघालो. आमच्या तेथील चार पांच दिवसांच्या वास्तव्याने त्या वृद्ध कुटुंबाच्या मनांत आमच्या विषयी प्रेमभाव उत्पन्न झाला होता. आम्हाला निरोप देतांना त्यांच्या डोळयात प्रेमाश्रू दाटून आले व आम्ही सजल नेत्रांनी त्यांचा निरोप घेतला. धोतराच्या सोग्यात बांधलेल्या कुळीथाला आता वास येऊ लागल्याने आम्ही ते फेकून दिले. आम्ही त्या वृद्ध दंपतीला मदत करण्याची इच्छा व्यक्त केली परंतु त्यांनी आमच्या कडून काहींच

घेतले नाही. त्यांची निरिच्छ वृत्ती पाहून आम्हास अतिशय आश्चर्य वाटले. त्या वृद्ध दंपतीच्या परिचयाचा एक ज्योतिषी होता. त्याला त्यांनी बोलावले. तो घरी आल्यावर त्या वृद्ध गृहस्थास म्हणाला तुमच्या घरी आलेले जे अतिथी आहेत ते अतिशय अमंगळ आहेत त्यांच्या वास्तव्याने तुम्हाला दारिद्रय प्राप्त होईल. त्यांना तुम्ही लवकरात लवकर घालवून द्या. ते वृद्ध दंपती म्हणाले, "पंडितजी ! त्यांच्या वास्तव्याने आलेल्या दारीद्य्राचा परिहार करण्याचा शास्त्रास कांही तरी उपाय असेल ना ? आपण तो सांगावा त्या साठी कितीही खर्च झाला तरी आम्ही तो देऊ. त्या अतिथीचे अमंगल्य नष्ट करण्यासाठी जो पूजाविधी असेल तो सांगण्याची कृपा करावी. परमेश्वराच्या इच्छेनेच सारे विश्व चालते. सर्व देवाना मंत्राच्या सहाय्याने प्रसन्न करून घेता येते. प्रत्यक्ष ब्रह्मास प्रसन्न करून घेण्याचे विधान तुम्ही

जाणता. यामुळे धरतीवर तुम्ही ईश्वरच आहात. तुम्ही आमची इच्छा पूर्ण करा ही विनंती." त्या ज्योतिषाला त्या वृद्ध जोडप्याची विनंती मान्य करण्याशिवाय मार्गच नव्हता. तो ज्योतिषी म्हणाला धान्य उगवण्या साठी पाण्याची गरज असते त्यासाठी पर्जन्य यज्ञाची तयारी कर. यज्ञ करणाऱ्या व्यक्तीला देवतुल्य मानतात. प्रत्यक्ष देवसुध्दा यज्ञ करणाऱ्याची स्तुती करतात. यज्ञाचे पांच प्रकार आहेत.

1) देवयज्ञ 2) भूतयज्ञ 3) मनुष्ययज्ञ 4) ब्रह्मयज्ञ आणि 5) पितृयज्ञ

श्रीपाद श्रीवल्लभांच्या लीला अत्यंत अद्भूत, आश्चर्यकारक होत्या. त्या वृद्ध दांपत्याने दिलेल्या द्रव्याच्या सहाय्याने विद्वान ब्राह्मणांद्वारा सर्व कार्य सिध्दीसाठी यज्ञ केला.

या यज्ञामुळे आमच्या जन्म पत्रिकेतील सर्व दोषांचे निर्मूलन झाले. त्या वृद्ध दंपतीच्या पुण्याइने आम्हास परम पवित्र अशा यज्ञाचे दर्शन घडले. या यज्ञातील हविष्य इंद्र आणि इतर देवतांना अर्पण केले होते. प्रत्येक देवाच्या इच्छेनुसार हविष्याचा भाग देण्यात आला होता त्या प्रत्येक देवतेने तोंड भरून आशिर्वाद दिले होते. गाय, वेद, ब्राह्मण, पतिव्रता स्त्रिया, सत्यप्रिय आणि दानशूर लोकामुळे पृथ्वीचे सृजन कार्य चालते. शेती करण्यास ज्या प्रमाणे बैलाची नितांत गरज असते तेवढीच गरज इहलोक सिध्दिसाठी यज्ञ यागाची असते आणि तितकीच गरज परलोक सिध्दीसाठी गोमातेची असते. शिवाय गायीमुळे आपणास दूध, दही, तूप लोणी, इत्यादी खाण्याचे पदार्थ तर मिळतातच.

# भूमातेचे सात गुण

सर्वधर्मांची तत्वे वेदांवरच आधारलेली आहेत. धरतीमातेला सुध्दा वेदांचाच आधार आहे. ब्राह्मण लोक आपल्या यजमाना द्वारा यज्ञ करवून समाजास सत्कर्म करण्यास प्रवृत्त करतात. अशा सत्कर्माने भूमातेस सामर्थ्य प्राप्त होते. पतिव्रता स्त्रिया आपल्या पातिव्रत्याने धर्माचे रक्षण करतात. पतिव्रता स्त्रियांमुळे धरणीमाता समृद्ध होते. सत्यभाषण करणाऱ्या सत्य-संकल्पी लोकांमुळे सुध्दा भूमी आनंदित होते. निर्लोभी लोक आपली लोभीवृत्ती टाकून देऊन समाजात माधुर्य वाटतात. तर दानशूर लोक पुण्यमार्गाने मिळालेले धन दीन-दुबळया अभागी लोकांना वाटून इहलोक आणि परलोक दोन्ही साधून घेतात. या सप्त गुणांनी युक्त असलेल्या लोकांमुळे पृथ्वी सदैव प्रसन्न, सामर्थ्यवान

आणि भरपूर अन्नपाणी पुरविणारी होते. बापनाचार्युलु सारख्या महापुरुषांनी आम्हाला निमित्तमात्र करून यज्ञपुरुष श्री श्रीपाद वल्लभ ह्यांच्या समक्ष आम्हास धन्य केले.

## श्रीपाद श्रीवल्लभांकडून भक्तांचे रक्षण

यज्ञ निर्विघ्नपणे, मोठ्या आनंदात संपन्न झाला. ते वृद्ध दंपती आम्हास आपल्या मुला सारखे मान देऊन वागवीत होते. हे त्यांच्या भाऊ बंदाना आवडले नाही. आम्हाला एक मिरचीचे शेत होते त्याला चारी बाजूनी ताडीच्या झाडाचे कुंपण होते. या ताडीच्या झाडाचा रस गौड लोक येऊन काढून घेऊन जात. एकदा मी शेतात गेलो असताना आमचे भाऊबंद शेतातील मिरच्या तोडून पोत्यात भरून बैलगाडीत ती पोती ठेऊन घरी जाण्यास

सिध्द असलेले मी पाहिले. मी एकटाच होतो परंतु ते दहा लोक होते. याच वेळी एक आश्चर्य घडले. एक अस्वल ताडीच्या झाडावर चढून त्याचा रस पीत होते. एवढयात त्याचा झोक गेला आणि ते खाली पडले त्या अस्वलाला जवळ आलेले पाहताच आमचे भाऊबंद घाबरून पळून गेले. अस्वलाच्या विषारी नखांनी होणाऱ्या जखमांची त्यांना कल्पना होती. मी श्रीपादांचे नामस्मरण करीत बैलगाडीत बसलो व ती गाडी चालू लागली. ते अस्वल श्रीपादाच्या नामस्मरणाच्या आवाजाने शांत झाले व आमच्या बरोबर चालत आमच्या घरी आले. त्या अस्वलाला पाहून त्या वृद्ध दंपतीच्या घरा जवळचे शेजारी आश्चर्य चकित झाले. त्या रात्री आम्ही श्रीपाद श्रीवल्लभांचे भजन केले तर ते अस्वलसुध्दा आमच्या बरोबर बसून तन्मयतेने भजन ऐकत होते. भजन संपवून सर्वांना प्रसाद वाटला. तो त्या अस्वलाने आनंदाने

खाल्ला. यानंतर ते अस्वल आमच्या घरातील एक सदस्य असल्या प्रमाणे राहात होते. ते आमच्याशी प्रेमाने राही परंतु आमच्या शत्रूंना त्याची भीती वाटे. त्याच्या भीतीमुळे शेताचे रक्षण करण्याचे काम अनायासे अस्वलच करीत. आमच्या घरी दत्त प्रभूंच्या लीलाकथांचे कीर्तन आणि श्रीपादाचे नामस्मरण नित्य नेमाने चाले. एकदा असेच शेतात गेले असतांना ते अस्वल शेतात आले. माझ्याकडे मोठ्या प्रेमाने पाहिले. मी श्रीपाद स्वामींचे नाम घेण्यास सुरवात करताच ते मोठ्या आनंदाने नाचू लागले.

आमच्या शेजारच्या गावात एक मांत्रिक आला होता. त्याने काही उपासना करून शक्ति प्राप्त केल्या होत्या त्याच्या प्रभावात येणाऱ्या लोकांकडून तो धन लुबाडून घेऊन संग्रहीत करीत होता. आमच्या भाऊ बंदानी त्याला

 

शरण जाऊन त्याचा आश्रय घेतला होता. त्याने अस्वलावर मंत्र प्रयोग केला त्यामुळे त्याची सारी शक्ति नष्ट झाली असल्याप्रमाणे अगदी निचेष्ट होऊन पडला. दुसऱ्या मंत्राने त्याने अस्वलाच्या साऱ्या शक्ति स्वत: आकर्षून घेतल्या. रामायणातील वाली प्रमाणे त्याला एक विद्या अवगत होती जिच्या प्रयोगाने समोरील शत्रुपक्षाची अर्धी शक्ति त्यास प्राप्त होत असे. या कारणामुळेच श्रीरामानी वालीला झाडाच्या मागे लपून बाण मारला होता व त्याने त्याचा अंत झाला.

## श्रीपाद श्रीवल्लभांच्या शिष्यांना कर्मबंधनापासून मुक्तता

श्रीपाद स्वामींच्या लीला मोठ्या अगम्य आहेत. त्यात कार्यकारण संबंध शोधणे अत्यंत कठीण आहे. कारणा शिवाय कोणतेही कर्म संभवत नाही. इंद्राची पूजा गोकुळवासीयानी, प्रतिवर्षाप्रमाणे न केल्यामुळे रागाऊन, त्याने गोकुळावर अतिवर्षा केली. तेंव्हा श्रीकृष्णाने गोवर्धन पर्वत आपल्या अंगुलीवर उचलून धरला व त्या खाली सारे गोकुळवासी सुरक्षित राहिले. ज्या प्रमाणे श्रीकृष्णाने सर्व गोकुलवासीयांचे रक्षण करून आपल्या गोपाल धर्माचे पालन केले त्याच प्रमाणे श्रीपाद वल्लभानी मांत्रिकाच्या योग शक्तीला तिच्या आज्ञे प्रमाणे करू दिले. अस्वल त्या शक्तीला बळी पडले त्याच्यातील पुण्य अंशामुळे ते श्रीपाद स्वामींचे भक्त झाले होते. त्या मांत्रिकाच्या शक्ति प्रयोगाने निचेष्ट पडलेले अस्वल मंदगतीने रडत होते. दु:खी जीवांचे ॠदन

 

श्रीपाद श्रीवल्लभ स्वामींना न चुकता ऐकू येते. ते प्रत्येकाच्या कर्मानुसार पापकर्माच्या फलाची तीव्रता कमी करतात. श्रीमन्नारायणाच्या घरी दत्तकथा, श्रीपाद श्रीवल्लभ स्वामींचे नामस्मरण, कथा, कीर्तने नित्य नेमाने चालत असे. तेथे येणाऱ्या भक्तातात काही भक्त श्रीपादाच्या चरणी अनन्य भावाने शरण जाणारे होते तर काहींच्या मनातील संदेह अजून दूर झालेला नव्हता. नामसंकीर्तन चालू असतांना एक अद्भूत घटना घडली. ते मृत -प्राय पडलेले अस्वल श्रीपादांच्या नाम घोषाने एकदम चेतना जागृत होऊन आनंद विभोर होऊन नाचू लागले. श्री दत्तात्रेयांचे योगसामर्थ्य सर्वापेक्षा काही वेगळेच आहे. त्यांच्या करुणेनेच त्या अस्वलाचे रूपांतर एका मनुष्यात झाले व त्या मानव तांत्रिकाचे रूपांतर एका अस्वलात झाले. तेथील लोकांनी त्या अस्वलास दोरीने बांधून अरण्यात सोडून दिले. ते मनुष्य रूपी

अस्वल सर्व लोकांना उद्देशून म्हणाले "लोकहो, मी गेल्या जन्मी एक सावकार होतो आणि व्याजा वर पैसे देण्याचा व्यवसाय करीत होतो. अधिक व्याजाचा दर लाऊन मी लोकांना छळीत असे. धन न दिल्यास त्यांचे धन लुबाडून घेत असे. अशा दुष्कत्यामुळे मला अस्वलाचा जन्म घ्यावा लागला.

परंतु माझ्या पूर्व पुण्याईने या जन्मी मला श्रीपाद श्रीवल्लभांचे दर्शन घडून त्यांचा अनुग्रह प्राप्त झाला. श्रीपाद श्रीवल्लभ श्री दत्तात्रेयांचे अवतार आहेत. त्यांच्या अनुग्रहामुळेच माझी अस्वलाच्या योनीतून सुटका होऊन उत्तम असा मानव देह प्राप्त झाला. त्या मांत्रिकाने अनेक पापकर्मे केली. त्याने माझ्या सारख्या मूक असलेल्या आणि विशेष म्हणजे श्रीपाद श्रीवल्लभ स्वामींचा भक्त असलेल्या प्राण्यांचा विनाकारण छळ

केला. या पापकर्मामुळे त्याला श्रीपाद श्रीवल्लभ स्वामींनी योग्य ते शासन केले. "शिष्टांचे रक्षण आणि दुष्टांना शासन" असे ब्रीद असलेल्या स्वामीची जे अनन्य भावाने,श्रध्दायुक्त अंत:करणाने सेवा करतात त्यांच्यावर श्री स्वामींचे कृपाछत्र सदैव असते. देव आणि भक्तांची निंदा करणाऱ्या आणि पर-धनावर आसक्ती ठेवणाऱ्या लोकांना ते योग्य ते शासन करण्यास चुकत नाहीत. आपल्या पाप कर्मावर पश्चाताप होऊन व योग्य ती शिक्षा भोगल्यानंतर कांही दुष्ट लोक स्वामींचे भक्त झाल्याची उदाहरणे आहेत." तो मनुष्यरूपी अस्वल पुढे म्हणाला, "मी श्री स्वामींच्या नामस्मरण पारायणाने सद्गतीस प्राप्त झालो. मला मानवी देह मिळालेला पाहून सर्व भक्त गणांना अत्यंत आश्चर्य वाटले व आनंदही झाला. ते श्रीस्वामीचा मोठ्याने जय जय कार करू लागले."

 

हे नाम संकीर्तन चालू असतांना एक अद्भुत घटना घडली अकस्मातपणे तीन नाग (देवता) तेथे आले आणि त्या नामसंकीर्तनात तन्मयतेने डोलू लागले. याच वेळी त्या मनुष्यरूपी अस्वलाचे प्राण पंचतत्वात विलीन झाले. तेथे आलेल्या नागांनी त्या मृत देहास तीन प्रदक्षिणा घातल्या व निघून गेले. ते नाग कोठून आले होते. कशासाठी आले याचा कोणालाच अर्थबोध झाला नाही. त्या मनुष्य रूपातील अस्वलावर सर्व शास्त्रोक्त पध्दतीने दाह संस्कार करण्यात आले.

आम्हास श्रीपाद श्रीवल्लभांच्या नामस्मरणाचेच सतत ध्यान होते व त्यांचाच जीवनाला आधार होता. ते तीन नाग वरील घटनेनंतर आमच्या घरीच राहू लागले. त्यांची आम्हाला व दुसऱ्या दत्त भक्तांना भिती वाटत नसे परंतु

 

दुसऱ्या लोकांना मात्र त्यांची भिती वाटे व ते आमच्या घरी येत नसत. श्रीपाद श्रीवल्लभांचे नामस्मरण, भजन सुरु करताच ते नाग तन्मयतेने डोलू लागत. त्या वृद्ध दंपतीच्या घराजवळील काही जमीन त्यांच्या भाऊबंदानी अन्यायाने लुबाडली होती. त्या जागेस पंचानी विवादग्रस्त अशी घोषीत केली होती. परंतु त्या जमीनीवर भाजीपाला लावण्याची परवानगी मिळाली होती. आमच्या भाऊबंदानी गावातील प्रतिष्ठित लोकाना धनाचे प्रलोभन दाखवून आपलेसे करून घेतले होते. त्यामुळे त्या विवादित भूमीचा निर्णय सारखा पुढे ढकलला जात होता.या विवादास्पद जागी एक नागाचे वारूळ होते. नागपंचमीला लोक त्या वारूळात दूध आणून घालीत. दूध घालणारे भाविक जन "नागदेवता नागदेवता आमची संकटे दूर कर" अशी नम्र प्रार्थना करीत असत. दूध घालणाऱ्या कांही लोकांना माहीत होते

 

की त्या वारूळात एकही नाग नाही. एकदा नागपंचमीच्या वेळी आम्ही श्रीपाद श्रीवल्लभांना नैवेद्य दाखवून नागाची प्रार्थना करताच त्या वारूळातून ते तीन नाग आले व आम्ही ठेवलेले दूध पिऊन परत त्या वारूळात निघून गेले. हे दृष्य पाहिल्यानंतर मात्र त्या वारूळात दूध घालण्यास कोणी आले नाही."

नागपंचमीच्या दिवशी एक मांत्रिक आमच्या गावात आला. त्या मांत्रिकाचे गावातील प्रतिष्ठित लोकांनी बोलाऊन स्वागत केले. तो मांत्रिक कितीही विषारी साप असला तरी त्याला आपल्या मंत्रसामर्थ्याने वश करून घेत असे. अशी त्याची प्रसिध्दी होती. तसेच सर्पदंश झालेल्या कोणत्याही व्यक्तीला आपल्या मंत्रशक्तीने जिवंत करीत असे. त्याच्या तळहातावर गरुडाचे चिन्ह होते. अशी गरुडरेषा असलेल्या व्यक्तीस सर्प वश होतात

 

असे शास्त्र वचन आहे. ही मंत्र विद्या त्यास प्राप्त असल्याने सारे गावकरी त्याच्या पुढे नतमस्तक होत असत. त्या मांत्रिकाने गावातील प्रतिष्ठित व्यक्ति बरोबर येऊन आमच्या घराजवळ असलेल्या वारूळाच्या चारी बाजूनी आग लावली. तो त्या आगीजवळ बसून जोर जोरात मंत्रोच्चार करीत होता. व विचित्र हावभाव करीत होता. त्या सर्पांना मारल्यास पाप लागेल असे आम्ही त्याला दूर उभे राहून सांगत होतो. परंतु आम्ही तेथे काहीच करू शकत नव्हतो. त्या वेळी आम्ही त्या निरपराध सर्पांचे रक्षण करावे अशी श्रीपादाचे चरणी प्रार्थना केली. त्या मंत्राच्या प्रभावाने ते तिन्ही सर्प वारूळातून बाहेर आले. परंतु आम्ही पाहिले की त्या मांत्रिकाची मंत्रविद्या क्षीण होत होती. त्याला काहींच करता येत नव्हते. तो मोठ्याने मंत्रोच्चार करीत होता परंतु त्याचा कांहीच उपयोग होत नव्हता. ते सर्प ज्या

दिशेने जात होते तेथील अग्नि श्रीपादांच्या कृपेने थंड झालेला असे. आणि आश्चर्य म्हणजे अग्निदेवतेने त्या तीन्ही सर्पासाठी मार्ग मोकळा करून दिला होता. ते ज्या मार्गाने आले होते त्या मार्गाने निर्विघ्न पणे निघून गेले. थोडयाच वेळात तो अग्नी पूर्णपणे शांत झाला. हे दृष्य पाहून त्या मांत्रिकाचे अनुचर पळून गेले. त्याच वेळी गावातील प्रतिष्ठित व्यक्तींच्या मोठ्या मुलास सर्प दंशाच्या खुणा दिसून आल्या. थोडयाच वेळात त्याचे शरीर सर्पाच्या विषाने काळे निळे झाले. दुसऱ्या मुलाची दृष्टी पूर्णपणे नष्ट झाली. त्या मांत्रिकाने पुष्कळ मंत्रोच्चार केला परंतु काहीच उपयोग झाला नाही. त्या मांत्रीकाच्या हातावरील ती गरुडरेषा हळू हळू लहान होत अदृष्य झाली. गावातील लोकांना खूप भीती वाटली. या भयंकर संकटातून केवळ श्रीपाद श्रीवल्लभच आपली सुटका करू शकतील असा त्यांना दृढ विश्वास वाटत

होता. त्या मांत्रिकाची मंत्रविद्या पूर्णपणे लुप्त होऊन तो निस्तेज होऊन जमीनीवर पडला. श्रीपाद प्रभूंची लीला कोणत्या प्रसंगी कशी व कोणाला सहाय्यभूत होईल हे समजून येत नाही. गावातील सर्व लोक धावत धावत येऊन ओक्साबोक्शी रडू लागले परंतु आम्ही करू शकलो नाही. "अनन्य भावाने श्रीपाद प्रभूंना शरण जाऊन त्यांचे नामस्मरण केल्यास तुमची दोन्ही मुले पूर्व स्थितीत येतील." असे आम्ही त्यांना सांगितले. निस्तेज झालेला मांत्रिक अल्पावधितच गतप्राण झाला. त्या मांत्रिकाचे पार्थिव शरीर गाव प्रमुखांच्या घरासमोर ठेवले होते. आमचे भाऊबंद भीतीने थरथर कापत होते. वातावरणात सारीकडे दु:खाची कळा पसरली होती. त्या मांत्रिकाचा मृतदेह स्मशानभूमीत अंत्यविधिसाठी नेला. चितेवर ते शरीर ठेऊन अग्नि संस्कारास प्रारंभ करताच एक मोठे आश्चर्य घडले. त्या मांत्रिकाच्या मृत देहात चैतन्याचा

 

संचार झाला. तो त्याचे अग्नि पासून रक्षण करण्यासाठी आरडा ओरड करू लागला. श्रीपादाच्या कृपेने त्या मांत्रिकातील दुष्टभाव अग्निचा स्पर्ष होताच जळून खाक झाला. आणि एक शुध्दात्मा त्या लाकडामधून बाहेर आला. हे सगळे करण्यामागे श्री स्वामींची अगाध लीला दिसून येते; ते सज्जनांचा उध्दार आणि दुर्जनाना योग्य ते शासन करीत असतात.

तो मांत्रिक चितेवरून उठून त्या गाव प्रमुखांच्या घरी उडया मारीतच आला. आम्ही सर्वांनी जमून त्या मुख्याच्या घरी दत्त महात्म्य वर्णन करणारे कीर्तन केले. त्यानंतर "दत्ता दिगंबरा, श्रीपाद वल्लभ दिगंबरा" या भजनाने सारा आसमंत भरून टाकला. श्रीपाद प्रभूंच्या स्थूल रूपातील आणि सुक्ष्म रूपातील दिव्य किरण सारे वातावरण अत्यंत शांत आणि पवित्र करीत होते. सारी

ब्रह्मांडे या दिव्य किरणांनी पवित्र झाली होती. स्वामींच्या सच्चिदानंद अद्वैत स्वरूपात असलेला महाकारण देह महत विश्रांतीत होता. त्यातून निघणारे दिव्य किरण सायुज्य, सालोक्य आणि सामिप्य मुक्ति प्रदान करणारे होते. अवधूत, अंशावतार आणि महासिध्दि प्राप्त महायोगी सुध्दा या दिव्य किरणांनी पवित्र होत होते. श्रीपादांचे अत्यंत श्रध्दा आणि भक्तियुक्त अंत:करणाने नामस्मरण केल्यास, अगोचर असलेले स्वामी प्रकट होऊन सर्वांना दर्शन देत. लहान बाळास आपल्या आईच्या कुशीत जसे आह्लाददायक आरामदायक वाटते तसेच श्रीपादांच्या चरणांवर नतमस्तक होणाऱ्या भक्तांना वाटत असे. अत्यंत पापी असलेला तो मांत्रिक श्रीपाद वल्लभांच्या नामस्मरणांच्या संकिर्तनात रंगून गेला. त्याला श्रीपादवल्लभ दिगंबर अवस्थेत असल्या सारखे दिसत होते त्याला वाटले की

 

आपण केलेल्या पापांचे कर्मफल म्हणून स्वामी तसे दिसत आहेत. किती तरी सर्पांच्या त्याने आपल्या मंत्र विद्येने आहुति दिल्या. अनेक महान संन्यासी व दिगंबर विभूतींना त्याने त्रास दिला होता. या सर्वांचा त्याला पश्चाताप झाला होता. त्याला श्रीपाद प्रभूंच्या दिव्य स्वरूपाची कल्पना आली होती तो श्रीपादांच्या चरणांवर नतमस्तक झाला. जेंव्हा त्याच्या मनाचे परिवर्तन झाले तेंव्हा त्याचा द्वेषाग्नी शांत झाला. श्रीपाद प्रभूंनी आपले उत्तरीय त्याला पांघरण्यास दिले. ते घेतल्यावर तो मांत्रिक अत्यंत आनंदाने नाचू लागला. सुर्योदय होण्यापुर्वीच त्या ग्राम प्रमुखाच्या धाकटया मुलास उत्तम दृष्टी प्राप्त झाली. श्रीपाद प्रभूंच्या नैवेद्याच्या दुधाने मोठ्या मुलास शुध्द आली आणि थोडया वेळातच तो पूर्ववत निरोगी झाला. तो मांत्रिक सर्व संग परित्याग करून साधु होऊन दूरदेशी निघून गेला. गावातील पंचानी

त्या वृद्ध दंपतीची जमीन त्यांनाच मिळावी असा न्याय दिला.

तीन सर्पराज असलेल्या वारूळातून तीन औदुंबराची झाडे उगवली. कांही काळानंतर दत्तानंद अवधूत संन्यासी आमच्या घरी आले. हे संन्यासी औदुंबर वृक्षाखाली ध्यान करीत असत. एका शनीवारी सायंकाळी श्रीपादांच्या नैवेद्यासाठी केलेला हलवा प्रसाद म्हणून सर्वांना दत्तानंदानी दिला. श्रीपाद श्रीवल्लभ लहान असताना त्यांची आई त्यांच्या आजोबांच्या घरात असलेल्या औदुंबराच्या वृक्षाखाली बसून चांदीच्या भांडयात हलवा देत असे. श्रीपाद श्रीवल्लभ, श्री नृसिंह सरस्वती आणि श्री स्वामी समर्थ या तीन नांवाचे संकेतरूप असे तीन औदुंबर वृक्ष होत. (या संकेतरूपी वृक्षाच्या बीजांचे फलस्वरूप म्हणून पीठीकापुरम गांवात एक औदुंबर वृक्ष

आहे. या पुण्यप्रद वृक्षाच्या गर्द छायेत वृक्षाखाली श्रीपाद श्रीवल्लभांच्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा करून त्यावर एक सुंदर से मंदिर बांधण्यात आले. या मंदिराची अशी ख्याती आहे की जे भक्त शनीवारी प्रदोषकाळी हलव्याचा नैवेद्य दाखवतील त्याना सर्व सुखे, संपत्ती आणि अनन्य समाधान प्राप्त होईल.) श्रीपाद श्रीवल्लभांचा हा वृतांत ऐकून माझी भक्ती अजून दृढ झाली आणि मी पुढच्या प्रवासासाठी कुरूगड्डीच्या दिशेने निघालो.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -17

## श्रीनामानंदाचे दर्शन

मी कुरुगड्डीला जात असताना मार्गात एक स्त्री केस मोकळे सोडून विचित्र हास्य करीत माझ्या जवळ आली. तिची मन:स्थिती बरोबर नसल्याने ती काही तरी अस्पष्टसे ओरडत होती. ती माझ्याजवळ येताच मला तिची अत्यंत भीती वाटून माझे हात पाय थरथर कांपू लागले. तिच्या मागोमाग हातात काठी घेऊन दोन व्रूच्र बलिष्ठ पुरुष येत होते. त्या स्त्रीने माझ्या पायावर डोके ठेऊन तिचे त्या दोन राकट पुरुषांपासून रक्षण करण्याची

विनंती केली ते दृष्य पाहून माझा चेहरा पांढरा पडला. माझ्या सारखा घरादारा पासून दूर आणि पर प्रांतात असलेला ब्राह्मण, त्या स्त्रीचे रक्षण कसे करू शकणार होता ? त्या वेळी माझ्या तोंडून अचानकपणे उद्‌गार निघाले "हे माते ! तुला घाबरण्याचे मुळीच कारण नाही. या दुष्ट, दुराचारी लोकांपासून श्रीपाद श्रीवल्लभ तुझे नक्कीच रक्षण करतील. तू निर्भयतेने उठून उभी रहा. त्या स्त्रीच्या मागे आलेले पुरुष माझ्याकडे आश्चर्याने पहात होते. त्या दोन बलशाली पुरुषांच्या तुलनेत माझी शरीरयष्टी अगदीच किरकोळ होती तरी माझे धैर्य आणि दृढतेने उच्चारलेले आश्वासन ऐकून ते आश्चर्यचकित झाले. ते म्हणाले,"हे ब्राह्मणा ! आम्ही या दुराचारी स्त्रीला मारण्यासाठी आलो आहोत. तू जर मध्ये पडलास तर तुला सुध्दा मारून टाकू. तू चांगल्या बोलाने आमच्या मार्गातून दूर हो." त्या दुष्टांचे हे वक्तव्य ऐकून

माझ्यात एका अद्भूत शक्तीचा संचार झाला आणि मी म्हणालो,"अरे, ब्राह्मण कुलात जन्म घेऊन निर्लज्जपणे गायीचा वध करून, गोमांस भक्षण करून, मदिरापान करणाऱ्या तुमच्या सारख्या दुर्जनांना माझ्या ब्राह्मणाचा आणि या निरपराध स्त्रीचा वध करणे काहीच कठीण नाही." मी पुढे येणाऱ्या सर्व परिस्थितीस सामोरे जाण्यास तयार होतो. मी पुढे त्यांना म्हणालो "तुम्ही या स्त्रीचा वध केल्यास तत्काळ कुष्ट रोगाने त्रस्त व्हाल. सर्व रोगांमध्ये हा अत्यंत भयंकर असा रोग आहे. त्याला तुम्ही स्वत: आपल्या कर्मांनी आमंत्रण देत आहात याची मला कीव येते. मी हे सारे तुमच्या हितासाठी सांगत आहे." माझे हे वक्तव्य ऐकून ते आपले सारे धाडस हरवून अगदी निस्तेज झाले. मी सांगितलेली त्यांच्या बद्दलची विधाने खरी असल्याने, माझी भविष्यवाणी नक्कीच खरी होईल असा त्यांना दृढ विश्वास वाटला.

त्यांनी आपल्या चुका मान्य केल्या. ज्योतिष्य शास्त्राचे काहींच ज्ञान नसलेला मी त्यांच्या दृष्टीने एक विद्वान भविष्यवेत्ता ठरलो . जवळच असलेल्या एका वृक्षाच्या छायेत आम्ही बसलो मी त्यांना त्यांचा जीवनवृतांत सांगण्याची विनंती केली. ते म्हणाले "महाराज आपण त्रिकालदर्शी आहात. आपणास अज्ञात असे या पृथ्वीवर काय आहे ? आपण विचारले म्हणून सांगतो. आम्ही दोघे सख्खे बंधु. आमचा जन्म ब्राह्मण कुलात झाला परंतु ब्राह्मणत्व आम्ही पूर्णपणे विसरून गेलो आणि भ्रष्ट झालो. गाईचे मांस खाण्यात आम्हास आनंद वाटे. त्यातच मदिरापानाचे भयंकर व्यसन आम्हास जडले. या सर्व दुर्गुणांचा व्यभिचारी वर्तनाने कहरच झाला. या सर्व दुराचारामुळे आम्ही दुरात्मा झालो. समोरील टेकडीवर पद्मासन घालून बसलेल्या या स्त्रीस पाहून आमच्या मनांत वाईट विचार आले परंतु तिने स्पष्ट नकार

दिल्याने आमचा अभिमान दुखावला व आम्ही रागाने तिच्या मागे निघालो. परंतु आमच्या सुदैवाने आपणा सारख्या महान पुरुषाच्या दर्शनाचा लाभ झाला." तेंव्हा मी म्हणालो "बाबांनो काय चांगले, काय वाईट आहे याचा निर्णय करणारी सद्सत विवेक बुध्दि देवाने मानवाला दिली आहे. चांगल्या मार्गाने आपण गेल्यास चांगली फळे मिळतील, वाईट मार्गाने गेल्यास वाईट अनुभव येणार, यात शंकाच नाही. ही स्त्री सदाचारी असल्याने तिने तुमचे म्हणणे मान्य केले नाही. तुमची दृष्टी दोषपूर्ण असल्याने तुम्हाला ती स्त्री दुराचारिणी वाटली. तुम्ही तिच्याकडे वाईट भावनेने गेला होता परंतु आता तुम्हास आपल्या वाईट कर्माचा पश्चाताप होतो आहे. तुमची पापे परमेश्वर क्षमा करेल किंवा नाही ते मी सांगू शकत नाही. एक शुभ वार्ता मात्र सांगतो, त्रैलोक्याचे आराध्य दैवत असलेले त्रिमूर्ति स्वरूप

असणारे श्री दत्तप्रभू सध्या मानव रूपात श्रीपाद श्रीवल्लभ या नावाने कुरुगड्डी या गावी वास्तव्यास आहेत. त्यांचे दिव्य चरण तुमचा उध्दार करतील. त्यांच्या अनेक दिव्य लीला मी ऐकल्या आहेत."

ती स्त्री म्हणाली, "आपण माझे या दुष्ट पापी लोकांपासून रक्षण केलेत. आपण मला पित्यासमान आहात. मी एक उच्च ब्राह्मण कुलात जन्मले. अगदी लहान वयातच माझा विवाह झाला. माझे दुर्भाग्य असे की माझा पती माझा अतिशय छळ करीत असे. मी मात्र त्याची मनोभावे सेवा करीत असे. तो माझ्यावर नको ते दोषारोपण करीत असे ज्या मुळे मला अत्यंत मानसिक पीडा होई. त्याचे आईवडिल, मोठी माणसे त्यास समजावण्याचा खूप प्रयत्न करीत. परंतु तो कोणाचेच ऐकत नसे." हे सांगनाना तिच्या डोळयातून घळ-घळ

अश्रू वाहू लागले. थोडया वेळाने तिने स्वत:स सावरून घेतले व पुढे सांगू लागली, "आमच्या गावात एक मांत्रिक आला होता. त्याला ज्योतिषशास्त्राचे चांगले ज्ञान होते. त्याला माझ्या सासू सासऱ्यांनी बोलावून घेतले. त्याने माझी कुंडली मांडून, चित्रविचित्र पूजाअर्चा करून म्हणाला, "ही नीच जातीची स्त्री आहे. तिच्या हातून अनेक अमंगल कार्ये घडली आहेत. त्यामुळेच तिच्या पतीस नपुंसकत्व प्राप्त झाले. तिला घरातून बाहेर काढल्यावर तुमचे सारे गृहदोष नाहीसे होतील व माझ्या पूजाअर्चा फलित होतील. तिचा पती सुध्दा चांगला सशक्त होईल. नंतर तुम्ही त्याचा विवाह दुसऱ्या कन्येबरोबर लावून द्या. त्यांना यथाकाली संतती प्राप्त होईल."

 

त्या ज्योतिष्याच्या सांगण्यावर दृढ विश्वास ठेऊन माझ्या सासू सासऱ्यांनी मला घरातून घालवून दिले. त्यांनी केलेल्या छळामुळे मी अत्यंत त्रासून गेले होते. मला काहीच मार्ग नसल्याने मी माहेरी जाण्यास निघाले. परंतु तेवढयात तो मांत्रिक आला आणि त्याने मला आडवले व वाईट नजरेने माझ्याकडे पाहू लागला. मला त्याच्या डोळयात दुष्ट वासनेचे ज्वलंत अंगारे दिसले. मी अत्यंत क्रोधायमान झाले. माझ्या शरीरात भद्रकालीची शक्ति प्रगट झाली होती. मी जवळच पडलेला एक मोठ दगड उचलला आणि त्या मांत्रिकाच्या शिरावर मारला. त्या भयंकर माराने मांत्रिकाचे डोके फुटून तो तत्काळ मृत्यूमुखी पडला. माझ्या शीलरक्षणासाठी मला दुसरा मार्ग नसल्याने मी तो दगड मारला होता. परंतु दुर्दैवाने माझ्या हातून एका ब्राह्मणाची हत्या झाली होती. माझे मन अत्यंत अशांत झाले होते. काय करावे, कोठे जावे

ते कळत नव्हते. मी माहेरी जाण्याचा विचार केला परंतु तेथे जाण्याने. माझ्या समस्यांचे समाधान होणार नव्हते. माझ्या आईवडिलांनी प्रेमाने माझा संभाळ केला असता. परंतु माझे बंधु, वहिनी, भावजयी माझ्याशी चांगले वागतील याची खात्री नव्हती. मांत्रिकाने मला दिलेला त्रास कोणाला सांगणार होते ? मांत्रिकाची केलेली हत्या गावातील सर्व लोकांनी पाहिली होती. अशा बातम्या आगीप्रमाणे चोहीकडे पटकन पसरतात. या आवारातच एक औदुंबराचे झाड होते. हे झाड दत्त प्रभूंना अत्यंत प्रिय असल्याचे मी ऐकले होते. त्या झाडाखाली बसले असताना मला गाढ निद्रा लागली. थोडया वेळाने जागी होऊन पाहिले तर माझ्या दोन बाजूस दोन नाग माझे रक्षण करीत होते. मी त्या दोन्ही नागांना नमस्कार केला तेंव्हा ते नाग दुसरीकडे निघून गेले. मी दत्त दिगंबर, दत्त दिगंबर, जय गुरुदेव दत्त असा जप करीत होते.

 

दत्त प्रभूंचे नुसते स्मरण केले तरी ते भक्तांच्या मदतीसाठी धावून येतात असे मी ऐकले होते. माझ्या भाग्याने औदुंबराच्या कृपाछायेत असताना मला श्रीपाद प्रभूंचे कृपाछत्र माझ्या शिरावर असल्याची अनुभूती आली. मी नामस्मरण करीत असताना एक वाटसरु त्या वृक्षाच्या छायेत विश्रांतीसाठी थांबला मी भयभीत होऊन त्याला विचारले, "तू कोण आहेस ? तू येथून निघून जा. तू गेला नाहीस तर एक दगड घेऊन तुला मारून टाकीन. थोडया वेळापूर्वीच मी एका मांत्रिकाला मारले होते." तो वाटसरू म्हणाला "माई, मी रजक (धोबी) कुलात जन्मलेला रविदास, श्री दत्त प्रभुंचा भक्त आहे. मी कुरवपुरात रहात असे. श्री गुरुदत्त श्रीपाद श्रीवल्लभ रूपात भूतलावर अवतरले असून सध्या ते कुरवपूर क्षेत्रात वास्तव्य करीत आहेत. दूर दूर पसरलेल्या दत्त भक्तांना ही वार्ता कळावी म्हणून ते नविन नविन लीला

 

करीत असतात. मी सध्या कुरवपूरला जात आहे. तुझी इच्छा असल्यास माझ्या बरोबर ये. कुरवपूर येथून जवळच आहे. मी माझ्या भावाकडे जाऊन तेथून पुढे कुरवपूरला जाईन." तेव्हा मी म्हणाले, "तुमच्या बोलण्यावर मी कसा विश्वास ठेवू ? तुम्ही सांगत असलेले श्रीपाद श्रीवल्लभ कोण आहेत हा विषय जाणून घेण्याची सुध्दा मला गरज नाही. ते जर दत्तमूर्ती असते तर त्यांनी माझे रक्षण केले असते. ते स्वत: श्रीदत्त गुरु आहेत हे सिध्द करण्याची जवाबदारी त्यांचीच आहे. मी श्रीपाद प्रभूंचे नामस्मरण करीत नाही परंतु श्री दत्तात्रेयांचेच नामस्मरण करते. यावर जे घडेल ते मी पाहीन. तुम्ही तत्काळ येथून निघून जा नसता कांही तरी प्रमाद घडेल." माझे वक्तव्य ऐकल्यावर तो गृहस्थ रोहिदास दत्तदिगंबर, श्रीपाद श्रीवल्लभांचे नामस्मरण करीत निघून गेला. त्यानंतर एका टेकडीवर मी पद्मासन

घालून ध्यान करीत बसले. त्याच वेळी हे दोन दुष्ट तेथे आले. त्यांची माझ्यावर विषारी नजर पडली आणि ते माझ्या मागे लागले. आपण माझी या दोन कामी दुष्टांपासून रक्षा केली." तेव्हा मी म्हणालो, "हे माते श्रीपाद प्रभूंच्या कृपेने तुझे रक्षण झाले. ते अंतर्यामी असून कालातीत आहेत. या सृष्टीमध्ये विविध कालावधित घटना घडत असतात. या सर्व घटनांच्या मागे ते स्वत: कारणरूपाने स्थित असतात. या सृष्टीत कारण नसलेले कोणतेच कर्म दिसत नाही. श्रीपाद श्रीवल्लभ स्वामींना निर्गुण, सगुण, निराकार, साकार यासारख्या कोणत्याच अवस्थेत कोणीच जाणू शकत नाही. प्रत्यक्ष वेदांनीसुध्दा त्यांच्या समोर हात टेकले व नेति-नेति, आम्ही जाणत नाही असे म्हटले आहे. वेदांची ही अवस्था झाली तर सामान्य भक्त त्यांच्या बद्दल काय जाणू शकेल ? त्यांच्या स्वरूपाचे ज्ञान त्यांना

स्वत:लाच असणार यात तिळमात्र संशय नाही. आपण मात्र त्यांचे नामस्मरण करीत गेल्यास त्यांचा अनुग्रह नक्कीच होतो आणि सर्व दु:खातून आपली मुक्तता होते." मी, दोन्ही ब्राह्मण आणि एक ब्राह्मणी-सुशीला आम्ही चौघे मिळून कुरुगड्डीस जाण्यास निघालो. मार्गात आम्ही श्री दत्तप्रभू आणि श्रीपाद श्रीवल्लभांचे भजन करीत, नामस्मरण करीत जात होतो. रस्त्यावरील लोकांना आम्ही भजन मंडळातील लोक असल्यासारखे वाटत होते. मार्गात असलेल्या नामानंद स्वामी या थोर महात्म्यांच्या आश्रमात पोहोचलो.

# श्रीपाद प्रभूंचे रूप परिवर्तन आणि शिष्य नामानंदास अनुग्रह

श्री नामानंद स्वामी हे त्रिकालज्ञानी महात्मा पुरुष होते. त्यांनी आमचे मोठ्या आदरपूर्वक स्वागत केले. त्यांनी आपला परिचय देण्यास सुरुवात केली. ते म्हणाले, "माझ्या वडिलांचे नांव मायन्नाचार्युलु आणि माझे नांव सायन्नाचार्युलु. आमचे गोत्र भारद्वाज आणि आम्ही वैष्णव संप्रदायाचे आहोत. मी संन्यास दीक्षा घेतल्यावर माझे नांव नामानंद असे ठेवले गेले. संन्यासोत्तर मी पूर्ण वैराग्य धारण करून पुण्यक्षेत्र आणि सिध्दतीर्थांच्या यात्रा केल्या, नंतर सद्गुरुंच्या शोधात निघालो. फिरत फिरत मी पीठीकापुरम् येथे येऊन पोहोचलो. आम्ही वैष्णव असल्याने श्री विष्णूचीच आराधना करतो. आमचे सोंवळे कडक असते आणि आचार विचार उच्च असतात.

पीठीकापूरम् येथील कुंती-माधवाचे दर्शन घेऊन बाहेर आल्यावर समोर एक चांडाळ उभा असलेला दिसला. चांडाळाचे दर्शन आम्ही वाईट समजतो. तो चांडाळ समोर येऊन उच्च स्वरात म्हणाला "आमची दक्षिणा देऊन पुढे जा." मी आश्चर्याने त्याच्याकडे पहातच राहिलो. गावातील सर्व लोक हा प्रकार पहात होते. कलियुगामुळे असा विपरीत प्रकार घडत असल्याचे सर्वांना वाटत होते. तो चांडाळ मदिरापान करून श्री वैष्णवांवर अत्याचार करीत होता. एवढयात नामानंद त्यास म्हणाले,"अरे चांडाळा, तू कोण आहेस ? मी एक वैष्णव ब्राह्मण आहे. माझे नांव नामानंद आहे. तू मला दक्षिणा मागणे योग्य वाटत नाही." त्या चांडाळाचे डोळे लाल झाले होते. त्याचा भयंकर चेहरा कोणासही भय वाटावे असा होता. नामानंदाच्या शांत भाषणामुळे तो अधिकच क्रोधित झाला होता. तो चांडाळ नामानंदांना म्हणाला "तू

सद्गुरुच्या शोधात वेडयासारखा फिरत आहेस. तू मला ओळखत नाहीस. मीच तुझा सद्गुरु आहे. मीच तुला संन्यासोत्तर "नामानंद" असे नांव दिले. तू तुझ्याजवळ असलेली सारी संपत्ती मला गुरुदक्षिणा म्हणून अर्पण कर आणि सर्वासमक्ष मला साष्टांग नमस्कार करून गुरु म्हणून माझा स्वीकार कर. तू जर असे केले नाहीस तर मी तुझा सर्वनाश करीन. तुझ्या शरीराचे तुकडे करून तुला मरणप्राय यातना देईन." श्री नामानंदाबरोबर त्या चांडाळ वर्णातील व्यक्तीने अतिशय कडक व्यवहार केला होता. तो पुढे म्हणाला, "मी सांगेन तसे तुला वागले पाहिजे. तू देवांची कितीही आराधना केलीस तरी कोणी तुला मदत करणार नाही." एवढे बोलून तो चांडाळ नामानंदांवर चाल करून आला.

नामानंदांच्या मनांत नसताना, केवळ दुसरा उपाय नसल्याने त्यांनी त्या चांडाळाचे पाय धरले. त्यांचे सर्वस्व त्या चांडाळाला गुरुदक्षिणा म्हणून अर्पण केले. देवाची आपण जी कल्पना करतो त्यापेक्षा तो कसा विपरीत असतो याची कल्पना नामानंदाना आली. परंतु तितक्यातच तो चांडाळ स्वामींना दिव्य मंगल अशा स्वरूपात दर्शन देत असल्याचा भास झाला. त्याच्या त्या दिव्य नेत्रातून अनंत दया करूणा यांचा वर्षाव झाल्यासारखा वाटत होता. दिव्य मंगलमूर्ती असलेल्या त्या भगवानांनी म्हटले "मी श्री दत्त आहे. सध्या श्रीपाद श्रीवल्लभांचे स्वरूपात मी पिठीकापूरम येथे अवतरीत झालो आहे. तू माझा भक्त आहेस आणि मी तुझा सद्गुरु आहे. तू माझे सर्वस्व झाला आहेस. मीच सत्, चित्, आनंद आहे. तू उद्यापासून नामानंद नाम धारण करून धर्मप्रचार कर. तुला सुख आणि शांती प्राप्त

होईल. शेवटी माझ्या पदास येशील" असे सांगून चांडाळाच्या वेशात असलेले दत्त प्रभू अंतर्धान पावले.

## श्री नामानंद स्वामींना श्रीपाद श्रीवल्लभांकडून भोजनाचे आमंत्रण

अशा प्रकारे नामानंद संन्यासी पिठीकापुरम येथील श्रीपाद श्रीवल्लभांचे दर्शन घेण्यासाठी पुढे निघाले. त्यांना मार्गात कोणी भिक्षा दिली नाही. भूकेने त्यांचा जीव व्याकूळ होत होता. सर्वजण त्यांच्या बद्दल शंका घेत होते. त्यांना वाटले हा एक वेडा आहे. एक चांडाळ येऊन याच्या कडून गुरुदक्षिणा घेऊन गेला. हा ब्राह्मण असून याने चांडाळाला आपला गुरु केला म्हणून हा अस्पृश्य झाला आहे. म्हणून याला भिक्षा देणे म्हणजे शास्त्र विरुध्द होईल. या विचाराने पीठीकपुरम गावातील

लोकांनी नामानंद स्वामींना भिक्षा घातली नाही. फिरत फिरत ते अप्पळराज शर्मांच्या घरी पोहोचले. अत्यंत भुकेमुळे तोंडातून शब्द बाहेर पडत नव्हते. कसे बसे ते "ॐ भिक्षांदेही" म्हणाले. तेवढयात दार उघडून घरातून श्रीपाद श्रीवल्लभ अन्नाचे भरलेले ताट घेऊन आले. त्यांना ओसरीवर बसवून त्यांनी स्वहस्ते नामानंद स्वामींना खाऊ घातले. केवढे ते भाग्य ! विश्व-नियंता आपल्या भक्ताला स्वहस्ते जेवण भरवित होता. धन्य ते गुरु आणि धन्य ते शिष्य. जेवण झाल्यावर त्या अनंत शक्ती स्वरूप अशा विधात्याने आपला हात नामानंदांच्या शिरावर ठेवला आणि आशिर्वाद दिला "तुला सर्व सिध्दि प्राप्त होतील. कशासाठीही तुला हात पसरावा लागणार नाही. तू कोठेही असलास तरी मी तुझ्याबरोबर अदृष्य रूपाने असेन. मी डोळयांच्या पापणी प्रमाणे तुझे रक्षण करीन." असे आशिर्वाद आणि अभय

वचन दिले. त्या दिवसापासून धर्म प्रसारासाठी संन्यासी होऊन नामानंद भ्रमण करीत होते अदृष्यपणे श्रीपाद प्रभूंचा दिव्य हस्त स्वामींचे रक्षण करीत असे. अशा प्रकारे स्वामींनी आम्हास त्यांच्या आश्रमात स्वत:बद्दलची संपूर्ण माहिती सांगितली.

## चार प्रकारचे जीवनमुक्त प्राणी

नामानंद स्वामींच्या आश्रमात सर्व शिष्य बसलेले असताना एका शिष्याने गुरुंना प्रश्न विचारला, "स्वामी, श्री दत्तांची आराधना केल्याने शीघ्र मोक्षप्राप्ति होते या साठी कांही साधना, मंत्र, विधाने आहेत का ? माझ्या शंकेचे समाधान करून मला कृतार्थ करावे." त्यावर प्रसन्न चित्ताने श्री स्वामी म्हणाले "हे पुत्र, वासना त्याग म्हणजेच मोक्ष आहे. शरीर पतनानंतरच मोक्ष

मिळतो असा नियम नाही. शरीर प्रारब्धानुसार शरीराला विविध अनुभव येत असतात. ज्या सत्पुरुषांचा जीवात्मा मुक्त अवस्थेत असतो त्यांना "जीवन्मुक्त " असे म्हणतात. आपल्या इष्ट देवतेच्या सतत सान्निध्यात राहणे यालाच "सालोक्य मुक्ति " असे म्हणतात. या अवस्थेत साधक इष्ट देवतांच्या लोकांत राहतो. या पेक्षा अधिक पुण्यवान भक्तांना इष्ट देवतांच्या समीप राहण्याचे भाग्य लाभते त्याला "सामिप्य मुक्ति " असे म्हणतात. त्या पेक्षा विशेष पुण्य करणाऱ्या भक्तांना इष्ट देवतांचेच स्वरूप प्राप्त होते त्याला "सारुप्य मुक्ति " असे नामाभिधान आहे. या पेक्षा सुध्दा उच्च स्थिति प्राप्त झाली म्हणजे भक्त , इष्ट देवतांच्या चैतन्यातच एकरूप होऊन जातो. या अवस्थेस "सायुज्य मुक्ति " असे म्हणतात. या अध्यात्मिक चिंतनात दत्तभक्त इहलोकी राहूनच "सालोक्य मुक्तिचा " अनुभव घेत

असतात. ते शरीराने प्रारब्धाचे भोग घेत भोगत असले तरी मनाने ते श्री दत्तप्रभूंच्या चरणांशी सतत निमग्न असतात. त्यांना सदैव श्री दत्त प्रभूंचेच ध्यान असते. सृष्टी धर्म आणि सूक्ष्मसृष्टीतही कालचक्र हे चालूच असते. सृष्टीचा चिद्विलास अंत:दृष्टीने पाहून दत्तभक्त आनंदाने विभोर होतो. स्वार्थरहित योग्याच्या दिव्य शक्तीने विश्व कल्याण होत असते. त्यात त्यांचा निस्वार्थीपणा दिसून येतो. या प्रमाणे हा योगी इहलोकी आपले कल्याण करून "सामिप्य मुक्ति " प्राप्त करून घेतो. असा भक्त श्री दत्त प्रभूंच्या दिव्य लीला अंत:दृष्टीने पाहून त्यांचे मनन चिंतन करून सालोक्य मुक्तिपेक्षा श्रेष्ठत्व प्राप्त करून सर्वोच्च आनंद प्राप्त करून घेतो. जीव शरीर बंधनात असताना त्याला अनेक वासना, इच्छा आपल्या बंधनात ठेवतात. परंतु जेंव्हा त्याला मुक्त अवस्थेचे ज्ञान होते तेंव्हा त्याला खूपच

हलके हलके वाटते. या प्रमाणे इच्छा, वासनारहित लघु जीव आनंदात रममाण असतात. सायुज्य मुक्तिचा लाभ झालेल्या दत्तभक्तांमध्ये श्रीदत्तलीला यथेच्छ मात्रेने प्रगट होतात. या भक्तांना आणखी कांही प्राप्त करून घ्यावे अशी इच्छाच नसते. श्रीदत्तप्रभूंचे दर्शन, स्पर्श, संभाषण आणि अनुग्रह प्राप्त झालेल्या भक्तांना त्यांचे सतत रक्षण मिळत असते. इहलोकात किंवा परलोकात प्राप्त होणारे महदैश्वर्य दोन्ही श्रीपाद श्रीवल्लभ स्वामीच देतात. मानव विविध देवतांना वेगवेगळया स्वरूपात भजतात. ते सर्व देव श्रीपाद प्रभूंचेच दिव्य अंश असतात. त्या त्या देवतांकडून श्रीपाद श्रीवल्लभ त्या भक्तांना अनुग्रह देतात."

## **श्री दत्त आराधनेची विशेषता**

 

यावर मी म्हणलो "आपण विविध रूपात असलेल्या देवांची पूजा अर्चा करावी का श्रीपाद वल्लभांची आराधना करावी ? देव श्रीपाद श्रीवल्लभांपेक्षा वेगळे आहेत ? या बद्दल आपण कृपा करून विश्लेषण करून सांगावे " यावर नामानंद म्हणाले, "एका मुलीचा विवाह होऊन ती आपल्या सासरी गेली. काही महिन्यानंतर त्या मुलीचे मोठे भाऊ तिला भेटायला गेले. मुलीची सासू म्हणाली "तुमची बहिण आमच्या घरी विविध प्रकारच्या चोऱ्या करते. दूध, दही, लोणी, तूप ती चोरून खाते. एखादी चोरी मी सहन केली असती परंतु इतक्या चोऱ्या ?" तेंव्हा त्या बहिणीचा भाऊ तिला म्हणाला ताई तू चोरी करणे सोडून दे. तू केवळ दूध घेत जा म्हणजे तुझी सासु रागावणार नाही दूधात सर्व काही असते. या प्रमाणे एकटया श्री दत्ताची आराधना केल्यास सर्व कांही मिळते. लोक आपल्या आवडीप्रमाणे वेगवेगळया देवांची

आराधना करतात. शिवाची पूजा केल्याने विष्णू प्रसन्न होत नाहीत तसेच विष्णूंच्या पुजेने शिव प्रसन्न होत नाही. सगुण आणि साकार देवांची पूजा केल्याने भक्ताच्या कर्माप्रमाणे फळ मिळते. अनेक जन्मातील केलेल्या पाप-पुण्याचे फळ क्षीण स्थितीत असेल तर पुण्य महाविशेष मध्ये जमा होते. यावेळी श्रीदत्तप्रभूंची भक्ति प्राप्त होते. अशा भक्ताला सर्वसिध्दि प्राप्त होतात. ब्रह्मदेवाने लिहिलेल्या प्रारब्धास कोणी बदलू शकत नाहीत. परंतु श्रीदत्त प्रभूंच्या भक्तांच्या बाबतीत मात्र श्री दत्त ब्रह्मदेवाला आदेश देऊ शकतात. जीवाच्या शारिरीक, मानसिक, अध्यात्मिक स्थितीला श्री विष्णू कारणीभूत असतात. अपरिपक्व अवस्थेत असताना महायोग शक्तीने जीवात प्रवेश केल्यास शरीर, मन, बुध्दि त्या शक्तिस सांभाळू शकत नाहीत आणि अग्निज्वालेचा दाह झाल्यासारखे वाटते. जीवाचे

जीवनमान सुरळित चालण्यासाठी भगवान विष्णु आपणास सहाय्य करतात, ते प्रत्येकाच्या कर्मानुसार. श्रीकृष्ण श्री दत्तप्रभूंचे अभिन्न अंग आहेत. श्रीकृष्णाने गोवर्धन पर्वत अंगुलीवर धारण केला होता. हे सर्वांना ज्ञात आहेच, गोकुळातील साऱ्या गोपी आणि गोप पूर्व जन्मातील महान महान ऋषि होते. त्यांनी रचलेले महान ग्रंथ पर्वत रूपाने अवतरित झाले होते. या महान ग्रंथांचे विभेदन होऊन त्यातून प्रचंड महायोग शक्ति निघते तेंव्हा जीवास खूपच हलके हलके वाटते. या सूक्ष्मस्थितित जीवाला महायोगानंद मिळतो. हा मिळविण्यासाठी कठीण तपश्चर्या लागते. श्रीकृष्ण भगवान आपल्या भक्तांचा, आश्रितांचा संपूर्ण भार स्वतः पेलून घेतात. त्यांचे ग्रंथि विभेदन करून त्यांना शक्ति प्रदान करतात. हे आध्यात्मिक रहस्य आहे. बौध्दिक दृष्टीने पाहिल्यास श्रीकृष्ण गोवर्धन पर्वत उचलून सर्वांचे

रक्षण करीत आहेत असे वाटते. श्री दत्त प्रभूंचा तो संकल्पच होता. परिस्थितीला बदलायचे, परिणाम क्रमाला शीघ्रपणे करण्याचे आदेश ते श्री विष्णूंना देत असत. या प्रक्रियेत भक्तांच्या प्रारब्धामुळे मार्गात येणाऱ्या अडचणी, त्यांचे अनुभव त्यांच्या नकळत त्यांना सुसहय होत असत. श्रीपाद श्रीवल्लभ आपल्या भारी भक्कम विद्यांवर भक्तांचा भार वाहतात. श्रीपाद प्रभू किती दयाळू आणि कारूण्य मूर्ति आहेत ! श्रीपाद प्रभूंच्या अवताराचे मुख्य लक्ष्य त्यांच्या बरोबर सायुज्य स्थिती अनुभवणाऱ्या योग्यांनी एक लाख पंचविस हजार अनुयायी करण्याचा संकल्प केला होता. त्याची पूर्तता करणे हे होते. ते कर्मबंधनाच्या स्पंदनातून सर्वांना मुक्त स्थितीत आणून, रुद्राच्या अंश रूपाने प्रकट होऊन कोटयान् कोटी जन्मानंतर येणाऱ्या त्या जन्मांचा विनाश करून त्या जीवात्म्याला मुक्ति देतात. त्यांच्या मधील

ब्रह्मा, विष्णू आणि रुद्राचा अंश स्फुट होऊन त्या त्या ईश्वरी गुणांनी भक्तांचे रक्षण होते. हे त्या त्या आत्म्याच्या संकल्पाने होत असते. भक्तांनी संकल्प सिध्दिसाठी भक्तिमार्गाचा अवलंब करणे आवश्यक आहे. एकदा पिठापुरम् मध्ये श्रीपाद प्रभूंच्या एका भक्तास , घोडयावर बसत असता घोडयाने पाडून टाकले व पायाने तुडविले. त्याला भयंकर जखमा होऊन तो रक्तबंबाळ झाला. त्या जखमी भक्ताला श्रीपादानी आपला अभय हस्त दर्शविला आणि त्याच क्षणी सर्व जखमा पूर्णपणे बऱ्या झाल्या. जणु कांही झाल्याच नव्हत्या. त्याच दिवशी श्रीपाद श्रीवल्लभांवर दृढ श्रध्दा आणि भक्तीभाव असणाऱ्या एका भक्ताला कल्पना नसतांना शंभर मोहरांनी भरलेला एक हंडा सापडला. श्री वेंकट अप्पयांनी प्रभूंना या घटनेविषयी विवरण करून सांगण्याची विनंती केली. त्यावर श्रीपाद स्वामी

म्हणाले,"मी माझ्या एका अनन्य भक्ताचे आयुष्य वीस वर्षांनी वाढविले. त्याच्या भक्तीवर संतुष्ट होऊन मी त्याला हे फळ दिले होते. आज त्याला शंभर मोहरांनी भरलेला हंडा मिळाला हा त्याचा महत् भाग्याचा दिवस आहे. ज्याची माझ्यावर मनापासून अनन्य भक्ति असते त्याचा मी दास होतो. जे भक्त मला हृदयात प्रस्थापित करतात ते मला अत्यंत प्रिय असतात. त्रिलोकपती परमेश्वर सुध्दा अशा भक्ताच्या आधिन होऊन त्यांच्या बरोबरच संचार करतात."

श्री नामानंद स्वामींच्या दिव्य सत्संगाचा लाभ झाल्याने सर्वांना अत्यंत आनंद झाला. ते दोन ब्राह्मण नामानंदाना म्हणाले,"आम्ही केलेल्या पापांचा आम्हास पश्चाताप होत आहे. आपण आम्हास उपदेश द्यावा" यावर श्रीनामानंद स्वामी म्हणाले "तुम्ही एक-भुक्त व्रत

करा”. कष्ट करून धन संपादन करा आणि त्या धनाचा उपयोग सद्ब्राह्मणांना अन्नदान करण्यासाठी करा. त्यामुळे तुमच्या पापांचे क्षालन होईल. असे वर्तन केल्यास श्रीपादप्रभूंचे प्रत्यक्ष अथवा स्वप्नामध्ये दर्शन होईल. मंत्रदिक्षा मिळाल्यावर सुध्दा तुम्ही सदाचाराने वागले पाहिजे. जर तुम्ही पूर्वीच्या सवयीनुसार पुन्हा दुराचारास प्रवृत्त झाल्यास श्रीपाद स्वामी तुम्हास दुप्पट शिक्षा देतील याचे ध्यान असू द्यावे."

## **दत्तात्रेयांच्या आराधनेचे फल**

 

सुशिला नांवाच्या ब्राह्मण स्त्रीने श्री नामानंदाना विचारले "स्वामी ! संकटातून कशी सुटका करून घ्यावी ?" त्यावर त्या प्रसन्न चित्त नामानंद स्वामींनी सांगितले, "आत्मा हा निरंतर असतो. त्याला जन्म मरण नसते. त्याला अग्नि जाळू शकत नाही, शस्त्र इजा करू शकत नाही. पाणी त्याला भिजवू शकत नाही. वारा त्याला सुकवू शकत नाही. मनुष्य मात्र कोटयावधी वेळा मृत्यु पाऊन पुन्हा जन्म घेतो. तू अनघा देवीचे व्रत केल्यास तू संसारात सुखी होशील. तसेच तू देवी समवेत श्री दत्तात्रेयांची आराधन करून त्यांना संतुष्ट करून घे. असे केल्याने श्री दत्तात्रेय नक्कीच तुझ्यावर अनुग्रह करतील. श्री बापनाचार्युलुंना श्री दत्तात्रेयांचे दर्शन घडले व त्यांनी "सिध्दमंगल" स्तोत्र लिहिले. प्रत्यक्ष दत्ताच्या दर्शनाच्या अनुभूतीने गायिली जाणारी या स्तोत्रातील अक्षरे अत्यंत प्रभावशाली आहेत. त्या अक्षरांमधील चैतन्य हे

 

युगानुयुगे विलसत राहील. या स्तोत्रात व्याकरण दृष्टया कोणताही दोष अथवा त्रुटी नाही. या स्तोत्राचे पठन करण्यासाठी कोणताही विधिनिषेध नाही. मला ते स्तोत्र श्री बापनाचार्युलूच्या मुखातून ऐकण्याचे भाग्य लाभले. हे स्तोत्र माझ्या हृदयावर अंकित झाले आहे.

## सिध्दमंगलस्तोत्र

**1) श्री मदनंत श्रीविभुषीत अप्पल लक्ष्मी नरसिंह राजा । जय विजयीभव, दिग्विजयीभव, श्रीमदखंड श्री विजयीभव ॥**

**2) श्री विद्याधरी राधा सुरेखा श्री राखीधर श्रीपादा । जय विजयीभव, दिग्विजयीभव, श्रीमदखंड श्री विजयीभव**

**॥**

**3) माता सुमती वात्सल्यामृत परिपोषित जय श्रीपादा । जय विजयीभव, दिग्विजयीभव, श्रीमदखंड श्री विजयीभव ॥**

**4) सत्यऋषीश्वरदुहितानंदन बापनाचार्यनुत श्रीचरणा । जय विजयीभव, दिग्विजयीभव, श्रीमदखंड श्री विजयीभव ॥**

**5) सावित्र काठकचयन पुण्यफला भारद्वाज ऋषि गोत्र संभवा ।**

**जय विजयीभव, दिग्विजयीभव, श्रीमदखंड श्री विजयीभव ॥**

**6) दौ चौपाती देव लक्ष्मीगण संख्या बोधित श्रीचरणा । जय विजयीभव, दिग्विजयीभव, श्रीमदखंड श्री विजयीभव ॥**

**7) पुण्यरूपिणी राजमांबासुत गर्भपुण्यफलसंजाता । जय विजयीभव, दिग्विजयीभव, श्रीमदखंड श्री विजयीभव ॥**

**8) सुमतीनंदन नरहरीनंदन दत्तदेव प्रभू श्रीपादा । जय विजयीभव, दिग्विजयीभव, श्रीमदखंड श्री विजयीभव ॥**

 

**9) पीठीकापुर नित्यविहारा मधुमतीदत्ता मंगलरूपा । जय विजयीभव, दिग्विजयीभव, श्रीमदखंड श्री विजयीभव ॥**

परम पवित्र अशा सिध्दमंगल स्तोत्राचे पठन अनघाष्टमीचे व्रत करून केल्यास सहस्त्र सद्ब्राह्मण जेवू घातल्याचे पुण्य प्राप्त होते. तसेच स्वप्नात सिध्द पुरुषांचे दर्शन होते. याच्या पठनाने मनातील सर्व कामना पूर्ण होतात. जे भक्त मन, काया आणि कर्मांनी श्री दत्तात्रेयांची आराधना करून या स्तोत्राचे पठन करतात ते श्रीपाद श्रीवल्लभांच्या कृपेस पात्र होतात. तसेच याच्या नियमितपणे गायनाने सूक्ष्म वायुमंडलातील अदृश्य रूपाने संचार करणाऱ्यास सिध्दी प्राप्त होतात."

 

# श्रीपाद प्रभूंचा सुशिलेच्या पतीस अनुग्रह

श्री नामानंद स्वामींची अमृतवाणी ऐकल्यावर मला एक कल्पना सुचली. मी श्री नामानंदाना म्हणालो. "हे स्वामी, या स्तोत्राच्या पारायणात श्रीपाद प्रभूंच्या दिव्य लीलांचे वर्णन यथा प्रसंग सांगावे अशी आपल्या चरणी नम्र प्रार्थना आहे." आम्हा तिघांवर दयेचा सतत वर्षाव करणाऱ्या स्वामींनी आम्हावर आनंद दृष्टी टाकली आणि आमच्या विनंतीस मूक सम्मती दिली. त्या रात्री आम्ही श्रीपाद प्रभुंचे नामस्मरण केले. स्वामींनी लीला कथन करीत सिध्दमंगल स्तोत्राचे गायन केले. त्या दिव्य अनुभूतीमध्ये रात्र केव्हा संपली ते कळालेच नाही. उष:काल होताच श्रीपादांची मंगल आरती केली. थोडयाच वेळात अन्नसामुग्रीने भरलेली एक बैलगाडी आश्रमात आली. गाडीवान खाली उतरला. त्याने सारी खाद्य

सामुग्री बैलगाडीतून उतरवून आश्रमात ठेवली . नंतर तो सुशिलेस उद्देशून म्हणाला, "थोडयाच वेळात तुझा पती, सासु सासरे दुसऱ्या बैलगाडीतून येतील." त्या गाडीवानाच्या बोलण्यात एक वेगळेच माधुर्य होते. तो दिसण्यास इतर गाडीवानासारखा नव्हता. सारखे त्या गाडीवानाकडे पहात रहावे असे वाटत होते परंतु तो सामान उतरवून, निरोप सांगून त्वरेने निघून गेला. त्या वेळी नामानंद स्वामी ध्यान अवस्थेत होते. त्यातून बाहेर आल्यावर त्यांनी विचारले, "तो गाडीवान कोठे आहे ?" तो सामान ठेवून निघून गेल्याचे आम्ही सांगितले. ते ऐकताच स्वामी म्हणाले "तुम्ही किती भाग्यवान आहात. मीच अभागी आहे." ते पुढे म्हणाले "परमकारुण्यमूर्ति श्रीपाद श्रीवल्लभ आपणासाठी गाडीवानाच्या रूपाने अन्न सामुग्री घेऊन आले. त्यांनी तुम्हाला दर्शन दिले." नंतर सुशिले कडे वळून म्हणाले, "हे सुशीले ! तुझे नशीब

उदयास आले. तुझ्या पतीचे नपुंसकत्व गेले. तुझे सासुसासरे आणि पती दुसऱ्या बैलगाडीतून येत आहेत."

त्रिकालज्ञानी नामानंदानी सांगितल्या प्रमाणे सारे घडून आले. सुशिला आपला पती व सासु सासऱ्या बरोबर आपल्या घरी गेली. मी आणि त्या दोघा ब्राह्मणांनी श्रीस्वामींना कुरुगड्डीस जाण्याची अनुज्ञा मागितली. श्री नामानंद स्वामींचा आशिर्वाद घेऊन आम्ही कुरुगड्डीच्या मार्गाने निघालो.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -18

# संत रविदास आणि श्रीपादांचे दिव्य मंगल दर्शन

मी त्या ब्राह्मणद्वया समवेत यथाकाली कुरुगड्डीस येऊन पोहोचलो. अनंतकोटी ब्रह्मांड नायक असलेले आदि, मध्य आणि अंत नसलेले चतुर्दश भुवनांचा सार्वभौम असे लीलावतारी भगवान-श्रीपाद प्रभु कृष्णा नदीत स्नान करून बाहेर येत होते. त्यांच्या दिव्यमंगल स्वरूपाच्या अकस्मात दर्शनाने आम्ही अगदी भारावून गेलो. त्यांच्या नेत्रांमधून अपार प्रेम, करुणा, वात्सल्य

ओसंडून वाहात होते. ते माझ्या जवळ आले. मी भांबावून जाऊन काय करावे हे मला सुचलेच नाही. ते स्वत:च मला नमस्कार करण्यास सांगत होते. मी त्याना चरणस्पर्श केल्यावर त्यांनी कमंडलुतील पवित्र जल माझ्या अंगावर शिंपडले. मी दिड़मूढ झालो. ते आपल्या मधुर वाणीने म्हणाले "बेटा शंकरभट, मी तुझ्यावर प्रसन्न झालो आहे." त्या मधुर वाणीचे वर्णन मी शब्दात करू शकत नाही. त्यांची वात्सल्यपूर्ण दृष्टी माझ्यावर पडली आणि मी कृतार्थ झालो. समस्त भूतलावरील आपल्या अनंत शक्तीने विराजमान असणाऱ्या श्रीपादांनी आपला वरदहस्त माझ्या शिरावर ठेवला . माझी कुंडलिनी शक्ति जागृत झाली आणि मला दिसणारी सारी दृष्य सृष्टी अंतर्धान पावल्यासारखी अनुभूती आली. हजार सागर एकदम येऊन मला अलिंगन देत असल्याचा भास झाला अनंत शक्तीचा विद्युत प्रवाह

माझ्या नसा नसांमधून वाहत गेल्यासारखा वाटून मोठा दाह झाला. माझे डोळे आपोआप मिटले गेले, नाडी आणि हृदयस्पंदन दोन्ही थोडया वेळासाठी थांबले होते. माझे मन निर्विकार आणि निश्चल होऊन अनंत शून्यात हरवले. माझ्या हृदयातील चैतन्य अनंत अशा विश्वचैतन्यात विलीन झाल्यासारखे भासले. या अवस्थेत मी अत्यंत आनंदात होतो. त्यांचे वर्णन शब्दाने करता येणे कठीण आहे. या अत्युच्च आनंदाच्या अवस्थेत माझ्यातून कोटयान् कोटी ब्रह्मांड, सृष्टी , स्थिति, लय पावत आहेत असे मला भासमान झाले. मी यापासून भिन्न नाही असा दृढ विश्वास वाटत होता. 'मी' चा लय झाल्यामुळे मी अव्यक्त अशा आनंदात होतो. हे सर्व मला चित्र विचित्र वाटत होते. तेवढयात श्रीपादप्रभूंनी आपल्या कमंडलूतील जल मोठ्या प्रेमभावाने माझ्यावर प्रोक्षण केले. आणि मी सहज स्थितीत आलो. संपूर्ण

विश्वाचे आदिगुरु असणारे श्रीवल्लभ माझ्याकडे हजार मातांचे वात्सल्य डोळयात आणून पहात मंद मंद स्मित करीत होते.

## यवनांना श्रीवल्लभांचे दर्शन

माझ्या बरोबर आलेल्या ब्राह्मण द्वयांना श्रीपाद प्रभूंबरोबर बोलणे किंवा पादस्पर्श करण्याचे धैर्य नव्हते. श्रीपाद स्वामी मला म्हणाले "तुझ्या बरोबर आलेले हे दोन अपरिचित कोण आहेत ?"

मी म्हणालो "प्रभू आपल्या दिव्य चरणांचे दर्शन घेऊ इच्छिणारे हे दोन ब्राह्मण आहेत." त्यावर प्रभु म्हणाले "हे ब्राह्मण दिसत नाहीत, गोमांस खाणारे यवन

दिसतात. खरे का खोटे हे तू त्यांनाच विचार. एवढयात ते ब्राह्मण म्हणाले "आम्ही ब्राह्मण नाही यवन आहोत यात संदेह नाही. आम्ही कुराण वाचतो" त्यांच्या या वक्तव्यावर मी स्तंभीतच झालो. "श्रीपाद वल्लभ नावाने माया वेषाने संचार करणाऱ्या जगत्प्रभु श्री दत्तात्रय स्वामींना ओळखणे अनेक जन्माचे पुण्यफल आहे. त्या स्थिर भावात भक्तीभाव संपूर्ण रूपाने वाटणे म्हणजे महद्भाग्य आहे. गोमातेत सर्व देवता वास करतात. गायीविना घर स्मशाना सारखे असते. श्रध्देने गोसेवा करणारे मला खूप आवडतात. गायीचे दूध पुष्टीदायक आणि तुष्टीदायक असते. ब्राह्मण जन्म घेऊन गोमांस खाणारा शिक्षेस पात्र असतो. यज्ञ याग करताना शेळीचे बलिदान दिले जाते. यज्ञ पशु म्हणून शेळी अथवा इतर पशुसुध्दा त्यांच्या नीच योनीतून विमुक्त होऊन पुढे उत्तम जन्म प्राप्त करतात. यज्ञ पशुला चांगला जन्म

 

मिळावा म्हणजे यज्ञ करणारा महायोगी तपोबल आणि योग बलाने समृद्ध असावा लागतो. जर तो योगी असा समर्थ नसेल तर त्याला प्राणी हत्या केल्याचे पापच लागते. देश कालानुसार धर्म-कर्मपध्दतींमध्ये थोडा थोडा बदल होत असतो. यवन असणाऱ्या तपस्वींनी गोमांस भक्षण केले तरी परमेश्वरार्पण बुध्दीने केलेले कर्म गाय आणि तिच्या संततीस उत्तम जन्मच मिळवून देते. परंतु असे न केल्यास मात्र महापाप लागते म्हणून गोहत्या शास्त्रानुसार महान पाप आहे. कौरव पांडवाच्या युध्दासाठी कोणते क्षेत्र धर्मक्षेत्र आहे याचा शोध करण्यासाठी अर्जुन व श्रीकृष्ण निघाले. त्यांना एका शेतात शेतकरी पाणी देत असलेला दिसला. पाण्याचा प्रवाह अडविण्यासाठी त्याला एका मोठ्या दगडाची आवश्यकता होती. तो अशा दगडाच्या शोधातच होता इतक्यात त्याचा मुलगा वडिलासाठी जेवण घेऊन आला.

 

जेवण झाल्यावर, पाणी अडविण्यासाठी जेंव्हा दगड मिळाला नाही तेंव्हा त्याने आपल्या मुलाचा वध केला आणि त्याचे मृत शरीर दगडाप्रमाणे पाणी अडविण्यासाठी ठेवले . त्यावेळी शेतकरी आणि त्याचा मुलगा या दोघात मारण्याची क्रिया करतांना कोणताही भाव नव्हता. ते दोघे निर्विकार होते. शेत पिकवून सर्वांना आहार द्यावा एवढेच त्या शेतकऱ्यास ज्ञात होते. तोच त्याचा धर्म होता. शेतकरी फळाची आशा न करता आपले कर्म अत्यंत श्रध्दाभावाने करीत होता. या शेताची जागा श्रीकृष्णांनी धर्मक्षेत्र म्हणून निवडली. अरे नाममात्र ब्राह्मणा, गोमांस भक्षण करणे केव्हाही बरोबर नाही. पूर्वपुण्याईने आणि पूर्वपितृदेवतांच्या प्रार्थनेने तसेच माझ्या अपार कारूण्याने तुम्हाला माझ्या दर्शनाचा लाभ झाला. हेच तुमचे महद्भाग्य समजा. तुम्ही केलेला नमस्कार मी स्वीकारीत नाही. तुम्ही मला स्पर्श करू

नका. माझ्या कमंडलूतील पाणी तुमच्या अंगावर घालणे शक्य नाही. तुम्ही येथून तत्काळ निघून जा. तुम्हाला अन्न वस्त्र मिळण्याची सोय केली आहे. तुम्ही यवन स्त्रीबरोबर विवाह करून यवनाप्रमाणे राहा. तुमच्या हातून मारल्या गेलेल्या गायी पुढील जन्मी तुमची संतती होऊन जन्मास येतील आणि तुमचा छळ करून तुमच्या पैशावर सुखी होतील. माझ्या दर्शनाने पुनित झाल्यामुळे कांही जन्मानंतर तुम्ही बडे बाबा आणि अबदुल या नावाने ओळखले जाल. महाराष्ट्रातील शिरडी गावात श्रीसाईबाबा नांवाचे एक महात्म्ये अवतरीत होतील ते तुमचा उध्दार करतील. हे माझे बोल काळया दगडावरील रेषे प्रमाणे आहेत." असे बोलून प्रभूंनी त्यांना जाण्यास सांगितले.

मी आणि श्रीपाद प्रभू दोघेच होतो. तेंव्हा तेथे रविदास नांवाचा एक रजक आला. रविदास श्रीपाद प्रभुना सारखा प्रणाम करीत होता. परंतु प्रभु त्याच्याकडे दुर्लक्ष करीत होते. थोडया वेळाने त्याच्याकडे पाहून श्रीपाद मंद हसले. याचे मला आश्चर्य वाटले. श्रीपाद वल्लभ स्वामींनी माझ्या कपाळाच्या मध्यभागी जोरात दाब दिला. तेंव्हा माझ्या नेत्रचक्षूंसमोर चित्रविचित्र दृष्य दिसले.

## श्रीपाद स्वामींचा भक्तांवर अनुग्रह

विदासाची नाव कृष्णा नदीतून कुरुगड्डीकडे जात होती त्या नावेत एक वेदशास्त्र पंडित बसले होते. इतर अस्पृश्य जातीच्या लोकांचा स्पर्श होऊ नये म्हणून ते एकटेच त्या नावेत बसून जात होते. ते पंडित रविदासाला म्हणाले "मी महा पंडित आहे आणि श्रीपाद

श्रीवल्लभ स्वामीकडे जात आहे त्यानी मला बोलावले आहे तेच तुला नावेचे भाडे देतील" ते ऐकून रविदासाने होकार दिला. नाव मार्ग आक्रमु लागली. बोलण्याच्या ओघात त्या पंडिताला कळले की रविदासाला पौराणिक ऐतिहासीक कथेंची काहींच माहिती नाही. तो पंडित म्हणाला "अरे रविदासा तुला पुराण आणि इतिहासाचे काहींच ज्ञान नाही म्हणजे तू तीन चतुर्थांश जीवन व्यर्थ घालविले. रविदास ते ऐकून निराश झाला. नाव चालताना एकदमच पाण्याचा वेग खूप वाढला. त्या वेगाने त्या नावेस एक छिद्र पडले व त्यातून पाणी आत शिरू लागले. रविदास त्या पंडिताला म्हणाला "महाराज आपणास पाण्यात पोहता येते का ?" पंडित म्हणाला, "अरे मला तर पोहता येत नाही." रविदास म्हणाला "महाराज मला पोहता येते परंतु तुम्हाला मात्र पोहता येत नसल्याने तुमचे जीवन शंभर टक्के व्यर्थ आहे.

सारखे वाढत असलेले पाणी पाहून रविदासाने श्री श्रीपाद प्रभूचे नांव घेऊन पाण्यात उडी मारण्याची तयारी केली. इतक्यात त्याला पाण्याच्या मध्यभागी एक दिव्यकांती दिसली. त्याने आदि अंत नसलेल्या श्रीपाद स्वामींच्या महिमा वर्णन करणाऱ्या अनेक लीला-कथा ऐकल्या होत्या. रविदासाने त्या दिव्यकांतीस अत्यंत श्रध्दा भावाने नमस्कार केला. नावेतील पाणी सारखे वाढू लागले होते. इतक्यात एक महदाश्चर्य घडले एक अदृष्य हात त्या नावेतील पाणी बाहेर टाकीत होता. पाणी कमी झाले आणि नांव किनाऱ्यावर पोहोचली आणि ते दोघे श्रीपाद प्रभूंच्या दर्शनास आले. रविदास या पूर्वी प्रभूंच्या दर्शनास कधी आला नव्हता. परंतु आज जेंव्हा त्याने स्वामींना नमस्कार केला तेंव्हा त्यांनी प्रसन्न मुद्रेने मंद हास्य केले. त्या पंडिताकडे मात्र दुर्लक्ष केले. शास्त्रचर्चा करण्यासाठी आलेल्या त्या पंडिताच्या मुखातून एक

शब्दही निघेना. श्रीपाद प्रभू पंडितास म्हणाले "अरे पंडिता तुला अहंकारामुळे योग्य काय आणि अयोग्य काय ते कळेनासे झाले आहे. तू महा पंडित असून सदगुणांचा संचय करण्या ऐवजी पापांचा साठाच करून ठेवलास. आपल्या सुशिल पत्नीचा छळ करून, एका सुखी कुटुंबातील राणीला आपल्या पती पासून परावृत्त केलेस त्यामुळे ती तुला सतत शाप देते आहे. तुझी भार्या एक सद्ब्राह्मणी असून मानसिक छळाने क्षोभित झाली आहे हे सर्व पापकर्म केल्यावर तू माझ्या कडे कसा आकर्षित झालास ? तुझ्या पत्रिकेप्रमाणे आज तुझा मृत्यू दिन आहे. आजपासून मी तुला तीन वर्षाचे आयुष्य वाढवून देतो. तू तुझ्या गावी जाऊन दुर्वर्तन विसरून चांगले आचरण कर. तू एक पंडित आहेस यात शंकाच नाही. तुझ्या विद्वतेचे प्रात्यक्षिक दाखवितोस का तुला दिलेले तीन वर्षाचे आयुष्य परत करतोस ? तत्काळ

उत्तर दे." सर्वज्ञान संपन्न असलेल्या श्रीपादांचे ते वक्तव्य ऐकून त्या पंडिताच्या तोंडून एक शब्दही फुटेना. जणु काही मुकाच झाला होता. त्याच्या मनात आयुष्य वाढावे अशीच इच्छा होती. श्रीपादवल्लभ स्वामी म्हणाले, "तुझ्या मनातील इच्छेनुसार मी तुला तीन वर्षाचे वाढविलेले आयुष्य देत आहे. तु रजकाच्या स्त्रीस जबरदस्तीने पळवून तिला दासी केलेस. परंतु पुढील जन्मात ते रजक दांपत्य महाराजाचे सुख वैभवाचा आस्वाद घेतील. तेंव्हा तू त्या रजक पत्नीचा दास होऊन त्यांची सेवा करशील. या तीन वर्षात कांही सत्कर्म केल्यास अन्न वस्त्रास काही कमी पडणार नाही. आणि दुष्कर्म केल्यास नाना यातना भोगाव्या लागतील. मरणापासून तुझे रक्षण करून माझ्याकडे घेऊन येणाऱ्या रविदासाला तुझे सर्व पुण्य मिळेल. त्या पुण्याच्या फल स्वरूप तो माझी सेवा करील. तू तत्काळ या

पुण्यभूमीतून निघून जा." स्वामींच्या आदेशानुसार तो पंडित तेथून निघून गेला. रविदास मात्र आश्रमात राहून स्वामींची सेवा करू लागला. तो दररोज स्वामींचे कपडे धुऊन आणि आश्रमातील अंगण, झाडून स्वच्छ करीत असे. पुजेसाठी फुले आणणे हे तर त्याचे आवडीचे काम होते. श्रीपाद प्रभु स्नानासाठी कृष्णानदीवर जात असताना तो त्यांना साष्टांग नमस्कार घालीत असे. आणि स्वामी त्याचा नमस्कार प्रसन्न मुद्रेने स्वीकार करीत असत. रविदासाच्या पित्याने त्यास एकदा सांगितले होते की "श्रीपाद प्रभू अंतर्यामी असल्याने त्यांना केलेला एक नमस्कार स्वीकार झाल्यास तो शंभर लोकांना केलेल्या नमस्काराचे फळ मिळवून देणारा आहे."

एकदा रविदास कृष्णानदीच्या तिरावर उभा होता. त्या वेळी एका मोठ्या नावेत त्या गावातील राजा आपल्या

 

लवाजम्यासह जल विहार करीत होता. रविदास त्या राजाकडे एकचित्तांने पहात होता. तेवढयात श्रीपाद स्वामी नदीत स्नान आटोपून बाहेर आले. रविदासाचे त्यांच्याकडे लक्षच नव्हते स्वामींनी त्याच्या खांद्यावर हात ठेवून प्रेमाने विचारले, "काय पहात आहेस रे रजका ?" त्यांच्या मधुर वाणीने रविदास एकदम गोंधळला व स्वत:ला सावरीत त्याने स्वामींना साष्टांग नमस्कार घातला. स्वामी म्हणाले, "त्या राजाच्या वैभवाकडे पहात होतास ना ?" रविदासाने होकारार्थी मान हलविली. ते पुढे म्हणाले, "तुला राजा होण्याची इच्छा आहे ना ? तू पुढच्या जन्मी विदुरा नगरीचा (सध्याचे बीदर) राजा होशील. त्या वेळी मी नरसिंह सरस्वती रूपात तुला दर्शन देईन." तो रजक म्हणाला, "प्रभो मला राजा होण्याची इच्छा आहे परंतु आपल्या चरणांची सेवा मला सदैव मिळावी." स्वामींनी रविदासाची ही इच्छा पूर्ण केली. तो

मृत्यूनंतर यवन कुलात जन्मला आणि यथाकाली तो विदुरा नगरीचा राजा झाला. राज्य वैभव उपभोगून जीवनाच्या उतार वयात त्यास श्री नरसिंह सरस्वती स्वामींचे दर्शन झाले. त्यांच्याच कृपेने त्यास पूर्व जन्माची आठवण झाली आणि तो नृसिंह सरस्वती स्वामींच्या चरणांवर नतमस्तक झाला. त्याने स्वामींना आपल्या राजधानीत नेऊन मोठा सन्मान केला.

## खिरीने भरलेले अक्षय पात्र

आम्ही सर्वजण बसलो असताना एक तरूण ब्राह्मण तेथे आला. तो दुरून आला असल्याने त्याचे पाय धुळीने भरले होते. त्याचे नांव "वल्लभेश्वर शर्मा" असे होते. त्याचे गोत्र काश्यप होते आणि तो अपस्तंभ शाखेचा होता. श्रीपाद प्रभू पीठीकापुरमहून येणाऱ्या भक्तांना

 

आपल्या आत्मियांची सविस्तर माहिती, त्यांचे क्षेमकुशल विचारीत असत. हा सर्वज्ञानी असणाऱ्या श्रीपादांचा आवडता छंद होता. वल्लभेश्वर पीठीकपूराहून आला होता. त्याला स्वामींनी आपल्या नातलगांचे, स्नेह संबंधितांचे क्षेम कुशल विचारले. मध्याह्नाची वेळ झाली होती, स्वामींचे शिष्य भिक्षा घेऊन आले होते. इतक्यात कांही तरी घेण्यासाठी स्वामीनी आपला दिव्य हात वर केला आणि एक चांदीचे पात्र हातात घेतले. त्यात खीर भरलेली होती. तेथे जमलेल्या शिष्यांना खीर वाटून दिली. परंतु ते भांडे खिरीने भरलेलेच राहिले. श्रीपाद प्रभूंनी शिष्यांनी आणलेली सर्व भिक्षा नदीच्या पाण्यातील जलचरांना देण्याचा आदेश दिला. त्यानुसार रविदास सर्व भिक्षान्न घेऊन कृष्णेच्या तीरावर गेला. नदीतील जीवजंतूंना सुध्दा स्वामींचा प्रसाद मिळावा हा त्यांचा संकल्प होता. श्रीपाद श्रीवल्लभ मला

 

वल्लभेश्वराच्या जवळ बसण्यास सांगत होते. परंतु त्याच्या जवळ रविदास बसला होता. माझ्या बाजूस "सुब्बण्णा शास्त्री" नावाचा एक कानडी ब्राह्मण बसला होता. एक गरीब ब्राह्मण आपल्या मुलीचे लग्नासंबंधी प्रभूना विचारत होता. प्रभू म्हणाले "मी असताना तुम्हाला काळजी कशाची ? जे लोक पापी असतात त्यांनाच भय असते." प्रभु पुढे म्हणाले "हा वल्लभेश्वर शर्मा तुझा जावई होण्यास अगदी योग्य आहे. सुब्बण्णा शास्त्री त्याला पौरहित्य शिकवित आहेत." वल्लभेश्वराकडे वळून स्वामी म्हणाले तुझ्या माता पितरांची अशी इच्छा आहे की त्यांना पिंडदान करावे. श्रध्दाभावाने आणि मंत्रोच्चारासह केलेले पिंडदान पितरांना पोहोचते. पितृदेवतांचा शाप घेणे चांगले नसते. गरुडपुराणातील मंत्र उच्चारल्यानंतरच विवाहाच्या मंत्राचे उच्चारण करावे असे शास्त्र वचन आहे. तसेच विवाह

मांगल्यासाठी हळकुंड स्वीकारावे. आज तुम्हाला मिळालेला प्रसाद अत्यंत दुर्लभ आहे. "पीठीकापुरम् मध्ये मल्लादी लोक, वेंकटप्पा, श्रेष्ठी महाराज आणि वत्स महाराज नैवेद्यासाठी खीर घेऊन आले. तोच नैवेद्य तुम्हाला प्रसाद म्हणून दिला आहे. ब्रह्मराक्षस, महापिशाच्चाच्या बाधेने पीडित असलेल्या लोकांची बाधा या प्रसादाने तत्काळ निवृत्त होते. दारिद्र्य आणि दु:खाने पीडित असलेल्या लोकांना या प्रसादाचा स्विकार केल्याने संपदा आणि अभिवृद्धी लाभते." हे दिव्य भाषण ऐकून माझ्या डोळयात अश्रु दाटून आले. सद्गदित झालेल्या कंठाने श्री श्रीपाद स्वामी म्हणाले "या तीन वंशांशी माझा ऋणानुबंध कालातित आहे. त्यांच्या वात्सल्य भक्तीने मी त्यांच्या अंकित होतो. मला कोठेही जेवण्यास न मिळाल्यास मी सूक्ष्म रूपाने जाऊन तेथे यथेच्छ जेवण

म्हणाले, वल्लभेश्वराचे शिर आणून त्याच्या धडास जोडून ठेव ." त्याप्रमाणे ठेवताच स्वामींनी त्या मृत देहाकडे अमृत दृष्टीने पाहिले. दुसऱ्या क्षणीच वल्लभेश्वराला नवजीवन प्राप्त होऊन तो झोपेतून उठून बसल्या प्रमाणे उठून बसला त्या चवथ्या चोराने वल्लभेश्वराला झालेला प्रकार सांगितला. त्याला झालेल्या आनंदाला सीमा नव्हती. श्रीपाद प्रभूंचे प्रत्यक्ष दर्शनाचे भाग्य न लाभल्यामुळे मात्र त्यास वाईट वाटले. वल्लभेश्वरामुळे श्रीपाद प्रभूंचे दर्शन घडल्याने तो चवथा चोर अत्यंत आनंदित होता. वल्लभेश्वर कुरवपुरला येऊन पोहोचला. त्याने एक सहस्त्र ब्राह्मणा ऐवजी चार सहस्त्र ब्राह्मण भोजनाची आराधना केली होती.

## श्रीपाद स्वामींचे विराट स्वरूप

आम्ही सर्वजण डोळे झाकून ध्यानात बसलो होतो. मला वल्लभाचार्यांच्या भविष्यात घडणाऱ्या घटनेचे चित्र दिसत होते. तितक्यात डोळे उघडण्याची श्रीपाद प्रभूंनी अनुज्ञा दिली. ते म्हणाले "कोणतेही कार्य अकारण होत नाही. प्रत्येक कर्मासाठी काही ना काही कारण असतेच. सृष्टीचे विधान चित्र-विचित्र आहे. निर्गुण, निराकार असा मी तुमच्यासाठी साकार रूपांत अवतरित झालो आहे. हे पाहून तुम्हाला आश्चर्य वाटेल. परिमित आणि अवधूत नसलेला मी तुम्हास परिमित आणि अवधूत असल्याचा भास होतो व तसा अनुभव सुध्दा येतो. हा फार गुंतागुतीचा विषय आहे. सर्व शक्ति माझ्या स्वाधीन आहेत. या अनंत कोटी ब्रह्मांडात प्रत्येक अणू रेणूमध्ये मीच भरून राहिलो आहे. अणु रेणुंना एकत्र करून ठेवणारा संकल्प स्वरूप मीच आहे. या अणू अणूला

 

वेगवेगळे करून नूतन सृष्टीची निर्मिती करण्यासाठी जी स्थिती हवी असते त्यासाठी प्रळयकाळ साधणारा असा रुद्ररूप ही मीच आहे. हे ज्ञान आणि हे अज्ञान ह्याचा तुम्हाला बोध करून सर्व जीवांना अनेक प्रकारची माया करून त्यात सर्वांना बंदिस्त मीच करतो. जेंव्हा जेंव्हा भक्त आर्ततेने माझी प्रार्थना करतात व मला सहाय्यासाठी बोलावतात तेंव्हा तेंव्हा मी सहस्त्र बाहूंनी त्यांचे रक्षण करतो. हे माझे अनादी तत्वही मीच आहे. प्रत्येक जीव मात्रात व्यापून असलेला 'मी' तोच 'मी' अशा 'मी' मध्ये असलेले शक्तिमत्व , सर्वज्ञता, सर्वांतर्यामित्व तुमच्या दृष्टीला दिसत नसल्याने तुम्ही भ्रमित होता. याचा तुम्हाला अनुभव येऊन तुम्ही मला व्यक्त रूपात पाहिलेत तर आश्चर्य वाटण्या सारखे कांही आहे का ?" परब्रह्मस्वरूप असलेले श्रीपाद प्रभू या प्रकारे समजावून सांगत असतांना घंटानाद ऐकू आला.

सगळे आश्चर्य मन:स्थितित असतांना तो घंटानाद शांत झाला.

## श्रीपादांची मातृभावना

आम्ही सर्वजण बसलो असतांना श्रीपाद प्रभू म्हणाले "श्रीपाद श्रीवल्लभाचा हा अवतार फल देणारा महान अवतार आहे. माझे नामस्मरण केल्या शिवाय कोणताच अवधूत, पूर्ण सिध्दी प्राप्त करू शकत नाही. तसेच महान योगी सुध्दा सिध्दी प्राप्त करण्यासाठी माझे नामस्मरण करतात. हे वल्लभेशा तुझे आईवडील लवकरच निवर्तले आणि तुझ्या नातेवाईकानी तुला दुर्मार्गाला लावून तुझी सर्व संपती हिरावून घेऊन तुला भिकारी केले. हे आम्हाला ज्ञात आहे. त्या नातेवाईकांची मुले सुध्दा तुझ्याशी वैरभावाने वागतात हे आम्ही

 

जाणतो. तुझे ते दुष्ट नातेवाईक पुढील जन्मात चोर बनले. तु धन घेऊन कुरुगड्डीस येत असतांना त्या चोरांनी तुझे धन लुटून तुला मारून टाकले. तू आमचे स्मरण करताच आम्ही तेथे प्रगट होऊन आमच्या त्रिशुलाने तीन चोरांचा वध केला. चौथा चोर आम्हास शरण आला त्याचा दोष ही अत्यंत कमी असल्याने त्याला आम्ही जीवनदान दिले." श्रीपाद प्रभूंचे हे वक्तव्य ऐकून वल्लभाच्या पत्नीच्या डोळयात पाणी आले. ते पाहून श्रीपाद प्रभु म्हणाले, "हे माते ! प्रत्येक स्त्रीमध्ये आम्हास जन्म दिलेल्या अखंड सौभाग्यवती सुमती महाराणीच दिसते. त्या महान मातेच्या कुशीमध्ये नेहमीसाठी आम्ही बालकच असतो. तू दु:खी होऊ नकोस. मी दिलेले हळकुंड जपून ठेव . तुला या हळकुंडामुळे सदैव सौख्य लाभेल. तू अखंड सौभाग्यवती राहाशील. आमचे हे वचन काळया दगडावरील रेषेप्रमाणे

अटळ आहे. त्याला सृष्टीतील कोणतीच शक्ति बदलू शकत नाही. मला गायत्री मंत्राचा उपदेश करणारे माझे प्रथम गुरु माझे पिताच असून त्यांचे नांव चिरकाल टिकून राहील. आमच्या पुढच्या अवतारात नरसिंह नांवाबरोबर सरस्वती नांव जोडून नृसिंहसरस्वती असे नांव आम्हास लाभणार आहे. आमचे आजोबा बापनाचार्युलु यांचे नांव सुध्दा अजरामर करण्याचा आमचा मानस आहे. नृसिंह सरस्वती अवतारात आमचे रूप आमच्या आजोबा सारखेच असेल. आमचे आजोबा माझे दुसरे गुरु होते. त्यांच्या कडे वेद शास्त्राचा अभ्यास केला. तुम्ही पहात असलेली ही घंटा एके काळी आमच्या आजोबांच्या घरात होती. ती माझ्या संकल्पाने अनेक प्रदेशात फिरून आली आहे. ती भूमीतील भुयारी मार्गाने सुध्दा जात असे. हे शंकर भट्टा, तू रचना करीत असलेल्या तेलुगु भाषेतील श्रीपाद वल्लभ चरित्रामृतातील

आठरावा अध्याय येथे संपत आला आहे. ती घंटा पीठीकापुरम गावी येऊन पोहोचली आहे. ही घंटा अनेक आकार घेऊन अनेक आकार बदलून माझ्या संकल्पानुसार पुन्हा येथे आली आहे. आमच्या आजोबांच्या स्वत:च्या घरात माझ्या महासंस्थानाची स्थापना होईल. आमच्या प्रेमाची खूण म्हणून ही जय जय निनाद करणारी घंटा आम्ही पीठापुरमला पाठवली आहे.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -19

# **श्री गुरुचरण समागम**

वल्लभेश्वर शर्मा दंपती, सुब्बण्णाशास्त्री आणि मी असे चौघेजण श्रीपाद प्रभूंच्या लीलांचे स्मरण करीत होतो. त्याच वेळी त्यांच्या घरी एक दूरचा नातेवाईक लिंगण्णाशास्त्री आला तो वेदशास्त्र पारंगत होता. लिंगण्णाशास्त्री म्हणाला, "मी पित्याच्या तर्पणानिमित्त, पादगया श्रेत्री, पवित्र असलेल्या पीठिकापुरम् क्षेत्रात आलो. माझे आजोबा कर्मठ ब्राह्मण होते. ते धनवान असले तरी स्वभावाने मितव्ययी होते. ते शास्त्रात सांगितल्या प्रमाणे, संकटात असलेल्या लोकांना काही उपाय सांगून त्यांना आपलेसे करून घेत असत.

पितृदेवतांना संतुष्ट करण्यासाठी भाविक लोक दहा प्रकारचे दान यथाशक्ति देत असत. परंतु माझे आजोबा अत्यंत थोडया पैशात सर्वविधि आटोपून स्वत:चा अधिकाधिक फायदा होईल असे पहात. त्यांचा व्यवहार ब्राह्मण धर्माला साजेसा नव्हता. काही कालावधीनंतर वार्ध्यक्याने त्यांचा मृत्यु झाला. माझे वडिल सुध्दा माझ्या आजोबा सारखेच होते. कालांतराने त्यांचा सुध्दा मृत्यु झाला. मी मात्र शास्त्रानुसार आणि माझ्या सामर्थ्यानुसार पितृदेवतांचे श्राध्दतर्पण आदि कर्मे करीत असे. आमच्या घरी अकारण होणाऱ्या ग्रह कलहामुळे माझी मन:शांती नेहमी भंग पावत असे. परमशांत स्वभावाचे माझे आप्तमित्र आमच्या घरात पाऊल टाकताच रौद्र स्वरूप धारण करीत. याच वेळी माझी पत्नी रुसून आपल्या माहेरी गेली. माझा मुलगा, मुलगी, जावयी या सर्वांनी माझा पदोपदी अपमान करून जीवन नकोसे केले होते. माझे जीवन नरकमय झाले होते. जीवनात धन असेल तर जीवन जगण्यात आनंद

वाटतो. परंतु माझ्या कडे तर धन नव्हतेच. शिवाय गृहकलह. या सर्वांना कंटाळून मी आत्महत्या करण्याचा विचार केला. परंतु मरणानंतर पिशाच योनी प्राप्त होण्याची भिती वाटत होती. माझ्या मृत्युनंतर माझी शास्त्रोक्त पध्दतीने अंतक्रिया होणार नाही हे निश्चित होते. एके दिवशी मी गोशाळेतील सर्व साफ सफाईचे काम आटोपून जेवणासाठी येऊन बसलो. त्या दिवशी सुनेने विटलेले अन्न वाढून दिले. त्याला वास येत होता. त्यात थोडे किडेसुध्दा दिसले. गोशाळेतील कामाने मी अत्यंत थकून गेलो होतो. आणि भुकेने डोळयात आसवे येत होती. माझी स्थिति फारच दयनीय झाली होती. माझे आप्त, सखे, पुत्र, कांता, कन्या हे खरेच माझे आहेत का ? हा सारा मायाजाळ तर नाही ना ? माझ्या मनांत गोंधळ उडाला होता. आणि विचार शक्ति कुंठित झाली होती. इतक्यात एका अवधुताने मला दर्शन दिले. करुणेचा महाप्रवाह त्याच्या नेत्रांतून ओसंडत होता. त्या करुणा मूर्तीस पाहून मी लहान बालकासारखा

त्याच्याकडे धावत गेलो. ही व्यक्ति माझ्या चिरपरिचयाची असल्यासारखे मला वाटले. मी त्या अवधूतांच्या दिव्य चरणांवर डोके ठेवून नतमस्तक झालो. ते दिव्य चरण मी हृदयात स्थापित केले. अवधूतांनी थाळीतील अन्नास स्पर्श करून ते शुध्द केले परंतु ते विटके अन्न अदृश्य होऊन त्या ठिकाणी "हलवा" नांवाचा गोड पदार्थ आला. त्या थाळीतील थोडा हलवा अवधूतांनी खल्ला आणि उरलेला मला प्रसाद म्हणून दिला. तो मी अत्यंत आनंदाने खाऊन तृप्तीची ढेकर दिली. त्या प्रसादाच्या सेवनाने माझ्यात नवीन शक्तिचा संचार झाल्यासारखे वाटले. अवधूतांनी नंतर मला एक पहार दिली व ईशान्य दिशेस खोदण्यास सांगितले. बराच मोठ खड्डा झाला त्यात दोन कुत्र्यांचे अस्थिपंजर देह दिसले. अवधूतांनी त्या खड्डयात तांदळाची पेज टाकण्यास सांगितली

त्यांच्या आदेशानुसार मी त्यात पेज टाकून तो खड्डा बुजवून टाकला त्यावर ते अवधूत म्हणाले "तुझी पिशाचबाधे पासून मुक्तता झाली आणि तुझ्या घराची आता स्थलशुध्दि झाली. आता तुला सर्व गोष्टी अनुकूल होतील. पादगये प्रमाणे महिमा असलेल्या पीठीकापुरमहून तुला बोलावणे आले आहे. तू तत्काळ प्रवासाची तयारी कर बाकी व्यवस्था मी पाहीन आपण पीठीकापुरम् येथे भेटू" अवधूतांच्या आदेशानुसार मी पीठीकापूरमला जाण्यास निघालो. घरी कोणाला सांगितले नाही. अगदी अंगावरील एका कपडयानिशी निघालो. थोडे अंतर जाताच सायंकाळ झाली. एका आमराईत मी प्रवेश केला. तेथील यजमान नरसिंहप्पा याने माझे यथोचित स्वागत केले. खाण्यासाठी आंबे आणि इतर गोड फळे दिली. ती खाल्याने माझी भूक शांत झाली. त्या आमराईच्या यजमानाच्या

विनंतीनुसार मी रात्री तेथेच मुक्काम केला. सकाळी स्नान संध्यादी आटोपून पुढे जाण्यास निघालो तेंव्हा नरसिंहप्पाने मला आंबे एका वस्त्रात बांधून दिले. अवधूतांनी सांगितल्या प्रमाणे माझी खाण्याची व राहण्याची उत्तम सोय झाली होती. त्या अवधूताच्या लीलेचे मोठे आश्चर्य वाटत होते त्यानंतर तो नरसिंहप्पा मला म्हणाला "कालपासून माझ्या स्वप्नात एक अवधूत येत आहे. तो अवधूत मला म्हणाला तुझ्याकडे उद्या एक सद्ब्राह्मण येईल. त्याचे उत्तम प्रकारे स्वागत करून जाताना त्याला वस्त्रदान आणि दक्षिणासुध्दा दे. मार्गात खाण्यासाठी त्याला तुझ्या शेतातील आंबे दे. मला पडलेले स्वप्न आज खरे झाले. तुमची सेवा करण्याची संधि मला भाग्याने मिळाली व तुमचे दर्शन झाले. मी धन्य झालो." या घडलेल्या घटनेवरून मला असे नक्की वाटते

की ते अवधूत साधी-सुधी व्यक्ती नसून तो कोणीतरी दिव्य महापुरुष असावा.

मी पुढच्या प्रवासास निघालो, नवीन वस्त्र धारण करून, वेदस्मरण करीत चालत असताना मला माझ्या देहात विद्‍युत प्रवाह जोरात होत असल्याचा अनुभव आला. त्या विद्‍युत प्रवाहाने मला एका अनामिक सुखाची अनुभूती होत होती. माझ्या सोबत एक वेद पारंगत महा पंडित चालत असल्याचा मला भास झाला. तो वेदातील सावित्री मंत्रांचा उच्चार करीत होता. मी सुध्दा त्यांच्या बरोबर वेद म्हणत होतो. एवढयात तो म्हणाला, "सावित्रीवर्णन मुख्य मंत्र आहे. त्रेतायुगापासून भारद्‍वाज ऋषिनी सावित्री काटक चयन केले. ते सुध्दा पीठीकापुरम् येथेच घडले. कधितरी केलेले विधान आज सत्य होऊन पीठीकापुरम येथे श्री दत्तात्रय प्रभू श्रीपाद श्रीवल्लभांच्या रूपात अवतरित झाले आहेत. वेद हे अपौरुषीय आणि ईश्वरनिर्मित आहेत. वेद पठनाचा

अधिकार ब्राह्मणांनाच आहे. परंतु वेदाध्ययन सर्व वर्णाच्या लोकांना करता येते. ब्राह्मण कृष्णाची भक्ति करीत परंतु कृष्ण मात्र ब्राह्मणांचा सत्कार करून त्यांचे पाय धुऊन ते पाणी आपल्या शिरावर प्रोक्षण करीत. तुला पीठिकापुरमहून बोलावणे आहे. तू किती भाग्यवान आहेस !" तेंव्हा मी म्हणालो, "अहो महाराज श्रीपाद वल्लभ कोण आहेत त्यांचा महिमा मला वर्णन करून सांगाल काय ?" "अरे बाबा श्रीपादांचे दर्शन सर्व पापांचे क्षालन करणारे असते. ते साक्षात दत्तात्रय प्रभु आहेत. त्यांची जन्मभूमी पीठीकापुरम क्षेत्र आहे. पूर्वयुगांत ज्या ज्या वेळी धर्माला ग्लानी आली त्या त्या वेळी परमेश्वरांनी पृथ्वीवर मानवी अवतार घेऊन सज्जनांचे रक्षण आणि दुष्टांचे हनन केले. त्या काळी विष्णुदत्त आणि सुशिला हे एक पुण्यवान दंपती राहात होते. सुशिला एक साध्वी स्त्री असून आपल्या पातिव्रत्याने आणि साधना सामर्थ्याने ती सती अनसूये समान होती. विष्णुदत्त एक अत्यंत विद्वान आचार

संपन्न सच्छील ब्राह्मण होता. त्याने आपल्या साधनेने आणि विद्वत्तेने अत्रिऋषि प्रमाणे स्थान प्राप्त केले होते. या उभय दांपत्यांनी सती अनसुया आणि अत्रिमुनी बरोबर तादात्म्य स्थिती प्राप्त करून घेतली होती. ही स्थिती निराकार असून नेत्रांना अगोचर असते. त्याचे वर्णन शब्दाने करता येत नाही. या स्थितीचा अनुभव मात्र घेता येतो. विष्णुदत्त आणि सुशिला पुढील जन्मात सुमतीराणी आणि अप्पलराज शर्मा या रूपात जन्मास आले. त्यांनी केलेल्या तपाचे फल स्वरूपच त्यांना श्रीपाद वल्लभ रूपाने एका दिव्य पुत्राचा लाभ झाला. अप्पळराज हे भारद्वाज गोत्राचे, अपस्तंभ शाखेचे कृष्ण यजुर्वेदी ब्राह्मण होते. पूर्व युगात लाभाद्र नावाचे एक वैश्य मुनी होते. ते श्री मातेच्या वासवी कन्यका अवतारात तिचे पिता भास्कराचार्युलु होते. श्रीपाद श्रीवल्लभांच्या अवतारात सुमती महाराणीचे पिता होते. तू पीठिकापुरमला त्या महान पुरुषांचे दर्शन घेऊ शकशील. तुझे उत्तम आदरातिथ्य करून दक्षिणा,

वस्त्रदान दिलेला शेतकरी पूर्व जन्मात, पीठीकापुरम् मधील वेंकटपय्या श्रेष्ठी आणि त्यांचे वडिल सुब्बरामय्या श्रेष्ठी यांच्या घरी सेवक होता. परम पवित्र अशा सुब्बरामय्या श्रेष्ठीच्या घरी सेवा करण्याने आणि ते पवित्र अन्न ग्रहण केल्याचे फलस्वरूप तो एक वतनदार होऊन सर्व सुखांचा लाभ घेत होता. पिठीकापुरम् मधील वेंकटअप्पा श्रेष्ठी नरसिंह वर्मा हे दोघे श्रीपाद प्रभूंना अत्यंत प्रिय होते. त्यांना श्रीपाद प्रभूंच्या वात्सल्य भक्तीचा लाभ झाला होता."

कर्म बंधन हे सर्व बंधनात अत्यंत क्लिष्ट बंधन आहे. यज्ञ करतांना चुकून जरी पवमान घट फुटला तर यज्ञ करणारा ब्राह्मण शिर फुटून तत्काळ मृत्युमुखी पडतो असे शास्त्र वचन आहे. परंतु सध्याच्या काळात पवमान घट फुटला तरी यज्ञ करणाऱ्या ब्राह्मणास कांही होत नाही याचे कारण काय ? असा प्रश्न श्रीपाद प्रभूंना शिष्यांनी विचारला. तसेच वेदशास्त्रात सांगितलेल्या

यज्ञफलस्वरूप शुभ घटना घडतात परंतु अशुभ घटना मात्र घडत नाहीत. याचे कारण काय ? श्रीपाद प्रभु म्हणाले "पुत्रा, सध्याच्या काळात यज्ञ संपन्न करताना विद्युत पदार्थ तितके प्राणघातक नसतात. यज्ञ करणारे पुरोहित उत्तम साधक असावे लागतात. त्यांच्या जवळ योगाग्नि भरपूर प्रमाणात असावा लागतो.

त्या अग्निने पवमान घटातील विद्युत जळू शकते. महायोगी असणाऱ्या पुरोहिताने शास्त्र विधिपुर्वक यज्ञ केल्यास त्याचे चांगले फळ मिळून विश्वाचे कल्याण होते. परंतु असे न घडल्यास यज्ञाची प्रक्रिया घडते परंतु वेदशास्त्रोक्त फळ मात्र मिळत नाही. यज्ञादी कर्मात देण्यात येणारी दक्षिणा रूपये 16, 116, 1116 अशा संख्येतच दिली जाते यात सुध्दा रहस्य दडलेले आहे. गोत्र हे पितृसंबंधित असते हे सृष्टीच्या अंतांपर्यंत बदलत नाही धर्म हा सात पुरुषांमध्येच फिरत असतो. सपिंड हे मातेशी संबंधित असते. विवाहयोग्य मुलगा

आणि धन ही दोन उत्तम कर्मांची फळे आहेत. स्त्री ही अग्निरूप असते ती प्रकृतीत आवश्यकच असते."

श्रीपाद श्रीवल्लभ अद्वैत मताचे पुरस्कर्ते होते. ते आदि शंकराचार्यांप्रमाणे पक्षपात रहित होते. गुणभेद नसणाऱ्या श्रीपादांना कुलभेद मुळीच नव्हता. आदि शंकराचार्यांनी आपली हेम विद्या सत्वगुणी ब्राह्मणाला न देता रजोगुणी असलेल्या गौड कुलातील लोकांना दिली. शंकराचार्यांना वाटले हेमविद्या जर ब्राह्मणांना दिली तर ते धनांच्या मोहाने त्यांच्या इष्ट धर्मांचे पालन करणार नाहीत. शंकराचार्यां प्रमाणेच श्रीपाद प्रभूंनी जाती, वर्ण, मत, वय यांचा भेदभाव न करता प्रत्येकाच्या योग्यतेनुसार अनुग्रह दिला. पृथ्वी , आप तेज वायु आणि आकाश ही पंच महाभूते आणि मन, बुध्दि, अहंकार ही अष्टधा प्रकृती जडस्वरूप आहे. एक (1) हे चित्र प्रकृतीचे प्रतिक आहे. 2 पासून 10 पर्यंत असलेल्या आठ संख्या जड प्रकृतीच्या द्योतक आहेत.

 

शून्य (0) हे ब्रह्मतत्त्वाचे दिग्दर्शक आहे. नउ (9) या संख्येत पूर्ण पृथ्वीच्या कार्यकलापाचे रहस्य दडलेले आहे. श्रीपाद श्रीवल्लभ हसून म्हणत "दो चौपाती देव लक्षी" आणि दोन पोळयांसाठी भिक्षा मागत असत. हे 2, 4, 9, 8, या संख्येचे प्रतिक आहे. स्वामींच्या बोलण्यात नाना अर्थ दिसून येत. सृष्टीतील सर्व द्वंद्वाचे दोन (2) हे प्रतिक आहे. देहाचे स्थूल, सूक्ष्म, कारण आणि महाकारण अशी चार (4) प्रतिके आहेत. ब्रह्मतत्त्व हे कधीच बदलत नाही. ते नउ (9) या संख्येचे द्यौतक आहे. महामाया ही आठ (8) ह्या संख्येने दर्शवली जाते.

श्रीपाद श्रीवल्लभ अर्धनारी नटेश्वर आहेत.

 

# श्रीपाद श्रीवल्लभांचे विराटरूप

मी ब्रहत्शीला नगरातील पेनुगाठेडा गावाचा रहवासी आहे. माझे नांव गणपती शास्त्री असून मी वेदाध्ययन करण्यासाठी वायसपूर (काकीनाडा) गावात आलो. गुरुंची सेवा करीत मी वेदाध्ययन करीत असे. माझ्या गुरुदेवांच्या घराजवळच त्यांची शेती होती. गायी वासरे होती. मी गायी वासरांना चरण्यासाठी रानात घेऊन जात असे. तसेच त्यांचे दूध काढून त्याचे वाटप करण्याचे कामसुध्दा आनंदात करीत असे. एके दिवशी मी गायींना घेऊन गेलो असताना मला दहा वर्षाचा एक अत्यंत तेजस्वी बालक दिसला. तो आमच्या शेतात आला. त्याच्या गळयातील जानवे पाहून तो ब्राह्मणच असावा असा दृढ विश्वास वाटला. मी त्याला विचारले "तुझ्या गळयात जानवे दिसते, तू कोण आहेस ? त्या वर तो बालक म्हणाला मी मीच आहे. सृष्टीतील सारी तत्वे माझ्यातच समावलेली आहेत. सर्वांना

 

आधारभूत असणारा तो मीच आहे. माझ्यातील ब्राह्मणांची लक्षणे पाहून मला ब्राह्मण समजलास हे कांही चूक नाही. परंतु तेच कांही सर्व सत्य नाही. माझ्यातील क्षत्रियांची लक्षणे पाहून मला कोणी क्षत्रिय समजल्यास ते खोटे नाही. परंतु ते पूर्ण सत्य नाही. माझ्यातील वैश्य लक्षणे पाहून जर कोणी मला वैश्य समजल्यास ते असत्य नाही परंतु ते पूर्णसत्य नाही. माझ्यातील शुद्राची लक्षणे पाहून कोणी मला शुद्र समजल्यास ते खोटे नाही परंतु ते पूर्णसत्य नाही. तू मला चांडाळ समजलास तरी ते अयोग्य नाही. परंतु ते ही संपूर्ण सत्य नाही. मी सर्व सीमांच्या पलिकडे आहे, अतित आहे. सत्य किंवा असत्य असणाऱ्या प्रत्येक विषयापासून मी अतित आहे परंतु त्यांचा आधारभूत सुध्दा आहे. मी परमसत्य आहे. ते अवधूताना ज्ञात आहे. माझा धर्म हा परमधर्म

 

आहे तो सर्वधर्मांच्या अतित आहे, आणि त्याचा आधार सुध्दा आहे. हेच माझे परमप्रिय तत्त्व आहे. सृष्टीतील जीवात असणाऱ्या प्रेमतत्त्वापेक्षा हे सुमधुर आहे एवढेच नव्हे तर ते सर्वांचा आधार आहे. तू आणि मी पुरुष असलो तरी स्त्रियांप्रमाणे वर्तन करतो. स्त्री असली तरी ती पुरुषांप्रमाणे वर्तन करते. अर्धनारी नटेश्वर या दोन रूपांनी एकत्र असलेला मी मन, वाचेस अगोचर असून दिव्यानंद तत्त्व मीच आहे. इतक्या विलक्षण अशा रूपाने युक्त असलेल्या मला तू कसा ओळखशील ?" त्या गुराख्याने असे सांगताच माझ्या अंगात कापरे भरले. माझ्या मनस्थितीची कल्पना येऊन तो दिव्य गुराखी म्हणाला, "आताच मी शनि देवाशी बोललो. मी या गणपती शास्त्रीस चित्र-विचित्र बंधनानी बांधून त्यास त्रास दिला त्या वेळी तो मला बंधनातून मुक्त करण्यासाठी विनवू

 

लागला. त्यावर मी म्हणालो मी याचे कर्मफळ गाईच्या दुधाच्या रूपात ग्रहण केले. तू अशा बंधनात पडु नकोस." ते ऐकून माझ्या अंगात कापरे भरले. माझ्या पत्रिकेत या काळात माझी दयनीय स्थिति दाखविली होती. मी कांही बोलण्याच्या स्थितित नसताना तो गुराखी एका गायीजवळ जाऊन म्हणाला,"हे गायत्री मला खूप भूक लागली आहे. दूध देशील का ?" त्या गोमातेने होकारार्थी मान हालविली आणि तिच्या स्तनातून उष्ण दुधाच्या धारा वाहू लागल्या. त्या गुराख्याने पोटभर दूध पिले. आश्चर्याची गोष्ट अशी की ती गाय वांझ होती तरी तिने त्या गुराख्यास दूध दिले. तो गुराखी तृप्त होऊन एका आंब्याच्या झाडाखाली बसला. मी त्याच्याकडे पुन्हा एकदा पाहिले. त्या गुराख्या बरोबर एक दहा वर्षाची शेतकऱ्याची कन्या होती. दिसायला दोघे सुंदर होते. त्यांचे विनोदी

संभाषण सारखे ऐकावेसे वाटे. त्यांचे बोलताना होणारे हावभाव नयनरम्य होते. तेवढयात वेंकटअप्पय्या श्रेष्ठी त्यांच्या घोडागाडीतून उतरले. त्यांच्या बरोबर एक दहा वर्षाचा तेजस्वी बालक होता. तो श्रीपाद श्रीवल्लभ असल्याचे मला नंतर समजले. माझ्या गुरुदेवांना ही भूमी वेंकटअप्पा श्रेष्ठींच्या वडिलांच्या स्मृती प्रीत्यर्थ त्यांनी दान दिली होती. या भूमीस लागूनच त्यांचे एक विस्तीर्ण शेत होते. या शेताची पहाणी करण्यास श्रेष्ठी पीठीकापुरम् हून वायसपूर या ग्रामात येत असत. श्रेष्ठींना त्या गुराख्या बरोबर असलेल्या शेतकऱ्याच्या कन्येस पाहून आश्चर्य वाटले. त्या गुराख्याने आणि त्याच्या बरोबर असलेल्या कन्येने श्रीपादांना नमस्कार केला. त्या वेळी श्रीपाद म्हणाले 'आजोबा ! तुम्हास एवढे आश्चर्य का वाटले." आजोबा म्हणाले "त्या दोघांकडे बघ किती

नयनमनोहारी दृष्य आहे. बघणारा आणि जे बघायचे ते दृष्य दोन्ही एकच आहे. यातील वेदांत विषय मला कळत नाही." तेंव्हा श्रीपाद म्हणाले "यात वेदांत काय आहे ? श्रीहरी सुध्दा अपरिमित, निर्गुण निराकार असुन सुध्दा आपल्या मायागतीस पाहून आश्चर्यचकित होतात. ही सृष्टी नव रसाने भरलेली आहे. आश्चर्यपूर्ण दृष्यांची कल्पना करणे हा सुध्दा सृष्टीचाच एक नियम आहे. ज्या ठिकाणी द्वैत दिसते तेथे वास्तविकत: अद्वैत असते. तर द्वैत खरे का अद्वैत खरे ? ते विचार करून सांगावयास हवे." त्या गुराख्याला आणि शेतकऱ्याच्या. मुलीला ही सर्व श्रीपाद प्रभुंचीच माया तर नसेल ना ? अशी शंका आली. श्रेष्ठींच्या हनुवटीला हलकासा स्पर्श करून श्रीपाद म्हणाले "आजोबा तुम्हाला शंका कशाची येते आहे ? जोपर्यंत तुमच्या घरातील लोक मला विसरणार

नाहीत तो पर्यंत माझा, सर्व शक्ती सहित अदृष्य रूपाने तुमच्या घरी वास राहील. तुमच्या घरी माझ्या पावलांचे आवाज प्रत्येक साधकाला नेहमी ऐकू येतील. अनघा देवी बरोबर असलेले दत्त स्वरूप अर्धनारी नटेश्वर रूपात आहे परंतु ते आपणास दिसत नाही. तेच तुम्हास श्रीपाद श्रीवल्लभ रूपात समक्ष दिसतात. मी सुमती मातेचा प्रथम पुत्र आहे. मी माझ्या मातेला निक्षून सांगितले होते की माझा विवाह करू नका. तसा प्रयत्न केल्यास मी घर सोडून जाईन. श्रेष्ठी राजऋषी असल्याने त्याने मला निष्कलंक भक्तीपाशात बांधून ठेवले आहे. म्हणून मी अनघा समवेत असलेल्या अनघ स्वरूपात तुम्हाला दर्शन देत आहे. श्रीपादांच्या सांनिध्यात कारणाशिवाय कोणतेच कार्य होत नाही. सृष्टीचे नियम चित्र-विचित्र आहेत. कर्म आणि कर्मांची फळे यांची संभावना देश

कालपरत्वे ठरत असते. सर्व भक्त गणांना माझ्या आचरणाने, माझ्या लीलेने, माझ्या महिम्याने ज्ञानबोध करणे, हा सुध्दा माझ्या अवतार कार्यांचाच एक भाग आहे." श्रीपाद प्रभू आमच्या बरोबर असे बोलत असताना त्यांची कांती आमच्या समक्षच एका अनामिक तेजाने झळकू लागली. ते नंतर आंब्याच्या झाडाकडे वळले. ते त्या झाडाकडे पहात असतानाच त्या शेतकऱ्याच्या मुलीची आणि गुराखी मुलाची कांती दैदिप्यमान होऊन ते श्रीपाद प्रभुंच्या रूपात विलीन झाले. वसंतऋतु नसतानाही कोकिळा आंब्याच्या झाडावर बसून मधुर स्वराने गाऊ लागली. त्या झाडाला एकच एक फळ लागले होते. ते फळ श्रीपाद प्रभूंनी तोडले. ते कच्चे फळ स्वामींच्या हस्त स्पर्शाने तत्काळ पिकून मधुर रसभरीत झाले. ज्या प्रमाणे एक माता आपल्या शिशूस मोठ्या प्रेमभराने गोड पदार्थ

भरविते, जेवणातील प्रत्येक पदार्थ शिशुने खावा म्हणून त्यास गाणे म्हणून, गोष्टी सांगुन भरविते तितक्याच प्रेमाने श्रीपाद प्रभूंनी तो गोड आंबा श्रेष्ठींना खाऊ घातला. स्वामींच्या प्रेमपूर्ण स्पर्शाने श्रेष्ठींच्या डोळयातून आनंदाश्रू वाहू लागले. श्रीपाद स्वामींचे आपल्या भक्तावरील प्रेम सहस्त्र मातांच्या प्रेमापेक्षा श्रेष्ठ होते. त्यांच्या दिव्य नेत्रांमधून कारुण्य, प्रेम, यांचा वर्षाव होत असताना ते साक्षात स्त्री शक्ती स्वरूपिणी अशा अनघा माते सारखे वाटत होते. श्रीपाद प्रभूंनी तोडलेला आंबा त्यांच्या समोर एका आज्ञाकारी सेवकासारखा दिसत होता. श्रीपादाच्या ओंजळीतून थोडा वर उडाला त्या वेळी त्यांची दिव्य कांतीच वर उडाल्याप्रमाणे वाटत होती. या वेळी श्रीपाद प्रभु म्हणाले "बी अगोदर असते का झाड अगोदर येते असा निष्कारण वितंडवाद करीत लोक बसतात. या

दोघांच्या ही अगोदर एक शक्ति असते ती म्हणजे "ईश्वर" त्याच्या संकल्पानुसार 'बी' पासून झाड किंवा झाडा पासून 'बी' निर्माण होत असते. त्याच्या अमोघ अशा संकल्पाची कल्पना कोणीच करू शकत नाही. मालिन्याने उदासीन झालेल्या जीवास परमात्मा आपल्याकडे बोलावित असतो. मालिन्य रहित जीव त्या ईश्वरी शक्तिस थांबवून ठेवतो . परमात्म्यात विलीन झालेला जीवात्मा सुपिक जमिनीत पेरलेल्या 'बी' प्रमाणे असतो. अशा जीवात्म्याला सृष्टीचक्रात येण्यापासून कोणी अडवू शकत नाही. परमेश्वराच्या इच्छेनुसार त्याला शरण आलेले जीव कारण देह घेऊन पुर्नजन्म घेतात व दैवी कार्य संपन्न करतात. हे कार्य झाल्यावर ते पुनरपि परमात्म स्वरूपात विलीन होतात. असे हे जीव परमात्म्याच्या अत्यंत समिप राहून अत्युच्य आनंदाचा लाभ घेतात.

जीवात्मा आणि परमात्मा यात भेद भाव करणारे जीव सुध्दा कारण देह प्राप्त करून दैवी कार्य संपन्न करतात परंतु त्यांच्या स्थितीत बदल होत नाही. द्वैत, विशिष्ठअद्वैत किंवा अद्वैत स्थिती मानणाऱ्या लोकांची एकादी मनोकामना पूर्ण होते. त्यामुळे सर्व सामान्य लोकांना द्वैत श्रेष्ठ, का विशिष्ठ अद्वैत श्रेष्ठ, का अद्वैत श्रेष्ठ असा संभ्रम पडतो. "सृष्टी , स्थिती आणि लय" या क्रिया प्रतिक्षणी घडतच असतात. ब्रह्मा, विष्णु आणि महेश हे तिघे आपआपल्या कल्पांतांत अव्यक्त स्वरूपात असतात. ते परमेश्वराच्या महासंकल्पास अनुसरून व्यक्त , साकार रूपात येऊन नवीन स्वरूपात निर्माण केलेल्या ब्रह्मांडात सृष्टीची उत्पत्ती करतात. जीवांना आपआपल्या संस्कार आणि योग्यतेनुसार विश्वपालनाच्या कार्यात हातभार लावावा लागतो. या कार्यात त्यांना दैवी शक्तींची

मदत होत असते. या दैवी शक्तींना विरोध करणाऱ्या अनेक राक्षसी शक्ति सुध्दा असतात. यवन लोक सगुण रूपात असलेल्या निराकार देवाला "अल्ला" असे संबोधतात तर इसाई लोक त्यालाच "येशु" असे म्हणतात. संबोधन कोणत्याही नावाने केले तरी सर्वांमध्ये एकच आदरणीय, प्रेमळ, करूणायुक्त असे दिव्य चैतन्य प्रवाहित होत असते." सर्व धर्मांत, सर्व मतांत, सर्व सिध्दांतात, स्वयं प्रकाशाने चमकणारे मूळ तत्व 'मी' च आहे. प्रत्येक जीवाच्या इच्छा आकांक्षा यांना अनुसरून त्या त्या मार्गाने त्या त्या स्थितीला अनुसरून चालविणारा 'मी' च आहे. मी सर्व तंत्रामध्ये स्वतंत्र असल्याने, मला साध्य अथवा असाध्य असे कोणतेच विधान नाही. सर्व देव देवतांच्या स्वरूपात अंतर्हित जाज्वल्याने प्रकाशित होणारा 'मी' च आहे. त्यामुळे त्या, त्या स्वरूपाद्वारे

पूजा स्तोत्र या सर्व उपचारांचा स्विकार करणारा 'मी' च आहे. सर्वांना बोध करणारा 'मी' च आहे. कलीपुरुष अंतर्धान पावल्यानंतर सर्व मतातील सार असलेला सनातन धर्म म्हणजे माझेच स्वरूप आहे, असे ज्ञान उदयास येईल. त्यावेळी साधक बहिर्मुखाने किंवा अंतर्मुखाने माझे सदैव दर्शन घेतील. त्यांच्याशी प्रेमळपणाने संवाद साधणारा 'मी' च आहे. वेदांतात, सुध्दा प्रथम 'सत्य', नंतर 'ज्ञान' आणि त्यानंतर ब्रह्म असे वर्णन आहे. 'मी' च तिन्ही सत्य, ज्ञान आणि ब्रह्म स्वरूप आहे. "नास्तिकांना" देव नाही असे सांगणारा 'मी' च आहे. आस्तिकांना देव आहे याची साक्ष 'मी' च देतो. समस्त "गुरुस्वरूप" माझेच आहे. सत्यलोक, सत्यनाम, गोलोक, महाशून्यातील समस्त साधना स्थितीत स्वयंप्रकाशित प्रकाशमान असा 'मी'च आहे. जो साधक माझी निर्मल भाव-भक्तीने आराधना

करतो, जीवनाचा सारा भार माझ्यावर सोपवून मला अनन्य भावाने शरण येतो त्याचा योगक्षेम मी नेहमीच चालवितो. मी श्रीपाद आहे मी श्रीवल्लभ आहे. आजोबा, तेंव्हाचा अति प्राचिन असा योगी अत्रि-अनसूयानंदन आज श्रीपाद श्रीवल्लभ आहे. भारद्वाज मुनींना दिलेल्या वचनानुसार मी पीठीकापुरम या क्षेत्री अवतार घेतला आहे. श्री वेंकटअप्पय्या श्रेष्ठी यांच्या नेत्रातून आनंदाश्रूंचा पूर ओसंडून वाहू लागला. त्यांनी श्रीपाद प्रभूंना गाढ अलिंगन दिले. त्यांना झालेल्या आत्मानुभूतीचे वर्णन शब्दांकित करणे केवळ अशक्य होते. थोडा वेळ थांबल्यानंतर ते सहज स्थितित आले आणि श्रीपादांना म्हणाले "अरे बाळा श्रीपादा, आमच्या वंशावर तुझी अशीच सदैव कृपा असू दे. आमच्या सर्व गोत्रजा तुझा अनुग्रह असू दे. आमच्या आर्य वैश्य कुळावर तुझी छत्रछाया

सर्वदा असू दे." त्यावर श्रीपाद प्रभु म्हणाले "तथास्तु" ब्राह्मणाला एक वर मागण्याचा अधिकार आहे. क्षत्रियांना दोन वर मागण्याचा, वैश्यांना तीन वर मागण्याचा तर शुद्रांना चार वर मागण्याचा अधिकार आहे. तेहतीस कोटी देवांच्या साक्षीने मी वरदान करीत आहे. बापनाचार्युलुच्या घरात ज्या ठिकाणी माझा जन्म झाला त्या स्थानी "श्रीपाद श्रीवल्लभ महा संस्थान" उभारले जाईल. हे महासंस्थान तुमच्या घरापासून तेहतीस पावलाच्या अंतरावर असेल तसेच ते श्री बापनाचार्युलूच्या व श्री नरसिंह वर्मा यांच्या घरापासून सुध्दा तेहतीस पावलांच्या अंतरावरच असेल. तुमच्या वंशातील तेहतीसाव्या पिढीतल्या व्यक्तीस निमित्त मात्र करून माझ्या संस्थानाची निर्मिती करून सर्व व्यवस्था मीच पाहणार आहे. तुमच्या वंशातील "माडेय" नांवाच्या महापुरुषास या संबधी मी आदेश

देणार आहे, तो असा, त्याने गुरुवारी मध्यान्ह काळी कोणत्याही एका रूपात येऊन मला नैवेद्यासाठी केलेल्या पदार्थांचा थोडा भाग स्विकारावा. यामुळे माडेय गोत्रात जन्मलेल्या सर्वांवर माझा सदोदित अभय हस्त राहील. त्यांची सदैव उन्नती होत राहील. तू इच्छिल्याप्रमाणे आर्यवंशावर सर्वदा माझी कृपादृष्टी राहील. आर्यवंशीयाना राज्याधिकार मिळतील. भविष्यात आर्यवंशी भारताचा राजा होईल आणि विधि लिखितानुसार तो पीठिकापुरमला येईल. त्याला माझा अनुग्रह प्राप्त होईल. नेपाळ राज्यातून असंख्य भक्तगण पीठिकापुरमला माझ्या दर्शनासाठी येतील. हे माझे वक्तव्य काळया दगडावरील रेघेप्रमाणे आहे. सृष्टीतील कोणताही प्राणी त्याला असत्य ठरवू शकणार नाही. आजोबा, कालांतराने माझ्या या जन्मीभूमीवर बरीच परिवर्तने

घडतील. या स्थानाच्या नूतनीकरणात भूमीतून "मृण्मयी" पात्र मिळेल. पीठीकापुरम् या क्षेत्री निर्माण होणाऱ्या महासंस्थानाच्या देवकार्याला धनसेवा करण्याचे भाग्य केवळ पूर्वसुकृतानेच लाभते. आर्यवंश कुलातील एखाद्या भाग्यवान व्यक्तीलाच धनसहाय्य करण्याचे महाभाग्य लाभणार आहे. त्याच्याकडून हे देवकार्य घडून येणार आहे. अविश्वासु अहंकारी लोक प्रत्येक वेळी तुला मदत मागून तुला महत्व देतील. माझे चरित्र पारायण करणाऱ्यांना "अभिष्ट सिध्दि" प्राप्त होतील. पीठीकापुरम् या क्षेत्रातील माझ्या संस्थानाशी संबंधित कोणत्याहि सत्कार्यात सहभागी होणाऱ्या भक्तांना मी सर्व बंधनातून मुक्त करीन. पीठीकापुरम् क्षेत्री माझ्या "चित्रा" या जन्मनक्षत्रावर जो श्रध्देने माझी अर्चना करील त्याला मी ऋणबंधनातून मुक्त करीन. कुमारिकांना सुयोग्य वर मिळून त्यांचे विवाह

 

संपन्न होतील. असा माझा आशिर्वाद आहे. भूत प्रेत पिशाचादी अदृष्य शक्ती पासून झालेल्या व्यथा मी दूर करीन. श्रावण शुध्द पौर्णिमेस, माझी बहिण वासवी कन्यका हिने मला राखी बांधली. तो पुण्य दिवस आहे. या दिवशी पीठीकापुरम क्षेत्रात माझ्या सानिध्यात जो साधक येईल त्याच्या भाग्यात चित्रगुप्ताकडून महापुण्य लिहिले जाईल. या सर्वांना मी स्वत: प्रमाण आहे. माझ्या लीला स्वयं प्रमाण आहेत. सूर्याने सूर्याची साक्ष कशी द्यावी ?"

श्रीपाद प्रभूंच्या या वक्तव्याने सारेजण अत्यंत भारावून गेले. त्यांच्या लीलांचे वर्णन करणे महाकठीण आहे. दुसऱ्या दिवशी मी, वल्लभेश्वर शर्मा दंपती. सुब्बण्णा शास्त्री, लिंगण्णा शास्त्री श्रीपाद प्रभूंच्या दर्शनासाठी कुरुगड्डीला निघालो. श्रीपादांनी आम्हाला पुन्हा एकदा

आशिर्वाद दिला. आणि सुहास्य वदनाने ते म्हणाले "अहा हा ! काय ही चर्चा रंगली ! श्रीपाद श्रीवल्लभ संस्थानाचे वर्णन करण्यात खूप वेळ गेला. मल्लादी यांचे ऋण, वेंकटप्पय्या यांचे ऋण श्रेष्ठी यांचे ऋण तसेच वत्सवाई यांचे ऋण कधीच फेडता येणार नाही." असे सांगून स्वामींनी मौनमुद्रा धारण केली.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -20

# श्रीपादांचे दिव्य मंगलस्वरूप

मी सकाळीच श्रीपाद प्रभूंच्या दर्शनासाठी कुरुगड्डीला आलो. श्रीपादांच्या दिव्य शरीरातून तेजोमय किरण बाहेर पडत असल्याचे मला दिसले. त्यांच्या पाणीदार नेत्रात शांती, करुणा, प्रेम, ज्ञान, ज्योती स्वरूपात ओसंडत होते. त्यांच्या सहवासात असणाऱ्या भक्तांना शांती, करूणा, प्रेम ज्ञान यांची कांही प्रयास न करता प्राप्ति होत असे. इहलोकात ते एकमेव प्रभुस्वरूप होते. निराकार तत्त्व साकार होऊन, सगुण रूपाने मानवाकार घेऊन डोळयासमोर दिसल्याने मी आनंदाने भावविभोर झालो.

 

श्रीपादांच्या अनुग्रहामुळे त्यांच्या जवळ येऊन नमस्कार करण्याचे भाग्य मला लाभले. त्यांच्या मुखाकडे पहाताच एक अलौकिक शांती, वात्सल्य, प्रेम माझ्या अंतरंगात व्यापून माझ्या मन, शरीर आणि हृदयास अवर्णनीय आनंदाची अनुभूती झाली. मी श्रीपादांच्या चरणांना अत्यंत श्रध्दाभावाने स्पर्श केला. माझे शरीर त्या स्पर्शाने हलके हलके वाटू लागले. माझ्या डोळयातून तेज बाहेर आल्यासारखे वाटले. माझ्या शरीरातील प्रत्येक अवयवातून काळे तेज बाहेर येत होते. त्या तेजाने माणसाचा आकार धारण केला. तो आकार माझ्या सारखाच होता. श्रीपादांनी मंद हास्य करीत मला प्रश्न केला "तुझ्या सारखा आकार असलेला तो कोण आहे ते कळले का ?" मी म्हणालो "स्वामी तो आकार मी पाहिला तो माझ्या सारखाच वाटला. परंतु माझ्या शरीरातून कसा बाहेर आला ते कळले नाही. ती आकृती कोणाची होती तेही कळले नाही. त्यावर श्रीपाद प्रभू

म्हणाले" "ते तुझे पापशरीर होते. तो तुझ्यातील पापरूपी पुरुष होता. आता तुझ्या शरीरात राहिलेला पुण्य पुरुषच आहे. प्रत्येक मानवाच्या देहात एक पाप पुरुष आणि एक पुण्य पुरुष असतो. ह्या जोडीचे विभाजन होऊन पाप पुरुष जेंव्हा निघून जातो तेंव्हा तिच मुक्तीची अवस्था असते. ब्राह्मण कुलात जन्म घेतल्यावर निष्ठावंत होऊन पाप शरीराचे दहन करून उरलेल्या पुण्य शरीराचा आपल्या उत्तम कर्मांनी उध्दार करावा. ब्राह्मणांनी आपल्या यजमानांकडून वेदशास्त्रातील विहित कर्म करवून घेतांना आपल्या उपजीविकेपुरतेच धन घ्यावे. अशा प्रकारे न केल्यास ब्राह्मणास यजमानाच्या पापांचे वाटेकरी व्हावे लांगते. त्या पापांना ब्राह्मणांनी आपल्या तमोगुणरूपी अग्नीत दहन करावे. अशा प्रकारे जीवन जगणारा ब्राह्मणच ब्राह्मत्वास पात्र होतो. अन्यथा तो जातीनेच केवळ ब्राह्मण असतो. ब्रह्मज्ञानी ब्राह्मण नव्हे.

आमचे आजोबा बापनाचार्युलु, वडिल अप्पलराजाशर्मा हे दोघे सद्ब्राह्मण होते. माझी आजी आणि माता सुमती महाराणी या दोघी परम पवित्र स्त्रिया होत्या. त्यांचे केवळ स्मरण केल्यानेच लक्ष लक्ष पापे नाहिशी होतात." असे बोलणे झाल्यावर श्रीपाद प्रभूंनी क्षणभर मौन धारण केले. नंतर आपल्या उजव्या हाताच्या बोटानी भूमीस स्पर्श केला त्या वेळी त्यांच्या डाव्या बाजूने प्रकाशाचा एक झोत निघाला आणि यज्ञासाठी लागणारी साधन सामुग्री प्रकट झाली. कांही मधुर फळे, सुवासिक फुले, थोडे सोने, चांदी आणि नवरत्नाचा हार तसेच दिव्य अग्नि प्रकट झाला. माझ्या शरीरातून निघालेला पापपुरुष भयाने कंपित होऊन आक्रोश करु लागला. श्रीपाद प्रभूंनी त्या पाप पुरुषाला नेत्रानीच अग्नित भस्म होण्याची आज्ञा दिली. त्यानुसार तो अग्नित पडून भस्मसात् झाला. माझ्या शरीरात अग्निचा भडका उडाला. "स्वामी मला वाचवा" अशी विनंती केली. प्रभूंच्या नेत्रातून एक दिव्य तरंग निघून मला स्पर्शून

गेला. माझे शरीर त्या तरंगाने शीतल झाले. माझी कुंडलीनी शक्ति जागृत झाल्यासारखे वाटले. माझ्या नाडीचे स्पंदन थांबले, हृदयाचे ठोके थांबल्या प्रमाणे वाटले आणि मी समाधी अवस्थेत गेलो.

माध्यान्ह काळ झाला होता. त्या दिवशी गुरुवार होता. श्रीपाद स्वामी स्नान आटोपून भक्तांच्या मेळाव्यात येऊन बसले होते. भक्त जनांनी समर्पित केलेल्या भिक्षा अन्नाला श्रीपादांनी आपल्या दिव्य हस्तांनी स्पर्श केला. कमंडलुतील जलाने, जमलेल्या भक्तांवर प्रोक्षण केले. भिक्षेतील थोडे अन्न काकबळी साठी काढून ठेवले . अत्यंत मधुर अशा आवाजात स्वामींनी मला नांवाने हाक मारली आणि सगळयांना भोजनाची अनुज्ञा दिली. मला त्यांच्या जवळ बोलावून घेतले. क्षणभर डोळे झाकून पुन्हा उघडून माझ्याकडे स्नेहाळ नजरेने पाहिले. त्याच वेळी त्यांच्या हातात एक चांदीचे पात्र प्रकट झाले. त्यात हलवा भरलेला होता. श्रीपाद प्रभु म्हणाले

 

"शंकर भट्टा माझे भक्त मला त्यांच्या भक्तिपाशने बांधून ठेवतात . मी निरपेक्ष भक्तीभावाला भुलुन जातो. श्रेष्ठींच्या घरी त्यांची धर्मपत्नी माझ्यासाठी आवर्जुन हलवा करीत असे. मी जेवल्यावरच तिचे समाधान होई. त्यांची नात लक्ष्मी वासवी हिने माझ्या हातात राखी बांधली होती. तिच्या पतीच्या पत्रिकेत अनिष्ट योग असल्याचे एका ज्योतिष्याने सांगितले होते. तिने मला विनंती केली की तिच्या राखीचा स्वीकार करून तिला अखंड सौभाग्याचा आशिर्वाद द्यावा. मी तिला अखंड सौभाग्याचा आशिर्वाद देऊन फुले, बांगडया, आणि कुंकवाचा प्रसाद दिला. तिच्या आज्जीने-वेंकट सुबम्माने प्रेमभावाने तयार केलेला हलवा तिने मला दिला. या मधुर प्रसादाच्या सेवनाने अनेक जन्मांची पापे नष्ट होतात. माझ्या प्रेमळ भक्तांनी श्रध्दाभावाने दाखविलेल्या नैवेद्याचे मी त्यांचे घरी सूक्ष्म रूपाने जाऊन सेवन करतो. परंतु श्रेष्ठांच्या घरचा महाप्रसाद मात्र मी प्रत्यक्ष जाऊन स्वीकार

करतो." सर्व भक्तांनी हा प्रसाद घ्यावा असे श्रीपादांनी सांगितले. या प्रसादाच्या माधुर्याचे वर्णन कोणाला करता येईल? प्रसादाचा थोडा भाग त्यांनी आकाशात फेकला. तो नभो-मंडळात विलिन झाला. थोडा प्रसाद त्यांनी भूमीस अर्पण केला, तो भूमातेने स्वीकार केला.

तो प्रसाद सर्व भक्तांनी वाटून घेतला. कोणासही निराश करायचे नाही असा श्रीपाद प्रभूंचा स्वभाव होता. कितीही प्रसाद वाटला तरी तो कमी होत नव्हता. याच वेळी पद्मशाली कुलातील गुरुचरण नांवाचा एक भक्त तेथे आला. त्याला श्रीपाद स्वामींनी चांदीच्या पात्रातील प्रसाद दिला. तो त्याने मोठ्या श्रध्दाभावाने खाल्ला. नंतर स्वामींच्या आदेशानुसार ते चांदीचे पात्र कृष्णा नदीच्या पात्रात सोडून दिले.

 

यानंतर श्रीपाद प्रभू म्हणाले "पद्मशाली कुलातील माडेय गोत्र असणारे लोक कालांतराने मांस भक्षण करणारे झाले. माझ्या सान्निध्यात कांही कारण नसलेले कार्य कधीच होत नाही." गुरुचरणा तू कित्येक दिवसांपासून मला नैवेद्य दाखवून "श्रीगुरु शरणम्," "स्वामी शरणम्" असे नामोच्चारण करीत पवित्र जीवन व्यतित करीत आहेस. आज तुला श्री गुरुंच्या करकमलातून महाप्रसाद मिळाला. तुला कळलेले गुरुतत्व या शंकरभट्टास सांग. आम्ही माध्यान्ह समयी योगनिद्रेत असतांना मानस संचार करतो. त्या वेळी कोणास दर्शन देत नाही. आमच्या विश्रांतीचा भंग होऊ नये."

श्री गुरुचरण कलियुगातील एक महान भक्त होता. त्याला योग मार्गातील अत्युच्च स्थिती प्राप्त झाली होती. त्याला शंकरभट्ट म्हणाला "हे महापुरुषा गुरुतत्त्वाचे ज्ञान मला देऊन कृतकृत्य करावे." यावर गुरुचरण म्हणाले "अनंत कोटी ब्रह्मांडात उत्पत्ति,

 

स्थिती आणि लय हे ज्यांच्या केवळ संकल्प मात्रानेच होते, असे श्री दत्तात्रय प्रभू निर्गुण निराकर स्वरूपातून श्रीपाद श्रीवल्लभांच्या स्वरूपात साकार रूपाने अवतरित झाले आहेत. त्यांना साकार समजणे महादोषास्पद आहे. कारण ते साकार रूपात असले तरी निराकारच आहेत. सगुण दिसत असले तरी निर्गुणच आहेत. एका देवतेच्या रूपात दिसत असले तरी सर्व देवता त्यांच्यामध्ये सामावलेल्या आहेत. ते सर्व योगमार्गाचे श्रेष्ठ गुरु आहेत. सृष्टीतील अनेक महर्षीनी आपआपल्या साधन वैशिष्टाने साक्षात्कार करून घेतलेल्या देवतांचे स्वरूप म्हणजेच श्रीपादांचे दिव्य रूप होय. पूर्वकाळापासून महर्षींना अनेक दिव्य शक्ति प्राप्त होत्या. वशिष्ठ ऋषी हव्ययुक्त यज्ञ करीत असत. विश्वामित्र ऋषी हव्यसामुग्री शिवाय यज्ञ करीत. जमदग्नी ऋषी विश्वामित्र ऋषींचे अनुकरण करीत. आपले श्रीपाद प्रभू सर्व प्रकाराच्या यज्ञांचे समर्थन करीत. कोणतेही कर्म करण्यास अथवा न करण्यास

किंवा वेगळया पध्दतीने करण्यास त्या कर्माचे आणि मंत्रांचे रहस्य जाणण्यास ते समर्थ होते. श्रीपाद प्रभु सर्व समर्थ असून सर्व कर्मांचे रहस्य जाणणारे असल्याने त्यांना त्या त्या व्यक्तींच्या आचरणाचे सूक्ष्म ज्ञान होते. बापनाचार्युलु, नरसिंहवर्मा, वेंकटप्पय्या श्रेष्ठी यांना अनेक प्रकारच्या योगाचे ज्ञान होते. सर्व शक्ति मध्ये प्रेमशक्ति सर्वात श्रेष्ठ आहे. या तिघांना श्रीपाद प्रभूंची वात्सल्य भक्ति प्राप्त होती. त्यांच्या प्रेमशक्तिमुळे ते स्वामींना आपले इच्छित कार्य सुसंपन्न करण्याचा आग्रह करून ते करवून घेत. श्रीपाद स्वामी सुध्दा त्यांचे कार्य मोठ्या आनंदाने सुसंपन्न करीत असत.

श्रीपाद प्रभू प्रत्येक स्त्रीमध्ये आपल्या मातेचे स्वरूप पाहून सहज स्वभाव, सहज वात्सल्याने शिशुप्रमाणे वर्तन करीत. त्या स्त्रिया सुध्दा स्वामींची शिशुरूपातच प्रेमभावाने आराधना करीत. हीच महामाया !

योगी आणि वेदज्ञ यांनी पुन्हा पुन्हा वर्णन केलेला निर्गुण, निराकार, परब्रह्मरूप दिव्य शिशु पीठिकापुरम या क्षेत्री आपल्या दिव्य लीलांनी सर्वांचे चित्त आकर्षित करीत असे. या शिशूच्या लीलांचे वर्णन करणे अतर्क्य होते. दैवमार्गाने, योग मार्गाने, ज्ञान मार्गाने, वेद शास्त्राच्या अध्ययनाने साधना करणाऱ्या साधकांना, त्यांच्या त्यांच्या मार्गाने श्रीपाद श्रीवल्लभांच्याच कृपेचा लाभ होतो. यानंतर शंकरभट्ट त्या महान भक्त श्री गुरुचरणांना म्हणाले, "महाराज आपणास श्रीपाद स्वामींचे प्रथम दर्शन कसे झाले तो कथा प्रसंग सांगून माझा उध्दार करावा."

गुरुचरण म्हणाले "हे ब्राह्मणोत्तमा ! तुम्ही अत्यंत धन्य धन्य आहात. तुम्हाला श्रीपाद प्रभूंच्या दिव्य लीलांचे समक्ष दर्शन पूर्व जन्मीच्या सुकृतामुळेच घडले.

तुम्हास प्रतिदिन स्वामींच्या करूणा कटाक्षाचा लाभ होतो. मी देवभक्त कुटुंबात जन्मलो. लहानपणा पासूनच मी आमचे कुलदैवत श्रीदत्तप्रभूं ची भक्ति करीत आहे. आमच्या कुटुंबात अनेक आर्थिक समस्या होत्या. मी दत्तात्रेयांची अत्यंत श्रध्देने आराधना करीत होतो परंतु समस्या कमी होत नव्हत्या. आमच्या गावातील कांही लोकांनी मला सल्ला दिला की तुझ्यावर श्रीदत्तात्रेयांची कृपा नाही. तू दुसऱ्या कुलदेवतेची निवड करून त्यांची आराधना कर. असे केल्याने तुझे संकटातून निवारण होईल. मी त्यांच्या मतास सहमत होऊन रात्री झोपलो. मला स्वप्नात एक भयंकर कसाई दिसला. तो प्रेमाने शेळयांचा सांभाळ करीत असे परंतु दररोज तो कांही शेळयांचा बळी देत असे. त्याच्या हातातील कोयता पाहून मी भयभीत झालो. तो मेघाप्रमाणे गंभीर स्वरात म्हणाला "मी दत्त आहे. तू कोणत्याही देव देवतांची आराधना केली तरी त्या स्वरूपात मीच असतो. तू आराधना करणाऱ्या देवास

नामरूपाने बदललेस तरी मी बदलणारा नाही. मी तुला कधिच सोडणार नाही. तू माझी छाया आहेस. माझी छाया मला सोडून कशी राहील ? समस्त देव देवतांच्या संकल्पांना आणि समस्त कोटी मानव संकल्पना चालविणारा महासंकल्प मीच आहे. भगवत् अवतारातील भगवत् स्वरूपाला कांती देणारा असा तो ब्रह्म मीच आहे. वाघाच्या तोंडातून एखादा प्राणी सुटु शकेल परंतु माझ्या हाती आलेला तू मला कधिही सोडून जाऊ शकणार नाहीस. दत्त भक्तांनी सिंहाच्या छाव्या प्रमाणे शूर असावे. आणि भित्रेपणा सोडून द्यावा. मी सिंहासारखा आहे. सिंहाच्या पिल्लांना सिंहाजवळ भय नसते. ते त्यांच्या बरोबर मुक्तपणे खेळत असतात. मी या कोयत्याने तुझा वध करीन. तुझे रक्षण करणारा त्रैलोक्यात कोणी नाही.

मी अत्यंत भयभीत होऊन ओरडलो आणि त्याच वेळी माझा स्वप्न भंग झाला. घरातील लोक काय झाले असे

विचारु लागले. मी त्यांना स्वप्नातील वृतांत कथन केला. आमच्या आर्थिक समस्या दिवसेदिवस अधिकच वाढत होत्या. कोणत्या जन्मात केलेल्या कर्माचे फलस्वरूप ही दरिद्र अवस्था आम्हास भोगावी लागत होती ते कळत नव्हते.

सकाळ होताच एक हरीदास आमच्या घरासमोर आला. त्याच्या हातात चिपळया होत्या. तो हरीनामाचे गायन करीत होता. त्याच्या डोक्यावर तांदुळाचे टोपले होते. हा एक विचित्र हरीदास होता. त्याच्या टोपलीत एक औदुंबराचे रोप होते. तो दारा समोर उभा राहून तांदुळ देता का ? असे विचारित होता. मी घरात तांदुळ शोधीत असताना एक मूठभर कण्या मिळाल्या. त्या कण्यांचा स्विकार करून तो म्हणाला "महाराज काल रात्री एका कसायाने गुरुचरण नांवाच्या एका दत्त भक्ताची हत्या केली. आश्चर्याची गोष्ट अशी की त्या दत्त भक्ताचे प्राण त्याच्या शरीरातून निघून या

औदुंबराच्या रोपात प्रविष्ट झाले. औदुंबराच्या वृक्षाखाली श्री दत्त प्रभुंचा निवास असतो असे प्रमाण आहे. हे रोप असामान्य आहे. गोदावरी मंडलातील पीठिकापुरम् एक महान क्षेत्र आहे. तेथे श्री दत्तात्रेय, श्रीपाद श्रीवल्लभांच्या रूपात वास्तव्य करीत आहेत. श्रीपादांच्या आजीच्या औदुंबर वृक्षाचेच हे रोप आहे. हे रोप तुमच्या घरी लावल्यास तुमच्या सर्व कामना पूर्ण होतील" त्या हरीदासाचे वक्तव्य ऐकून मी भ्रमितच झालो. मी म्हणालो, "गुरुचरण मीच आहे, माझी हत्या झाली नाही. मी दत्तभक्त आहे. मी स्वप्नात एक कसाई पाहिला होता तो मला मारून टाकीन असे म्हणाला होता."

## औदुंबरवृक्ष महिमा

एवढयावर हरिदास जोराने हसला आणि म्हणाला "तू म्हणतोस ते खरे का ? नाही म्हण. या सृष्टीत

 

असलेल्या अनेक मार्गांचे आदिगुरु म्हणजे दत्तच आहेत. ते भविष्यात घडणाऱ्या घटना जाणतात. त्यांच्या समोर आपण अगदीच क्षुद्र असतो. पत्रिकेत अनिष्ट काळ असे जरी दाखविले असले तरी गुरुदेव त्यांच्या शिष्याला घोर असा मानसिक त्रास, घोर अपमान पचविण्याचे सामर्थ्य प्रदान करतात. घोर कष्टातून बाहेर काढून त्याचा कर्मक्षय करून त्याला पुनर्जीवन देतात. तसेच अवतारी पुरुष त्यांच्या आश्रितांचे दु:ख दूर करून त्यांच्या व्याधी कमी करून त्यांना पुनर्जन्मप्रदान करतात. दत्तात्रेय प्रभू त्यांच्या भक्तांना प्राणशक्ति देऊन त्यांचा नित्य निवास असणाऱ्या औदुंबर वृक्षातून निघणाऱ्या प्राण शक्तिद्वारा आपल्या भक्तांचे रक्षण करतात. अल्पबुध्दिचे साधक मात्र असे समजतात की त्यांच्या शरीरातील प्राणशक्तिमुळे ते जिवंत आहेत. खरे तर ती प्राणशक्ति औदुंबर वृक्षातून निघून भक्ताचा शरीरव्यवहार उत्तमपणे पार पाडू शकते. भक्त मरणावस्थेत असल्यास त्या क्षणी औदुंबर वृक्षातून

 

निघालेली प्राण शक्ति भक्ताच्या शरीरात प्रतिष्ठित होऊन भक्ताचे आयुष्य थोडे वाढते. ही प्राणशक्ति परिपूर्ण असते. कारण प्रत्येक औदुंबराच्या वृक्षामध्ये सूक्ष्म रूपाने श्री दत्तात्रेय प्रतिष्ठित असतात." हरिदासाने सांगितलेला वृतांत आश्चर्यचकित करणारा होता. कृष्णदास नांवाचा एक व्यापारी त्या मार्गाने जात होता. मी त्या औदुंबर वृक्षाला मोठ्या प्रेमाने आणि भक्तिभावाने वाढवित होतो. काही दिवस असेच गेले. आमचे एक दूरचे नातेवाईक, रेशमी कापडाचा व्यापार करीत असत ते वृद्ध झाले होते. त्यांना मूलबाळ नव्हते. माझ्यावर त्यांचे प्रेम होते. ते आमच्या घरात वास्तव्याला होते. त्यांनी थोडे धन देऊन रेशमी कपडयाचा व्यापार करण्यास सांगितले. ते सुध्दा आमच्या घरी असलेल्या औदुंबराच्या वृक्षास भक्तीभावाने प्रदक्षिणा घालून श्रीदत्तप्रभूंची आराधना करीत. आमच्या घरी कोणतीही आपत्ति अथवा संकट आले असता आम्ही औदुंबराला प्रदक्षिणा घालून आमचे

 

दु:ख निवारण करण्यास सांगत असू. आमच्या याचना दत्त प्रभूंना कळत असत. आमची संकटे दत्तकृपेने दूर होत होती. श्रीदत्तप्रभूंना नवस केला असता तो औदुंबराच्या वृक्षाकडून पूर्ण होत असे. औदुंबराच्या वृक्षाची सेवा करणे दत्त भक्तांचा महत्वाचा विधि होता. घरात औदुंबराचे झाड असणे म्हणजे साक्षात दत्तात्रेयच घरात असल्या सारखे होते. औदुंबराचा महिमा वर्णावा तितका कमीच."

## पाप कर्माचे फलस्वरूप काटेरी वृक्षाचा जन्म

मी माझ्या व्यापाराच्या निमित्ताने आंध्र प्रदेशात असताना माझ्या भाग्याने पीठिकापुरम् क्षेत्री येऊन पोहोचलो. श्री बापनाचार्युलूचे घर शोधून काढले त्यावेळी श्रीपाद प्रभू बापनाचार्युलू बरोबर अंगणात बसले होते. त्यांच्या अंगणात एक काटयाचे झाड होते. त्या झाडाला

 

श्रीपाद प्रभू मोठ्या श्रध्दाभावाने प्रतिदिन पाणी घालीत असत. बापनाचार्युलू श्रीपादांना म्हणाले "हे काटयाचे झाड तुला एवढे प्रिय का आहे ? संजीवनी वृक्षाचे रोप असते तर त्यावर प्रीती करणे योग्य झाले असते. तू त्या झाडास श्रध्देने पाणी घातलेस अथवा न घातलेस तरी ते वाढणारच आहे" त्यावर श्रीपाद प्रभू म्हणाले, "आजोबा, हे काटयाचे झाड पूर्वीच्या जन्मी आपल्या घराण्यातील "विश्वावधानी" होते. स्वयंभू दत्तात्रेय, बापनाचार्युलुच्या नातवाच्या रूपाने अवतरीत झाले आहेत. केवढे हे आश्चर्य. परंतु विश्वावधानी, आजोबा परिहासाने म्हणत केवढा हा देवद्रोह. तेच या जन्मी काटयाच्या झाडाच्या रूपाने आपल्या अंगणात स्थित आहेत. मी, आई, मोठे भाऊ, श्री विद्याधरी, राधा, सुरेखा, वेंकट सुब्बय्या श्रेष्टींच्या घरी आणि नरसिंह वर्माच्या घरी मोठ्या प्रेमभावाने जेवण करीत असू. हे आमचे वर्तन विश्वावधानी आजोबाना मुळीच आवडत नसे. ते क्रोधाने म्हणत मल्लादी आणि मंदकोटा या

 

दोन कुटुंबातील धर्मभ्रष्ट करणाऱ्यांना, ब्राह्मण समाजातून बहिष्कृत करा. आज तेच आजोबा काटयाच्या वृक्षरूपात दिसत आहेत."

श्रीपाद श्रीवल्लभ प्रत्यक्ष दत्तात्रेय आहेत याचे प्रमाण काय ? असे तर्क कुतर्क करणाऱ्या विश्वावधानी आजोबा या काटेरी वृक्षाच्या रूपात जन्मले आहेत असे सांगून श्रीपाद प्रभू पुढे म्हणाले, "माझी आई सर्व सौंदर्य स्वरूपिणी-सुमती महाराणीस श्रेष्ठी आत्याघरची लेक मानीत. एकदा त्यांनी तिला सन्मानाने जेवणास बोलावून तिची नूतन वस्त्रांनी ओटी भरली. यामुळे त्यांना आपला जन्म धन्य झाल्या सारखे वाटले. नरसिंह वर्मा आजोबांना विश्वावधानी नेहमी टोचून बोलत. त्याने आपल्या आजोबाची मृत्युनंतर उत्तर-क्रिया व्यवस्थित पणे न केल्यामुळे आणि त्यांचा पापभार अति झाल्यामुळे त्यांना काटेरी वृक्षाचा जन्म मिळाला होता. त्या काटेरी झाडास पाहून व पूर्ववृतांत

 

जाणून श्रीपाद प्रभूंना त्यांची दया आली. त्यांनी त्या झाडावर थोडे पाणी शिंपडून ते अंगणातून बाहेर आले. श्रीपादांचे मुग्धमनोहर रूप पाहून मला आनंदाचे भरते आले आणि नेत्रांतून आनंदाश्रू वाहू लागले. मी श्रीपाद प्रभूंच्या दिव्य चरणकमलावर आपले मस्तक अत्यंत नम्र भावाने टेकविले.

श्रीपादांनी मोठ्या प्रेमभराने मला कुरवाळले आणि म्हणाले "हे गुरुचरणा, उठ हा काय वेडेपणा. तू पुनर्जन्म घेऊन माझ्याकडे आला आहेस." मी कापडांचा व्यापारी असल्याचे ओळखून बापनाचार्युलू म्हणाले "आमच्या सोनुल्यासाठी तुझ्याकडे कपडे आहेत काय ?" मी श्रीपादांना शोभतील असे कपडे काढून दिले. श्रीपाद प्रभू गुरुचरणास आत घेऊन आले आणि म्हणाले "आता तुला एक गम्मत दाखवितो ती तू बघ" त्यांच्या बरोबर बापनाचार्युलू सुध्दा होते श्रीपाद प्रभू सर्वांना त्या काटेरी झाडाजवळ घेऊन गेले आणि म्हणाले "हे

विश्वन्ना आजोबा ! तुमच्या मुलानी श्रध्दारहित श्राध्दकर्म केल्याने आणि बापनाचार्युलू सारख्या महापुरुषाची अकारण निंदा केल्याने तुम्हाला हा काटेरी झाडाचा जन्म आला. हा गुरुचरण तुमचा पूर्वजन्मीचा पुत्र आहे. याच्या हातून श्रध्दापूर्ण भावाने मी आपले उत्तर कर्म करवून घेईन. यासाठी तुमची संम्मति आहे ना ?" हे प्रभूंचे वक्तव्य ऐकून आम्ही सर्व आश्चर्यचकित झालो. त्या काटेरी झाडास आच्छादलेला विश्वावधानीचा प्रेतात्मा म्हणाला या पेक्षा मोठे भाग्य ते कोणते ? श्रीपादांनी गुरुचरणास ते काटेरी झाड उपटून काढून त्यास अग्नि देण्यास सांगितले. गुरुचरणाने श्रीपाद प्रभूंच्या सांगण्याप्रमाणे ते काटेरी झाड उपटून त्याचे दहन केले व नंतर स्नान केले. स्नानानंतर प्रभूंनी त्यास विभूती लावण्यास सांगितले. यावेळी श्रीपाद म्हणाले. "भगवान शिव जे भस्म धारण करतात ते महायोगी महान तपस्वी, महान भक्त महान सिध्द पुरुष, यांच्या मृत्यु नंतर त्यांच्या

शरीराच्या दहनाची पवित्र विभूती असते. शिव प्रभूच्या तेजोमय वलयात हे महात्मे ऐक्य स्थितित विश्राम करतात. वानर, सर्प, गाय या पशुंची न कळत आपल्या हातून हत्या झाल्यास त्यांची न चुकता उत्तर क्रिया करावी. त्यांचे श्रध्दापूर्वक दहन करून अन्नदान करावे. मंत्रपूर्वक करण्याचा कोणताही विधि करण्याची आवश्यकता येथे नाही. आपल्या पूर्वऋणानुबंधाने कोणत्या जीवाची न कळत हत्या झाल्यास त्याचे श्रध्दापूर्वक दहन करावे. असे केल्याने पापकर्मांचा नाश होतो. आणि त्या प्राण्यांना सद्गती मिळते.

पूर्व काळात गौतम नावाचे एक महर्षि होते. त्यांची पत्नी अहल्या एक महान पतिव्रता स्त्री होती. ते विश्वशांतीसाठी कोटी कमलाने यज्ञ केला होता. गौतम महर्षि आपल्या तपोबलाने घरासमोर अन्न धान्याचे पीक उगवीत असत. मानवाला आहारा शिवाय जीवन जगणे शक्य नाही. महर्षि गोधनाची सुध्दा वृद्धी करीत.

तसेच गोअमृतासारख्या पदार्थांची निर्मिती करीत. श्रीपाद प्रभु पूढे म्हणाले, "यज्ञ याग न केल्यास विश्वनियंता, देवता आणि मानव यांच्या परस्पर सहकार्याने चालणारे जीवन निरर्थक होऊन धर्माला ग्लानी येते. माया निवारणासाठी, गोहत्येचे पातक निवारण्यासाठी गोदावरी नदी गौतम ऋषींच्या सहाय्याने अवतरित झाली. त्यांच्या या महान कार्यासाठी सारा जन समुदाय त्यांचा अत्यंत ऋणी आहे.

विश्वावधानी हा गौतम गोत्रातीलच होता परंतु त्याचा संबंध या गोत्रात जन्म घेण्या पुरताच होता. त्रेता-युगात पीठिकापुरम या क्षेत्रात "सावित्रि काटक" नावाचा यज्ञ करण्यात गौतम महर्षिचा मोठा भाग होता. विश्वावधानीच्या भाग्यानेच त्याला पीठिकापुरम् येथे जन्म मिळाला आणि अत्यंत दुर्लभ असे माझे दर्शन त्यास घडले. तो अयोग्य असला तरी माझ्या निर्व्याज प्रेम, करुणेने त्यास सद्गति मिळाली. ही सद्गति

श्रीदत्तात्रेय प्रभुंच्या कृपाप्रसादानेच प्राप्त झाली. ऋणानुबंध नसेल तर कुत्रासुध्दा जवळ येत नाही. आपणास कोणी सहाय्य मागण्यास आल्यास आपण शक्य तेवढी मदत करावी. मदत करणे शक्य नसल्यास आपल्या मधुर वाणीने आपली असमर्थता व्यक्त करावी. परंतु निष्ठुर होऊ नये. जर तुम्ही कठोर वागल्यास सर्व भूतांमध्ये चैतन्य रूपाने वास करणास मी सुध्दा तुमच्या बरोबर तसेच वर्तन करीन. तुम्ही जसे लोकांशी वागाल तसेच लोक तुमच्याशी वागतील. या संपूर्ण सृष्टीतील सत्याचे एकमेव मूल कारण मी आहे. मी सर्व सत्याचे "सर्वमय परम सत्य" आहे. वेदात सुध्दा असे सांगितले आहे की ज्ञानाचे अंतिम सत्य ब्रह्म आहे." श्रीपाद प्रभूंचे हे वक्तव्य ऐकून बापाचार्युलुच्या डोळयातून आनंदाश्रु वाहू लागले. मोठ्या प्रेमभावाने श्रीपादांनी ते आपल्या बाल हातांनी टिपले. आणि म्हणाले "आजोबा तुम्ही सर्वदा माझ्या ध्यानातच असता. तुमचा जन्म धन्य आहे. मी नृसिंह

 

सरस्वतीच्या अवतारात अगदी तुमच्या सारखेच रूप धारण करणार आहे. हे त्रिवार सत्य आहे." बोलताना श्रीपादांनी आजोबांचा हात हातात घेतला होता. यावेळी बापनाचार्युलु म्हणाले "श्रीपादा माझ्या मनांत कित्येक दिवसा पासून एक शंका आहे. विचारू का ?" त्याच क्षणी श्रीपाद चिरहास्य करून म्हणाले "माझ्याकडे काय शंका आहे ? मी दहा वर्षांचा बालक तुमच्या शंकेचे समाधान कसे करू शकेन ? प्रयत्न करून पाहीन" यावर बापनाचार्युलुनी प्रश्न विचारण्यास आरंभ केला. ते म्हणाले "सृष्टी , स्थिती आणि लय याचे कर्ते ब्रह्मा, विष्णु आणि महेश आहेत ना ?" श्रीपाद म्हणाले 'हो' यात शंकाच नाही. "त्यांच्या स्त्री शक्तिस्वरूपात सरस्वती, लक्ष्मी आणि पार्वती आहेत ना ?" यावर श्रीपादांनी होकारार्थी मान हालविली. "या त्रिमूर्तींना आणि त्यांच्या तीन शक्तींना निर्माण करणारी आदि पराशक्ति आहे ना ?" श्रीपाद म्हणाले 'हो'. यावर बापनाचार्युलु म्हणाले, "तर त्यांच्या समोर तू कोण

आहेस ? तू नेहमी माझ्या बांधवाना सांगतोस ती वासवी कन्या कोण ? तुम्ही दोघे भाऊ बहिण आहात याला कांही शास्त्राधार आहे काय ?"

## श्रीपाद सर्व देवस्वरूप - सर्व देवतांचे मूळ श्रीपाद प्रभूच

एकानंतर एक असे अनेक प्रश्न ऐकून श्रीपाद प्रभू मुग्धपणे हसले आणि म्हणाले "आजोबा आताच तुमच्या दृष्टीसमोर काटयाच्या झाडास सद्गति दिली. मी केलेल्या कामास कांही शास्त्र प्रमाण आहे काय ? यासाठी अशा प्रकारच्या चिकित्सेची गरज नाही. मी योगी असून सर्व योगक्रियांत असतो. यामुळे कोणत्याही भूमिकेत मी समरस होतो. सृष्टी ही माझी मायाच आहे. तिलाच आपण सृष्टी मानतो. संपूर्ण सृष्टीत एकच भगवत् चैतन्य भरून राहिले आहे. ते विविध स्थितीत आणि विविध अवस्थेमध्ये परिणामाला

वशिभूत होऊन राहिले आहे. या परिणामक्रमाला कालाचा आधार आहे. कालाचे ज्ञान प्राप्त होत असल्याने परिणाम चक्र अनुभवास येते. या कालाची गणना आकाशातील सूर्य, चंद्र, तारे, ग्रह यांच्या गतीमानाने कळते."

अत्रि महर्षिंना त्रिकालाचे आणि तीन अवस्थांचे ज्ञान होते. या सृष्टीतील एक महान पतिव्रता म्हणून अनसूया माता प्रसिध्दि पावली. श्रीपाद प्रभू पुढे म्हणाले, "मला, सृष्टी , स्थिति आणि लय, तसेच स्थूल, सूक्ष्म आणि कारण अशा तीन देहाबद्दल आणि भूत, भविष्य आणि वर्तमान कालाबद्दल, एकाच कालात अनुभव येतो. यामुळे माझे नित्य वर्तमानच असते. घडून गेलेले, घडत असलेले आणि पुढे घडणारे हे सर्व मी एकाच काळात अनुभवतो. अशा स्थितीत त्रिमूर्ती, त्रिशक्ति माझ्यात असणे ही आश्चर्याची गोष्टी नाही. त्रिमूर्ती, त्रिशक्ति सृष्टीच्या उत्पत्तीच्या अगोदर आदि-

पराशक्तीच्या रूपाने होत्या. ही गोष्ट खरीच आहे. मी आणि आदिपराशक्ति दोघे अभिन्न स्वरूप आहोत. यातील एक सूक्ष्म अंश असल्याने समस्त सृष्टीतील मातृगर्भात एक महासंकल्प आदिपराशक्ति रूपाने विलसत असतो. तेच ब्रह्मयोनी स्वरूप आहे. त्यातूनच त्रिमूर्ती, त्रिशक्तींचा अविर्भाव झाला. त्या आदिपराशक्तिस शक्ति निर्माण करण्याचा संकल्प असो किंवा सृष्टी रचनेचा संकल्प असो तो कसा संभव आहे याची प्रबोधन शक्ति मीच आहे. यामुळे महासंकल्प स्वरूप मीच आहे. त्या महासंकल्प सिध्दिसाठीच आदि पराशक्तीचा अविर्भाव झाला. तसेच त्रिशक्तीचा अविर्भाव झाला तो महा संकल्प रूपच परम गुरुस्वरूप आहे. हा अत्यंत रहस्यपूर्ण विषय आहे. या महान संकल्प स्वरूपात संकल्प मिळताच तो तत्काळ सिध्द होतो. संकल्प होणे आणि सिध्दी पावणे हे दोन्ही एकाच वेळी घडत असते. सर्वशक्तींना एकत्र धरून ठेवणारी मूळ शक्ति मीच आहे सृष्टीतील माता-शिशु संबंध, पिता-पुत्र

संबंध, पती-पत्नी संबंध, भाऊ-बहिण संबंध हे अनिवार्य संबंध आहेत. या पवित्र संबंधाना आदर्श स्वरूप म्हणून देवि-देवता पृथ्वीवर अवतरीत होतात. जीव म्हणजे मायेची शक्ति . मी मायेच्या अतित असलेली महाशक्ति आहे. मायाशक्ति असो अथवा महाशक्ति असो ती योगशक्ति मुळेच फलद्रूप होत असते. जी महाशक्ति स्त्री स्वरूपात वासवीकन्यका म्हणून ओळखली जाते तीच महाशक्ति पुरुष स्वरूपात श्रीपाद श्रीवल्लभांच्या रूपात अवतरली आहे. या दोन्ही शक्तींचा आविर्भाव सुध्दा महासंकल्पाला अनुसरूनच आहे. आदिपराशक्तीची अथवा मूळ दत्त स्वरूपाची आराधना केली असता त्रिमूर्ति आणि त्रिशक्ति अंतर्लिन होतात. या दैवि संबंधांना आणि त्यांच्या तत्त्वांना त्या त्या स्थितितील अनुभूती केवळ साधनासंपन्न जीवाना अवगत होते."

# श्रीपाद प्रभुंची आराधना करणाऱ्या साधकांच्या पापाचे निवारण

"मृगाजवळ जाऊन त्याला संस्कृत व्याकरणाचा बोध करणे निरर्थक असते. संस्कृत शिकून त्या नीच योनीतून मुक्तता मिळवावयाची असल्यास मानव जन्मातील मिळणारी समर्थतता असणाऱ्या व्यक्ति कडून व्याकरण शिकले पाहिजे. माझा प्रत्येक जीवाशी अंतर्गत संबंध असल्याने मी जीवाचे संस्कार आणि मलीनता स्वीकारतो. प्रतिदिन केलेल्या स्नान संध्या जपादिकामुळे जीवांची मलीनता मी दग्ध करून त्याला त्या परिणामांपासून मुक्त करतो. वास्तविक पहाता माझी पूजा करण्याची आवश्यकता नाही. माझी आराधना करणाऱ्या भक्तांचे पाप संस्कार मी आकर्षित करून घेतो.

भक्तांनी आपआपल्या कुलदैवतांची पूजा केल्यास ती माझ्या स्वरूपाची स्थूल पूजा होईल. ती पूजा केल्याने मिळणारे महाफल माझी आराधना करणाऱ्या भक्तांना मी अर्पण करतो. तुम्ही कर्म न केल्यास तुम्हास फळ मिळणे शक्य नाही. म्हणून मी तपश्चर्या आणि महापुण्य कर्मांचे आचरण करतो. मी अनंत चैतन्य असल्याने उत्तम कर्म करणाऱ्या साधकांना त्यांच्या त्यांच्या योग्यतेनुसार कर्मांचे फळ तत्काळ मिळवून देतो. माझे आदि गुरुस्वरूप आहे. माता-पिता, धन-दौलत, याचे हक्कदार मुले असतात. त्याच प्रमाणे गुरुंच्या तपोशक्तीचे , त्यांचे शिष्य वारसदार असतात. भगवान कृष्णांनी गीतेत सुध्दा सांगितले आहे की मानवाला कर्म करणे अनिवार्य आहे."

# माझ्या तपाराधनेला समाप्ति नाही

"श्रीदत्तात्रेयांप्रमाणेच मी सुध्दा सुलभ प्राप्त दैवत आहे. इतर देव देवता भक्तांनी केलेल्या तपश्चर्येवर संतुष्ट होऊन त्यांना वर प्रदान करतात. गुरुस्वरूप असलेले श्री दत्तात्रेय त्यांच्या शिष्यांच्या वर प्राप्त करण्याच्या मार्गातील अडचणी आणि दुष्ट शक्तींना आपल्या तपोबलाने दूर करतात. ते अनुग्रह करणारे परम कारुण्यमूर्ती स्वरूप आहेत. आजोबा, मला स्मरण करताच प्रसन्न होणारे दैवत असे म्हणतात. सर्वांचे मूळ असलेले गुरुरूप मीच आहे. हे महान करूणेने अवतरित झालेले परम गुरुतत्व स्वरूप असल्याने या अवताराला समाप्ति नाही. माझ्या भक्तांच्या हाकेला मी तत्काळ साद देतो. माझ्या भक्तांची हाक केव्हा येते याची मी वाटच पहात असतो. साधकांनी माझ्याकडे एक पाऊल टाकले तर मी त्यांच्या कडे शंभर पावले चालून जातो. आपल्या डोळयाच्या पापण्या ज्या प्रमाणे डोळयांची

 

काळजी घेतात याप्रमाणे मी माझ्या भक्तांची काळजी घेऊन त्यांना त्यांच्या संकटातून, अडचणीतून सोडवितो. ही माझी सहज प्रवृत्ती आहे." श्रीपाद प्रभूंच्या या वक्तव्यानंतर मी त्याना प्रश्न केला, "हे महागुरो ! मी सोमलता आणि सोमयागाबद्दल अनेकांकडून ऐकले आहे. कृपा करून त्या बद्दल विवरण करून सांगावे" यावर श्रीपाद प्रभू म्हणाले "सोमलता ही संजीवनी वनस्पती आहे असे म्हणतात. तुला ती पहायची आहे काय ?" मी होकारार्थी मान हालविली तत्काळ श्रीपाद प्रभूंच्या हातात संजीवनी वेल प्रकट झाली. त्यानी ती मला मोठ्या सन्मानाने दिली. तो त्यांचा दिव्य प्रसाद माझ्या पूजा मंदिरात जपून ठेवला आहे. श्रीपाद प्रभू पुढे म्हणाले, "ही संजीवनी वनस्पती हिमालयातील पर्वत श्रेणीत, काश्मीर मधील मानस सरोवराजवळ, सिंधु नदीच्या उगम स्थाना जवळ, मल्लिकार्जुन प्रभूंचा नित्य निवास असलेल्या श्रीशैल्य पर्वतावर, सहयाद्रि, महेंद्र देवगिरी, विंन्ध्यपर्वत श्रेणी, बदरी अरण्य प्रांतात मिळते. या

मुळीच्या प्रभावानेच लक्ष्मणाची मुर्छा दूर झाली होती. या वनस्पतीच्या सेवनाने अनेक असाध्य रोग बरे होतात. लेपाने आकाशगमन सिध्दि प्राप्त झाल्यासारखे वाटते. सेवनाने हाडांना बळकटी येते, नेत्रकांती वाढते, श्रवणशक्ति सुधारते, या मुळीच्या प्रभावाने अग्नीभय, जलभय आणि विषभय दूर होते. या मुलिके मुळे अष्ट सिध्दि प्राप्त होतात. ह्या संजिवनीच्या झाडाला शुक्ल पक्षाच्या सुरवाती पासून रोज एक एक पान येऊन पोर्णिमे पर्यंत पंधरा पाने येतात. कृष्ण पक्षाची सुरवात होताच प्रत्येक दिवशी एक एक पान गळून पडते आणि अमावस्येला झाड वाळून जाते. या वाळलेल्या झाडाची एक फांदी रात्री पाण्यात भिजवून ठेवल्यास त्याच्यातून प्रकाश बाहेर पडतो. सह्याद्रि पर्वत श्रेणी, भीमाशंकर पर्वता जवळ 'वृच्र मृग ' ह्या संजीवनी मुळीचे रक्षण करतात. अमावस्येच्या रात्री सुध्दा, दिव्य कांतीने चमकणारी संजीवनी मुळी शोधणे सोपे होते."

 

श्रीपाद प्रभू पुढे म्हणाले "हे गुरुचरणा, या प्रमाणे चोविस प्रकारच्या दिव्य औषधी मुळी आहेत. या सर्व अत्यंत पवित्र आहेत. यांचा आश्रय देवता शक्ति घेतात. पवित्र अशा वेद मंत्रांचा उच्चार करीत अत्यंत विनम्र भावाने या मुळी तोडल्या पाहिजेत. त्या चोविस औषधी मुलिका अशा आहेत.

1) सोम 2) महासोम 3) चंद्र 4) अंशुमान 5) मंजुवान 6) रजीत प्रभु 7) दुर्वा 8) कनियान

9) श्वेतान 10) कनकप्रभा 11) प्रतानवान 12) लालेवृत 13) करदीर 14) अंशवान

15) स्वयंप्रभा 16) रुद्राक्ष 17) गायत्रि 18) एष्टम 19) पावत 20) जगत 21) शाकर 22) अनिष्टम् 23) रैत्तच् 24) त्रिपाद गायत्रि."

मी श्रीपादांचा निरोप घेऊन पीठिकापूरम हून निघालो.

मी शंकरभट्टाला हा वृतांत विवरण करून सांगितला. महागुरुंचा मानस संचार पूर्ण झाला आणि त्यांच्या दर्शनास येण्याची आज्ञा झाली. मी श्रीपाद प्रभूंच्या दर्शनाने धन्य झालो. मला त्यांच्या दिव्य हस्तानी फळाचा प्रसाद मिळाला. श्रीपाद प्रभू मला म्हणाले "कृष्णा नदी ओलांडून मांचाल ग्रामास जा. या गावाची ग्राम देवता तुम्हास आशिर्वाद देईल. तिचा आशिर्वाद घेऊन तुम्ही पुन्हा कुरुगड्डीस या. तुम्ही माझ्या जवळ असा किंवा दूर असा माझे तुमच्याकडे सदैव लक्ष असते हे ध्यानात असू द्या." भविष्यात हे मांचाल ग्राम विश्वविख्यात होईल. एका महान पुरुषाच्या जीवन समाधीमुळे हे गाव प्रसिध्द होईल. या महापुरुषाच्या लीला अद्भूत असतील. पीठिकापूरम स्थूल दृष्टीने पाहिल्यास एक आहे आणि सूक्ष्म दृष्टीने पाहिल्यास वेगळे आहे. तेच सुवर्ण पीठिकापुरम ते माझ्या शरिरास

वेढून तेजोवलय सुप्रतिष्ठित आहे. कोणत्याही योगातील, कोणत्याही देशातील, कोणत्याही काळातील व्यक्ति असो माझ्या नेत्र कटाक्षाने त्याचे चैतन्य सुवर्ण पीठिकापुरात सुप्रतिष्टित होते. हा योगदृष्टी असणाऱ्या भक्तांना कळणारा विषय आहे. सुवर्ण पीठिकापुरातून जीवनचैतन्याला स्थान संपादन करून घेणारे सारे भक्त धन्य आहेत. त्यांना मी जन्मजन्मांतरी सांभाळित राहीन. पितासमान शंकरभट्टा, अनेक शत संवत्सरा नंतर माझ्या अंगणात महा संस्थान उभारण्यात येणार आहे. ते माझ्या आजोबांच्या घरी जेथे माझा जन्म झाला त्या ठिकाणी औदुंबर वृक्षाच्या छायेत असेल. माझा पुढचा अवतार श्री नृसिंह सरस्वती या नावाने होणार आहे या अवताराची मूर्ती सुध्दा या महासंस्थानात स्थापित होईल." श्रीपाद प्रभु पुढे म्हणाले "हे पहा मी तुम्हाला दिव्य दृष्टी देत आहे." असे म्हणून त्यांनी गुरुचरणांच्या आणि माझ्या भ्रूमध्यावर दृष्टी रोखून ठेवली . ते सुंदर दृष्य पाहून आम्ही धन्य धन्य झालो.

त्यांचा संकल्प अमोघ आहे त्यांच्या लीला अद्भूत आहेत. आम्ही पुढे जाण्यास निघालो तेंव्हा श्रीपाद प्रभु म्हणाले "वशिष्ठ ऋषींचा अंश असलेला एक भक्त माझ्या संस्थानात पूजारी म्हणून येईल.'

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -21

# श्री दंडीस्वामींचे कुक्कुटेश्वर येथे आगमन
# साधकांची स्थान शुध्दि, भाव शुध्दी आवश्यक

मी महागुरुंच्या आज्ञे प्रमाणे गुरुचरण सोबत मांचाल ग्राम दर्शनासाठी निघालो. जात असताना मार्गामध्ये मला श्रीपाद प्रभूंच्या लीला वारंवार आठवत होत्या. अध्यात्मा बद्दलचे अनेक विषय मी श्री गुरुचरणां कडून समजावून घेत होतो. श्री गुरुचरणांना मी म्हणालो, "विश्वधानींचा अंश असलेली व्यक्ति माझ्या संस्थानात पूजारी म्हणून आली आहे असे श्रीपाद प्रभू म्हणाले. ही व्यक्ति महत्भाग्यवान आहे. ती आहे तरी कोण ? ती कोणत्या वेळी येईल ?" यावर श्रीगुरुचरण मला

 

म्हणाले,"अहो शंकरभट्टा ! अनेक शताब्दीनंतर त्यांच्या जन्मस्थानी महासंस्थान होणार आहे असे श्रीपाद प्रभु म्हणाले होते. त्या महा संस्थानात कोणी एक महा तपस्वी येणार असल्याचा प्रभुंचा संकल्प होता. त्या महासंकल्पासाठी तरी तो महातपस्वी नक्की येथे येईल. दीर्घकालाच्या ध्यानाने, आराधनेने, पवित्र मंत्रोच्चाराने आणि श्रध्देने केलेल्या पूजा विधानाने येथील भूमी आणि वायुमंडळ अत्यंत शुध्द झाले आहे. विश्व अंतराळातील दशदिशेतील भावतरंग तेथे नेहमीसाठी प्रस्फुटित झाले आहेत. पवित्र भाव असणारे भक्त तेथील पवित्र स्पंदनाचा स्वीकार करतात. अपवित्र भक्तांना अपवित्र स्पंदनाचा अनुभव येतो. एखाद्या ठिकाणी वायुमंडळातील भाव तरंग प्रबळ शक्ति संपन्न होऊन कांही प्रयत्न न करिता सुध्दा महापुरुषांच्या मानसिक चैतन्याला स्पर्श करून अनेक विचित्र पध्दतीद्वारा त्या विशिष्ठ स्थानास आकर्षित होतात. यात आश्चर्य वाटण्या सारखे कांही नाही. त्यामुळे

 

साधक स्थळ शुध्दि होऊन तेथे राहू शकतात. भावशुध्दी झालेल्या साधकास हे शक्य आहे. अशा साधकांचीच आपण संगत केली पाहिजे. द्रव्य शुध्दि आणि अन्न शुध्दि असलेल्या साधका कडूनच आपण अन्न अथवा धन स्वीकारले पाहिजे. वेदवेदांतील महापंडित म्हणविल्या जाणाऱ्या व्युप्तन्न ब्राह्मणांना सुध्दा श्रीपाद प्रभूंच्या कृपा कटाक्षाचा लाभ होऊ शकत नाही परंतु तोच दोषरहित अल्पज्ञान असणाऱ्या भक्तास सहजपणे होतो. मी पौंड देशात (ओरिसा राज्यात) जगन्नाथ पुरी क्षेत्रात व्यापाराच्या निमित्ताने गेलो होतो. तेथे मला श्री जगन्नाथाच्या मूर्तिमध्ये श्रीपाद प्रभूंचे दर्शन झाले. माझ्या बरोबर आलेल्या तीन-चार भक्तांना श्रीपाद प्रभूंनी त्यांच्या इष्ट देवतांच्या स्वरूपात दर्शन देऊन तत्काळ स्वत:च्या रूपात दर्शन दिले. सर्व देवी देवतांच्या रूपात मीच आहे असा मौन बोध त्यांनी केला."

 

# दंडी स्वामीचा गर्वभंग

"आम्ही जगन्नाथपुरीला गेलो त्याच दिवशी दंडीस्वामी आपल्या एकशे आठ शिष्या सह आले होते. कोणी एखादा महात्मा दिसताच त्यांच्या चरणांवर मस्तक टेकवून नमस्कार करणे ही आमची रीतच होती. आम्ही दंडी स्वामींच्या चरणावर आपले डोके ठेवून नमस्कार केला. आणि काय आश्चर्य तत्काळ दंडी स्वामींची वाचा गेली. त्यांना काही बोलता येईना. आम्ही सर्वांनी श्री दंडी स्वामीना पुन्हा वाचा यावी अशी श्रीपाद प्रभूंचे चरणी नम्र प्रार्थना केली. त्या प्रार्थनेचे फलस्वरूप त्या स्वामींची गेलेली वाचा परत आली. दंडी स्वामीचे शिष्य श्रीपाद प्रभूंच्या शिष्यास पाहून कुतर्काने म्हणाले "श्रीपाद हे क्षुद्र मांत्रिक आहेत. त्यांचे शिष्य सुध्दा क्षुद्र मांत्रिक आहेत. त्यांच्या क्षुद्र विद्येने आमच्या दंडी स्वामींची वाचा जावी

 

असे त्यांनी केले. परंतु आमचे स्वामी समर्थ असल्याने त्याची वाचा पुन्हा आली आणि ते स्वस्थ झाले. आमचे गुरु श्री दंडीस्वामी श्रीपादांचे खरे स्वरूप जनतेसमोर आणतील. ते पीठिकापूरमला जाऊन श्रीपाद वल्लभांशी शास्त्रचर्चा करून त्यांना पराभूत करून विजय पत्र घेऊन येतील यात शंकाच नाही." पीठिकापुरम् मधील प्रजाजनांनी श्री दंडी स्वामीच्या स्वागतासाठी एका महान रथाचे आयोजन केले होते. आम्ही ते एकून निरुत्तर झालो.

जेंव्हा भक्त श्रीपाद प्रभूंना अनन्यभावाने शरण जातो तेंव्हा ते आपल्या लीला विधानांनी भक्तांचे संकटातून रक्षण करतात. आश्चर्याची गोष्ट अशी की समस्या निर्माण करणारे श्रीपाद प्रभू आणि त्यांचे निराकरण

करणारे सुध्दा श्रीपादच. अशा अनेक अंतर्मय लीला करून श्रीपाद प्रभू सर्व दत्तभक्तांना अनुभव करून देत. कांही दिवसांनी दंडीस्वामींनी पीठिकापुरम् क्षेत्री प्रवेश केला. माझ्या भाग्यामुळे मी (शंकर भट्ट) सुध्दा पीठिकापुरमला आलो होतो. श्री बापनार्युलु, श्री अप्पळराजू आणि श्रीपाद प्रभूंच्या विरुध्द असणाऱ्या लोकांची पीठिकापुरम् गावात कमी नव्हती. श्री दंडी स्वामींनी कुक्कुटेश्वराच्या मंदिरात जाऊन सर्व देवदेवतांचे दर्शन घेतले. स्वयंभू दत्तात्रेयांचे सुध्दा दर्शन घेऊन ते म्हणाले "येथे असलेल्या स्वयंभू दत्तात्रेयांचा महिमा अपरंपार आहे, असे सांगून पुढे म्हणाले की, त्यांचा अवतार श्रीपाद प्रभूंचा गर्व दूर करण्यासाठी आहे." त्या दिवसापासून त्यांनी आपल्या संकल्प शक्तीने कुंकुम, विभूती या सारखे पदार्थ निर्माण करून आपल्या भक्तांना देण्यास सुरवात केली. पीठिकापुरम् मधील ब्राह्मणांनी वेदमंत्राच्या गजरात दंडी स्वामींचे स्वागत करून त्यांना कुक्कुटेश्वराच्या मंदिरात नेले.

गावात दंडी स्वामी आल्याची दवंडी पिटविली. स्वत: दत्त अवतार असलेल्या श्रीपाद प्रभूंनी दंडी स्वामींची तपस्या जाणून त्यांना साष्टांग नमस्कार घातला. श्री बापनाचार्युलूंनी दंडी स्वामीचे दर्शन घेऊन त्यांची शरणागती पत्करली. श्री अप्पळराजू शर्मा यांनी श्री दंडी स्वामीचे दर्शन घेऊन परंपरेनुसार पूजा अर्चा होत असलेली एक काळया पाषाणाची मूर्ती त्यांना अर्पण केली. वेंकटप्पा श्रेष्ठी यांच्या अध्यक्षतेखाली आर्यवैश्य समितीचे संम्मेलन झाले. या संम्मेलनात एक ठराव सर्वमते पास झाला की कोणत्याही परिस्थितीत श्री दंडी स्वामींच्या अकृत्यांना, श्रीपाद प्रभू, अप्पळराजू शर्मा आणि बापनाचार्युलु सहकार्य देणार नाहीत. नरसिंहवर्मा यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या क्षत्रिय सभेत हाच प्रस्ताव अनुमोदित झाला.

श्रीपाद प्रभू आपल्या आजोळच्या घरातील अंगणात असलेल्या औदुंबराच्या झाडाखाली विश्रांती घेत होते.

 

दिव्यकांतीच्या कळा पसराविणाऱ्या श्रीपाद प्रभूंकडे पाहून श्रेष्ठींना गहिंवरून आले आणि त्यांच्या नेत्रातून कांही अश्रुबिंदु ओघळले. बापनार्युलु, श्री अप्पळराजू शर्मा आणि श्रेष्ठी हे तिघे श्रीपादांच्या मुखारविंदाचे अवलोकन करीत त्यांच्या अगदी जवळ बसले. श्रीकृष्णा सारख्या दिसणाऱ्या श्रीपाद प्रभूंना भूक लागली होती. त्यांची आजी राजमंबाने श्रीपाद प्रभूंना खाण्यासाठी एका चांदीच्या भांडयात दहीभात आणला. श्रीपाद प्रभूंनी तो मोठ्या आवडीने खाल्ला. तो भात खाल्यावर श्रीपाद आपल्या आजोबांना वेदघोष करा असे म्हणाले. बापनार्युलुनी वेदघोष करण्यास सुरवात केली. त्यांच्या बरोबर श्री अप्पळराजू शर्मा व स्वत: श्रीपाद प्रभु सुध्दा वेद घोष करीत होते. नरसिंह वर्मा आणि श्रेष्ठी या दोघांनी सुध्दा अत्यंत आनंदाने सुश्राव्य स्वरात वेद पठनास प्रारंभ केला. तेथील वातावरण या वेद घोषामुळे ऋषी आश्रमाप्रमाणे पवित्र झाले होते. याच वेळी कुक्कुटेश्वराच्या देवळात एक आश्चर्य घडले. स्वयंभू

 

दत्तात्रेयाच्या तोंडाजवळ दहीभाताची शिते दिसू लागली. पुजाऱ्याने ती दोनतीन वेळा पुसली तरी पुन्हा तेथे ती येत होती. अशा प्रकारे ही श्रीपाद प्रभूंची अद्भूत लीला होती. दंडीस्वामी आपल्या शिष्यांबरोबर वेदघोष करीत पीठिकापुरमहून बाहेर जाण्यास निघाले. ते सर्वजण एकामागून एक पाऊले टाकीत चालले होते. त्यांना तेथील जमीन वाढत असल्यासारखी वाटत होती. ते किती तरी वेळ चालत होते परंतु ज्या ठिकाणाहून निघाले तेथेच होते. या प्रमाणे या विचित्र क्रियेत बराच वेळ गेला. सर्वांना हे पाहून मोठे आश्चर्य वाटले. तेवढयात दंडी स्वामींच्या हातातील दंड तूटून त्याचे दोन तुकडे झाले. दंडीस्वामीना मात्र आपल्या शरीराचेच दोन तुकडे झाल्यासारखे वाटले. पीठिकापुरम् मधील ब्राह्मणांना ही घटना भयप्रद वाटली. श्रीदंडीस्वामीना आतापर्यंतच्या अनुभवावरून कळून चुकले होते की, श्रीपाद श्रीवल्लभ आपणापेक्षा कैकपट अधिक शक्ति संपन्न आहेत. त्यांचा विरोध केल्यास अनर्थ घडून

येईल, अशी त्यांची खात्री पटली. अशा परिस्थितीत आपल्या गावी कसे जावे याची त्यांना चिंता लागून राहिली.

## मोहनाश म्हणजेच मोक्ष

पीठिकापुरममध्ये अब्बन्ना नांवाचा एक गृहस्थ राहात होता. तो सर्प पकडून त्यांचा खेळ करून आपली उपजिविका चालवित असे. तो एकदा बापनाचार्युलुंच्या घरी आला. श्रीपादांनी त्या वेळी वेदघोष थोडा वेळ थांबबिण्यास सांगितले. अब्बनाला पोटभर जेवण दिले. नंतर त्यास बोलावून म्हणाले "येथून एक भांडे पाणी घेऊन श्रीकुक्कुटेश्वराच्या मंदिरात जा. दत्तप्रभूंचा एक अवतार त्यांच्या करणचरणद्वयांबरोबर संचार करीत असताना अकारण ज्यांनी त्यांची निंदा केली असे महापापी लोक कुक्कुटेश्वर मंदिरात आहेत. त्यांना

मृत्यूनंतर पिशाच्च योनी प्राप्त होईल असे चित्रगुप्ताने भाकित करून ठेवले आहे. मी चित्रगुप्ताबरोबर संवाद करून त्यांच्या पापांचा परिहार कसा करावा याचा उपाय शोधून काढला आहे. भूमातेने सुध्दा तसा आग्रह केला आहे. तू तेथे जाऊन भूमातेस शांत राहण्याचा माझा निरोप सांग. श्रीपादांच्या दर्शनास उत्सुक असणाऱ्या भक्तांना तुझी संम्मती घ्यावी लागेल. त्यांच्यावर तू या जलाने प्रोक्षण कर. माझ्या पूर्व आदेशाप्रमाणे तू मादिगा सुब्बय्याच्या घरी जाऊन दहीभाताचा महाप्रसाद सर्वांना दे. अब्बय्या सुब्बय्या वगैरे तिकडेच गेले आहेत ते सर्वांना बापनाचार्युलुच्या घरी घेऊन येतील." श्रीपाद प्रभू उग्र स्वरूपात पुढे म्हणाले "आहो दंडीस्वामी ! एक महान तपस्वी असून किती गर्व केलात ? तुम्ही ज्यांची दत्तस्वरूपात आराधना करता तेच श्रीपाद श्रीवल्लभ रूप घेऊन भक्तांसाठी अवतरीत झाले. त्यांना न ओळखणारे तुम्ही महामूर्ख आहात. तुमचे शिष्यगण सुध्दा तुमच्या प्रमाणेच मूर्ख आहेत. पिठापुरमचे तुमचे नविन शिष्य

 

अज्ञानी आहेत. तुम्ही आम्हाला काय करू शकता ? समस्त सृष्टीचे शासन करणाऱ्या एकमेव सत्तेसमक्ष तुमचे अस्तित्वच ते काय ? तुमचे सामर्थ्य ते किती ? दैवदुषणासारखे महापाप केल्यामुळे तुम्हाला अनेक शत वर्षे पिशाच्च योनीत राहावे लागणार असा चित्रगुप्ताने निर्णय घेतला आहे. अव्याज करूणेने मी तो निर्णय रद्द करीत आहे. मानव जन्म मिळाल्यावर तुम्ही सर्वजण नीच जातीत आपले आयुष्य घालविणार आहात. असा आदेश दिला आहे. तुमच्या पापांचा परिहार मी अत्यंत थोडया शिक्षेतून करीत आहे. श्रीपाद श्रीवल्लभस्वरूप महा अग्निसमान आहे. अग्निशी खेळल्यास महा प्रमाद संभवेल. माझ्या मायेस किंवा मलाच अभिन्न स्वरूपात जाणले असताना मोक्ष म्हणजे काय ? असा विचार तुम्ही करता. खरे तर **मोहाचा क्षय म्हणजेच मोक्ष आहे.** कोणताही जीव जो सच्चिदानंद स्वरूपाचा आनंद अनुभवतो त्याची योग्यता पाहून मीच अनुग्रहित करतो. "दिव्यानंद परवश्य" अशा माझ्या पूर्वस्वरूपी अतित

सुखस्वरूपात राहण्याची इच्छा करणाऱ्या जीवास मी तत्काळ ती स्थिति प्राप्त करून देतो. माझ्या दृष्टीने निर्गुण, निराकार, सगुण साकार, मोक्ष आणि बंधन असा भेदच नाही. प्रत्येक क्षणी असंख्य अशा नूतन लोकांची सृष्टी , स्थिति आणि लय यात मी व्यस्त असतो. जीवांच्या उन्नत स्थिति किंवा उन्नत आनंद भूमिकेसाठी कांही परिमिती किंवा सीमा नाही. मरणानंतर माझ्या स्वरूपात लीन होऊ इच्छिणाऱ्या साधकांनी माझ्या ठिकाणी अवश्य यावे. त्यांनी किती शत वर्षे त्या स्थितित रहावे, कोणत्या लोकांत त्यांनी पुन्हा जन्म घ्यावा हे सर्व मी माझ्या संकल्पा प्रमाणे ठरविण . संपूर्ण विश्वाचा नाटक सुत्रधार असलेला मी सध्या साकार रूपात तुमच्या समक्ष आहे. तुम्ही मला सध्या साकार रूपात पहात आहात. हा आकार नसलेल्या निर्गुण निराकार अवस्थेत असताना सुध्दा मी सर्वदा तुमच्याकडे पहात राहीन. हे सांगण्यासाठी मी साकार रूप घेतले आहे. त्या महा उन्नत स्थितीतून मी

 

तुमच्यासाठी खाली उतरून आलो आहे. **महा योग्याच्या योग शक्ति लोककल्याणार्थ, लोकरक्षणार्थ उपयोगात आणायच्या असतात.** लोक म्हणजे केवळ हा भूलोक नाही. आपल्या पेक्षा कमी म्हणजे नीच अवस्थेत असलेल्या **नि:सहाय स्थितीत असलेल्या जीवांना सहाय्य करणे, मदत करणे हा मानवी धर्म आहे.** मी धर्ममार्ग कर्ममार्ग, योगमार्ग, भक्तिमार्ग आणि ज्ञानमार्ग यांचा बोध करण्यासाठी अवतरित झालो. मी सर्व धर्मांचे मूळ असलेले एकैक सत्य, सर्व धर्मांचे मूळ असलेला एकैक धर्म आणि सर्व कारणांचा कारण असलेले एकैक कारण आहे. माझ्या संकल्पाशिवाय या सृष्टीत काहींच घडत नाही. मी नसलेले या सृष्टीत काहींच नाही. मी आहे म्हणूनच तू आहेस, ही सृष्टी आहे. या पेक्षा वेगळे सत्य मी तुला काय समजावून सांगू ? तू हिमालय पर्वतावर जाऊन नि:संग होऊन तपाचरण कर. तुला शिष्य संघटनेची गरज नाही. तू मोक्ष मिळविलास किंवा उध्दरून गेलास तरी या सृष्टीचे

किंवा माझे असे काहींच नुकसान होणार नाही. सृष्टीतील सारे व्यवहार व्यवस्थित पणे यथाविधि पार पडतील. हे समजून घेणे तुझ्या दृष्टीने आवश्यक आहे. तुझ्या सोबत तू पिठापूरमचे शिष्य घेऊन जाशील तर ते उंटाच्या लग्नाला गाढवाचे संगीत असे होईल. उंटाच्या सौंदर्याची स्तुती गाढवाने करावी आणि गाढवाच्या गायन माधुर्याची प्रशंसा उंटाने करावी असे होईल. परस्परानी एकमेकांच्या प्रशंसेचे पूल बांधले तरी यथार्थ स्थिति काही बदलत नाही आणि ती निराळीच असते."

## अरुंधती वशिष्ठ संबंध

त्यावर मी म्हणालो "अहो गुरुचरण, अरुंधती मातेचा जन्म चांडाळ वंशात झाला असे मी ऐकले आहे. तिचा विवाह वशिष्ठ ऋषी बरोबर कसा झाला ?" यावर

 

गुरुचरण म्हणाले पूर्वी वशिष्ठांनी हजार वर्षे तपाचरण केले होते. त्या वेळी अक्षमाला नांवाच्या एक चांडाळ कुळातील कन्येने त्यांची उत्तम रितीने सेवा केली. तिच्या सेवेने प्रसन्न होऊन ऋषींनी तिला वर मागण्यास सांगितले. त्यावर त्या कन्येने म्हटले "वशिष्ठ मुनी माझे पती व्हावेत अशी माझी इच्छा आहे." तेंव्हा वशिष्ठ मुनी म्हणाले "अक्षमाले ! तू एक चांडाळ कन्या आहेस. मी एक सच्छील ब्राह्मण आहे. मी तुझा पत्नी म्हणून कसा स्वीकार करू शकेन ?" या वक्तव्यावर अक्षमाला म्हणाली "अगोदर वर मागण्यास आपणच मला प्रेरित केले आणि आता इच्छित वर मागितल्यावर आपल्या वचनापासून मागे का फिरता ?" वादोषाच्या भीतीने वशिष्ठ मुनी म्हणाले, "तुझा देह माझ्या इच्छेनुसार करण्यास तुझी संम्मती आहे काय ?" त्यावर अक्षमालेने होकार दिला. वशिष्ठ मुनींनी तिला भस्म केले आणि पुन्हा जिवंत केले. असे त्यांनीं सात वेळा केले सातव्या जन्मी तिचे चांडाळ वशांतील

सारे दोष नष्ट होऊन ती अत्यंत पवित्र स्त्री झाली त्यावेळी वशिष्ठ मुनींनी तिच्या बरोबर विवाह केला. वशिष्ठ मुनीनी केलेल्या शुध्दिकरणाच्या कर्मास तिने विरोध केला नसल्याने तिचे नांव अरुंधति असे पडले. आणि त्याच नांवाने ती प्रसिध्दी पावली. ही हकिकत वशिष्ठ गोत्रातील श्री नरसिंह वर्मा यांना श्री प्रभूंनी सांगितली होती. शूद्र जातीत जन्म झाला असला तरी ब्राह्मणाची कर्मे करणारा सातव्या जन्मी उपनयन झाल्या नंतर ब्राह्मण पदाला प्राप्त होऊन ब्राह्मण कुलात स्वीकारला जातो. त्या काळी समाजातील चातुर्वर्णाची विभागणी त्यांच्या कर्मानुसार होत असे. ही समाजाच्या दृष्टीने हितकर योजना होती. परंतु कांही कालानंतर ही विभागणी कर्मावर आधारित न राहता जन्मावर आधारित झाली. पूर्वीच्या काळी ब्राह्मण कुळात जन्मलेला ब्राह्मणांची नियत कर्मे न करिता वाणिज्य करीत असेल तर तो वैश्याच्या वर्णास योग्य होई. तसेच एखादा क्षत्रिय अत्यंत सात्विक वृत्तिचा

असून त्याला ब्राह्मणांच्या कर्मामध्ये अधिक रस वाटत असल्यास तो ब्राह्मण पदाला योग्य होऊ शकत असे. श्री दत्त प्रभूंवर विश्वास ठेवणाऱ्या साधकांना ते उन्नत स्थितीत ठेवून त्यांच्या योग्यते प्रमाणे शिष्यत्व देत. त्यांचे भक्त कोणत्याही कुलात जन्मले असले किंवा कोणत्याही परिस्थितित असले तरी सुखी जीवनाला आवश्यक असणारे आयु, आरोग्य, ऐश्वर्य, श्री दत्तगुरु आपल्या भक्तांना देत. जन्म-जन्मांतरीची कर्मबंधने तोडून उन्नत स्थितीत ठेवणे ही श्रीपाद प्रभूंची सहज लीला होती.

## दत्त भक्तांना स्वामींचे अभय वरदान

आम्ही श्रीपाद प्रभूंचा महिमा विशेष रूपाने समजावून घेण्यासाठी मंचाला या ग्रामी येऊन पोहोचलो. मंचाल ग्रामदेवतेने आम्हास दर्शन देऊन धन्य केले. तिने

आपल्या दिव्य हस्तांनी आम्हास प्रसाद दिला. ती ग्रामदेवता म्हणाली "पूर्वीच्या काळी प्रल्हादास गुरुबोध केलेले श्री दत्तात्रेयच भूलोकात श्रीपाद श्रीवल्लभांच्या रूपात अवतरित झाले आहेत. श्रीपाद प्रभूंचा संकल्प अनाकलनीय असतो. येणाऱ्या शताब्दींमध्ये प्रल्हादाचे सार्वभौम गुरु अवतरतील. हा प्रदेश मंत्रालय या नावाने प्रसिध्दि पावेल. असे श्रीपाद प्रभूंनी स्वत: मला सांगितले होते. तुमचे सारे शुभ मंगल होवो." असे बोलता बोलताच ती आपल्या पूर्व रूपात आली. आम्ही तेथून निघण्याच्या वेळी कृष्णदास नांवाचा एक व्यापारी तेथे आला. मंचाल ग्रामदेवतेने त्याला सुध्दा प्रसाद दिला आणि फुलाची एक माळ दिली.

आम्ही तिघे (गुरुचरण, कृष्णदास आणि शंकरभट्ट) कुरुगड्डीस जाण्यास निघालो. सर्व दत्त भक्तांचे कूळ एकच असते. त्यांना दत्ताचा प्रसाद कोणत्याही कुलातील भक्ताने दिला तरी त्याचा ते मोठ्या प्रेमाने

 

स्वीकार करतात. आमच्या बरोबर प्रवासात कृष्णदास आल्यामुळे नवा उत्साह आला होता. बोलता, बोलता एका प्रसंगानुसार कृष्णदास म्हणाले यज्ञादि कर्मासाठी दिली जाणारी दक्षिणा सोळा, एकशेसोळा, आणि एक हजार सोळा अशी असावी. ही संख्या श्रीपाद प्रभूंनी सांगितलेल्या 2498 या संख्ये प्रमाणेच आहे.परमात्म्या पासून ज्या प्रमाणे जगताची निर्मिती होते त्याच प्रमाणे पित्यापासून पुत्रांची निर्मिती होते. नवरदेव विवाहाच्या वेळी होमाच्या अग्नी देवतेस प्रार्थना करीत असे की "हे अग्नीदेव, मला या वधु पासून दहा पुत्रांची प्राप्ति व्हावी." दहा कन्या-पुत्रांची प्राप्ति झाल्यानंतर त्याने पत्नीस मातेच्या स्वरूपात पहावे असे शास्त्र वचन आहे.

कृष्णदास पुढे म्हणाले "पूर्ण या शब्दाचा अर्थ निर्गुण असा आहे. म्हणून तो रुद्ररूप समजला जातो. या समस्त विश्वाचा लय झाल्यावर उरणारे ते शून्यच असते. त्या महा शून्यातच सर्वांचा लय होतो.

विष्णुस्वरूप म्हणजे अनंत धर्मतत्त्व. सृष्टीच्या स्थिति स्वभावासाठी अनंत तत्त्व आवश्यक आहे."

## श्रीपाद प्रभूंचे सोळा कलापूर्णत्व

गुरुचरण म्हणाले "अरे शंकरभट्टा, कोणत्याही वस्तुचे असंख्य तुकडे केले असता एक एक तुकडा म्हणजे शुन्यासारखाच असतो. असे असंख्य शुन्य एकत्र झाले असता त्याला मर्यादित आकार येतो. या कारणाने शिव आणि केशव अभिन्न आहेत. पंचभूतात्मक असलेली सृष्टी ही विष्णुस्वरूपच आहे. दक्ष यज्ञाचा विध्वंस करणाऱ्या वीरभद्रास श्री विष्णु म्हणाले" मूल प्रकृती आणि ईश्वर यांच्या निमित्ताने पार्वती माता, राक्षसांशी युध्द करणारी दुर्गामाता आणि कोपावस्थेतील कालिका माता ही सारी माझीच रूपे आहेत. श्रीपाद प्रभूंना षोडश कला संपन्न

 

म्हणण्याचा उद्देश हाच आहे. सोळा वर्षाचे वय असतानाच श्रीपाद प्रभू पीठिकापुर सोडून गेले. ते स्वयं ब्रह्मा, विष्णु आणि रुद्र स्वरूप असल्यामुळे त्यांना सोळा कला परिपूर्ण असे मानले जाते.

## सावित्रीकाठक यज्ञाचे फलित म्हणजेच श्रीपाद प्रभूंचा अवतार

सकल जनांच्या बुध्दिमत्तेस प्रेरित करणारी आणि सर्वातील मंडलाच्या मध्यभागी असलेले दिव्य तेज म्हणजेच गायत्री माता. तिची चोविस प्रतिके आहेत. नउ (9) ही संख्या ब्रह्माच्या स्वरूपाचे प्रतिक आहे. आठ (8) हे महास्वरूपाचे द्योतक आहे. त्रेतायुगातील भारद्वाज मुनीनी पीठिकापुरम् या क्षेत्री सावित्रि काठक यज्ञाची योजना केली होती. त्या वेळी मुनींनी केलेल्या

भाकितानुसार आज पीठिकापुरम मध्ये श्रीपाद श्रीवल्लभांचा अवतार झाला. ते शक्ति स्वरूप असून अर्धनारी नटेश्वर आहेत. ते त्यांच्या स्वरूपाने साधकांची बुध्दि आणि प्रवृत्ति वाढवून, धर्ममार्गाने जीवन व्यतित करण्यास प्रेरित करतात. हे त्यांच्या या महाअवताराचे वैशिष्टय आहे. त्यांच्या बोधपर वाक्यांचे आणि लीलेचे व्याकरण अनाकलनीय आहे. या नवीन व्याकरणाचे ते स्वतःच कर्ता असल्याने ते केवळ त्यांनाच समजते. मला (शंकरभट्टास) कृष्णदासांकडून अनेक विषयांची माहिती मिळाली. यात अनेक नविन गोष्टींचे ज्ञान झाले. पांडित्य पूर्ण परंतु अहंकारी असलेल्या साधकांना श्रीपाद प्रभूंच्या कृपाकटाक्षाचा लाभ होत नसे.

कृष्णदास म्हणाले "श्रीपाद प्रभू हे पिपीलिका पासून ते ब्रह्मा पर्यंत सर्वत्र व्याप्त आहेत. एकदा नरसिंह वर्माच्या शेतात श्रीपाद श्रीवल्लभ आणि वर्मा विश्रांती घेत होते. तेवढयात तेथे दोन नाग आले. श्रीपाद प्रभूंनी

मोठ्या कौशल्याने मारून दूर फेकले. नरसिंह वर्मांना गाढ निद्रा लागली होती. त्यांच्या जवळच अत्यंत मोठ्या आकाराच्या लाल मुंग्या आल्या. तितक्या मोठ्या मुंग्या पूर्वी कधीच पाहिल्या नव्हत्या त्या. चावून वर्मांची झोप मोड होऊ नये म्हणून श्रीपाद प्रभूंनी त्या सर्व मुग्यांना मारले. मेलेल्या मुंग्यांचा एक लहानसा ढीग समोर होता. थोडयाच वेळात नरसिंह वर्मांना जाग आली. त्या मेलेल्या मुंग्याना पाहून त्यांना दया आली. त्यावेळी श्रीपाद प्रभू स्मित हास्य करून म्हणाले, "राजाला त्याच्या सेवकांचे रक्षण करावेच लागते. हा प्रकृतीचा नियम आहे. या अद्भूत मुंग्या निर्माण करणारा एक अद्भूत जादुगर आहे." तेवढयात एक पांढऱ्या रंगाची आकाराने इतर मुंग्या पेक्षा मोठी व कांतीमान मुंगी तेथे आली. ती त्या मुंग्यांची राणी मुंगी होती. तिने मेलेल्या मुंग्याभोवती एक प्रदक्षिणा घातली आणि आश्चर्य असे की साऱ्या मेलेल्या मुंग्या पुन्हा जिवंत झाल्या आणि निघून गेल्या. श्रीपाद प्रभू मंदहास्य करून म्हणाले "या

मुंग्यांच्या राणीला संजीवनी शक्ति प्राप्त असल्याने तिने सर्व मुंग्यांचे रक्षण केले." अशा प्रकारच्या अनेक विस्मयकारक गोष्टी या सृष्टीत आहेत. ते वर्मास पुढे म्हणाले "तुमची इच्छा असले तर प्रतिक्षणि मी तुला अनेक लीला दाखवू शकेन." तितक्यात नरसिंह वर्मांचे लक्ष मरून पडलेल्या दोन नागांकडे गेले. त्यांना पाहून ते चकित झाले. ही सुध्दा श्रीपाद प्रभूंचीच लीला असल्याचे त्यानी जाणले. श्रीपाद प्रभूंनी एका नागास कुरवाळले आणि दुसऱ्याला आपला दिव्य पाय लावला. ते दोन्ही नाग जिवंत होऊन, श्रीपाद प्रभूंना एक प्रदक्षिणा घालून निघून गेले.

ते नाग कशासाठी आले ? श्रीपाद प्रभूंनी त्यांना असे का केले ? या बद्दल त्यांना विचारले तेंव्हा ते म्हणाले "राहु ग्रहाचे बळ नसल्यामुळे जीवांना अनेक संकटांना तोड द्यावे लागते. आणि त्यांना बंधनात असल्याचा अनुभव येतो. यालाच कांही लोक कालसर्प योग म्हणतात. राहू

हा सर्व देवतांची आदिदेवता आहे. या प्रकारे येणाऱ्या संकटांचे निर्मुलन कसे करावे ते कोणीहि जाणत नाही. परंतु मी त्या सर्वांचे दोष दूर करून त्यांना सुख संतोष मिळेल अशी योजना करतो."

आम्ही कुरुगड्डीला क्षेमपूर्वक येऊन पोहोचलो. श्रीपाद प्रभूंचे मंगल दर्शन घेतले. त्यांनी आम्हास हसत मुखाने आशिर्वाद दिले.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

# अध्याय -22

## गुरुदत्त भट्टाचा वृतांत -ज्योतिष्य शास्त्रा प्रमाणे भक्ताच्या पत्रिकेतील शुभफल देणारे एकमेव श्रीपाद प्रभू

गुरुचरण, कृष्णदास आणि मी (शंकरभट्ट) श्रीपाद प्रभूंच्या सम्मुख अद्वितीय आनंदाच्या सागरात विहार करीत होतो. गुरुदत्त नावाचा एक ज्योतिषी श्री गुरुदेवांच्या दर्शनासाठी आला होता. श्रीपाद प्रभूंनी त्याचा यथोचित सन्मान केला. एका निवांत जागी बसून सत्संग करा असा त्यांनी आदेश दिला. आमचे संभाषण ज्योतिष शास्त्राकडे वळले. मी दत्त महाशयाना म्हणालो "महाराज, ज्योतिष्य शास्त्रात सांगितलेले फळ खरेच असते का ? फळात बदल करता येतो का ?

मानवजीवनातील पूर्व कर्मे निर्देशित असतात ?" यावर श्री दत्त गुरुदत्त भट्ट म्हणाले,"'भ' चक्र ही नक्षत्र कक्षा आहे. हिची सुरवात अश्विनी नक्षत्रा पासून होते. हे नक्षत्र स्थल निर्देश करण्यासाठी चैत्र पक्ष आहे. आणि रैवतपक्ष नांवाची दुसरी पध्दत्त आहे. रेवतीनक्षत्र असणाऱ्या स्थानापेक्षा आठ कळा कमी असलेल्या स्थानामुळे ते ग्राह्य नाही. अश्विनीनक्षत्र गोल ओळखण्यास कठीण आहे. परंतु 1800 अंशावर असलेले चित्रानक्षत्र याचा एकच गोल प्रकाशवंत असून स्फुट असल्याने त्यात सहा (6) ही राशी मिळविल्यास ती अश्विनी होऊन चैत्रपक्ष म्हणून ग्राह्य मानली जाते. अश्विनीनक्षत्र "तुरग मुखाश्विनी श्रेणी" तीन गोल म्हणून स्पष्ट करण्यात आली आहे. श्रीपाद श्रीवल्लभ चित्रा नक्षत्रावर जन्म घेण्यास एक विशेष कारण आहे. तीन गोल एकत्र असलेले अश्विनी नक्षत्र म्हणजे त्यांचे स्वरूप आहे. तोच 'भ' चक्राचा प्रारंभ आहे. तेच त्यांचे दत्तात्रय स्वरूप आहे. कलियुगात त्यांचा प्रथम अवतार

श्रीपाद श्रीवल्लभ आहे. हा अश्विनी नक्षत्रांच्या सरळ रेषेत 1800 अंशावर असलेले चित्रा नक्षत्र त्यांचे जन्मनक्षत्र आहे. 1800 अंश दूर असणारे कोणतेही नक्षत्र किंवा कोणताही ग्रह शक्तकेंद्रित करण्याचे कार्य करतो. मनुष्य, त्याचे पूर्वजन्म कृत प्रारब्ध गणिताने योग्य अशा ग्रहसंपुटिने जन्माला येतो. ग्रह मानवावर द्वेष भावना अथवा प्रेम भावना ठेवीत नाहीत. त्या ग्रहातून निर्माण झालेल्या विविध किरणांनी, विविध स्पंदनाने त्या त्या काळी, त्या प्रदेशात त्या विशिष्ट जीवांना इष्टानिष्ट फल मिळतात. अनिष्ट फळाच्या परिणामा पासून दूर जाण्यास आपणास त्या किरणांना आणि स्पंदनाना दूर करावे लागते. हे आपण 1) मंत्र - तंत्राने 2) ध्यानाने आणि 3) प्रार्थनेने तसेच 4) योगशक्तीचे सहाय्याने साध्य करू शकतो. पूर्वजन्मकर्म अत्यंत प्रबळ असेल तर वरील विधान कांही करू शकत नाही. अशा परिस्थितीत श्रीपाद प्रभूच आपली भाग्य रेषा बदलून टाकू शकतात. या प्रमाणे आपली भाग्य

 

रेखा बदलून लिहिण्यासाठी आपणाकडून दुसऱ्यासाठी कांही ना कांही चांगले काम होणे आवश्यक आहे. सर्वसाधारण परिस्थितित हे साधणे कठीण आहे. सृष्टीच्या कार्यकलापात किंवा कर्मदेवतेच्या कार्य कलापात श्रीपाद प्रभू अनावश्यक दखल देत नाहीत. भक्तांची तीव्रता श्रीपाद प्रभूना हलवून सोडते व योग्य उपाय सांगण्यास प्रेरित करते. श्रीपादांच्या हृदयातून उमडणारे प्रेम, करुणा यांच्या महा प्रभावामुळे कर्मदेवतेची शक्ति निस्तेज होऊन जाते. कर्माचे रूप जड असते. श्रीपाद प्रभू हे चैतन्यस्वरूप आहेत. योग्य वेळी प्रगट होऊन आपल्या चैतन्य शक्तीची समर्थता ते प्रदर्शित करतात हा त्यांचा अत्यंत सहज भाव आहे.

मी (गुरुदत्त भट्ट) अज्ञानी दशेत ज्योतिष्य शास्त्रातील महा पंडित समजत होतो. मी कर्नाटक प्रदेशातून आलेला, त्यामुळे मला तेलुगु भाषा अस्खलितपणे बोलता येत नसे. संस्कृत भाषा मात्र चांगली येत असे.

माझ्या भाग्यानेच मला पीठिकापुरमला जाण्याची संधि प्राप्त झाली. श्रीपाद श्रीवल्लभांबद्दल मी अनेक गोष्टी कर्णोपकर्णी ऐकल्या होत्या. माझे कुलदैवत श्री दत्तात्रेय प्रभूच आहेत. मी पादगया क्षेत्र असलेल्या पीठिकापुरम् मधील कुक्कुटेश्वर देवालयाच्या दर्शनार्थ आलो होतो. भक्ति श्रध्दायुक्त अंत:करणाने देवतेचे दर्शन घेतले. मी ध्यानात बसलो असताना माझी अंत:वाणी स्पष्टपणे म्हणाली "अरे मुर्खा तुला मरून किती दिवस झालेत ? तू माझा भक्त असे सांगून माझी आरती करून पायावर डोके ठेवित आहेस. पादगयेला येऊन माझ्या पायावर डोके ठेऊन नवस पूर्ण करणार आहेस ? का माझ्या पायावर डोके आपटून माझे रक्त आटविणार आहेस? असे शब्द मला वारंवार ऐकू येऊ लागले. मी ज्योतिष पंडित असे गृहीत धरून माझी जन्मपत्रिका बनविली होती. त्या पत्रिकेनुसार मी ज्या दिवशी ह्या शरीराचा त्याग करणार त्या दिवशी पादगया क्षेत्री असलेल्या दत्तप्रभु सन्मुख असेन. मी माझ्या नाडी

स्पंदनाला पाहिले. नाडी चालत नव्हती. हृदयावर हात ठेऊन पाहिले ते सुध्दा बंद होते. मी माझा चेहरा आरशात पाहिला. माझ्या चेहऱ्यावर जीवनकळा जाऊन प्रेत कळा आली होती. मी हसत आरशात पाहिले तो माझे मुख अजूनच भयानक दिसू लागले. मला गर्व करण्यासारखे काय उरले होते ? विकृत अशा प्रेतकळेने मेलेला माणूस पिशाच्च तत्वाने युक्त होऊन हसत असल्यासारखा मला वाटला. स्वयंभु दत्तात्रेयांच्या देवळातील पुजारी, त्यांचे सूक्ष्म शरीर मी पाहिले. त्याचे सूक्ष्म विकार अत्यंत कलेने युक्त असे दिसले. माझ्यातील कोपऱ्यात दडून बसलेला विवेक जागा झाला. श्रीपाद श्रीवल्लभांचे दर्शन झाल्याशिवाय आपले दुर्भाग्य संपणार नाही, असे वाटले. देवता आनंद स्वरूप असतात. ते आनंदाच्या उच्च स्थितित असतात. माझी स्थिती फारच दु:ख दायक होती. माझा जीव अतिशय दु:खी होता. आत्मा शरीराला सोडून गेल्यावर देहाच्या सर्व बाधा संपतात. माझा आत्मा अजून शरीर सोडून

 

गेला नव्हता, जिवंत असल्या प्रमाणे निर्बंध स्थितीत हृदयस्पंदनाना शरीरात भरून श्री गुरुदेवांनी मला एक अनामिक अवस्था प्रदान केली होती. अत्यंत निकृष्ट आणि पापी लोकांचे बोलणे ऐकून मी कसा फसलो होतो याची मला जाणीव झाली. पाषण रूपातील स्वयंभू दत्तात्रेयांच्या मूर्तीने घंडीकोट यांच्या घरी जन्म घेतला होता. पाषाणाच्या मूर्तीला नाडी स्पंदन, हृदय स्पंदन कोठे असते ? श्रीपादांना नाडी स्पंदन आणि हृदय स्पंदन आहे ना ? महालया अमावस्येच्या दिवशी पितृदेवतांचा परम पवित्र दिवस असतो. त्या दिवशी कोणीतरी अवधूत येऊन भिक्षा स्विकारून जातो. तेच दत्तात्रय असतात असे तेथील लोकांचे मत आहे. श्रीपाद महाप्रभूच मल्लादींच्या मेहुण्याच्या रूपात जन्मास आले केवढे हे आश्चर्य ! काय ही वंचना ? असे निकृष्ट बोल ऐकून मी स्तब्धच झालो. त्या निकृष्ट व्यक्तीचे बोलणे यथार्थ समजून मी रत्नतूल्य श्रीपाद प्रभूंना अंतरलो. असा मला मनापासून पश्चाताप झाला."

मी तत्काळ श्रीपाद प्रभूंच्या घरी धावतच गेलो. दहा वर्षाचे वय असलेले श्रीपाद प्रभू अंगणात आले. ते गुरुदत्तभट्टाला पाहून म्हणाले "ये रे ये, मूर्खा ! जिवंत असल्याचे नाटक करतोस. मृतवत् असलेल्या तुझ्या सारख्या मानवरूप पिशाच्चाला सद्गती माझ्या कृपेनेच प्राप्त होऊ शकते. तुम्ही केलेल्या दुष्कृत्यामुळे रौरवादी नरकाच्या यातना भोगीत असलेल्या तुमच्या पितरांना सद्गती मिळावी म्हणून अवधूत वेषधारी होऊन महालया अमावस्येच्या पवित्र दिनी भिक्षा मागण्यास आलेला मी कोण हे तू जाणतोस का ? ते दत्तात्रेय कोण ते माहित आहे का ? ते दत्तात्रेय म्हणजे मीच आहे. त्यांचे नुसते नांव घेतले तरी राक्षस पिशाच्च गण थर थर कापू लागतात. ते दत्तात्रेय मीच आहे. तुझे मी दगडी शिळेमध्ये रूपांतर करू शकतो, तुला उपाशी ठेवू शकतो आणि तुझे प्राण सुध्दा घेऊ शकतो. तू जिवंत असल्या प्रमाणे दिसत असलास तरी मृतवत आहेस, तू

जिवंत असल्याचे नाटक करू शकतोस. मी दत्त आहे की नाही याचा विचार आपण नंतर करू. प्रथम तू तुझ्या विषयी सांग" हे ऐकून मी (गुरुदेव भट्ट) गर्भगळित झालो आणि माझा थरकाप उडाला. इतक्यात सुमती महाराणी अंगणात आल्या. त्या म्हणाल्या "कृष्णा, कन्हैय्या हा प्रेतकळा असलेला अघोरी माणूस कोण आहे ? तू आत ये तुझी दृष्ट काढते." यावर श्रीपाद म्हणाले "माते हा अजून अघोरी झालेला नाही. परंतु याचा पुढचा जन्म शवांना नेणाऱ्याचा येणार आहे. त्या जन्मापूर्वी तो माझ्या दर्शनाला आला आहे. आपल्या घरी उरलेला भात याला खाण्यास दे. श्रीपाद प्रभूंच्या मातेने शिल्लक ठेवलेला भात आणून दिला. श्रीपादांनी तो गुरुभट्टास दिला. आणि जेवून लवकर निघून जाण्यास सांगितले. गुरुदेव भट्टाने तो भात घेऊन कुक्कुटेश्वराच्या मंदिराच्या समोरील मोकळया जागेत बसून खाल्ला. तो खाताच त्याची दुरावस्था नाहिशी झाली. तो पुन्हा श्रीपाद प्रभूंच्या दर्शनाला गेला. तेंव्हा

श्रेष्ठी श्रीपादांना घेऊन दुकानांत गेले होते. श्रीपाद प्रभू पैसे मोजून तिजोरीत ठेवित होते. श्रेष्ठी स्वत: तांदुळ ज्वारी मोजून ग्राहकांना देत होते. तेंव्हा श्रीपादांनी श्रेष्ठींना विचारले "आजोबा आज दशमी आहे. बाबांना किती दक्षिणा देणार ?" तेंव्हा श्रेष्ठी म्हणाले "आपणा दोघात काही भेद नाही. तूला जे हवे असेल ते तू घेऊ शकतोस. तुला हवे असलेले तू घे आणि मला हवे असलेले तू मला दे. ते दृष्य किती मनोहर होते त्याचे वर्णन करणे कठीण. श्रीपाद प्रभूंनी एक गुळाचा खडा घेऊन तोंडात टाकला आणि एक गुळाचा खडा श्रेष्ठींना प्रसाद म्हणून दिला. श्रीपाद प्रभू म्हणाले "आज मला करायची असलेली गणेश पूजा झाली. गणेशांनी गुळाचा खडा तोंडात टाकून नैवेद्य स्वीकारला. तुम्हास खोटे वाटत असल्यास माझे तोंड पहा" असे म्हणून श्रीपादांनी आपले तोंड उघडून श्रेष्ठींना दाखविले. या मुखात कोणते महारूप दिसले ते श्रेष्ठींनाच ठाऊक. ते त्यांनी कोणालाच सांगितले नाही. ते श्रीपादांना म्हणाले, सोनुल्या !

श्रीपादा ! गणेशाला जेंव्हा भूक लागेल तेंव्हा आम्हास न विचारता हवा तेवढा गूळ नैवेद्यासाठी घेत जा. तेवढयात अखंड सौभाग्यवती वेंकट सुब्बमंबा तेथे आल्या, त्यानी श्रीपाद प्रभूला अभ्यंग स्नानासाठी नेले. अरे, शंकर भट्टा ! कुत्सित लोकांचे बोलणे ऐकून मी (गुरुदेव भट्ट) अधोगतीला जाऊन अघोरी जन्माच्या दुर्भाग्यांत जाणार होतो परंतु श्रीपाद प्रभूंनी त्यातून माझे रक्षण केले. मला नुसते सोडले असते, माझ्यावर कृपादृष्टी झाली नसती तर माझे पतन झाले असते. सद्गुरुंना आपल्याबद्दल वाटणाऱ्या निस्वार्थ प्रेमामुळे ते आपली पूर्वजन्मातील कर्मफलापासून पूर्ण सुटका करतात. यासाठी ते आपला अमूल्य वेळ आणि शक्ति खर्ची घालतात. श्रीपाद प्रभुंची जन्म पत्रिका सांध्रसिंधु वेदातून पाहता येते. श्रीपाद प्रभूंच्या घरी तेलुगु भाषेबरोबर संस्कृत भाषा सुध्दा बोलली जात असे. हिमालयातील पवित्र भूमीवर जी भाषा बोलली जात असे त्या भाषेत श्रीपाद प्रभू, अप्पळराज शर्मा, बापनाचार्युलु

 

बोलत असत. संबल प्रांतात बोलली जाणारी भाषा संस्कृत भाषेपेक्षा वेगळी होती. त्या भाषेचे माधुर्य सरलता वर्णनातीत होती. ही भाषा पीठिकापुरम् मधील केवळ श्रीपाद प्रभू, बापनाचार्युलु अप्पळराजू शर्मा यानांच बोलता येत असे. सत्यऋषीश्वर नावाचे एक विद्वान गृहस्थ बापनाचार्युलु बरोबर असतांना श्रीपाद म्हणाले "आजोबा, श्रीकृष्ण सत्य किंवा असत्य कांही बोलत नसत. ते केवळ कर्तव्य बोधक होते." त्यावर बापनाचार्युलु म्हणाले, कन्हैय्या, नेहमी सत्यच बोलावे. औषधाला सुध्दा खोटे बोलू नये. हे ऐकून श्रीपाद प्रभूंनी मंदहास्य केले. त्या दिवशी बापनाचार्युलुंच्या घरी वेंकट सुब्बया श्रेष्ठी आले होते. त्यांची एक आंतरिक इच्छा होती की बापनाचार्युलुंनी त्यांच्या घरी जेवण करून दक्षिणा स्विकारावी. हा दिवस परमपवित्र महालया पक्षातील एक दिवस असावा ज्यांचेमुळे त्यांचे पितृदेव संतोष पावतील. ही इच्छा बापनाचार्युलु पूर्ण करतील का नाही या बद्दल त्यांना शंका होती. त्यामुळे श्रेष्ठींनी

श्रीपादांच्या समोर नतमस्तक होऊन बापनाचार्युलुंच्या समोर आपली इच्छा प्रकट केली. बापनाचार्युलुंनी महालय पक्षात श्रेष्ठींच्या घरी जाऊन जेवण करून दक्षिणा स्विकारण्याची अनुमती दिली. या सम्मतीने श्रेष्ठीच्या आनंदाला पारावार नव्हता.

## श्रीपाद प्रभू बहु चमत्कारी होते

महालय पक्षातील जेवणाचे आमंत्रण स्विकारलेले बापनाचार्युलु आणि आमंत्रण देणारे श्रेष्ठी या दोघांना या गोष्टींचा विसर पडला. महालया अमावास्येचा मध्यान्ह समय आला. श्रेष्ठी बापनाचार्युलुच्या घरी आले. श्रीपाद मंद हास्य करून म्हणाले "आजोबा, वाग्दान करू नये. केल्यास त्या प्रमाणे नक्की वागावे. वाग्दान करून ते विसरणे महापाप आहे. तुम्हा दोघांना मी त्याची आठवण करून देतो. त्यावेळी श्रेष्ठी आणि

 

बापनाचार्युलु दोघांनाही आपली चूक लक्षात आली. जीवांना समज कशी द्यायची आणि विस्मृती कशी घालवायची या दोन्ही कला श्रीपादांना उत्तम रितीने अवगत होत्या. ते सर्व बाबतीत समर्थ होते. त्या दोघांना सावध करून ते म्हणाले "तुम्हाला विस्मृती देण्याचा माझा एक हेतू आहे. प्रत्येक मानवात मी, मी करणारे एक चैतन्यरूप आहे. जीव आपल्या माता पित्याकडून नुसते शरीरच नाही तर 'मी' असे चैतन्यरूप सुध्दा ग्रहण करतो. या 'मी' अशा चैतन्याला विश्व प्रणालिकेत पार पाडण्यासाठी कोणत्या ना कोणत्या जबाबदारीचे कर्म असतेच. पित्याकडून मुलाला, मुलाकडून त्याच्या मुलाला असे परंपरागत बंधन प्रत्येकाला असतेच. गृहस्थाश्रम सोडून संन्यास आश्रम स्वीकारल्यावरच या कर्मबंधनापासून सुटका होते. आज केलेले वाग्दान परिमित होऊन नाम स्वरूपात्मक असलेल्या या जन्मानंतर तुमच्या दोघातच संपणार असे नाही. हे बृहदाकार स्वरूपात असलेल्या 'मी' च्या चैतन्यात

बदलल्यामुळे कोणत्या तरी एका देशात कोणत्यातरी एका काळात बापनाचार्युलु वंशाची एखादी व्यक्ति , श्रेष्ठी वंशातील कोणत्या तरी एका व्यक्तीच्या घरी महालय पक्षातील भोजन करून दक्षिणा स्वीकार करेल. ते केंव्हा , कसे, कशा प्रकारे ते मला विचारु नका कारण कर्मस्वरूप फारच संदिग्धमय असते. सूक्ष्ममयी असते. कांही कांही कर्मात भौतिक काल, योगकाल असा वेगवेगळा असतो. भौतिक कालरित्या महालय पक्षातील हे कर्म करूनच संपवावे लागते. योग्य काळ नसेल तर ते कर्म लांबणीवर पडते.

यावर मी (शंकरभट्ट) म्हणालो "अरे गुरुदत्त भट्टा ! भौतिक काळ आणि योग काळ म्हणजे काय ? ते मला विवरण करून सांग." श्री गुरुदेव भट्ट महोदय म्हणाले "भौतिक काळ, भौतिक देश, मानसिक काळ मानसिक दशा तसेच योगकाळ आणि योग देश यांचे सहा ते दहा वर्षापर्यंतचे वय असते. तो नेहमी सोळा वर्षाच्या किशोर

अवस्थेतील मुला सारखा निरंतर विद्याआश्रमात असतो. त्याचा भौतिक काल साठ वर्षाचा निर्धारित केलेला आहे. तो शरीराशी संबंधित आहे. त्याचा मानसिक काळ वीस वर्षे निर्धारित केलेला आहे. वीस वर्षाच्या युवकाला साठ वर्षाचे वय असलेल्या वृद्धाचे वजन असते. जवाबदाऱ्या असतील तर त्यांचा काळ वीस वर्षे असतो. तो शरिराशी संबंधित आहे. त्याचा मानसिक काळ साठ वर्षे आहे. या प्रमाणे भौतिक काळ आणि मानसिक काळ एकाच काळात मिळून असावा असा नियम नाही. तो वेगवेगळा असू शकतो."

# काशीमध्ये अथवा पीठिकापूरममध्ये निवास केल्याने तापत्रयापासून सुटका.

## काशीवासाचे फल - पिठापुरम् निवासाचे फल

श्रीपाद प्रभू म्हणाले "मी कालातीत आहे. ज्या भक्ताला काशीमध्ये निवास करण्याची इच्छा आहे आणि आंतरिक तळमळ आहे त्याला काशी निवासाची प्राप्ति होते. भौतिक दृष्टया तो कोणत्याहि प्रदेशात असला तरी मानसिक दृष्टया त्याचा निवास काशीतच असतो. भौतिक दृष्टया काशीत राहून गोहत्या करणाऱ्यास काशी निवासाचे फळ मिळत नाही. ज्या प्रमाणे गंगाजलातून माशासाठी निरीक्षण करणाऱ्या बगळयास गंगास्नानाचा लाभ होत नाही. एखादा साधक भौतिक रूपाने पीठिकापुरमला राहात असेल आणि श्रीपाद प्रभूंचे दर्शन सुध्दा घेत असेल तरी जर त्याचा मानसिक काल आणि देश पीठिकापुरमला नसेल तर तो श्रीपाद प्रभूंचा भक्त

होणार नाही. योग काल आणि योग देश अध्यात्मिक शक्ति संपन्न असलेल्या व्यक्तिलाच अवगत असतो. श्रीपाद प्रभूंचा अनुग्रह कोणाला आणि केंव्हा मिळेल, कोणत्या देशात मिळेल हे न कळणारे गूढ रहस्य आहे. मानवाला केवळ कर्म करण्याचाच अधिकार आहे."

## देह हे एक क्षेत्र आहे त्यात जर मन नसेल तर त्याला क्षेत्र वासाचे फल मिळणार नाही

सत्कर्म केल्याने सुख आणि दुष्कर्म केल्याने दु:ख प्राप्त होणे हे अनिवार्य आहे. पूर्वजन्माचे बंधन आपला पाठलाग करीत असते. सद्गुरुंच्या कृपेमुळे आपण त्या पासून मुक्त होतो. काल चांगला नसेल तर आपण कोणत्याही देशात असलो तरी त्या कर्माचे फल चुकवू शकत नाही. हा अत्यंत अनाकलनीय विषय आहे. पीठिकापुरममध्ये नरसिंह वर्मांच्या घरी एक सेवक

 

होता. त्याचे नांव शिवय्या असे होते. एके दिवशी श्रीपाद प्रभूंना त्याने पाहिले. तत्काळ त्याच्या मनोवृत्तीत बदल झाला. त्याने निद्रा आहार सोडले. आणि असंबध्द बोलू लागला. "मी सृष्टी स्थिति आणि लय यासाठी कारणीभूत आहे. मीच सर्व सृष्टीचे आदिमूळ आहे. ही सृष्टी माझ्या पासूनच उत्पन्न झाली आहे. माझ्यामुळेच वाढणार असून माझ्यातच लय पावणार आहे." नरसिंह वर्मांना शिवय्याची अत्यंत दया आली. त्यांनी श्रीपादांना शिवय्याचे रक्षण करण्याची विनंती केली. श्रीपाद प्रभु शिवय्यास स्मशानात घेऊन गेले. त्यांच्या बरोबर नरसिंह वर्मा सुध्दा होते. औदुंबराच्या झाडाची वाळलेली फांदी स्मशानात ठेऊन शिवय्याच्या हातून त्याचे दहन करविले. या मुळे शिवय्याची त्या विचित्र मनोवृत्तीतून सुटका झाली. नरसिंह वर्मांना हे सारे अत्यंत आश्चर्यकारक वाटले. श्रीपाद प्रभू म्हणाले "आजोबा, यात आश्चर्य करण्यासारखे काही नाही. वायसपूर गावात एक पंडित माझ्यावर अत्याचार करीत

 

होता. तो वारंवार असे म्हणे की वेदस्वरूप असलेला परमेश्वर कोठे आणि हा लहान वयाचा श्रीपाद कोठे ? तो सृष्टी , स्थिती, लय याचा कारक आहे म्हणे, तो आदिमूल आहे म्हणे, हे सारे खोटे आहे. थोडयाच दिवसात तो पंडित मरण पावला आणि आपल्या कृत्यामुळे ब्रह्मराक्षस झाला. एका जन्मी हा शिवय्या त्या पंडिताचा अल्पऋणी होता. मी योगकाल कल्पून स्मशानात योगदेश निर्माण करून योग कर्माच्या योगाने वाळलेल्या काडीचे दहन करून त्या ब्रह्मराक्षस तत्वातून पंडिताची सुटका केली. आपल्या शिवय्याची त्या ब्रह्मराक्षसाच्या पंज्यातून सुटका केली."

अरे शंकरभट्टा ! पीठिकापुरम क्षेत्री अवतरलेले हे महातेजस्वी आणि धर्मज्योती श्रीपाद प्रभू कुरुगड्डीस येऊन त्यांनी या क्षेत्रास पवित्र केले. श्रीपाद प्रभूंच्या महा संकल्पाने ग्रहांचे फलित ठरविले जाते. कोणत्याही प्रकारच्या ज्योतिष्य फलाने निर्धारीत केलेले भौतिक

काळ आणि भौतिक नियम नसतात. ते योग काल पाहून योगदेश पाहून यांचा निर्णय होतो.

## श्रीपादांनी अनुग्रहित केलेले प्रारब्ध कर्म - मरण चुकवू शकते

श्रीपादांनी कल्पना केलेल्या ज्योतिष्य शास्त्रानुसार एक हजार वर्षानंतर घडणाऱ्या घटना ते आताच घडवू शकतात म्हणून योग काल तेच ठरवितात . दूर घडणारी घटना सुध्दा ते आपल्या जवळ घडवू शकतात म्हणून योगदशेचा निर्णय सुध्दा ते करू शकतात. संघटना सर्व देश कालात ते घडवू शकतात. श्रीपादांना देशकाल त्यांच्या इच्छे प्रमाणे बदलता येतो. एकदा श्रेष्ठींच्या देवांना नारळ फोडताना स्वत: श्रीपादानी तो नारळ फोडला. त्या नारळाचे त्यांनी तुकडे, तुकडे केले. श्रीपाद म्हणाले

 

"आजोबा, आज तुमचा मरण योग होता परंतु मी नारळाचे तुकडे करून तो टाळला."

सायंसंध्येची वेळ झाली. श्रीपादांकडून आज्ञा घेऊन कुरुगड्डी सोडून आम्ही कृष्णकथवल्ली ओढयाकडे मार्गस्थ झालो.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

 

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

# अध्याय -23

## शिवयोगी भक्त महिमा - शिवपूजा रहस्य विवरण

मी कृष्ण-युवल बड्डूतून कुरवपुरास प्रयाण करीत असतांना धर्मगुप्त नावाचे एक सद्वेषधारी गृहस्थ भेटले. ते श्रीपादांच्या दर्शनास कुरगड्डीस निघाले होते. ते सुध्दा योगायोगाने पीठिकापुरमला असणाऱ्या वेंकटप्पय्या श्रेष्ठीचे जवळचे नातेवाईक होते. मला याचे आश्चर्य वाटले की मला भेटणारे सर्व श्रीपाद प्रभूंचे भक्त होते. ते प्रभूंच्या दिव्य चरित्राबद्दल अधिक माहिती सांगणारे होते. यामागे काहींतरी विशेष हेतू असावा हे नक्की. श्रीपाद प्रभूंच्या चरित्रातील एक एक वर्ष झाले की त्यात घडलेल्या घटनांच्या थोडा मागचा भाग मला

कळलेला असे. त्यातील एका घटनेचा दुसऱ्या घटनेशी फारच कमी सबंध असे. आता पर्यंत श्रीपाद प्रभूच्या दहा वर्षापर्यंत घडलेल्या लीलाच मला माहित होत्या. त्या क्रम बध्द पध्दतीने त्यांच्या कडून मला कळल्या होत्या मी मनांत विचार केला की श्रीपादांच्या अकराव्या वर्षातील लीला मला कळतील का ? श्रीपाद प्रभू क्षण क्षण लीला विहारी आहेत. श्री धर्मगुप्त म्हणाले "अरे शंकरभट्टा, मी शिवभक्त आहे. श्रीपाद अकरा वर्षाचे झाले असताना एके दिवशी त्यांच्या घरी एक शिवयोगी आला. तो अत्यंत विद्वान होता. तो केवळ करतल भिक्षाच घेत असे. तो आपल्याजवळ झोळी, भांडे, थाळी असे काहींच बाळगीत नसे. तो दिसण्यास एखाद्या वेडया पुरुषाप्रमाणे दिसे. तो एके दिवशी कुक्कुटेश्वराच्या मंदिरा जवळ आला. त्याचे धुळीने माखलेले कपडे आणि विचित्र बोलणे ऐकून त्याला देवळातील पूजाऱ्यांनी मंदिरात येऊ दिले नाही. तो देहाचे भान नसलेला अवधूत होता. तो सतत "ॐ नमो शिवाय" हा शिव

 

पंचाक्षरी मंत्राचा जप करीत होता. मी माझे मेहुणे, वेंकटपय्या श्रेष्ठींच्या घरी घोडयावरून गेलो होतो. वाटेत असलेल्या कुक्कुटेश्वर मंदिरात जाऊन दर्शन घेण्याची माझी सवय होती. मी वैश्य प्रमुख असल्याने देवळातील अर्चकांनी माझ्या नावाने मोठी पूजा केली. त्यांना चांगली दक्षिणा देण्याची माझी पध्दतच होती. मी पांच वराह त्या अर्चकांना दिले. त्यांनी आपआपसात वाटून घेतले. देवळातील अर्चकांनी मला त्यांची आर्थिक परिस्थिती, त्यांचे अनेक कष्ट या विषयी सांगितले आणि सनातन धर्माच्या रक्षणासाठी तुमच्या सारख्या सदाचारी शिष्याची अत्यंत आवश्यकता आहे, असे ते म्हणाले. तेवढयात बाहेर आलेला शिवयोगी आत आला. त्या बरोबर दोन नागसर्प ही आत आले. ते पाहून अर्चकांच्या तोंडाचे पाणी पळाले. शिवयोगी म्हणाले "अहो अर्चक स्वामी तुम्ही घाबरू नका ही शिवाची आभूषणे आहेत. पुत्र ज्या प्रमाणे आपल्या पित्याला प्रेमाने आलिंगन देतो तसेच हे नाग आपल्या पित्यासम

कुक्कुटेश्वराला आलिंगन देण्यासाठी आतूर आहेत. ते आपले स्नेही समान आहेत. आपण आपल्या स्नेह्यांना पाहून घाबरणे किंवा पळून जाणे हे महापाप आहे. अर्चक स्वामींनी विशेष पूजा केल्यामुळे ते नाग आकर्षित झाले. नागभूषण कुक्कुटेश्वराची आपण मनापासून अधिक श्रध्देने पूजा केली पाहिजे. रुद्राध्यायातील नमक आणि चमक सुस्वरात म्हणून रागयुक्त शिवाची भजने म्हटली पाहिजेत. अर्चक स्वामी तेथेच बसून होते. मंदिरात येणाऱ्या भक्तगणांत कोणी धनवान होते तर कांही भक्त साधारण गरीब होते. विशेष धन दान देणाऱ्या भक्तांशी अर्चक स्वामी अधिक आत्मियतेने भाषण करीत. या अर्चकामध्ये पीठिकापुरम मधील सूर्यचंद्र शास्त्री नांवाचा एक चांगले अनुष्ठान करणारा पंडित होता. त्याला श्रीपाद प्रभूंबद्दल भक्ति प्रेम होते. तो श्रीपाद प्रभूंचे स्मरण करून नमक-चमक सुस्वरात आणि रागयुक्त आलाप गात म्हणत होता. तेथे आलेल्या नागांना त्याचे गाणे आवडले होते

 

ते सुध्दा आपले फणे हालवत आपला आनंद प्रकट करीत होते. शिवयोग्याला घेऊन सूर्यचंद्रशास्त्री बापनार्युलुच्या घरी आले. तेथे त्यांना संतृप्तिकर भोजन करविले आणि श्रीपाद प्रभूंचे दर्शन घडविले. श्रीपाद प्रभूंनी त्यांना शिवशक्ति स्वरूपात दर्शन दिले. त्या दिव्य दर्शनाने तो शिवयोगी एवढा आनंदित झाला की त्याला समाधी स्थिति प्राप्त झाली. अशा अवस्थेत तो तीन दिवस होता. त्यानंतर श्रीपादांनी आपल्या दिव्य हस्तांनी त्याला जेवू घातले.

श्रीपाद म्हणाले "ए मुला, सनातन धर्मात सांगितल्या प्रमाणे आपले जीवन व्यतीत करून संसार तरून जा. पुराणात विषयांच्या कल्पना किंवा असत्य असे काही नसते. त्यातला सामान्य अर्थ वेगळा असतो आणि गूढ रहस्यात्मक अर्थ हा वेगळाच असतो. अनुष्ठान करणाऱ्या साधकास त्यातील अंतर अर्थ, आणि गूढ रहस्य अंत:करणात स्फुरते. भूतकारकाना चंद्रसूर्यात सूर्य

 

परमात्म्याचे प्रतिक आणि चंद्र मनाचे प्रतिक वाटते. चित्स्वरूप तेजस मनोरूप असणाऱ्याना चंद्राशिवाय सृष्टीकार्य चालत नाही असे वाटते. अमावास्या ही मायेचे प्रतिक आहे. ही माया पूर्वीच्या काळी वसुगुल नावांच्या कलेने जन्म पावत होती. चंद्रबिंबामध्ये कलेचा प्रवेश झाल्यावर त्यातच तिचा लय होतो. ज्या प्रकारे माया परमेश्वर तेज घेऊन मनोरूप चंद्रात पसरते. त्याच प्रकारे चंद्रात सूर्याचे किरण समाविष्ठ होतात. माया असो अथवा अमावास्या असो त्यांच्या जड स्वरूपामुळे त्यांच्या पासून निर्माण झालेले जगत त्याच्या चिरकाल सान्निध्याने चित्तजडात्मक आहे. वसंत ऋतु ज्या प्रमाणे सृष्टीतील फूल फळाच्या उत्पत्तिसाठी कारणीभूत होतो तसेच स्त्री सुध्दा शिशुच्या जन्मास कारणीभूत होते."

मृत्यु लोकात जीवाला जन्म-मरण असते. पाताळ लोकात सूर्य कांतीमुळे कांतीवान दिसणाऱ्या लोकांना

 

वृष्ण असे म्हणतात. सप्त पाताळात वेदांच्या अधिष्ठातृ देवता असतात. मनाचे ज्या ठिकाणी निवास स्थान असते ती भूमी सप्त पाताळ या नावाने संबोधिली जाते. याची अग्नी आदि देवता आहे. या अष्ट देवतांना अष्टवसु असे नांव आहे. सूर्य कांतीमुळे शोभायमान होणाऱ्या देवतांना वसू असे म्हणतात. ब्रह्मशिला नगरातील श्रीपाद प्रभूंच्या बहिणीच्या "वासवी" या नावाचे हे गूढ रहस्य आहे. या अष्ट गोलकांच्या मध्ये असलेल्या वायु स्कंदाला सप्त समुद्र असे नांव आहे. सामान्य जन या सप्त समुद्राला जल स्वरूप समजतात परंतु ते खरे नाही.

# शिव महिमा - आंध्र प्रदेशातील अकरा शिवक्षेत्रे आणि त्यांचे स्वरूप

शिव हा एकादश रुद्र स्वरूप आहे. आंध्र प्रदेशात अकरा शिवक्षेत्रे आहेत. त्यांचे दर्शन घेतल्याने महाफल मिळते. ती क्षेत्रे पुढील प्रमाणे आहेत. 1) बृहत्शिला नगरातील नगरेश्वर 2) श्रीशैल्यावरील मल्लिकार्जुन 3) द्राक्षारामम् येथील भीमेश्वर 4) क्षीरा राम येथील राम लिंगेश्वर 5) अमरावती येथील अमर लिंगेश्वर 6) कोटीफली क्षेत्रातील कोटी फलेश्वर 7) पीठिकापुरम येथील कुक्कुटेश्वर 8) महानंदी येथील महानंदीश्वर 9) काळेश्वर येथील काळेश्वर 10) कालहस्ती येथील कालहस्तेश्वर 11) त्रिपुरांतक येथील त्रिपुरांतकेश्वर.

शिवाची मूर्ती पूजेसाठी कोठेच नसते. शिवलिंग आत्म्यात तेवणारे ज्योतीस्वरूप आहे. सिध्दि प्राप्त झाल्यानंतर निर्मल मनरूपात असणारी निर्मलता म्हणजेच "स्फटिक लिंग" आहे. आपल्या शरीरात असणारा मेंदु त्याला ज्ञान मिळविण्या साठी सहकार्य करणारा रुद्र आहे. मानेपासून नाडी रूपात मानेच्या खाली पर्यंत व्याप्त असणाऱ्या नाडयांना रुद्रजटा असे म्हणतात. शिवाच्या हटयोगी रूपात लकुलीश्वर आहेत. शिवप्रभु भिक्षाटन करून जीवाची पाप कर्मे हिरावून नेतात. या सृष्टीतील तालबध्द असलेली सृजन , स्थिति आणि लय यातील महस्पंदन शिवाच्या आनंद तांडवाने सुव्यवस्थित चालतात यामुळे शिवाला नटराज असे म्हणतात. शिव परमानंदकारक असून ते आपल्या अनन्य भक्तांना मोक्ष सिध्दि प्रदान करतात. चित्त म्हणजे मन आणि अंबर म्हणजे आकाश.

 

आकाश रूपात असणारा तो चिदंबर (चित्त+अंबर = चिदंबर) आहे. तुम्ही पहात असलेल्या या विशाल विश्वात रोदसी रूपात रुद्रस्वरूपच आहे. द्वादश ज्योर्तीलिंगात राशीचक्रातील बारा राशींचे हा प्रतिक आहे म्हणून शिव काल स्वरूप आहे. आठ दिशांना ज्या अष्टमूर्ती आहेत त्या चिदाकाश स्वरूपच आहेत. पंचभूते शिवाची पंचमुखे आहेत. पंच ज्ञानेंद्रिये, पंच कर्मेंद्रिये आणि मन मिळून एकंदर अकरा रुद्र आहेत. यालाच एकादश रुद्र असे म्हणतात. शिवाचे उमामहेश्वर रूप नित्य प्रसन्नरूप आहे. त्रिगुणांचे भस्म करून घेतलेले रूपच त्रिपुरांतक रूप आहे. ज्ञाननेत्र हाच शिवाचा तिसरा नेत्र आहे. शिवांच्या जटाजूटातून परम पावन अशी निरंतर प्रवाहित होणारी गंगामाता उगम पावते आणि धरतीवर प्रवाहित होऊन साऱ्या प्रदेशाला सुजलाम्, सुफलाम् करते. आद्र्रानक्षत्र आकाशात

 

चमकत असतांना शिवप्रभु दर्शन देतात. मिथुन राशी जवळ जाण्यासाठी अगोदर वृषभ रास ओलांडून जावे लागते. ही वृषभ रास नंदीश्वराचे प्रतिक आहे. तो धर्मस्वरूप आहे. दोन भुवयातील पेटणारी ज्योती म्हणजेच लाल चंद्रकळा. योगस्थिति मुळे उद्भवलेल्या कामवासने मुळे स्त्री, पुरुष भेद नाश झाल्यावर एकत्व स्थितिस प्राप्त होणे आणि याचे स्वरूप म्हणजेच अर्धनारीनटेश्वर. लिंग म्हणजे स्थूल शरीरात आत लपून असलेले लिंग शरीर, हे ज्योती स्वरूपात विलसत असते. असे वेद सांगतात.

शिवपूजा रहस्य अनुष्ठान केल्याने किंवा गुरुकटाक्ष असेल तरच समजते. भौतिक रूपातील पिठापूर जसे आहे तसेच ज्योतीर्मय स्वरूप

असलेले स्वर्णपिठापूर एक आहे. त्याला आणि श्रीपाद प्रभूंना जो निरंतर भजतो किंवा स्मरण करतो तो ज्ञानी भक्त श्रीपादांना जाणू शकतो. तो कितीही दूर असला तरी स्वर्ण पीठिकापुरातच वास करतो. अशा भक्ताला श्रीपाद प्रभू अत्यंत सुलभ-प्राय असतात.

भौतिक पीठिकापुरम मधील कुक्कुटेश्वर मंदिरातील अर्चकस्वामी प्रमदगणांचे अंश रूपाने जन्माला आले होते. भूत-प्रेत, पिशाच्चादी महागण अनेक असतात. योगाभ्यास करणारे आणि श्रीपाद प्रभूंची आराधना करणारे भक्त त्या त्या भूत प्रेतांना रोखून ठेवतात . हे सर्व अडथळे दूर करून जे भक्त श्रीपाद प्रभूंना येऊन भेटतात ते धन्य होत. श्रीपाद प्रभू म्हणाले "माझ्या आजोळच्या घराच्या अंगणात

 

एक मोठे संस्थान होणार आहे असे अनेक वेळा मी सांगत आलो आहे. माझा संकल्प अमोघ आहे. मुंग्या जशा अगणित संख्येत असतात तसेच माझे भक्त लक्षानुलाक्ष आहेत. योगीगण माझ्या संस्थांनाचे धर्मपालन योग्यरीतीने करतील. कोण, कितीजण, कोठून केंव्हा कशा प्रकारे येणार ते मीच ठरवितो . पीठिकापूर येथे वास्तव्य केल्यावर श्रीपादांच्या संस्थानाचे दर्शन सर्वांनी केलेच पाहिजे. माझा अनुग्रह जे योग्य शिष्य आहेत त्यांनाच होईल. त्यांच्यावर मी अमृतवृष्टी करीन. अयोग्य व्यक्तीला माझे दर्शन मृगजळासारखे वाटेल."

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

# अध्याय -24

## अर्धनारी नटेश्वर - विवरण

मी (शंकरभट्टाने) श्री धर्मगुप्तांना प्रश्न विचारला, "महाराज, भगवान शिवाने वेगवेगळी आभूषणे आणि शस्त्रे धारण केली आहेत. ही धारण करण्यामागील अंतर्गत अर्थ काय याचा खुलासा करावा." यावर धर्मगुप्त म्हणाले, "अरे शंकरभट्टा, गणपती देवाचे पाशांकुश हे मुख्य आयुध आहे. तसेच श्री विष्णूंचे सुदर्शन चक्र मुख्य आयुध आहे. त्रिशूल हे भगवान शंकरांचे मुख्य आयुध आहे. त्रिशूलाला वरच्या बाजूस तीन टोके

असतात ही अग्निज्वालेच्या रूपात असतात. ती तिन्ही टोके मिळून एकच शूलहस्ता प्रमाणे असतात. सत्व, रज आणि तम या त्रिगुणांची ही तीन टोके निदर्शक आहेत. या त्रिगुणांचे एकत्व म्हणजे खरा त्रिगुणातीत शिवभगवान आहेत. हा अंतरार्थच त्रिशूल सूचित करतो. श्वासाचे चलनवलन पिंगला नाडी द्‌वारा होऊन कपाळाच्या मध्य भागातून तो शिरस्थाना पर्यंत जाऊन पोहोचतो. इडा, पिंगळा आणि सुषुम्णा या तीन नाडया ब्रह्मज्ञानाची केंद्रे आहेत यालाच नाडींचा त्रिवेणी संगम असे म्हणतात. हा त्रिशूलाचा अंतर अर्थ आहे. शिवाचे दुसरे आभूषण म्हणजे नाग आहे. मानवाच्या शरीरात कुंडलिनी शक्ति ही सर्पांच्या आकारात सुप्त अवस्थेत असते. ती जागृत झाली असता अष्टसिध्दि प्राप्त होतात. या महासिध्दिंना वश करून त्यांचा उपयोग लोककल्याणासाठी करणाऱ्या

 

शिवाचे ईश्वर असे सुध्दा एक दिव्य नांव आहे. शिवाच्या त्रिशूलाला डमरु बांधलेला असतो. हा शब्दगुणाचे प्रतिक आहे. नाद, झंकार हा आकाश गूण आहे. आकाशात शब्द प्रकंपाने विचलन करतो. आपण मंत्रजप केला असता किंवा मंत्र ऐकला असता तो डमरुच्या आवाजा प्रमाणे आपल्या कानात घुमतो. मंत्र पुरश्चरण केल्यामुळे योग्याला आनंद प्राप्त होतो. या आनंदाच्या नादात तो नृत्य करतो. याचे प्रतिक म्हणून परमेश्वर डमरु धारण करतो.

दोन भूवयांच्या मध्य बिंदूवर आज्ञाचक्र असते. तेच सर्व ज्ञानाचे केंद्र असते. ज्ञानी पुरुषाला अतीद्रिंय दृष्टी असल्यामुळे त्याचे ज्ञानकेंद्र विकसित असते. याच चक्राद्वारे योगी भूत-भविष्य यथार्थपणे समजू शकतात. हाच

परमेश्वराचा तिसरा नेत्र असे म्हणतात. हा ज्ञाननेत्र विकसित झाला म्हणजे कामस्वरूप मदनाचे दहन करता येते.

शिवप्रभूंचा निवास स्मशानात असतो असे म्हणतात. योगाग्निमुळे सर्व वासनांचे भस्म होऊन योग्याला परमशांती प्रदायक निर्वाण स्थितिचा अनुभव येतो. ज्ञानाच्या स्थितिचा पांढरा रंग असतो, असे म्हणतात. तीच विभूती होय. आलोचना (निंदा), वासना यांच्यावर नियंत्रण ठेवण्याची शक्ति आल्यावर शुध्द ज्ञान प्राप्त होते. त्यामुळे आनंद प्राप्ति होते. ज्ञानाची शुध्दी चार प्रकारे होते 1) आदिभौतिक 2) आदिदैविक 3) अध्यात्मिक आणि 4) मानसिक यांचे संकेत रूप म्हणून शिवाचे भक्त चार विभूती रेषा कपाळावर लावतात. एक दिव्य

औषधी शिलाजीत नांवाची असते. या औषधीच्या सेवनाने नित्य यौवन प्राप्त होते. पूर्व काळात शिलादुड नावाचे एक महर्षी खडयाचा आहार करून निर्वाह करीत असत. तेच नंदीश्वर रूपात अवतरित झाले. श्रीकृष्णाचा जन्म रोहिणी नक्षत्रात आणि वृषभ राशीत झाला. शिवांचे जन्मनक्षत्र आद्र्रा होते. उमामहेश्वराच्या अर्धनारी नटेश्वर रूपाची राशी मिथुन होती. या राशीच्या अगोदर वृषभ राशी असते. हा वृषभच नंदीश्वर आहे. नंदी हा धर्माचे प्रतिक आहे. निम्न जातीच्या कामरूपी मदनाला शिवाने दग्ध केले होते. परंतु शिवाच्या कृपेनेच तो निराकार रूप घेऊन उच्च प्रकृती असलेल्या दिव्य दांपत्य धर्माचे पालन करणाऱ्या दांपत्यास पुत्र रूपाने प्राप्त झाला. श्रीकृष्णाने उपमन्यु ऋषींचे शिष्यत्व पत्करुन अत्यंत निष्ठेने शिवोपासना केली होती. शिवाच्या अनुग्रहामुळे रुक्मिणीच्या

पोटी मन्मथ हा प्रद्युम्न नावाने जन्मास आला. हा मन्मथ वृषभ राशीतील काम स्थान आहे. धर्मबध्द असलेल्या कामना कोणत्याही असल्या तरी उन्नत प्रकृतीच्या असतात. त्यांची पूर्णता करणे धर्म विहित असते.

भयंकर अशा तांत्रिक सिध्दि आणि शक्ति वाघाप्रमाणे प्रमादकारी असतात. त्यांना वश करून, आपल्या ताब्यात ठेवणारे शिवभगवानच आहेत. वाघ हा शक्ति देवीचे वाहन आहे. शक्तिस पूर्णपणे आपल्या ताब्यात ठेवण्याचे प्रतिक म्हणून परमेश्वर चर्म अंगी धारण करतात म्हणून त्यांना व्याघ्रचर्मांबरधारी असे म्हणतात. शुध्द ब्रह्मज्ञान निरंतर प्रवाहित करणारी प्रज्ञा अमृतत्व सिध्द असलेल्या शिवाच्या जटेतून वाहणाऱ्या लोकपावनी गंगेचे

 

प्रतिक आहे. या प्रमाणे नित्य प्रसन्नतत्वामुळे मिळणारा महाप्रशांत आनंद आल्हादमयी स्थितीचे प्रतिक चंद्रकोर आहे.

उजव्या भागात प्रवाहणारी श्वासरूप शक्तीची पिंगळा नाडी असते. डाव्या भागात प्रवाहणारी श्वासरूपी शक्ति इडा नाडी नावाने ओळखली जाते. अरे शंकरभट्टा ! प्राणायाम करताना उजव्या नाकपुडीने श्वास घेतल्यास उष्णता वाढते म्हणून तिला सूर्यनाडी म्हणतात. डाव्या बाजूने श्वास घेतल्यास शितलता मिळते म्हणून तिला चंद्रनाडी असे म्हणतात. काळ पुरुषाच्या शरीरातील राशीचक्रात मेष राशी पासून तुळा राशीपर्यंत उष्णता देणारे सहा महिने सूर्यनाडी असे ग्रहित धरल्यास अश्विन मासापासून फाल्गुन मासापर्यंतचे सहा महिने शीत अर्थात

कमी उष्ण असल्याने चंद्रनाडी असे समजले जातात. या चंद्रसूर्याच्या गतीमुळेच पौर्णिमा आणि अमावास्या यांची निर्मिती होते.

योगी पुरुष आपल्या वैशिष्टयपूर्ण साधनेने कालचक्रातील समस्त सिध्दि प्राप्त करून घेतो. त्याला भूत, भविष्य आणि वर्तमान या तिन्ही कालाचे ज्ञान योगशक्तिमुळे प्राप्त होते. या कालचक्रालाच अर्धनारीश्वर, जी कोणत्याही परिस्थितीत वेगळी करता येत नाही, अशी जोडी समजावे. रात्र-दिवस, पौर्णिमा-अमावास्या या एकानंतर एक विशिष्ट कालावधीनंतर दृष्यमान होत असतात. रात्र नसेल तर दिवस व दिवस नसेल तर रात्र असूच शकत नाही. माता-पिता रूपाने संबोधिले जाणारे अर्धनारीश्वरच या अनंत सृष्टीच्या चलनवलनास कारणीभूत होत असतात.

शिवाचे कार्य संहारक आहे असे आपण म्हणतो त्याचा गर्भित अर्थ जुन्या सृष्टीचा अंत होऊन नविन सृष्टीची निर्मिती असा आहे. सृष्टीतील बदल अतिसहजपणे होत असताना नूतन सृष्टींचा अविर्भाव होऊन ती थोडयाकाळ पर्यंत त्या स्थितीत असते. नंतर मात्र त्याचा संहार अनिवार्यच असतो. अथर्ववेदातील समस्त अस्त्र-शस्त्र, मंत्र विद्यासिध्द होण्यासाठी या विद्येचा अधिपती असलेल्या ईशानरुद्राचा अनुग्रह असणे आवश्यक असते. असा संवाद चालू असतानाच मी म्हणालो "आपण शिव-पार्वती आणि आद्र्रा नक्षत्राचा घनिष्ट संबंध असल्याचे सांगितले होते. या विषयी सविस्तर माहिती सांगावी ही प्रार्थना." तेंव्हा धर्मगुप्त म्हणाले "रुद्र पळत्या हरिणाची शिकार करीत असलेल्या रूपात "मृगव्याध रुद्र" या नावाने दर्शन देतील. हे दिव्य रूप आकाशातील आद्र्रा नक्षत्रात दिसेल."

## ग्रह संचाराचा प्रभाव

धर्मगुप्त पुढे म्हणाले "या मृगव्याध रुद्राचे रूप नक्षत्र मंडळातील मिथुन आणि कर्क राशीच्या मध्ये आडवे दिसेल. या नक्षत्र मंडळाच्या जवळ राहू, केतू, शनी या सारख्या ग्रहांचा संचार झाल्यास विश्वव्यापी युध्द, प्रलय, देवादानवाचे युध्द, महाभारताचे युध्द या सारखी संकटे ग्रह गतीनेच येतात. कालसंहार मूर्ती म्हणजे धनुष्य बाण धारण केलेल्या उग्रमूर्ति असलेल्या रुद्राचेच मन्युदेवता रूप असे वेदांनी वर्णन केले आहे." धर्मगुप्त आपले वक्तव्य चालू ठेवीत म्हणाले "माघ मासातील अमावास्येच्या अगोदर येणाऱ्या चतुर्दशीला "महाशिवरात्री" असे म्हणतात. प्रत्येक

 

महिन्यातील अमावास्येच्या पूर्वी येणाऱ्या चतुर्दशीला "मास शिवरात्रि" असे म्हणतात."

## शनीप्रदोष समयी ईश्वर आराधनेचे फळ म्हणजे शनिग्रह दोषाचे निवारण

महाशिवरात्र मंगळवारी आल्यास ती अत्यंत पुण्यकारक असते. शनिवारी त्रयोदशी आल्यास त्याला शनीप्रदोष म्हणतात. या शुभ दिनी शिवार्चन करून शनीदेवास प्रिय असलेले तीळ दान करावे. शिव शनीची आदिदेवता असल्याने तीळाच्या तेलाने परमेश्वराची आराधना केली असता शनीदेवाच्या बाधेपासून निवृत्ती होते. शनीवारी प्रदोष समयी शिवाराधना केल्यास समस्त कर्म दोषरहित होऊन आपणास सुख

शांती लाभते. शनी ही कर्म कारक देवता आहे. शिव ही संहारक देवता आहे. शनीप्रदोष समयी शिवाची आराधना, सर्व प्रकारच्या अशुभ कर्माच्या महापापांचे भस्म करून, शुध्द, नूतन, दिव्य, तेजोमय शुभ स्पंदनाने मानवाचे मन, बुध्दि, अहंकार, चित्त यांची आत्मशुध्दि करून नवीन जन्म प्राप्त करून देते.

अशा प्रकारच्या अर्चनेने शनीदेव शांत होतात. शनीवारी रात्रीच्या वेळी, त्या जीवाचे सारे दुष्कर्म, दोषांची अधिष्ठान देवता महाकालीमध्ये विलीन होतात. दुसऱ्या दिवशी म्हणजे रविवारी सूर्योदयाच्या समयी सवित्र मंडळातील मध्यवर्ती असलेल्या त्या महाशक्तीचा साधकास अनुग्रह प्राप्त होतो. याच वेळी त्याच्या नूतन जीवनाची

सुरवात होते. त्याच्या अशुभ कर्माच्या पापाचे गाठोडे परमेश्वराच्या योगाग्नीत जाळले जाते.

## पंचभूतात्मक शिवस्वरूप

शिवशंकर हे पंचभूतात्मक देवाधिदेव आहेत. आपल्या शरीरातील "मूलाधार" केंद्रात पृथ्वी तत्व असते. याचेच प्रतिक म्हणून साधकाकडून पार्थिव लिंगाची पूजा केली जाते. "स्वाधिष्ठान चक्रात" जलतत्व असते. याचे प्रतिक जललिंग असते "मणिपूर" चक्रात अग्नीतत्व असते त्याचे प्रतिक ज्वाललिंग आहे. यालाच हिरण्यस्तंभ असे सुध्दा म्हणतात. कंठस्थानात म्हणजे विशुध्दचक्रात वायुतत्व असते. त्याचे प्रतिक वायुलिंग आहे. हृदयातील आकाश स्थानात असलेल्या लिंगाला "चिदंबर

लिंग" असे म्हणतात. या पंचभूतात्मक लिंगाची आराधना, दर्शन, अर्चना हे विषेशफलप्रद असतात. आकाशलिंग म्हणविल्या जाणाऱ्या चिदंबर लिंगाला आकारच नसतो. चिदंबर क्षेत्रात पडद्याच्या मागे लपवून ठेवलेले चिदंबर रहस्य म्हणजे पडदा उचलल्यानंतर मध्ये काहींच नसते. शुध्द आकाश म्हणजे शिवाचे आत्मलिंग होय. हृदयच चित्स्थान असल्याने आत्म्याचे निवासस्थान आकाशच असते. वास्तविक पहाता आकाशाला आकारच नसतो. एकाग्र चित्ताने निजतत्वाचे ध्यान करणाऱ्या योग्याना त्यांच्या हृदयात समस्त सृष्टी , संपूर्ण ब्रह्मांडाचे, नक्षत्रांचे, ताऱ्यांचे वगैरे दर्शन होते. परमेश्वर सर्वव्यापी आहे. तोच अरुणाचलेश्वराच्या रूपात, अरुणाचलातील पर्वत रूपात, एका महासिध्दाच्या रूपातही अरुणाचलात आहे. त्यांच्या केवळ दर्शनानेच पापांचा क्षय होतो. तोच

अरुणाचलेश्वरच आज मानवाकृती मध्ये पीठिकापुरात श्रीपाद श्रीवल्लभ या नामरूपाने अवतार घेऊन समस्त मानव जातीचे कल्याण करण्याच्या उद्देशाने सध्या कुरुगड्डीमध्ये दिव्य तेजाने विलसत आहे.

कुरुगड्डी अरुणाचल पर्वता प्रमाणे आहे. अर्धनारीश्वर रूपात असलेले अरुणाचलेश्वर श्रीपाद श्रीवल्लभच आहेत. ज्या प्रमाणे अरुणाचलातील पर्वत साक्षात शिवस्वरूप आहे तसेच कुरुगड्डी सुध्दा साक्षात श्रीपाद श्रीवल्लभांचे रूपच आहे. अरुणाचलातील शिवलिंगात शिवशक्ति असल्याप्रमाणे श्रीपाद श्रीवल्लभांच्या रूपात सुध्दा शिव आणि शक्ति मिळून आहेत. अरुणाचलातील महासिध्दाच्या रूपातील परमेश्वराचे दर्शन साधकांना अत्यंत दुर्लभ असते. परंतु

श्रीपाद श्रीवल्लभ या रूपातील महासिध्दाचे दर्शन साधकांना अत्यंत सुलभ रितीने होते." हे धर्मगुप्तांचे वक्तव्य ऐकून मी म्हणालो "महाराज ! मी आतापर्यंत श्रीपाद प्रभू हे श्री पद्मावती देवी समवेत श्रीवेंकटेशाचे संयुक्त स्वरूप आहेत असे ऐकले होते. परंतु तुम्ही ते शिव शक्तीस्वरूप आहेत असे सांगितलेत. मला हे सारे कांही स्पष्ट कळत नाही. घोटाळयात पडल्यासारखे वाटते. आपण कृपा करून स्पष्ट करून सांगावे" माझे बोलणे ऐकून धर्मगुप्त हसले आणि म्हणाले, "अरे बाबा, श्रीपाद प्रभूंचे दिव्य तत्व सप्तऋषींना सुध्दा अवगत झाले नाही. तेंव्हा माझ्यासारख्या सामान्य पामराची काय कथा ? तरीपण माझ्या सामर्थ्यानुसार तुला समजावून सांगण्याचा प्रयत्न करतो. श्री वेंकटेश प्रभू कृतयुगापासून आहेत. त्यांनी श्री दशरथ राजाला दर्शन देऊन सांगितले होते की

मी श्रीरामचंद्र या नांवाने तुझ्या घरी जन्म घेईन."कौसल्या तनय" श्रीराम या नांवाने सुध्दा स्वामींची पूजा काही लोक करतील. कांही काळपर्यंत श्रीपाद प्रभूंची शक्तीस्वरूप म्हणजे बालत्रिपूर सुंदरी या स्वरूपात सुध्दा भक्तांनी आराधना केली. कांही साधकांनी त्यांची "सुब्रह्मण्यम" या स्वरूपात सुध्दा अर्चना केली. यानंतर श्री रामानुजाचार्यांनी वैष्णवांकडून "श्री महाविष्णु" रूपात त्यांची आराधना करविली. ही सारी रूपे असलेले साक्षात दत्तप्रभूच आहेत. साधकांनी कोणत्याही रूपात श्रध्दाभावाने त्यांना साद घातली तर ते भक्ताचे रक्षण करण्यास धावून येतात आणि भक्तांचे रक्षण करतात. साधकांना लीला दर्शविणारे माया नाटकाचे सुत्रधार श्रीपाद प्रभूच आहेत. तेच आज श्रीपाद श्रीवल्लभ या नामरूपाने भक्ताचे कल्याण करीत आहेत.

श्रीपाद प्रभूंच्या वामभागात शक्तिसंचार असतो आणि उजव्या भागात शिवसंचार आसतो या कारणाने ते शिवशक्तीस्वरूप आहेत. त्यांच्या हृदयात पद्मावती देवीचा वास असतो. हृदय हे दयेचे तसेच अनाहत चक्राचे स्थान आहे. येथून शक्ति ऊर्ध्वचक्राकडे त्याच प्रमाणे अधोचक्राकडे म्हणजे मुलाधार चक्राकडे प्रवाहित होते. या कारणानेच ते अजून एका दिव्य चैतन्यमय शरीराने श्रीपद्मावती आणि श्री वेंकटेश्वर स्वामी रूपात आहेत. श्रीपाद प्रभू वाणी हिरण्यगर्भाचे सुध्दा स्वरूप आहेत. परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी स्वरूपी वाणी देवीचा त्यांच्या जिव्हेवर वास असतो. वाणीमातेचे दिव्य मानस आणि हिरण्यगर्भाचे दिव्य मानस हे अद्वैत स्थितीत असते.

 

वास्तविक पहाता चिदंबर रहस्य म्हणजे, ते तीन प्रकारचे चैतन्य स्वरूप एकाच वेळी धारण करतात. त्यांच्या एका शरिराला दुसऱ्या शरीराचा कोणत्याहि दृष्टीने पाहिल्यास स्पर्श नसतो. ते वाणी, हिरण्यगर्भाचे चैतन्य शरीर, शिव-पार्वतीचे चैतन्य शरीर, पद्मावती वेंकटेशाचे चैतन्य शरीर यांना एकेच वेळी धारण करून त्या सगळयांचे अतीत श्रीपाद श्रीवल्लभ असे आणखी एक दिव्य चैतन्य शरीर धारण करतात. याचे वैशिष्टय असे की एका शरीराशी दुसऱ्या शरीराचा स्पर्श नसतो हीच प्रभुची योगमाया, वैष्णविमाया आणि हेच त्यांचे चिदंबर रहस्य. श्रीपादांना द्वैत, विशिष्ठाद्वैत, अद्वैत आणि या सर्वांचे अतीत असे म्हटले तरी योग्यच होईल. कारण त्यांची योगमाया अगाध आहे."

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -25

## रुद्राक्ष महिमा

## शिवाराधनेच्या पध्दती आणि त्यांचे फळ

धर्मगुप्ताना मी प्रश्न केला "महाराज शिवाराधना कशी करावी ? त्यातील विविध पध्दतींचा बोध करून माझ्यावर अनुग्रह करावा" श्री धर्मगुप्त म्हणाले, "ॐ नम: शिवाय" या शिवपंचाक्षरी मंत्राचे जपानुष्ठान करून शिवाची आराधना करावी ही पहिली पध्दत, महान्यासाचे विधान

 

ही दुसरी पध्दत आणि रुद्राभिषेकाने शिवार्चन करणे ही तिसरी पध्दत. पंचाक्षर मंत्रातील पाच अक्षरे ही पंच महाभूतांची प्रतिक आहेत. जीव हा पशुप्रमाणे ममता, मोह आदींच्या बंधनात फसल्यामुळे त्याला पशू म्हटले गेले आहे. पशूबंधाचे विमोचन करणाराच पशूपतीनाथ आहे. शिवपंचाक्षरी मंत्राचे शास्त्रात पंचकोनी नक्षत्रासारखे वर्णन आढळते. या पंचकोनी मंत्रात मोक्ष प्रदान करणारे मंत्र पहिल्या वर्गाचे, भोग, भाग्यादि देणारे दुसऱ्या वर्गात समाविष्ट होतात. पंचोपचारात भूतत्त्वाचे चंदन, जलतत्वाचे नारळाचे पाणी, अग्नितत्वाचे दीपाराधन, वायुतत्वाचे सुगंधित धूप, आणि आकाश तत्वाचे घंटानाद असे उपचार येतात.

 

पंचाक्षरातील पाच अक्षरे त्यांच्या त्यांच्या तत्वानुसार साधना करणाऱ्या साधकांना पांच रंगाने तत्वांचे दर्शन घडवितात.1) पांढऱ्या शुभ्र मोत्या सारखा पांढरा पादरस किंवा चांदी सारखा चकचकित प्रकाश 2) प्रवाळासारखी अरुण कांती 3) पिवळया हळदी सारखी सोनेरी कांती 4) निळया वर्णात निळया आकाशासारखी विश्वव्यापी कांती 5) शुध्द धवल कांती. भूमध्यात पांच रंगाची ज्योत प्रकाशित होणे यालाच ऋषीश्वरांनी संध्योपासन असे नाव दिले आहे. यंत्र, पंचतत्व साधना, योगसाधन आत्मसमर्पण हे सर्व प्रधान असे साधनांश आहेत. या पध्दतींनी देहात्म बुध्दीचा नाश होतो. जीवांचा देहच देवालय आणि त्यात विराजमान असलेला आत्माच शिवात्मा असे तादात्म्य साधून मोक्ष प्राप्ति होते. ही स्थिति प्राप्त होण्यासाठी पंचाक्षरी जप, महान्यास

पूर्वक शिवाराधना, रुद्राभिषेक हे सहकारी आणि कल्याणप्रद ठरतात . विष्णुसहस्त्रनाम स्तोत्र श्री विष्णुंना अत्यंत प्रिय आहे. गणेशाला मोदक अतिप्रिय आहेत. सूर्याला सूर्यनमस्कार प्रिय, चंद्राला अर्घ्य प्रिय, अग्नीला हवन प्रिय त्याच प्रमाणे शिवाला अभिषेक प्रिय आहे. अभिषेकामुळे शिव संतुष्ट होतात. ब्रह्म कल्पातील प्रलयाच्या वेळी, भविष्यातील सृष्टी साठी सकल जातीचे बीज म्हणजे समस्त जीव राशी, वृक्ष , औषधी वनस्पती यांचे बीज एका पूर्ण कुंभात भरले. त्यात अमृत सर्व नद्यांचे जल, समुद्राचे जल घालून गायत्री मंत्राद्वारे आपल्या प्राणशक्तीचे त्यात आवाहन केले. या कुंभालाच पूर्ण कुंभ असे म्हणतात. या कुंभातील अमृताचेच सिंचन महर्षींनी निरंतर पृथ्वीवर केले. या कलशातील जलाचा, अमृताचा अभिषेक प्रामुख्याने कैलास पर्वतावर झाला. याकारणाने हे अमृत स्थान

या नावाने प्रसिध्द झाले. श्रावण पौर्णिमेच्या दिवशी अमरनाथ गुहेत बर्फाचे शिवलिंग तयार होते. या दैवी शिवलिंगाचे दर्शन घेतल्यास समस्त पापापासून निवृत्ती होते.

## वशिष्ठ आणि अगस्त्य मुनींचा जन्म

जेंव्हा पूर्ण कुंभास उलटे केले तेंव्हा त्याच्यातून दोन महामुनी अवतरित झाले. या पैकी पहिले वशिष्ठ मुनी आपल्या शुभ्र तेजाने तळपत होते दुसरे अगस्त्य मुनी नीलवर्णाचे असून त्यांची कांती अत्यंत तेजोमय होती. ते मित्र वरूणांच्या अंशरूपाने जन्मले.

पूर्ण कुंभातील अमृतीकरण केलेल्या जलाने अकरा वेळा एकादश रुद्राभिषेक केल्यास एकादशीचे पुण्यफल "एकादश रुद्ररूप" हे शिवाकडून प्राप्त होते. एकादश रुद्राचा आणि वैष्णव संप्रदायातील एकादशी व्रताचा असा अगदी जवळचा संबंध आहे. यामुळे शिव आणि केशव हे अभिन्न रूपच आहेत. "नमकाने" रुद्राभिषेक केल्यास अकाल मृत्यु दोषाचे हरण होते. सोम ग्रहाची अधिष्ठान देवता चंद्र आहे. चंद्र पुनरुज्जीवनासाठी मूल साधन शक्तींचा वर्षाव करतो. या चंद्रकलेचे स्थान योगी पुरुषांच्या भ्रूमध्यात भुवयांच्या थोडे वर सहस्त्राराच्या समोर चमकत असते.

# ईश्वराच्या विविध रूपांचे वर्णन

या कारणानेच शिवाच्या शिरावर चंद्रकला आहे असे सांगितले जाते. गुर्जरदेशात (गुजराथमध्ये) असलेल्या सोमनाथाचा मंदिरात चंद्रकांत शिला वापरूनच शिवलिंगाच्या मस्तकावरील पांढरी चंद्रकोर केली आहे. येथील ज्योती सारखे चमकणारे स्फटिकाचे ज्योतिर्लिंग पुजिले जाते. शास्त्राचे असे वचन आहे की स्वत:मध्ये रुद्रतत्व आल्या शिवाय रुद्राभिषेक करू नये. महान्यासामध्ये काळ म्हणजे स्व-रूपाचा संहार करणारे, यासाठी अभिषेक करणाऱ्यानी कालात्मक होऊन यज्ञ स्वरूप शरीरात न्यास करून रुद्राभिषेक करावा. बोधायन महर्षिच्या महान्यास रुद्राभिषेक विधानात शिवाचे वर्णन तत्पुरुष,

 

अघोर, सद्योजात, वामदेव, ईशान असे केले होते.

तत्पुरुष मूर्ति, पलयाग्नी सारखी विद्युत रंगाची असते. अघोर मूर्ती मेघवर्ण असते. सद्योजात मूर्ति चंद्राच्या कांतीसम धवल असते. वामदेवमूर्ति गौर वर्णाची असते. ईशान मूर्ति ही तेजोमय असून आकाश वर्णाची असते.

रुद्र सहस्त्रादी संख्येत असतात. रुद्राचे गण या नावाने संबोधिल्या जाणाऱ्या देवता, एका गणात तीस हजार या प्रमाणे एकादश सहस्त्र गणात तेहतीस कोटी रुद्राचे गण असतात. हेच गण भूमी, आकाश, अंतरिक्ष, जल, वायु, शरीर, प्राण आणि मन यांना व्यापून असतात असे वेदामध्ये प्रतिपादित केले आहे.

 

## श्रीपाद प्रभूंची अर्चना, स्मरण करणाऱ्या भक्तांना

## तेहतीस कोटी रुद्रांचा अनुग्रह - रुद्राक्षाचे वर्णन

या तेहतीस कोटी रुद्रांचा अधिपति श्री गणपती देवता आहे. याच कारणाने आपल्यातील गणपती तत्त्वास योगमार्गाने दर्शविण्यासाठी श्रीपाद प्रभूनी आपला अवतार गणेशचतुर्थीच्या या मंगल दिनी या भूमीवर घेतला. यासाठी श्रीपाद प्रभूंची अर्चना, स्मरण करणाऱ्या साधकांना तेहतीस कोटी रुद्रांचा अनुग्रह प्राप्त होतो.

धर्मगुप्त पुढे म्हणाले "अरे बाबा शंकरभट्टा शिवभक्तांनी रुद्राक्ष धारण करावा. तो अत्यंत लाभप्रद असतो. रुद्राक्षाच्या चार जाती आहेत. त्या या प्रमाणे 1) ब्रह्मजात 2) क्षत्रियजात 3) वैश्यजात 4) शूद्रजात. ब्रह्मजातीचे रुद्राक्ष पांढऱ्या रंगाचे असतात. हे रुद्राक्ष मिळणे अत्यंत कठीण असते. क्षत्रिय जातीचे रुद्राक्ष लाल मधाच्या रंगाचे असतात. चिंचुक्याचा रंग असलेले रुद्राक्ष वैश्य जातीचे असतात तर काळया रंगाचे रुद्राक्ष शूद्र जातीचे असतात. सर्वसाधारणपणे पंचमुखापासून ते सोळा मुखे असलेले रुद्राक्ष मिळतात. एकमुखी रुद्राक्ष अत्यंत विरळा असतो. दुधात अथवा पाण्यात रुद्राक्ष घातला असता तो बुडतो. हलके रुद्राक्ष, कोवळे रुद्राक्ष धारण करणे निषिध्द असते. रुद्राक्षाला तांब्याच्या पळीखाली दाबून त्याच्या खाली तांब्याचे पंचपात्र पालथे ठेवावे . रुद्राक्ष चांगला

 

खरा असल्यास तो प्रदक्षिणा घालण्याच्या दिशेने फिरतो. कांही रुद्राक्ष अप्रदक्षिण म्हणजे उलटया दिशेने फिरतात. या रुद्राक्षांना द्रविड रुद्राक्ष म्हणतात. असे रुद्राक्ष गृहस्थांनी वापरु नये. यांनी अनेक अनिष्ट प्रसंग उद्भवतात व संन्यास योग येतो. यामुळे असे रुद्राक्ष केवळ संन्यासी जनांनीच वापरावे. कालाग्नी रुद्राने असे सांगितले आहे की पांढरे रुद्राक्ष ब्राह्मणांनीच वापरावे. क्षत्रियांनी लाल रंगाचे, वैश्यांनी फिका पिवळया रंगाचे व शूद्रानी काळे रुद्राक्ष धारण करावे. हे रुद्राक्षच त्यांना अनुकुल असून त्यांच्या पापांचा नाश करून त्यांच्या मनोकामना पूर्ण करतात.

एकमुखी रुद्राक्ष प्रत्यक्ष शिवस्वरूप असतो. द्विमुखी रुद्राक्ष अर्धनारीस्वरूप असतो. त्रिमुखी, अग्नीस्वरूप, चतुर्मुखी रुद्राक्ष ब्रह्मस्वरूप,

पंचमुखी कालाग्नी स्वरूप, षड्मुखी रुद्राक्ष कार्तिकेयाचे स्वरूप असतो. सप्तमुखी मन्मथाचे स्वरूप, अष्टमुखी रुद्रभैरवाचे स्वरूप, नवमुखी कपिल मुनींचे स्वरूप असतो. हा रुद्राक्ष अत्यंत दुर्लभ असतो. या रुद्राक्षामध्ये विद्याशक्ति , ज्ञानशक्ति , क्रियाशक्ति, शांतशक्ति, वामशक्ति, ज्येष्ठाशक्ति, रौद्रशक्ति, अंगशक्ति, पश्यंती अशा नऊ प्रकारच्या शत्तिच् असतात. या कारणानेच हे रुद्राक्ष धर्मदेवता स्वरूप आहेत. दशमुखी रुद्राक्ष विष्णुस्वरूप, एकादशमुखी रुद्राक्ष साक्षात शिव स्वरूप, द्वादशमुखी द्वादशादित्यरूप असा रुद्राक्षांचा विविध देवतांशी संबंध आहे.

श्रीपाद प्रभूंनी, प्रकृतिक प्रवृत्ती आणि निवृत्ती यांचा अधिपति श्रीगणपती, त्यांचे तत्त्व आपल्या चैतन्यमय स्वरूपात धारण केलेले आहे.

 

यामुळेच ते तेहतीस कोटी देवतेचे दिव्यस्वरूप आहेत. एवढेच नव्हे तर या सृष्टीतील प्रत्येक हालचाल श्रीपाद प्रभूंच्या संकल्पानेच होत असते.

सर्व चलनाचे मूल कारण श्रीपाद प्रभूच असून सर्व कारणाचे तेच कारण स्वरूप आहेत. ते शिवस्वरूप आहेत असा मनी भाव ठेवून त्यांचे पूजन केल्यास ते विष्णुरूपात दिसतात आणि विष्णुरूपात त्यांची आराधना केल्यास ते शिवरूप दिसतात. परंतु मनातील तर्क विर्तकांचा मल काढून टाकून त्यांना अनन्य भावाने शरण गेल्यास ते यथार्थ रूपात दिसतात."

श्री धर्मगुप्त पुढे म्हणाले "अरे शंकरभट्टा ! मी सुध्दा तुझ्या बरोबर कुरुगड्डीस येऊन श्रीपाद प्रभूंचे दर्शन घेऊन माझा जन्म कृतार्थ करून

घेईन." मी (शंकरभट्ट) आणि धर्मगुप्त आम्ही दोघे कुरुगड्डीस आलो आणि श्रीपाद प्रभूंचे दर्शन घेतले. त्यांनी डोळे उघडून आमच्याकडे पाहिले आणि थट्टेने म्हणाले काय उत्तम चर्चा चालली होती. श्रीपाद हे शिवरूप आहेत. मीच श्रीपाद आहे का ? तसे नसेल तर श्रीपादच "मी" म्हणून आलो काय ? मी कोण आहे ? धर्मगुप्ता, थोडे विवरण करून सांग ना ?" यावर धर्मगुप्त म्हणाले "मी पीठिकापुरमहून येत असताना श्री वेंकटपय्या श्रेष्ठी यांनी मला सांगितले होते की श्रीपाद प्रभू बरोबर कोणताही तर्क वितर्क करू नकोस. केवळ त्यांना संपूर्णपणे शरण जा. या प्रमाणे मी आपणांस अनन्य भावाने शरण आलो आहे आपल्या कोणत्याही प्रश्नास मी मौन धारण करीन. वेद सुध्दा श्रीपाद प्रभूंचे यथार्थ वर्णन करू न शकल्याने ते मौन झाले. तर धर्मगुप्ता सारख्या सामान्य

 

साधकाची काय परिस्थिती." धर्मगुप्ताचे वरील कथन ऐकून श्रीपाद प्रभू अत्यंत प्रसन्न झाले. त्यांनी दोघांना चरणस्पर्श करण्याची सम्मती दिली. आम्ही अतिआनंदाने प्रभूंच्या चरणांना स्पर्श केला. आणि काय आश्चर्य ! आम्ही दोघे ध्यानावस्थेत गेलो. या अवस्थेत किती वेळ गेला याचे भानच नव्हते. जेंव्हा ध्यानावस्था उतरली त्यावेळी सायंसंध्येची वेळ होत आली होती. श्रीपाद प्रभूंनी आम्हास कृष्णानदीचे पात्र ओलांडून पैलतिरावर जाण्यास सांगितले. त्या प्रमाणे आम्ही दोघे श्रीपाद प्रभूंच्या दिव्य लीलांचे स्मरण करीत करीत कृष्णेच्या पैलतिरावर गेलो, पैलतिरावरील नदीच्या मऊमऊ वाळूत आम्ही पहुडलो आणि केंव्हा निद्रादेवीच्या कुशीत गेलो ते कळालेच नाही. प्रात:काळी जाग आली ती अत्यंत मधुर कंठरवाने म्हणलेल्या

 

योगी जनांच्या "श्रीपाद श्रीवल्लभ दिगंबरा" या नाम स्मरणाने.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

# अध्याय -26

## कलीयुगाचे लक्षण

आम्ही प्रात:काळीच उठून नदी ओलांडून श्रीपाद प्रभूंच्या दर्शनासाठी कुरुगड्डीस गेलो. धर्मगुप्तांना श्रीपाद प्रभूंच्या मुखातून कलियुगाच्या प्रादुर्भावाचे विशेष जाणून घेण्याची तीव्र इच्छा होती. आज श्रीपाद प्रभू अत्यंत आनंदात होते. त्यांची कारुण्यामृताची वर्षा करणारी अमृत दृष्टी साऱ्या साधकांना एका अगळया वेगळया अध्यात्मिक आनंदाचा ठेवा प्रदान करीत होती. प्रभूंच्या चरणकमलांना स्पर्श करून आम्ही धन्य झालो.

श्री धर्मगुप्तांनी, श्रीपादांना, कलियुगाच्या प्रादुर्भावाचे विशेष वर्णन करून सांगण्याची नम्र प्रार्थना केली. श्रीपाद प्रभू म्हणाले "साधकानों, काळ हे परमात्म्याचे विराट स्वरूप आहे. सूर्याला कालात्मक असे सुध्दा म्हणतात. धनिष्ठा नक्षत्रापासून प्रारंभ केलेली सूर्याभोवतीची श्रवण नक्षत्राची परिक्रमा परत फिरुन धनिष्ठा नक्षत्रापर्यंत येण्याच्या काळास ब्रह्मकल्प असे म्हणतात. ब्रह्मकल्पातील एका भागास सृष्टीकल्प असे म्हणतात. आणि उरलेल्या भागास प्रलय कल्प असे म्हणतात. पितृदेवतांच्या संबंधित कालगणनेत अर्धाभाग शुक्लपक्ष आणि अर्धाभाग कृष्णपक्ष असे असतात. संवत्सर पुरुषाचे सहा महिने उत्तरायण आणि नंतरच्या सहा महिन्यास दक्षिणायन असे म्हणतात. संपूर्ण कालचक्राचे दर्शन योगी आपल्या शरीरात करतात. या रहस्य विद्येला तारक राजविद्या असे म्हणतात.

तारक राजयोगात शरिरालाच ब्रह्मांड मानतात. समस्त लोक यातच समाविष्ट झालेले आहेत. आपल्या शिरस्थानाला ब्रह्मलोक असे म्हणतात. या शिरस्थानात आचार विचार असतात. नाभीमध्ये विष्णुलोक असतो. आपल्या हृदयात रुद्रलोक असतो. पितृलोक आपल्या वीर्यकणात जन्युदेवता स्वरूपात वास करतात. या जन्युदेवतांचे कार्य असे की मानवाच्या गत जन्मात केलेल्या कर्माचे फळ पुढील जन्मात देणे. असे असले तरी गेल्या जन्माचे फळ एका क्रमपध्दतीने देण्यास काळाची अत्यंत आवश्यकता असते."

 

# कलियुगाचे लक्षण

पितृदेवता म्हणजे आपले दिगंवत झालेले पूर्वज नव्हे. स्वर्गवासी झालेल्या आपल्या माता-पिता, आजी आजोबा यांच्या नांवाने आपण केलेल्या श्राध्दपक्षाचे फळ स्विकारून त्याना उत्तम गती प्राप्त करून देणारे जन्युदेवताच असतात. या जन्यु देवतांना जन्म नसतो. योगीजन आपल्या शरीरातच सृष्टीतील सहा ऋतुंचे दर्शन करतात. एका वर्षात बारा पौर्णीमा आणि बारा अमावास्या असतात. हे चोवीस पर्वच गायत्रीचे चतुर्विशंती छंद असतात. कालस्वरूपी श्री विष्णु भगवानांना कांही लोक संवत्सर पुरुष मानून त्यांची उपासना करतात. या विद्येला द्वादशाक्षरी विद्या असे म्हणतात. प्रत्येक महिन्याचे एक अक्षर या प्रमाणे बारा

महिन्यांची बारा अक्षरे मिळून यांचा एक मंत्र तयार होतो.

नद्यांना भयंकर पूर येऊन मनुष्य, पशु, संपत्ती यांची अपार हानी होणे, भूमीचे प्रकंपन होणे म्हणजे भूकंप होणे, सूर्य, चंद्राची गती बदलणे, दिवसा अंधार पडून सूर्य न दिसणे, आकाशात "धूमकेतू" तारा दिसणे ही सारी कलियुगाची लक्षणे आहेत. द्वापार युगाच्या शेवटच्या काळात पश्चिमी समुद्रातील एका द्वीपावर कलियुगाचा अधिपती असलेल्या कलिपुरुषाने घोर तपस्या केली होती. हे सारे विषय वेदव्यास ऋषींच्या भविष्य पुराणात आढळतात.

# म्लेंछ जातीचा आविर्भाव

जिकडे पहावे तिकडे वेदमंत्राचे उच्चार, यज्ञ यागादी तपस्या याचाच जोर सर्वत्र चालू होता. या कारणाने कलिपुरुषास अत्यंत दु:ख झाले. त्याने भगवंताची प्रार्थना केली "हे प्रभो, पृथ्वीवर सगळी कडे यज्ञ, याग, धार्मिक आचरण, नीतिमत्ता याचेच प्राबल्य आहे. अशा परिस्थितीत मी माझ्या कलियुगाचा प्रभाव लोकांमध्ये कसा पसरवू. आपल्या आज्ञेप्रमाणे मी माझ्या युगधर्मास सगळीकडे व्यापून टाकावे परंतु सद्य परिस्थितीत ते मला अशक्यच वाटत आहे." कलियुगाचे हे वक्तव्य ऐकून जगत्प्रभूंनी कलियुगास पश्चिमी समुद्रातील एक द्वीप दाखविले. म्लेंछ जातीचा मूलपुरुष आदम आणि स्त्री हव्यावती या दोघांना जगतप्रभूंनी

 

कलियुगास दाखविले. त्या स्त्री पुरुषास विहार करण्यासाठी एक अत्यंत रमणीय उद्यान निर्माण केले. वास्तविक पहाता ते स्त्री पुरुष भाऊ-बहीण होते. परंतु कलियुगाने सर्परूपाने त्यांच्या शरीरात प्रवेश करून त्यांच्यात काम भावनेचे बीज पेरले. आणि अधर्मी संतान उत्पन्न करण्यास प्रेरीत केले. ते दोघे अशा प्रकारे पतित झाल्यावर त्यांच्यातील दिव्य शक्ति अदृष्य झाली. कालांतराने या जोडीपासून कलिधर्मांच्या मूळ म्लेंछ जातीचा अविर्भाव झाला.

द्वापारयुगाच्या अंति म्हणजे दोन हजार आठशे वर्षांनंतर म्लेंछ देशात म्लेंछ जातीच्या संततीची अभिवृद्धी होणार असल्याचे भविष्य पुराणातील प्रत्येक सर्गपर्वात कथन केले आहे. नीलांचल पर्वता जवळ आदम आणि हव्यावती

या दोघांनी आपल्या पापाचे फळ अनुभवून आर्य धर्मास दूषण लावणारी, अभक्ष्य भक्षण करणारी, दुराचारी अशा संततीची वृद्धी केली.

श्रीपाद प्रभू पुढे म्हणाले "मी कल्कि अवतार घेऊन कोटयावधि अधर्मी व दुराचारी लोकांचा नाश करून पुनरपि सत्य युगाची स्थापना करणार आहे. हा फार दूरच्या भविष्यातील माझा कार्यक्रम आहे."

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

# अध्याय -27

## पंचदेव पहाड प्रांतात विरुपाक्षाची भेट

श्री धर्मगुप्त आणि मी कृष्णेच्या अलिकडील तिरावर पोहोचलो, ती मध्यान्हीची वेळ होती. त्या दिवशी गुरुवार होता. गुरुवारी श्रीपाद प्रभू विविध स्थळी एकेच वेळी भिक्षा स्वीकारीत. असा हा परमपवित्र गुरुवार व त्याची मध्यान्ह वेला होती. पंचदेव पहाड या स्थळी एक गवताची कुटी बांधावी असा श्रीपाद प्रभूंचा आग्रह होता. ही कुटी एका दिवसातच बांधा असे सुध्दा ते म्हणाले होते. परंतु पंचदेव

पहाडाचा तो परिसर आमच्या परिचयाचा नव्हता. कुटी बांधण्यास सोयिस्कर जागा हवी होती. बांधकामाचे साहित्य गवत, काठ्या दोऱ्या, पाने इत्यादि काहीच वस्तु आमच्या कडे नव्हत्या. कुटी बांधण्यास हवे असलेले कामगार सुध्दा तेथे नव्हते.

## पंचदेव पहाड स्थानाचे महत्व

कोठे जावे याचा निश्चित विचार मनात नव्हता. या परिसरात आम्ही वाटसरु प्रमाणे इकडे तिकडे फिरत होतो. फिरत फिरत आम्ही एका शेतकऱ्याच्या शेतात गेलो. तेथे तो आपल्या जनावरांसाठी गोशालेचे निर्माण करीत होता. शेतात एका स्वच्छ जागी एक उंच ओटा बांधला होता आणि त्यावर शेताच्या

 

मालकासाठी एक गादी बसण्याकरिता घालून ठेवली होती. त्या गादीवर बसलेल्या मालकाने आम्हास बोलावून आमचे स्वागत केले. आणि आम्हास भोजन दिले. आम्ही भुकेजलेलेच होतो. शूद्राच्या घरचे भोजन करावे का नाही ही शंका आमच्या मनांत क्षणभर डोकावून गेली. तेंव्हा त्या शेताचा मालक चिडून म्हणाला, आमची जनावरे चोरुन नेऊन दुसऱ्या प्रांतात विकणाऱ्या तुम्हाला शूद्राचे भोजन घ्यावे का नाही अशी विचित्र शंका आली का ? त्या मालकांच्या दृष्टीने आम्ही चोर ठरलो होतो. परंतु भुकेमुळे आम्ही तेथील भोजन केले. त्या शेताच्या मालकाचे नांव विरुपाक्ष असे होते. भोजन झाल्यावर आम्हा दोघांना एका-एका झाडास बांधण्यात आले. मी एक गरीब ब्राह्मण आहे. माधुकरी मागून आपला उदर निर्वाह करतो असे अत्यंत दीनवाणीने त्यांना सांगितले.

माझ्याकडे धन अजिबात नाही हे सुध्दा पुन्हा सांगितले. या नंतर त्या शेताच्या मालकाचे लोक धर्मगुप्ताकडे धन असेल अशा विचाराने त्यांच्या कडे गेले आणि त्यांच्याकडील असलेले सारे धन हिसकाऊन घ्यावे अशा विचारात होते.

## श्रीपाद प्रभूंची कल्पनातीत दिव्य लीला

आमची सत्यस्थिती परोपरीने समजाऊन सांगितली, तरी त्याचा त्या शेताच्या मालकावर काहीच परिणाम झाला नाही. त्याच्या आज्ञेनुसार आम्ही बंदिस्त होतो. काय करावे ते सुचत नव्हते. त्याच वेळी एक यात्रेकरूंचा घोळका (तांडा) तेथे आला. या यात्रेकरूंमध्ये "शिवकावडी" नावाचा एक भक्त समुदायात होता. हे यात्रेकरू वासविकन्यका परमेश्वरीसाठी कावडी नेत

 

असतात. हे भक्तगण त्रिपुंडगंध लावतात. घंटानाद करीत, श्री कन्यका परमेश्वरीची स्तुतीभरित गीते गात आपले मार्गक्रमण करतात. गंगेच्या पवित्र जलाची कावड शुभ कार्यासाठी किंवा वासवि मातेच्या जयंतीच्या उत्सवासाठी हे भक्तगण वाहून आणतात. या यात्रेकरूमध्ये अजून एक प्रकारचे साधक असतात. त्यांच्या कटीस एक पट्टा बांधलेला असतो. या पट्टयामध्ये तलवार, कवच, आणि विविध प्रकारची युध्दाची शस्त्रे असतात. या लोकांच्या समुदायास "वीरमुष्टि" असे नांव आहे. हे लोक नामाचा जयघोष करीत घंटानाद करीत येतात.

त्या शेतकऱ्याने आलेल्या यात्रेकरूंना आणि वीरमुष्टि लोकांना भोजन देऊन त्यांचा सत्कार

केला. त्यानंतर आम्हास बंधनातून मुक्त करून गोशाळेच्या निर्माण कार्यात मदत करा असा आदेश त्या शेताच्या मालकाने दिला. आम्ही कामास लागलो. सायंकाळी काम संपल्यावर विरुपाक्षाने आम्हास प्रश्न केला,"मुष्ठीतील मुष्ठी वीरमुष्ठी याचा अर्थ काय ?" आम्हास तो अर्थ माहित नसल्याने आम्ही शेतकऱ्यास तसे सांगितले. त्या दिवशीचे सायंकाळचे भोजन सुध्दा त्याने आम्हास दिले. गायींच्या संरक्षणार्थ आम्ही त्या रात्री तेथेच झोपावे असे त्या शेतकऱ्याने आम्हास सांगितले नंतर तो शेताचा मालक आपल्या सेवेकऱ्या बरोबर हसत खेळत निघून गेला. त्या रात्री आम्ही मध्यरात्री पर्यंत श्रीपाद प्रभूंचे नामस्मरण आणि दिव्य लीलांचे स्मरण करीत होतो. त्यानंतर आम्हास झोप लागली सकाळी सूर्याची किरणे अंगावर पडताच घाईने उठून बसलो. आजूबाजूस पाहिले तेथे

गायी नव्हत्या. आजूबाजूचे शेतकरी येऊन विचारू लागले की ती जागा त्यांनी किती किंमतीस विकत घेतली. आम्ही काल घडलेला वृतांत त्याना संपूर्णपणे सांगितला, परंतु त्यांनी आम्हा दोघांना वेडयातच काढले. आमच्या मनांत एकच प्रश्न सतत घोळत होता-काल पाहिलेले दृष्य खरे का हे दिसत असलेले खरे. अशा संभ्रमित अवस्थेत असतानाच एक अपरिचित गृहस्थ आला. त्याने आम्हास विचारले "श्री वासविकन्यका देवीचा जन्म वैशाख शुध्द दशामीच्या दिवशी झाला का सप्तमीच्या दिवशी झाला ?" या प्रश्नास उत्तर देताना श्री धर्मगुप्त म्हणाले, "श्री वासवी मातेचा जन्म वैशाख शुध्द दशमीच्या दिवशी मध्यान्ह समयी झाला. त्या दिवशी शुक्रवार होता." हे उत्तर ऐकून तो अपरिचित गृहस्थ म्हणाला, "तुम्ही दोघे वेडे आहात." त्या गृहस्थाने श्रीपाद प्रभू

बद्दल काढलेले उद्‌गार आम्हास आवडले नाहीत. परंतु कुरुगड्डीस तत्काळ जाण्यास निघण्याचा विचार करून आम्ही मार्गस्थ झालो. आमच्या दोघांकडे नावडयास देण्यास पैसे नव्हते ही गोष्ट आम्ही नावाडयास नावेत चढण्यापूर्वीच सांगितली, त्यामुळे नावाडयाला दया येऊन त्याने आम्हास नावेत बसू दिले. नाव चालू झाल्यावर नावाडयाची दृष्टी धर्मगुप्तांच्या बोटातील अंगठीवर गेली. त्याने ती काढून घेतली परंतु स्वत:जवळ न ठेवता कृष्णेच्या पाण्यात टाकून दिली. आम्ही नदी पार करून कुरुगड्डीस पोहोचलो त्यावेळी श्रीपाद प्रभू कृष्णा नदीत स्नान संध्यादी आटोपून तपश्चर्येसाठी बसले होते.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -28

## श्रीपाद श्रीवेंकटेश्वर स्वामी आहेत

## विष्णु-महाविष्णु, लक्ष्मी-महालक्ष्मी, सरस्वती-महासरस्वति,

## काली-महाकाली यांच्या स्वरूपाचे वर्णन

तो शुक्रवारचा शुभ दिवस असून श्री वासवी कन्यका देवीच्या जयंतीच्या उत्सवाचा परम मंगल दिन होता. प्रात:काळीच श्रीपाद प्रभू

कृष्णेच्या पाण्यावरुन चालत चालत पैलतीरावर पोहोंचले. आम्ही नावेत बसून नदी ओलांडून पैलतीरावर आलो. त्यावेळी सकाळचे सात वाजले होते. तिरुमला महाक्षेत्रात श्री वेंकटेश्वर स्वामींची, श्री लक्ष्मी स्थानाकडून पूजा अर्चना इत्यादि स्वीकारण्याची ती शुभ वेला होती.

श्रीपाद श्रीवल्लभ, काल त्या शेताच्या मालकाने निर्माण केलेल्या गोशाळेत प्रवेश करून ध्यानस्थ बसले. त्याच वेळी आम्हीसुध्दा गोशाळेत पोहोचलो. पंचदेव पहाड या परिसरात श्रीपाद प्रभूचा सत्संग प्रारंभ करण्याचा तो मंगल समय होता. बघावे ते आश्चर्यच ! श्रीपाद प्रभूंचा देह एकाएकी अत्यंत तेज:पुंज होत होता. ते महातेज चारी दिशांना हळु हळु व्यापू लागले. त्या वेळी प्रभुंचे शरीर प्राकृतीक शरीरासारखे न

 

दिसता एका अत्यंत तेजोमय मूर्तिप्रमाणे दिसत होते. थोडया वेळानंतर श्रीपाद प्रभू गोशाळेतून बाहेर आले. सर्व साधारण मानवाप्रमाणे सूर्याच्या उन्हात त्यांची छाया भूमीवर पडत असे. परंतु आज आश्चर्य घडले. त्यांची छाया भूमीवर पडत नव्हती. चालतांना मातीमध्ये त्यांची पदचिन्हे नित्य उमटत असत परंतु आज मात्र एक सुध्दा पदचिन्ह उमटले नव्हते. त्यांनी सूर्याकडे तीक्ष्ण नजरेने पाहिले. त्यांचे शरीर दिव्य तेजाने भरून जाऊन ते सारखे वाढत होते. थोडयाच वेळात आमच्या दृष्टी समोरच श्रीपाद प्रभूंचे ते विशाल तेजोमय रूप सूर्यामध्ये विलीन झाले. त्या सूर्यबिंबात आम्हास एका दिव्य शिशूचे दर्शन झाले. ते बाल्यरूप पृथ्वीवर वेगाने येत होते. त्या बालकाचे चरण भूमीवर पडताच आम्हास काहीच दिसेनासे झाले. श्रीपाद प्रभु मंदहास्य करीत होते. त्यांनी सूर्याकडे पुन्हा

 

एकदा तीक्ष्ण नजरेने पाहिले त्यावेळी आम्हास पुनरपी सर्वकांही स्पष्ट दिसू लागले. आम्हाला सुध्दा त्यांनी सूर्याकडे पहाण्यास सागितले. आम्हास त्या लालबुंद सूर्य बिंबात एक अत्यंत सुंदर अशी दिव्यतेज मूर्ती बालिका दिसली. ती बालिका हास्य वदनाने भूमीवर येत होती. तिचे चरण भूमीस लागताच आम्हास पुनरपी काही दिसेनासे झाले. आम्ही आश्चर्याने चौफेर पाहू लागलो. त्या गोंडस बालिकेने आमच्याकडे पाहिले आणि स्मित हास्य केले तेंव्हा आम्हास पुन्हा सर्वकांही दिसू लागले. त्या बालिकेस श्रीपाद प्रभूनी अत्यंत प्रेमाने, आदराने उचलून घेतले. त्या वेळी श्रीपाद प्रभूंचे वय सोळा वर्षाचे व त्यांच्या सारख्याच दिसणाऱ्या त्या अजाण कन्येचे वय तीन वर्षाचे होते. तिने अंगावर भरजरी रेशमी वस्त्र परिधान केलेले असून त्याला शोभतील अशी दिव्य आभूषणे सुध्दा

घातली होती. ती बालिका आणि श्रीपाद प्रभू त्या गोशाळेत पुन्हा गेले.

मी आणि धर्मगुप्त हे अद्भूत दृष्य अत्यंत आश्चर्य, भय आणि संभ्रम या त्रिविध भावनांनी पहात होतो. माझ्या मनांत शंका आली की हे सारे इंद्रजाल तर नव्हे ना ?

माझ्या मनातील भावना ओळखून श्रीपाद प्रभू म्हणाले "अरे शंकरभट्टा ! हे कांही इंद्रजाल नाही. हा माझा स्वभावच आहे. ही माझी दिव्य प्रकृतीच आहे. माझ्या संकल्पानेच "भूमी" "आकाश" होतात. माझ्या संकल्पानुसार ब्रह्मा सृष्टीची निर्मिती करतात. त्यावेळी निरनिराळी व्यक्तीत्वे निर्माण केली जातात. अदृष्य असलेली प्राकृतिक शक्ति साकार होते. सगुणरूपी

सृष्टी व्यक्तिरूपाने साकार होते. मी ब्रह्मस्वरूपच आहे म्हणजे ब्रह्माची प्रेरणाच आहे. या सृष्टीतील जीवांचे पालन पोषण करणे हे विष्णु स्वरूपाचे कार्य आहे. त्या विष्णूंना प्रेरणा देणारा महाविष्णु मीच आहे. सरस्वती आणि महा सरस्वती या दोघी वेगवेगळया आहेत. सरस्वती ही सृष्टीतील ज्ञानदेवता आहे. या ज्ञानदेवता स्वरूप असलेल्या सरस्वतीला प्रेरणा देणारी "महा सरस्वती" देवता आहे आणि हे अनघा स्वरूपच आहे. सृष्टीची स्थिती, कारण, वस्तुंची समृद्धी , धन समृद्धी हे लक्ष्मी मातेचेच स्वरूप आहे. महालक्ष्मी, लक्ष्मीच्या स्वरूपाला प्रेरणा आणि शक्ति देणारे अनघा स्वरूपच आहे. सृष्टीचे शक्तिस्वरूप कालिका स्वरूपच आहे. "महाकाली" ही कालीस्वरूपाची प्रेरणा आहे. हे शक्ति देणारे अनघा स्वरूपच आहे."

# अनघालक्ष्मीचे स्वरूप

अनघा लक्ष्मीचा अनघ म्हणजे माझे दत्तस्वरूप होय. महासरस्वती, महालक्ष्मी, आणि महाकाली या तिघांचे मिळून एक आगळे वेगळे दिव्य मातृत्वस्वरूप म्हणजेच अनघा लक्ष्मीचा अविर्भाव. या कारणानेच अनघालक्ष्मी ही महासरस्वती, महाकाली आणि महालक्ष्मी या तीन्ही रूपानी एकत्र धारण केलेल्या तादात्म्य स्थितीचे स्वरूप आहे. या तिन्ही देवतांचा आधार अशी ही अतीत दिव्यशक्ति आहे. माझे अनघस्वरूप म्हणजे ब्रह्मा, विष्णु आणि रुद्र या तिघांनी एकत्र येऊन तादात्म्य स्थिती धारण करून, या तिन्हींचा आधार असणारी त्रिशक्ति रूपिणी अनघा, हिला माझ्या वामभागात धारण केलेले, असे माझे शक्ति स्वरूप आहे असे ध्यानात

ठेव . त्रेतायुगातील "सवित्रकाठचयन" या यज्ञाचे फलस्वरूपच माझ्या भव्य दिव्य अशा "अर्धनारीश्वर" स्वरूपाच्या आधारानेच, पीठिकापुरम येथे माझा श्रीपाद श्रीवल्लभ हा अवतार झाला. आता तुम्ही पहात असलेले हे स्वरूप खरे पाहता, महालक्ष्मी महाविष्णूचेच स्वरूप आहे. महासरस्वती, महालक्ष्मी, महाकाली या तिघींचे चैतन्य पद्मावती देवीमध्ये सामावलेले आहे. तिचे स्वरूप मात्र महालक्ष्मीचेच आहे. परंतु शक्ति मात्र तिघींची आहे. अशा प्रकारे पद्मावती देवी ही तिन्ही शक्तींचा आधार, अतीत असलेली पराशक्ति स्वरूपच आहे. श्री वेंकटेश्वराचे रूप म्हणजे बृहदाकार ब्रह्माला, विराटरूपी विष्णूला, प्रलयकाल रुद्राला म्हणजेच महाकालाला आपल्या दिव्य चैतन्यामध्ये लीलेने धारण करून, त्यांचा आधार आणि त्याला अतित असलेले परब्रह्माचे स्वरूपच आहे. श्रीपाद श्रीवल्लभ म्हणजेच

 

मायारूपी श्री पद्मावती वेंकटेश्वरच अर्धनारी स्वरूपात आहेत असे समज.

श्रीपाद प्रभूंचे हे वक्तव्य ऐकल्यावर मी म्हणालो "गुरु सार्वभौमांचा जयजयकार असो. आपण एकदा मी श्रीपद्मावती वेंकटेश आहे असे म्हणता. थोडयावेळाने मी अनघालक्ष्मी समवेत असणारा अनघ आहे असे म्हणता माझ्या मंदबुध्दिला याचा बोध होत नाही. आपण कृपा करून माझा उध्दार करावा." त्यावेळी दीनांचे नाथ सद्गुरु श्रीपाद प्रभू म्हणाले "महालक्ष्मी आणि पद्मावती या मुलत: एकच तत्त्वाच्या आहेत. ती जेंव्हा महालक्ष्मी तत्त्व स्विकारते तेंव्हा माझ्यातून विष्णुतत्त्वाचा प्रादुर्भाव होतो. ती जेंव्हा पद्मावतीचे तत्त्व स्वीकारते तेंव्हा माझ्यातून तिचा प्रभु वेंकटेश्वर तत्त्वाचा

 

अविर्भाव होतो. जेंव्हा जेंव्हा सगुण साकार तत्त्वांचा अविर्भाव होतो त्या, त्या तत्त्वांच्या मर्यादा, त्यांचे आचार आदि गोष्टींचे अचूक पालन करावे लागते. माझी ही दिव्य भगिनी, ही महाशक्ति कृष्णअवतारात योगमायेच्या रूपात अवतरीत झाली होती. नंतर ती आपले कार्य संपवून अंतरिक्षात गुप्त झाली. आज तीच, श्रेष्ठ, तप:संपन्न अशा योगी, मुनी, महर्षी आदींच्या घोर तपस्येनेच वासवी कन्यका या रूपात प्रकट झाली आहे. कांही विशिष्ट कारणानेच मला पीठिकापुरम् येथे अवतार घ्यावा लागला. जे डोळयासमोर घडते ते पहात राहावे. माझे अवतारतत्त्व हे दिव्य, विनोदी लीला करण्यासाठीच आहे हे तुम्हास कळले असलेच. श्रीपाद प्रभू पुढे म्हणाले "अरे शंकरभट्टा, या पंचदेव पहाडावर घडलेल्या लीलांचे, पाहिलेल्या दृश्यांचे जसे पाहिलेस अगदी तसेच वर्णन

चरित्रामृतात कर. ते भविष्यातील भक्तांना स्फूर्तीदायक ठरेल . नाना शंका, कुशंकांचे त्यात समाधान मिळेल. साधकांना या ग्रंथाद्वारे आणि लीला प्रसंगाने भक्तिमार्ग सुलभ होईल."

या वक्तव्यावर श्रीपाद प्रभूंच्या दिव्य वाणीने विश्राम घेतला. आम्ही आश्चर्य चकीत होऊन पहातच होतो तितक्यात श्रीपाद प्रभूंचे स्वरूप दिव्य तेजाने झळकू लागले आणि त्यामधूनच श्री पद्मावती देवीचा, श्री वेंकटेश्वर स्वामींचा आविर्भाव झाला.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

 

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

# अध्याय -29

## **श्रीपाद श्रीवल्लभांचा दिव्य उपदेश**

आम्ही कुरुगड्डीमध्ये श्रीपाद प्रभूंचे दर्शन घेऊन त्यांच्या आज्ञेनेच त्यांच्या समीप बसलो. तेंव्हा प्रभू म्हणाले "अनन्य भावाने मला शरण येणाऱ्या साधकांचे मी सदैव रक्षण करतो. हे श्रोतेहो हा देशकाल माझ्या हातातील चेंडूप्रमाणे आहे. कोठेही होत असलेल्या, भूतकाळात घडलेल्या आणि भविष्य काळात होणाऱ्या घटनांना मी बदलू शकतो. मी देश कालाचा शास्त्राच आहे. तुमच्यातील चैतन्याच्या

 

संस्कारांच्या दर्जानुसारच तुम्हाला माझ्या बद्दलचे ज्ञान होईल. सर्व धर्मांचा परित्याग करून, तुमच्या अंतरंगातील अंतर्यामीरूपात असलेल्या मला अनन्य भावाने शरण आल्यास, माझ्या आदेशानुसार कर्मांचे पालन केल्यास मी तुमचा सर्व भार वाहून तुम्हाला जीवन्मुक्त करीन. केवळ माझ्या शब्दानेंच मी सृष्टीमध्ये शासन करतो यामुळे मीच सरस्वती रूपाने प्रसिध्दी पावेन. कलियुगातील मानव हा हिरण्यकश्यपु सारखाच असेल. त्यांच्या समस्या, भाव आणि आचार-विचार या सर्वच गोष्टी अत्यंत कठीण स्वरूपाच्या असतील. त्यांना प्रकृती विज्ञानातील अनेक संशोधनाला यश मिळून हिरण्यकश्यपूसारखे वरदान सुध्दा सृष्टी मातेकडून मिळेल. परंतु मला प्रल्हादासारख्या निष्पाप, निरपराध भक्तांच्या संरक्षणार्थ नरसिंहाचा अवातर घ्यावा लागेल. यासाठी मी "नृसिंह सरस्वती" या नाम रूपाने

 

अजून एक दिव्य अवतार घेऊन गंधर्वपूर नगरीत प्रसिध्द होईन." एवढे बोलून श्रीपाद प्रभू ध्यानस्थ झाले आणि त्यांनी आम्हास सुध्दा ध्यानात बसण्यास सांगितले.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -30

## "श्रीपाद श्रीवल्लभ महासंस्थान"

## निर्माण होईल असे श्रीपाद प्रभूंनीचसांगितले

नाथ संप्रदायाप्रमाणे, जीव, चौसष्ट शाबर तंत्राचा उपयोग करून परमेश्वराशी तादात्म्य पावतो आणि आपला उध्दार करून घेतो. नाथ संप्रदायाचे आदिगुरु श्री दत्तात्रेय भगवानच आहेत. आपणासमोर बसलेले श्रीपाद श्रीवल्लभ हे साक्षात दत्तात्रेयच आहेत. बुध्दीबळाच्या पटावर चौसष्ट घरे असतात. श्रीमहाविष्णु श्री महालक्ष्मी

बरोबर वैकुंठलोकांत बुध्दिबळाचा डाव खेळतात याचा गुढार्थ असा की चौसष्ट योनीमध्ये असलेल्या निरनिराळया जीवांच्या जीवनकलापांचे कर्मफळ आणि त्यांच्या परिणामित क्रियांचे साक्षात दर्शन घेत, त्यांच्या त्यांच्या कर्मफळांच्या आधारावर त्यांच्यावर अनुग्रह करतात.

## दिव्य मानव होण्यासाठी आवश्यक योग्यता

मानवाच्या अध्यात्मिक अधिकारावर त्यांच्या उन्नतीचा वेग आधारीत असतो. प्रत्येक जीवाची दिव्यात्मा होण्याची आकांक्षा असते. या मार्गाने वाटचाल करण्यासाठी योगपध्दति, मंत्रजप, यज्ञयागादी कर्म, धर्मकार्य संपन्न करणे इत्यादी पध्दतीचा अवलंब करून शरीरातील आत्मज्योती प्रकाशमय करावी. या प्रकाशावर नाडीशुध्दि

 

अवलंबून असते. नाडीशुध्दीच्या स्तरास अनुसरून मानवास निरनिराळया शारिरीक, मानसीक, अध्यात्मिक शक्तीची प्राप्ति होते. त्या त्या शक्तींचा विकास झाला म्हणजे साधकाने केलेल्या धार्मिक कर्मांना अनुसरून त्यांना दैवानुग्रह प्राप्त होतो. श्रीपाद प्रभु पुढे म्हणाले "शंकरभट्टा, भविष्यात माझे महासंस्थान श्री पीठिकापुरातील माझ्या जन्मस्थानीच निर्माण होईल. श्रीपीठिकापूर, श्यामलांबापूर आणि वायसपूर अग्रहार हे तिन्ही मिळून एक महानगर होईल. माझ्या देवस्थानाचे दर्शन घेण्यास येणाऱ्या भक्तांची मुंग्याप्रमाणे रीघ लागेल. कलियुगात अनेक आश्चर्ये घडतील. वशिष्ठ महामुनींचा अंश घेऊन जन्मास आलेला एक साधक श्रीपाद श्रीवल्लभ संस्थानाचा पूजारी नेमला जाईल. त्याच्या बरोबर मी किती दिव्य लीला करेन याचा अंतच नाही. क्षणोक्षणी दिव्य

लीला आणि दिव्य विनोद हे चालतच राहतील." असे बोलून श्रीपाद प्रभूंनी मंद हास्य केले. ते पहाण्यास सहस्त्रावधि जन्म सुध्दा अपुरेच पडतील.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

# अध्याय -31

## दश महाविद्यांचे वर्णन

आम्ही रोज सायंकाळी श्रीपाद प्रभूंच्या आज्ञेने कृष्णेच्या अलिकडील तिरावर येऊन तेथेच वास्तव्य करीत असू. प्रात:काळीच स्नान संध्या आटोपून पुन्हा श्री गुरुंच्या सान्निध्यात जात असू. या अलभ्य सत्संगात श्री प्रभूंचे प्रसादरूपी दर्शन, नित्यनूतन योगानुभव आणि अनेक दिव्य रहस्यांचा उलगडा होत असे. देवी तत्त्वाची उपासना दश महाविद्यारूपानेच होते असे आम्ही ऐकले होते या दश महाविद्यारूपांची संपूर्ण

 

माहिती आम्हास सांगावी अशी आम्ही "श्रीं"च्या चरणी नम्र प्रार्थना केली. श्रीपाद प्रभू म्हणाले "अरे शंकरभट्टा, श्रीविद्येची उपासना अत्यंत श्रेष्ठ आहे. पूर्वकाळात हयग्रीवांच्या कृपा प्रसादानेच अगस्त्य महामुनींना श्री विद्येचे ज्ञान झाले. त्यांनी ही विद्या आपली पत्नी लोपमुद्रा देवीला दिली. लोपमुद्रादेवीने या विद्येचा सखोल अभ्यास करून त्याचा गुढार्थ अगस्तीऋषीना सांगितला. अशा रितीने ते उभयता एकमेकांचे गुरु झाले."

## लोपमुद्रा आणि अगस्तीऋषींचे चरित्र

विदर्भ देशाच्या राजास बरीच वर्षे पर्यंत संतान प्राप्ति झाली नव्हती. अगस्त्य महामुनींच्या तपोबलाने राजाला एक कन्यारत्न प्राप्त झाले.

 

त्या कन्येचे नांव लोपामुद्रा असे ठेवले होते. लोपामुद्रा कालांतराने मोठी झाली त्या वेळी अगस्ती मुनींनी तिला लग्नासाठी मागणी घातली. दोघांच्या वयातील अंतर पाहून राजा विचार मग्न झाला. एवढया लहान वयाच्या मुलीचा विवाह एका वृद्ध महामुनी बरोबर कसा करावा. याच चिंतेत तो होता. शेवटी त्याने आपल्या कन्येस तिचा विचार या विवाहाबद्दल विचारला तेंव्हा क्षणाचा सुध्दा विलंब न लावता ती म्हणाली "पिताश्री मी अगस्ती मुनींसाठीच जन्मले आहे. मी त्यांच्याशीच विवाह करणार." राजाने दोघांचा विवाह लावून दिला. राजकन्या लोपामुद्रा राजप्रसाद सोडून वल्कले परिधान करून अगस्ती मुनी बरोबर तपोभूमीस निघून गेली. कालांतराने अगस्ती ऋषींनी तिच्याशी शास्त्रयुक्त संग करण्याची इच्छा व्यक्त केली. त्यावर लोपामुद्रा मुनींना म्हणाली "नाथ, मी

 

ललिता स्वरूपाची उपासना करून ललिता स्वरूपच झाले. आपण सुध्दा शिवोपासना करून शिवरूप झाल्यावरच आपली इच्छा मी पूर्ण करीन. अगस्ती ऋषींनी घोर तपस्या करून शिवरूप प्राप्त करून घेतले. नंतर त्यांनी आपली इच्छा लोपामुद्रेस सांगितली यावेळी ती म्हणाली" नाथ मी एका राज घराण्यात जन्मले. क्षत्रियांना शोभतील असे धन, आभुषणे, रेशमी वस्त्र, सुगंधी द्रव्ये, सर्व उपभोग्य वस्तु असल्या शिवाय माझ्याशी संग करणे योग्य नाही. तेंव्हा तुम्ही सर्व वस्तूंचा संचय करून तसेच आपणासाठी भरजरी वस्त्रे आणावीत. ही सर्व भोग सामुग्री आणल्यानंतरच आपली इच्छा पूर्ण होईल. धन संपादन करण्यासाठी अगस्ती मुनी इल्वल नांवाच्या एका राक्षसाकडे गेले. त्याला आपल्या मायेने आपलेसे करून त्याच्याकडून धन, दागिने, वस्त्र आभूषणे घेऊन लोपामुद्रेकडे

आले आणि पत्निची इच्छा पूर्ण केली. यथाकाली त्यांना उत्तम संतान प्राप्ति झाली. एकदा अगस्ती ऋषींनी आपल्या तपोबलाने संपूर्ण समुद्रच आपल्या कमंडलुमध्ये भरला आणि तो पिऊन टाकला होता. या अगस्ती महाऋषींनी विंध्याचल पर्वताचा गर्व हरण केला होता. अजून सुध्दा दक्षिण भारतात अगस्ती मुनींना एक महान सिध्द पुरुष मानले जाते. त्यांची अनेक ठिकाणी देवालये आहेत. श्रीपाद प्रभू पुढे म्हणाले मी जेंव्हा कल्की अवतार घेईन त्यावेळी परशुरामासाखेच अगस्ती ऋषींना गुरुस्थान देईन.

## **देवीची दशमहाविद्या**

 

श्रीपाद प्रभू पुढे म्हणाले "काली" हे दशमहाविद्येतील प्रथमरूप आहे. "महाकाली" ही समस्त विद्यांची आदि देवता आहे. तिच्या विद्यामय विभूतीनाच महाविद्या असे म्हणतात. एके काळी, हिमालयातील मातंग ऋषींच्या आश्रमात सर्व देवतांनी महामायेची स्तुति केली. त्यावेळी अंबिकेने "मतंगवनिता" रूपात दर्शन दिले. ती काजळासारखी काळया रंगाची असल्याने तिचे नांव कालिका देवी पडले. तिने शुंभ-निशुंभ राक्षसांचा वध केला. तिचे रूप काळे निळे असे असल्याने तिला तारा असे नांव सुध्दा आहे. कोणताही संकल्प अथवा फलीभूत न झालेली योग साधना अल्प काळात गंतव्य स्थानास पोहोचावी यासाठी कालीमातेची उपासना करतात. या साधन काळात कालीमातेच्या

 

साधकाच्या अंगाचा भयंकर दाह होतो तो सहन करावा लागतो.

दशमहाविद्येतील दुसरे रूप "तारा" देवीचे आहे. ही माता मोक्षदायिनी, सर्व दु:खापासून तारण करणारी आहे त्यामुळे तिचे "तारा" हे नांव प्रख्यात झाले. या देवीस "नील सरस्वती" असे सुध्दा नामाभिधान आहे. भयंकर अशा विपत्तीतून भक्ताचे रक्षण करणारी असल्याने योगीजन हिची अग्रतारा रूपात आराधना करतात. वशिष्ठ महर्षींनी सुध्दा तारा देवीची उपासना केली होती. चैत्र शुध्द नवमीच्या रात्रीस तारारात्रि असे म्हणतात.

दशमहाविद्येतील तिसरे रूप "छिन्नमस्ता देवीचे" आहे. हे अत्यंत गोपनीय असे रूप आहे. एके

वेळी देवी आपल्या सखी बरोबर मंदाकिनी नदीवर स्नानाला गेली होती. तिच्या द्वारपालांनी भोजना विषयी विचारले तेंव्हा तिने आपल्या तलवारीने आपलाच शिरच्छेद केला. तिचे शिर वाम हस्तावर येऊन पडले. तिच्या धडातून रक्तधारा निघाल्या त्यातील दोन धारा सखींनी प्राशन केल्या व तिसरी धार देवीने स्वत:च प्राशन केली. या दिवसा पासून तिचे नांव "छिन्नमस्ता" असे पडले. हिरण्यकश्यपु आदि दानव या देवीचेच उपासक होते. दशमहाविद्येतील चवथे रूप "षोडशीमहेश्वरीचे" आहे. या देवीचे हृदय लोण्याप्रमाणे मऊ असून ती अत्यंत दयावान आहे. हिच्या आश्रयास आलेल्या साधकांना ज्ञानप्राप्ति त्वरित होते. विश्वातील सकल मंत्र-तंत्राचे निर्माते या देवीचेच उपासक आहेत. या षोडशीमहेश्वरी देवीचे वर्णन वेद, श्रुती सुध्दा करू शकले नाहीत. ते नेती,

 

नेती असे म्हणून शांत झाले. ही प्रसन्नवदना माता भक्तांचे सकल मनोरथ पूर्ण करते. या भगवतीच्या उपासनेने भोग, मोक्ष दोन्हीची प्राप्ति होते.

दशमहाविद्येतील पाचवे रूप "भुवनेश्वरी देवीचे" आहे. सप्तकोटी महामंत्र या देवीचे उपासक आहेत. या देवीजवळ कालीतत्त्वापासून ते कमला तत्त्वापर्यंत दहा अवस्था असतात. त्यातून अव्यक्त भुवनेश्वरी व्यक्त होऊन ब्रह्मांडाचे रूप धारण करू शकते. प्रलयकाळी कमलापासून म्हणजेच व्यक्त जगापासून क्रमाक्रमाने लय पावून काली या मूळ स्वरूपात बदलते. यामुळे या देवीला काळाची जन्मदात्री असे सुध्दा म्हणतात.

दशमहाविद्येमध्ये सहावे रूप "त्रिपुर भैरवी"चे आहे. महाकालास शांत करू शकणाऱ्या या शक्तिरूपालाच त्रिपुर भैरवी असे म्हणतात. ही त्रिपुर भैरवी नरसिंह भगवानांची अभिन्न शक्ति आहे असे शास्त्रांत सांगितले आहे. सृष्टीमध्ये परिवर्तनाची प्रक्रिया सतत चालूच असते. या प्रक्रियेस आकर्षण आणि विकर्षण हे मूल कारण स्वरूप असतात. ही क्षणोक्षणी होणारी क्रिया आहे. या त्रिपुर भैरवीचे रात्रीचे नांव कालरात्री आणि भैरवाचे नांव कालभैरव आहे. या दोघांच्या संयुक्त स्वरूपानेच माझा येणारा नृसिंह सरस्वती अवतार होणार आहे. हा अवतार महायोग्यांसाठी त्रिपुर भैरवी आणि कालभैरवनाथ अवतार मानला जाईल.

दशमहाविद्येतील सातवे रूप धुम्रावती आहे. ही धुम्रावती उग्रताराच आहे. ह्या देवीस शरण जाणाऱ्या साधकांची सारी संकटे नष्ट होऊन तिच्या कृपा प्रसादाने सकल संपदा प्राप्त होते.

दशमहाविद्येतील आठवे रूप "बगलामुखी देवी"चे आहे. ऐहिक, पारलौकिक, देश, समाजाचे अरिष्ट निवारणासाठी तसेच शत्रूच्या शमनासाठी या देवीची आराधना केली जाते. विष्णुभगवान, परशुराम हे या देवीचे भक्त होते. श्रीतिरुमला क्षेत्रातील श्रीवेंकटेश्वर स्वामींनी या देवीची मातेच्या स्वरूपात आराधना केली होती.

दशमहाविद्येतील नवम रूप "मातंगी" मातेचे आहे. मानवाच्या गृहस्थ जीवनास सुखी करून पुरुषार्थ सिध्दिस नेण्याची शक्ति मातंगी

 

मातेचीच असते. या देवीला मातंग ऋषींची कन्या असे सुध्दा मानतात.

दशमहाविद्यतील दहावे रूप "कमलालया" मातेचे आहे. ही सुख, समृद्धी प्रदान करणारी देवता आहे. भार्गव मुनीनी या मातेची आराधना केली होती या कारणाने तिला भार्गवी असे सुध्दा नांव लाभले. या मातेच्या कृपेने पृथ्वीचे पतित्व तसेच पुरुषोमत्व या दोन्हींचा लाभ होतो. हीच देवी श्री वेंकटेश्वरस्वामी बरोबर पद्मावती रूपात तिरुमला क्षेत्रात असते.

श्रीपाद प्रभू पुढे म्हणाले "दशमहाविद्या स्वरूपिणी अनघा देवी आणि तिचा प्रभू अनघ (म्हणजे साक्षात दत्त प्रभु) यांची अर्चना केली असता अष्टसिध्दिंची प्राप्ति होते. प्रत्येक

महिन्यातील कृष्ण अष्टमीस अनघाष्टमी मानून अनघा मातेची पूजा, अर्चा करावी. या तुमच्या आराधनेने सर्व मनोकामना पूर्ण होतील. प्रभू पुढे म्हणाले "अरे शंकरभट्टा ! तु रचलेल्या श्रीपाद श्रीवल्लभ चरित्रामृताचे पारायण करून, येणाऱ्या शुक्ल अथवा कृष्णा अष्टमीस "अनघाअष्टमीचे" व्रत करून अकरा गृहस्थाना जेवण द्यावे अथवा त्यांना पुरेल एवढी शिधासामुग्रीचे दान करावे. अशा पारायणाने व अन्नदानाने इच्छित फल प्राप्ति निश्चित होते."

## चरित्रामृताचा पारायण महिमा

 

प्रभू पुढे म्हणाले "श्री चरित्रामृत हा केवळ एक ग्रंथ आहे असे मानू नये. हा एक सजीव अशा महाचैतन्याचा प्रवाह आहे. तुम्ही याचे पारायण करीत असतांना यातील प्रत्येक अक्षरातील शक्ति माझ्या चैतन्यात प्रवाहित होते. तुमच्या न कळत माझ्याशी भावसंबंध घडतो. यामुळे तुमच्या धर्मबध्द अशा सर्व इच्छा माझ्या कृपेने पूर्ण होतात. या ग्रंथराजाला तुमच्या पूजा मंदिरात (देवघरात) नुसते ठेवले असता त्यातून शुभप्रद स्पंदने येतात. ही स्पंदने दुष्टशक्तींना , दुर्दैव आणणाऱ्या शक्तींना पिटाळून टाकतात."

श्रीपाद श्रीवल्लभांच्या चरित्रामृताची जाणते पणे अथवा अजाणते पणे निंदा केल्यास त्या निंदा

करणाऱ्या व्यक्तीचे पूर्वपुण्यफल धर्मदेवता घेते आणि योग्य अशा जीवाला वाटून टाकते. अशा रितीने श्रध्दावान गरीब भक्त भाग्यवंत होतो आणि अश्रध्दावान व्यक्ति गरीब होतो. हा अक्षरसत्य ग्रंथ आहे. याचे हा ग्रंथच स्वत: प्रमाण आहे. जिज्ञासू लोक याची परिक्षा घेऊ शकतात. मनात कांही इच्छा ठेऊन या ग्रंथाचे पारायण केले तरी चालते. आपले स्वत:चे जीवन शुध्द करण्यासाठी अत्यंत श्रध्दा भक्तीभावाने या ग्रंथाचे पठन करावे.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

 

|| श्री गुरुवे नम: ||

|| श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ||

अध्याय -32

# **नवनाथांचे वर्णन**

## **नवनाथांचा वृतांत**

श्रीपाद श्रीवल्लभांच्या दिव्य चरणांना स्पर्श करून मी त्यांना प्रश्न केला "महाप्रभू ! नवनाथ या नांवाने प्रसिध्द असलेले सिध्द योगी सर्व श्रीदत्त प्रभूंचे अंशावतार आहेत असे मी ऐकले होते. त्यांच्या विषयी सविस्तर माहिती आम्हास द्यावी अशी श्रीचरणी नम्र प्रार्थना."

श्री नवनाथांचे नांव ऐकताच श्रीपाद प्रभूंच्या दोन्ही नेत्रांमधून अमृतवृष्टीचा प्रवाह बहिर्मुख होऊन सृष्टीवर पडत असल्या सारखे वाटले. त्यांच्या दृष्टीतून प्रेमचैतन्य प्रवाहित होत होते. ते अत्यंत आनंदाने म्हणाले "श्रोत्यांनो, मच्छेंद्र, गोरक्ष, जालंधर, गहनी, अडभंग, चौरंग, भर्तरि, चर्पट आणि नागनाथ हे नवनाथ आहेत. त्यांच्या स्मरणमात्रानेच शुभफल सिध्द होते. श्रीदत्त प्रभूंची कृपा नवनाथांचे स्मरण करणाऱ्यावर अपार असते. कलियुगाच्या प्रारंभापूर्वी श्रीकृष्णाने उध्दवासारख्या महान भक्ता बरोबर तसेच समस्त यादवांबरोबर चर्चा करून, आज नवनाथ या नावाने जाणले जाणाऱ्या नवनारायणांचे स्मरण केले."

ऋषभ चक्रवर्तीला शंभर पुत्र होते. त्यातील नारायण अंशाने जन्मलेल्या नऊ जणांना नवनारायण म्हणतात. त्यांची नांवे 1) कवि 2) हरी 3) अंतरिक्ष 4) प्रबुध्द 5) पिप्पलायन 6) अविर्होत्र 7) दुमिल 8) चमस 9) करभाजन अशी होती. हे सगळेच अवधूत स्थितीमध्ये राहणारे सिध्दपुरुष होते. माझ्या आज्ञेप्रमाणे या नवनारायणांनी धर्म संस्थापनार्थ नवनाथ या नाम रूपाने पृथ्वीवर पुन्हा अवतार धारण केला. प्रथम पुत्र कवि हा "मच्छेंद्रनाथ" या नांवाने जन्मला. अंतरिक्ष "जालंदर" नांवाने जन्मला. यांच्या शिष्य रूपाने प्रबुध्द "कनिफा" या नावाने जन्मला, पिप्पलायन "चर्पटनाथ" या नांवाने जन्मला. अवर्होत्र हा "नागेश नाथ" या नांवाने जन्मला. द्दमिल हा "भर्तरिनाथ" या नांवाने जन्मला. चमस, "रेवणनाथ" रूपाने आणि कारभाजन "गहनीनाथ" या नांवाने

 

जन्मला. सृष्टीवर अनेक स्थानी कांही कारणास्तव ब्रह्मदेवाचे वीर्य पडले. त्यापासून अनेक ऋषी जन्मास येतील असे व्यास महर्षिंनी आपल्या भविष्य पुराणात सांगितले होते.

उपरिचर नावाचा एक वसु होता. त्याने एकदा उर्वशीला पाहिले आणि तो अत्यंत मोहित झाला. त्यावेळी त्याचे वीर्य द्रवून यमुनेच्या पाण्यात पडले. ते एका मासोळीने गिळले. ह्या मत्स्या पासून मच्छेंद्रनाथांचा जन्म झाला. कामदेव मन्मथाला शिवाने क्रोधित होऊन आपल्या ललाटाग्नीने जाळून भस्म केले. त्या भस्मामध्ये सूक्ष्म रूपाने मन्मथाचा आत्मा होता. बृहद्रथाने जेंव्हा यज्ञ केला त्या यज्ञकुंडातून जालंदर नाथांचा अविर्भाव झाला. रेवा नदी म्हणजे सध्याची नर्मदा नदी. या नदीमध्ये

पडलेल्या ब्रह्मवीर्यापासून रेवण सिध्दांचा जन्म झाला. एकदा थोडे ब्रह्मवीर्य एका नागाच्या शिरावर पडले ते भक्ष्य समजून नागिणीने खाऊन टाकले. त्या योगाने ती नागीण गर्भवती झाली. त्याच वेळी जनमेजय राजा सर्व नाग, सर्पांना नष्ट करण्यासाठी सर्पयाग करीत होता. ब्राह्मणांच्या मंत्रोच्चारा बरोबर शेकडो सर्प नाग यज्ञ कुंडात येऊन पडू लागले. या महा भयंकर सर्पयागापासून वाचण्यासाठी तक्षकाच्या मुलीस एका मोठ्या वडाच्या झाडाच्या बुंध्यातील बिळात लपविले गेले. त्या गर्भपिंडातून अविर्होत्राचा जन्म होणार असल्याने त्या अंडयास त्या बिळात ठेवून तक्षकाची मुलगी स्वस्थानी निघून गेली. यथासमयी त्या अंडयातून वटसिध्द नागनाथाचा जन्म झाला. मच्छेंद्रनाथ देशसंचार करीत असताना एका स्थळी त्याचा मुक्काम होता. त्यांच्या दर्शनसाठी अनेक लोक येत

असत. एक वांझ स्त्रीने मच्छेंद्रनाथाना नमस्कार केला व आपली व्यथा सांगितली नाथांनी भस्म मंत्रून दिले. परंतु त्या स्त्रीने ते अविश्वासाने उकिरडयावर फेकून दिले. त्या भस्माच्या अमोघ अशा शक्तिसंपन्नतेने त्यामधून गोरक्षनाथांचा जन्म झाला. पार्वतीच्या विवाह समयी पौरोहित्य करणारे ब्रह्मदेव तिचे अप्रतिम लावण्य पाहून तिच्यावर मोहित झाले आणि त्यांचा वीर्यस्त्राव झाला. या कृत्याची त्यांना अत्यंत लज्जा वाटली आणि त्यांनी ते वीर्य आपल्या मांडीस पुसून टाकले. त्या क्षणीच त्या वीर्याचे साठ हजार भाग झाले आणि त्यातून वालखिल्य या नांवाचे साठ हजार ऋषी जन्मास आले. त्यातून थोडा भाग उरला होता तो कचरा समजून भागिरथी नदीत फेकला गेला. तो कचरा, नदीतील गवतात अडकून तेथेच राहिला. त्यामध्ये पिप्पलायनाचा आत्मा शिरला आणि

 

चर्पटनाथाचा जन्म झाला. कोलिक मुनींनी त्यांच्या पर्णकुटीतून बाहेर जाताना आपले भिक्षापात्र पर्णकुटीच्या बाहेर ठेवले . त्याच वेळी सूर्याचे तेज त्या पात्रात पडले ते महर्षिंना कळाले. त्यांनी ते पात्र तेथेच संभाळून ठेवले "भर्तरि" या शब्दाचा अर्थ भिक्षापात्र असा होतो. त्या पात्रातूनच एका नवनाथाचा जन्म झाला यामुळे त्यांचे नांव भर्तरिनाथ असे पडले. हिमालयातील एका पर्वतावरील घनदाट अरण्यात एक हत्ती झोपला होता. एकदा ब्रह्मदेव सरस्वतीवर मोहित झाले आणि त्यांचे वीर्य द्रवित होऊन खाली पडले. ते झोपलेल्या हत्तीच्या कानात पडले. त्या कानातूनच प्रबुध्दाला जीवन प्राप्त होऊन त्याने जन्म घेतला. कानातून जन्म घेतल्याने या नाथाचे नांव कर्ण कनिफा असे पडले. गोरक्षकाने संजिवनी मंत्राचा जप करीत मातीमध्ये एक

मनुष्याकार आकृती काढली. त्या आकृतीतून करभाजनाला त्या संजिवनी मंत्राच्या सहाय्याने जीवन प्राप्त झाले आणि त्याने गहनीनाथ या नावाने अवातर धारण केला. श्रीकृष्णांच्या आज्ञेनुसार या नवनारायणानी आपले स्थूल शरीर मंदपर्वतावर समाधी अवस्थेत सांभाळून ठेवले आणि अंशअवताराने नवनाथ नामरूपाने पृथ्वीवर जन्म घेतला. धर्मसंस्थापनेचे महान कार्य करण्यासाठीच या नवनाथांचा अवतार झाला होता. श्रीपाद प्रभूंचे हे नवनाथांच्या जन्मासंबंधीचे आश्चर्यजनक विवेचन ऐकून आम्ही मंत्रमुग्ध होऊन गेलो होतो. आम्ही प्रभूंच्या चरणी वंदन करून त्यांचा जयजयकार केला. यानंतर मी प्रश्न केला "प्रभू नवनाथांचे अवतार हे नवनारायणाचे अंशअवतार आहेत असे आपण सांगितले. नवनाथ आणि नवनारायण यामध्ये कांही फरक आहे काय ?" आमच्याकडे आपल्या

दिव्य, प्रेमळ दृष्टीने पहात श्रीपाद प्रभूंनी मंदहास्य केले आणि म्हणाले "श्रोत्यानो, समस्त सृष्टीच्या महासंकल्पाचे स्वरूप मीच आहे. देविदेवतांनी कार्य करण्याचे संकल्प सुध्दा माझ्या महासंकल्पाचे अंशमात्र असतात. या अंशमात्र संकल्पांना थोडे फार स्वातंत्र्य असते. हे स्वातंत्र्य शेतातील झाडाला दोरीने बांधलेल्या गायीस चरण्यासाठी जेवढे स्वातंत्र्य असते तसेच आहे. तसेच धर्मसूत्रांना अनुसरून अंशावतारांना स्वेच्छा दिली जाते. संकल्प मात्र मूळ तत्त्वातूनच येतात. त्यांचे योग्य प्रकारे नियंत्रण करणे हे अंशावतरातले कार्य असते. कोणतीही समस्या निर्माण झाल्यास अंशावतार त्या समस्येच्या निराकरणासाठी मूलतत्त्वाकडे निवेदन घेऊन येतात. मूलतत्त्वाकडून अनुमति घेऊन जीवांचे कल्याण करतात. या अंशावतारात, राग, लोभ, मद-मत्सर, अहंकार असे मानवी दुर्गुण

नसतात. यामुळे मूलतत्त्वाची कार्य समर्थता अंशावतारात सुध्दा आढळते. या कारणामुळे अंशावतार आणि पूर्णावतार यात कांही फरक नसतो."

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

 

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -33

## रमणि आणि नरसिंहरायडु यांचा विवाह

## श्रीपादांनी स्वत:च करविला

आम्ही दोघांनी श्रीपाद प्रभूंची आज्ञा घेतली. ते म्हणाले,"बाबांनो तुम्ही येथून निघून श्रीपीठिकापुरास जावे. माझे मंगल आशिर्वाद तुमच्या पाठीशी आहेत." श्री महागुरुंची आज्ञा शिरसावंद्य मानून आम्ही दोघे कृष्णा नदी पार करून पलिकडील तीरावर पोहोंचलो. तेथे एका दगडावर श्रीपादांची पादमुद्रा पाहिली. नित्य

 

श्रीपाद प्रभू त्याच दगडावर उभे राहून सूर्यनमस्कार घालीत असत. श्री चरणांची चरण कमले तेथे पाहून आम्हास आश्चर्य वाटले आणि अत्यानंद झाला.

आम्ही पंचदेवपहाड या ग्रामास पोहोचलो. तेथे अल्पोपहार करून पुढच्या प्रवासास प्रारंभ केला. एका ज्वारीच्या शेतातील पायवाटेने चालत असताना त्या शेताच्या मालकाने आमचे स्वागत केले. खाण्यास मधुर फळे आणि गोड ताक दिले. त्याचे नांव नरसिंहरायडु असे होते. त्याने स्वत:चे घर शेतामध्येच बांधले होते व तो तेथेच रहात असे. एक दिवस त्यांच्या घरी विश्रांती घेऊन त्यांचे आदरातिथ्य स्वीकारावे अशी इच्छा त्याने व्यक्त केली. आम्ही त्याच्या विनंतीस मान देऊन एक दिवस तेथे

राहिलो. त्याने श्रीचरणांचे लीलावैभव सांगण्यास सुरुवात केली. "बाबांनो माझे नांव नरसिंहरायडु आहे. मी लहानपणी अत्यंत दुर्बल आणि भित्रा होतो. माझे माता-पिता मी लहान असतानाच दिवंगत झाले. मी माझ्या मामांच्या छत्रछायेत वाढलो माझी मामी फारच तापट स्वभावची होती. घरात भरपूर काम करावे लागे शिवाय शेतातील कामे पण करावी लागत. माझ्या मामाची एक मुलगी होती. तिचे नांव रमणि असे होते. तिचे सौंदर्य, पूर्ण गावातील आमच्या कुलस्थांच्या सगळया मुलीपेक्षा अपूर्व होते, ती सद्‍गुण संपन्न असून तिच्यात देवभक्ति होती. श्रीकृष्णाला ती आपले आराध्य दैवत मानीत असे. माझी मामी मला शिळे अन्न खाण्यास देत असे. हे तिला सहन होत नसे. माझा आहार फार स्वल्प होता. माझ्या बद्दल आदर असा घरात कोणास नव्हताच. कामाचा मात्र

पहाडच असे. चोरून रमणि मला ताजे अन्न आणि मधुर फळे आणुन देत असे. कधी ते माझ्या मामीच्या दृष्टीस पडल्यास माझ्या बरोबर तिची सुध्दा पुजा होत असे. माझे मामा स्वभावाने फार चांगले होते, परंतु बायकोपुढे त्यांचे काहीच चालत नसे, तिच्या समोर ते असमर्थच होते. कधि-कधि माझी मामी आमच्या कुलस्थातील माझ्यापेक्षा बलवान मुलांना बोलावून मला मारायला सांगत असे. माझ्या या दुर्बलतेमध्ये मारहाणीने दुर्बलता आणि भित्रेपणा अधिकच वाढला. माझ्यापेक्षा वयाने लहान पण सशक्त मुलांसमोर सुध्दा मी असमर्थ असहायच वाटत होतो. ते माझी टिंगल करीत. अशा प्रकारे कष्टमय जीवन मी जगत होतो."

आमची रमणि सौंदर्यवान असल्याने गांवातील आमच्याच कुलातील सगळया युवकांची तिच्याशी लग्न करण्याची इच्छा होती. परंतु तिला माझ्याशी लग्न करावयाचे होते. माझ्या जवळ पैसा अडका तर नव्हताच, शिवाय दुर्बल शरीर आणि भित्रा स्वभाव यामुळे ते कसे जमणार हा प्रश्न होता. आमचे मामा धनवान, श्रीमंत होते. ते स्वभावाने चांगले होते पण त्यांना पैशाची आशा फार होती. मामी दुष्ट होती, परंतु तिची स्तुती केली की, ती फसत असे.

आमची रमणि कसेहि करून मीच तिचा पति व्हावा अशी श्रीकृष्णा जवळ दररोज प्रार्थना करीत असे. एकदा आमच्या गावांत एक ढोंगी साधु आला. तो कालीचा भक्त असून भूत, भविष्य आणि वर्तमानाचे त्याला ज्ञान आहे, असा साऱ्या गावात प्रचार झाला. त्याच्या जवळ

भूत-भविष्य जाणण्याची विद्या होती. गावात त्याने सांगितलेले भविष्य शंभर टक्के खरे झाले होते. आमच्या मामीवर त्याने माया केली आणि तिला, घरात कालिपूजा करावी असे सांगितले. सगळी तयारी करून घेतली. त्याने रमणिची पूजेतिल कृष्णाची मूर्ति घराच्या बाहेर फेकून देण्यास सांगितले, त्या गोष्टीला मामीने होकार दिला. रमणि तळमळू लागली. विलाप करू लागली परंतु सगळे कांही व्यर्थ झाले. त्या ढोंगी साधूने पूजेस सुरुवात केली. अनेक कोंबडयांचा बळी दिला, त्या कोंबडयांच्या रक्ताने सारे देवघर बघवेनासे झाले. घरात माणसाची कवटी आणि स्मशान साधन सामुग्री सुध्दा ठेवण्यात आली. ती पूजा परिपूर्ण झाल्यावर या घरात एके ठिकाणी विशेष अपार धनलाभ होईल. त्या संपत्तीने ह्या कुटुंबात

 

ऐश्वर्यसंपन्नता नांदेल असे सांगून त्या ढोंगी साधूने सर्वांना विश्वासात घेतले.

त्या साधूस वशिकरण विद्या अवगत होती. त्या विद्येच्या साहयाने आमच्या रमणिचे शील हरण करण्याचे त्याने योजिले. त्यासाठी तो चित्र-विचित्र पध्दतीच्या पूजा घरात करत असे, त्यामुळे रमणीची प्रकृती क्षीण होत गेली. तिच्या वागणुकीत पण फरक पडला. अर्ध्या रात्रीच्या वेळी ती रक्तपान करू लागली. कोंबडे बकऱ्या मारून तिला ते रक्त देण्यात येत होते. तिच्या अंगात कालिका मातेचा प्रवेश झालेला आहे. त्या मुळेच ती रक्त पिते.

रक्ताशिवाय माता शांत होत नाही. आणि अपार संपत्तीपण मिळणार नाही. तिच्या अंगातील

कालिका माता निघाल्यास ही कन्या पूर्ववत् होईल असे त्या साधूने सांगितले. घरात बिभित्सपणाला उत आला होता. अचानक घरातील स्वयंपाक केलेले भांडे विहिरीत पडत होते. अर्ध्यारात्री घरात माणसांचे सापळे दिसत तसेच चित्र-विचित्र आकार दिसत आणि अक्राळ-विक्राळ आवाज ऐकू येत. आमचे घर स्मशान भूमिसारखेच दिसत होते. त्या साधूला घरातून पिटाळण्याचे धैर्य आमच्या मामा मध्ये नव्हते. हे कष्ट थोडे दिवस सहन केल्यास अपार संपत्ति मिळेत ह्या आशेने मामी दिवस काढीत होती. एकंदरीत गोंधळून जाण्यासारखी आणि चिंताजनक परिस्थिती होती.

अचानक एके दिवशी रात्रीच्या वेळी तो साधू रमणि जवळ गेला. तिचे वशिकरण झालेलेच होते. ती सांगितल्यासारखे ऐकेल आणि आपली

इच्छा पूर्ण करील या विचाराने तो साधु तिच्याकडे आला आणि तिच्या अगदी समीप गेला. रमणि जोरात ओरडली आणि जवळ असलेल्या एक वजनदार वस्तूने तिने त्या ढोंगी साधूच्या डोक्यावर प्रहार केला. ती असे वर्तन करेल असे तिला सुध्दा वाटले नव्हते. वशिकरण केल्यावर सुध्दा व्यक्ति अशा प्रकारे प्रवर्तन कसे करते याचा साधूला उलगडा झाला नाही.

## श्रीपादांचे आर्त त्राण परायण तत्व

 

दुसरे दिवशी सकाळी एक गरीब ब्राह्मण याचक आमच्या दारासमोर भिक्षेस आला. आमच्या घरी भूत-प्रेतांचे जास्त वास्तव्य आहे. हवे असले तर आपण त्यांना भिक्षारूपाने घ्या असे रमणि त्या ब्राह्मणाला म्हणाली. त्याला त्याने नकार दिला.

त्या ब्राह्मणाचे मुखारविंद अत्यंत शांत आणि उज्वल होते. आमचे मामा बाहेर आले आणि म्हणाले आमच्या घरची परिस्थिति अत्यंत चिंताजनक आहे, त्या परिस्थितिच्या कारक दुष्टशक्तीचा आपण दान म्हणून स्वीकार करावा. तेवढयातच मामी पण बाहेर आली आणि म्हणाली आमच्या घरात तुम्हाला देण्यास काही नाही. आमच्या घरचे दारिद्र्य आपण भिक्षा म्हणून स्विकारावे. त्यावेळेस मी पण तेथेच होतो. मी म्हणालो,"स्वामी माझ्याकडे

वंशपारंपारिक असलेले एक चांदीचे ताईत आहे. आपली सम्मति असेल तर तो ताईत मी अर्पण करतो ते भिक्षा म्हणून स्विकारावे." त्याचा त्याने स्वीकार केला. इतक्यातच ढोंगी साधू स्मशानातून माणसांचे कपाल घेऊन आला. तो अट्टाहासाने म्हणाला, अरे भिक्षुक ब्राह्मणा ! तू नाकारलेस तरी मी ह्या मानव कपालाची भिक्षा घालीन, तिचा स्विकार कर ! त्या ब्राह्मणाने त्या भिक्षेचा अस्विकार केला.

तितक्यात आमच्या घरात एक दिव्य प्रकाश दिसला आणि तो भिक्षेस आलेला ब्राह्मण अदृश्य झाला. त्या दिव्य प्रकाशामुळे ढोंगी साधूच्या सर्व अंगाची भयंकर आग होऊ लागली. त्या प्रकाशातील किरण रमणिवर पडले आणि ती एकदम पूर्ववत् झाली. मामीला

 

पक्षवात होऊन ती धरणीवर पडली. मामांना भितीने सर्वांगास कापरे भरले. मला मात्र विपरीत धैर्य आले. माझ्या शरीरात शक्तिचा प्रवेश होऊन माझे मलाच मी अत्यंत बलवान वाटू लागलो. त्या मांत्रिकाच्या तोंडातून सारख्या रक्तधारा वाहू लागल्या आणि त्याच्यातील सर्व शक्तींचा नाश झाला.

त्या दिव्य तेजोमय प्रकाशाचे एका मानवरूपात रूपांतर झाले. ते आर्तत्राण परायण, समस्त देवीदेवतास्वरूपी, आदि, मध्य आणि अंत रहित असलेले दिव्यभव्य तेजोमय स्वरूपाचे श्रीपाद श्रीवल्लभच होते.

श्रीपाद श्रीवल्लभ म्हणाले "कालिमाता खरे पहाता मानवात लपलेल्या कामक्रोधादि राक्षसांचा ध्वंस

 

करते. ती कोंबडया, बकऱ्या वगैरे कधीच मागत नाही. या प्राणमय जगातील राक्षसशक्तिच कालिकारूप धारण करून निरनिराळया प्राण्यांचे बळी मागते. खऱ्या खऱ्या कालिमातेची शुभलक्षणे प्रेम, शांती, दया वगैरे असतात."

या प्राणमय विश्वातील राक्षसीशक्ति , असुरी शक्ति , भूत-प्रेतादी शक्ति , आम्ही देवता आहोत असे सांगून क्षुद्र विद्येचे प्रदर्शन करतात. क्षुद्र मांत्रिक त्यांची उपासना करून, या लोकांत भलतेच उपद्रव निर्माण करतात. या जगातील निरनिराळया प्रेतात्म्यांना देवता शरीर धारण करता येते हे लक्षात ठेवा पण त्या त्या देवतेची दैविशक्ति मात्र त्यांना नसते." श्रीपाद प्रभू पुढे म्हणाले "धर्मरक्षणार्थ माझा जन्म होतो असे मी वचन दिलेले आहे. त्याला

 

अनुसरून धर्मसंस्थापनार्थ श्रीपाद श्रीवल्लभांचा अवतार झाला आहे. हा अवतार दया, शांति, प्रेम, करूणा अशा अनंत शक्तींचे मिश्रण आहे.

आमच्या घराची शुध्दी करून, ढोंगी साधूला पिटाळून लावले. श्रीपादांच्या अनुग्रहाने मामी बरी झाली.

श्रीपादांनी आम्हाला आशिर्वाद देऊन, माझा आणि रमणिचा विवाह स्वहस्ताने केला. तेंव्हा ती जेमतेम 12 वर्षाची मूर्ति होती. श्रीप्रभूंचे वास्तव्य पीठिकापुरातच होते माया रूपाने ते पंचदेव पहाड या ग्रामात सुध्दा राहात. त्यांनी आम्हास ह्या अक्षता दिल्या होत्या, शंकरभट्ट आणि धर्मगुप्त या नावांचे दोघेजण येतील त्यांना थोडया अक्षता द्याव्या असे त्यांनी

सांगितले होते. अहा ! किती लीलामय स्वरूप आहे श्रीवल्लभांचे.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

# अध्याय -34

## शरभेश्वराचा वृतांत

आम्ही दोघांनी सतत थोडे दिवस प्रवास केला आणि एका गावात पोहोचलो. प्रवासात आम्ही श्रीपाद श्रीवल्लभांचे नामस्मरण करीत, त्यांच्या अलौकिक लीलांचे स्मरण करीत चाललो होतो. मार्गात आमचे आदरातिथ्य सुध्दा होत होते. कधी बैलगाडी मिळाली, कधी घोडा गाडी तर कांही वेळी पायीच चालावे लागले असा आमचा प्रवास झाला. आमच्या प्रवासातील मार्गामध्ये श्रीपाद प्रभूंच्या भक्त मंडळी कडून आदरातिथ्य

स्वीकारणे चालूच होते. ही सर्व परोक्ष रूपाने श्रीपाद प्रभूंची लीलाच होती.

त्या गावात पोहोचताच एका ब्राह्मणाच्या घरातील सर्व सामान बाहेर फेकत असलेले दिसले. त्याची बायको आणि मुले घरातच होती. ह्या ब्राह्मणाने एका ऋणदात्या (सावकार) कडून थोडे पैसे घेतले होते. ते पैसे तो परत करू शकला नाही. एके दिवशी त्या सावकाराने त्या ब्राह्मणास मार्गातच अडविले आणि त्याच्या भोवती कोळश्याने एक रिंगण करून त्याच्या रेघेच्या बाहेर येऊ नये असे बजाविले. किती दिवसात माझे पैसे परत करशील ते तुझ्या यज्ञोपवीताची शपथ घेऊन सांग असे तो सावकार रागाने म्हणाला. मी आपले पैसे दोन आठवड्यात परत करीन असे ब्राह्मणाने

आश्वासन दिले. परंतु पंधरा दिवसात तो धनाची व्यवस्था करू शकला नाही त्यामुळे त्याचा शब्द पाळला गेला नाही. मुदत संपल्यावर धन न दिल्यामुळे तो सावकार ब्राह्मणाचे घर रस्त्यावर आणत होता. ब्राह्मण आणि त्याची मुले, पत्नी सगळेच उदास होऊन बघत होते. गावातील सगळे लोक तमाशा सारखे बघत उभे होते. त्यांच्या पैकी कोणीही साहस करून त्या ब्राह्मणाला अजून थोडया दिवसाची मुदत द्या असे म्हणाला नाही.

**श्रीपादांची भक्ति परिक्षा आणि भक्तांना तारणे**

श्री धर्मगुप्तांना त्या ब्राह्मणाची अवस्था पाहून कींव आली, परंतु कांही सहाय्य करावे तर हातात धन नाही. मी तर निर्धनच होतो. परंतु

धैर्य करून म्हणालो, बाबा ! ह्या दुबळया ब्राह्मणावर दया करून अजून दोन महिन्याचा अवधि द्यावा. या अवधीत श्रीपाद श्रीवल्लभांच्या कृपा कटाक्षाने त्याचे कष्ट दूर होतील. थोडा शांतचित्ताने विचार करा. त्याचे कर्ज फेडण्याची जिम्मेदारी माझी आहे असे समजा. म्हणण्यास मी म्हणालो पण मनात अत्यंत भिती होती. त्यावर तो सावकार म्हणाला, "बरे ! तुमच्या शब्दावर विश्वास ठेवून मी याला दोन महिन्याचा आणखी अवधि देतो. माझे धन पूर्ण फिटेपर्यंत तुम्ही दोघांनी येथून कोठे जाऊ नये. समजा माझे धन ठरलेल्या अवधीत याने परत नाही केले, तर त्याचे घर स्वाधिन करून घेईनच आणि मध्यस्थी केल्यामुळे तुम्हा दोघांना सुध्दा न्यायालयात नेईन. तेंव्हा न्यायधीश जी शिक्षा देईल त्यास तुम्ही दोघेहि तितकेच पात्र ठराल."

 

दिलेल्या अवधी मध्ये मला किंवा धर्मगुप्ताला त्या ब्राह्मणाची रक्कम फेडणे असंभवच वाटत होते. मागचा पुढचा विचार न करता, आपल्याला जमते किंवा नाही याचा विचार न करता अविवेकाने मी शब्द दिला. असे अविचाराने करता वागल्यामुळे माझा मलाच तिटकारा आला. यात श्रीपादांना दोष देणे बरोबर नव्हते. माझ्या बरोबर बिचाऱ्या धर्मगुप्ताला संकटात टाकले. हे आणखी एक पापच घडले. जिभेला नियंत्रण नसल्याने किती अनर्थ झाला याचे हे ज्वलंत उदाहरण होते. परंतु प्रभूंची लीला अपार आहे, तिला अंतच नाही. अशा परिस्थितीत प्रभूवरील भक्ति दृढ होते. किंवा मानव भक्तिरहित होतो. धर्मगुप्त मात्र निश्चिंत होते. ते म्हणाले "शंकरभट्टा ! घडलेल्या घटनेचा विचार करू नये झालेल्या,

होत असलेल्या आणि पुढे होणाऱ्या घटना म्हणजे भूत,वर्तमान आणि भविष्य हे सारेच प्रभूंची लीला आहे. आपले ब्रह्मलिखित जे आहे तेच होणार. ते तर चुकणारच नाही."

ब्राह्मण पूर्ण निर्धन आणि दरिद्री झाला होता. तो आणि त्याच्या कुटंबातील सगळेजण उपाशी राहू लागले होते. आम्ही त्यांचेकडे पाहुणेच होतो म्हणून आम्ही सुध्दा उपाशीच रहावे. अशी दयनीय परिस्थिती होती. श्रीपादांच्या अनुग्रहाने रहाण्यास जागा मिळाली. त्यांचे आम्ही आभार मानत होतो. भूक, तहान, थकवा आला असताना तसेच देणेकरी आले असताना श्रीपाद श्रीवल्लभांचे नामच एकमेव तरणोपाय आहे, असा दृढ विश्वास वाटत होता. आम्ही स्नान-संध्या करून, श्रीपादांचे नामस्मरण करण्याचे

 

योजिले. त्या ब्राह्मणाच्या घरी देवाजवळ दिवा लावण्यास तेल वात सुध्दा नव्हती. आम्ही "श्रीपादराजम् शरणं प्रपद्ये" असा जप मोठ्या सुरात म्हणत होतो, घरातील सारी मंडळी सुध्दा आमच्या बरोबर हा मंत्र उच्चारत होते. शेजारपाजारचे अबाल वृद्ध लोक जमा झाले आणि भक्तीभावाने नामस्मरण करू लागले.

ब्राह्मणाच्या घरी एक शेतकरी आला आहे. ब्राह्मणाचे कर्ज फेडण्याची जवाबदारी त्याने घेतली आहे. तेवढया काळात सर्वत्र बातमी पसरली की मी कुठल्यातरी महापुरुषांचा शिष्य आहे आणि माझ्या दैवीशक्तीनेच ब्राह्मणाचे देणे देण्यासाठी सिध्द झालो आहे. असा त्यांचा समज झाला. मी फार मोठा ज्योतिषी आहे असा साऱ्या गावात त्यांनी प्रचार केला. त्या

गावात शेतकऱ्यांना पैजा लावण्याचा नाद होता. त्या ब्राह्मणाचे ऋण हा फेडेल का नाही. या प्रश्नावर शेतकरी पैजा लावित होते. मी जर ब्राह्मणाचे कर्ज न फेडले तर आम्हाला न्यायालयात जावे लागणार होते. माझ्या बरोबर धर्मगुप्तपण संकटात सापडले. माझ्या कोरडया वाग्दानावर लोक पैज लावत होते. हा एक प्रकारचा जुगारच असल्या सारखा होता. त्याचे कारण म्हणजे माझा शब्दच होता. काय करावे ते काहीच कळत नव्हते अशा परिस्थितीत आम्ही श्रीपादांच्या नामस्मरणाचाच आधार घेतला. माझी ती पण योग्यता नाही असे वाटले. मी एक मोठा ज्योतिष्य आहे, दैवीशक्ति संपन्न आहे असा प्रचार होतच होता. परंतु मी मात्र दिव्य, क्षणक्षणलीलाविहारि अशा श्रीपादांचे चरण कमलच मला या संकटातून तारतील या विश्वासाने बसलो होतो."सत्यं विधातुं

 

निजभृत्यभाषितं" या नारदमुनिंनी श्री महाविष्णूला सांगितलेल्या वाक्याचे स्मरण झाले. नारायणाचे भक्त ज्या शब्दांचा प्रयोग करतात, त्या शब्दांना खरे करण्याची जबाबदारी नारायणांचीच असते.

त्या ग्रामात शरभेश्वरशास्त्री या नावाचा एक पंडित आणि फार मोठा मंत्र शास्त्रवेत्ता राहात होता. त्याच्यावर एका प्रेतात्म्याचा अनुग्रह होता त्याच्या आधाराने तो भूत,भविष्य,वर्तमान अगदी अचूकपणे सांगत असे. पैज लावलेले शेतकरी शरभेश्वराकडे आपल्या पैजेचे काय होईल याचा उलगडा करण्यास गेले. ब्राह्मण धन परत करू शकणार नाही असे त्या प्रेतात्म्याने सांगितले, यानंतर पैजांनी आणखी जोर पकडला आणि शंभर शंभर वराहांची पैज लागली. शरभेश्वर

 

शास्त्री मोठा की शंकरभट्ट मोठा याचा निर्णय करण्यासाठी पैज लावणारे फार उत्साहित होते.

शेवटी आम्हाला जुन्या वाडयात नेऊन न्यायालयात नेण्यास सिध्द केले गेले. त्या ब्राह्मणाला आशेला लावून निराश केले, धर्मगुप्तांना सुध्दा माझ्या बरोबर संकटात ढकलले. श्रीपाद प्रभूंच्या दिव्य लीलेचा गूढार्थ काय असेल मला काहीच समजेनासे झाले. माझे थोडेफार शिक्षण झाले होते परंतु कोणत्याहि प्रकारची अध्यात्मिक शक्ति नव्हती, ज्योतिष्यविद्या तर येतच नव्हती, जपतप, योगाभ्यास, कठीण असे नियमनिष्ठा यांचे ज्ञान तर अजिबातच नव्हते. श्रीपादांच्या चरित्र लेखनाचा एका कुतुहलाने मी संकल्प केला परंतु त्याला पाहिजे असलेली योग्यता माझ्या जवळ नव्हती. माझे यातून रक्षण करून माझा उध्दार

करावा. अंतिम सर्व कांही आपल्या इच्छेवर अवलंबून आहे. अशी आर्त प्रार्थना मी श्रीपाद प्रभूंच्या चरणांजवळ केली. माझ्यात कधीहि नसलेले धैर्य त्यावेळी अचानक आले. जे होणार असेल ते होणारच परंतु श्रीपाद श्रीवल्लभ माझे यातून रक्षण करून मला तारतील असा दृढविश्वास माझ्या मनांत उत्पन्न झाला.

शरभेश्वर शास्त्रीना एक बहीण होती. ती त्याच गावात रहात होती. तिला एके दिवशी पहाटेच्या वेळी एक स्वप्न पडले. त्या स्वप्नात तिला भयंकर ताप आल्याचे, तिचा पती मरण पावला, आणि तिला वैधव्य प्राप्त झाले असे दिसले. तिने आपल्या भावाला म्हणजे शरभेश्वरशास्त्रींना स्वप्नाचे फळ विचारले. शरभेश्वराने आपल्या उपस्थित प्रेतात्म्याला त्या स्वप्नाबद्दल विचारले.

त्या प्रेतात्म्याने सांगितले, हिचा पती देशांतरी गेलेला असताना. मध्येच मार्गावर चोरांनी त्याला घेरले आणि सगळे द्रव्य लुबाडून त्याला मारून टाकले.

ते ऐकून ती मोठ्याने पतीच्या निधनाचा विलाप करू लागली, आपल्या दैवाला दोष देऊ लागली. तेवढयात कांही लोक तिच्या घरी आले, तिला धीर देऊन सांगू लागले आपल्याच गावांत शंकरभट्ट या नावाचे महापंडित आलेले आहेत. त्यांना घटना घटिताचे ज्ञान आहे. श्रीपाद श्रीवल्लभ प्रभू त्यांचे आराध्यदैवत आहेत त्यांच्याकडुन सत्य काय आहे ते जाणून घे. असा सल्ला त्यांनी तिला दिला. तिने स्वत:च्या भावापेक्षा कोणी मोठा पंडित असल्याचे ऐकले

 

नव्हते. शंकरभट्टा कडुन आशिर्वाद घ्यावा अशी इच्छा तिच्या मनात उत्पन्न झाली.

तिने आमच्या घरी येऊन "भाऊ ! माझ्या मांगल्याचे रक्षण करा" अशी मोठ्या दीनवाणीने प्रार्थना केली. ती ऐकुन माझ्या हृदयाचे पाणी-पाणी झाले. श्रीपादांकडून पंचदेव पहाडामधील विवाह समारंभात शेतकऱ्याने प्राप्त केलेल्या मंत्राक्षता माझ्या जवळ थोडया आहेत असे मला आठवले . माझ्यात एका दिव्यस्फूर्तीचा आविर्भाव झाला, ह्या मंत्राक्षता साक्षात् श्रीपाद श्रीवल्लभां कडून मिळालेल्या असल्याने हिच्या मांगल्याची रक्षा शंभरटक्के होईल असा दृढ विश्वास मला प्राप्त झाला. मी त्या बाईला बोलावून म्हटले, "बाई ! ह्या मंत्राक्षता तू घे आणि तुमच्या पूजेच्या ठिकाणी नेऊन सुरक्षित ठेव . तुझा

पती थोडयाच दिवसांत तुला भेटेल. हेच सत्य आहे. त्रिवार सत्य आहे."

हे वर्तमान कांही शेतकऱ्यांनी शरभेश्वर शास्त्रींना सांगितले, ते ऐकून त्याला आपल्या बहिणीचा फार राग आला. "माझा पती सुखरूप घरी परत आल्यास, मी त्या गरीब ब्राह्मणांचे देणे तर देईनच शिवाय शंकरभट्टाला गुरु करून, श्रीपाद श्रीवल्लभांचे नामस्मरण, आराधना करीन" असा तिने संकल्प केला.

तीन दिवस गेले. या तीन दिवसात शेतकऱ्यांनी आम्हाला शिधा वगैरे आणुन दिला. ह्या शेतकऱ्यांनीच माझ्यावर पैज लाविली होती. मी विजयी झालो तर त्यांचा पण विजय होऊन पैजेचे पैसे सुध्दा त्यांना मिळणार होते.

तीन दिवसानंतर चौथ्या दिवशी शरभेश्वर शास्त्रीच्या बहिणीचा नवरा देशाटन करून सुखरूप घरी आला. त्या ब्राह्मण स्त्रीच्या आनंदाला सीमाच नव्हती. त्या मंत्राक्षतांच्या बळानेच आज माझे सौभाग्य टिकले अशी तिची खात्री झाली. तिच्या पतीला चोरांनी मार्गात मारण्याचा प्रयत्न केलाच होता. परंतु एका यवन मल्लाने मधे पडून त्या चोरांना मारून त्या ब्राह्मणाचे रक्षण केले होते.

आहा ! श्रीपादांचा महिमा अगाध आहे. अमोघ आहे. शरभेश्वर शास्त्रीचा अहंकार नष्ट झाला. माझे ज्योतिष्य खरे ठरल्यामुळे आम्ही रहात असलेल्या घरच्या मालकांचे ऋण शरभेश्वर शास्त्रीने सारले आणि आम्ही दोघांनी त्यांच्या

घरचे आदरातिथ्य स्वीकारावे अशी विनंती केली. त्याला आम्ही होकार दिला.

शरभेश्वरशास्त्री म्हणाले. "बाबा ! धूमावती देवी ही दशमहाविद्येतील एक आहे. तिचा मी उपासाक आहे. ती फार उग्रदेवता आहे. परंतु ती प्रसन्न झाली तर रोग, शोक या सर्व गोष्टींचा नाश करते. हिचा कोप झाला तर सर्व सुखांचा, सर्व कामनांचा ती नाश करते. ह्या देवीला शरण गेल्यास सर्व विपत्तींचा नाश होऊन सर्व संपदांचा लाभ होतो. तिला राग आला तर उपास, भांडणे, दारिद्रय वगैरे येतात. माझ्यावर त्या मातेचा अनुग्रह आहे. करणी केल्याने त्रस्त जनांचा उध्दार करण्यास ह्या मातेची उपासना अनिवार्य असते. कल्याणास्तव मी थोडे दिवस विनामूल्य सेवा केली. परंतु

 

थोडया दिवसाने माझ्यात धनाशा निर्माण होऊन मी अधिक धन घेऊ लागलो. हे मातेला आवडले नाही. याच कळात माझा एका बलशाली प्रेतात्म्याशी संबंध स्थापित झाला. त्याच्या साह्याने भूत, भविष्य,

वर्तमान काळाचे कथन करण्याची शक्ति मला लाभली. प्रेतात्म्याची उपासना करूच नये. उपासना केलीच तर त्याच्या शक्तिमुळे मिळालेले धन, प्रजासेवेसाठी, गरिबांना, निर्धनाना दान द्यावे. तसे केल्यास प्रेतात्मा नेहमी आपल्या स्वाधीन रहातो. असे न केल्यास, तो प्रेतात्मा चुकीचे भविष्य सांगतो आणि त्याच्या साधकांचा अपमान होण्याची परिस्थिती निर्माण करून त्याला निर्धन करतो. एवढेच नव्हे तर जीवास सुध्दा धोका असतो. स्वार्थाने वागल्यास

 

आपल्यातील पुण्यराशींचा क्षय होतो. मग तो प्रेतात्मा आपल्यासाठी कष्टांचे डोंगर रचतो. त्यातून बाहेर पडणे सोपे नसते. मी अविवेकाने धनार्जन केले आणि नेहमी स्वार्थच पहात होतो. त्यामुळेच त्या प्रेतात्म्याने चुकीचे भविष्य कथून मला संकटात टाकले आणि माझा अपमान पण झाला. आज पासून तुम्हीच माझे गुरु आहात, कृपा करून मला आपला शिष्य म्हणून स्विकारावे ही नम्र विनंती." त्यावर मी म्हणालो, "बाबा ! या प्रपंचाचे, या सृष्टीचे गुरुत्व श्रीपाद श्रीवल्लभांनाच आहे. त्यांच्या शिवाय दुसरे गुरु कोणीही नाही. मी अहंकाराने जर गुरुत्व पत्करले तर तुझ्या अपमानापेक्षा आणखी दुसरे काही मला भोगावे लागेल. आम्ही कुरुगड्डीहून येते वेळी दशमहाविद्यांचे संक्षिप्त वर्णन श्रीपादांनी केले, बाकी उरलेले ते योग्य वेळी सांगणार आहेत. दशमहाविद्येमधील

कालिबद्दल, धुमावति बद्दल त्यांनी आम्हाला सांगितलेच आहे. बाबा ! मला तू गुरु करू नकोस. श्रीपादांना, भक्तांना संकटात टाकणे आणि त्यातून सोडविणे म्हणजे एका चमत्कारासारखेच वाटते. सदा सर्वदा श्रीपादांचे नामस्मरण करणे हेच इह-परलोक साधन आहे."

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

# अध्याय -35

## उग्र तारादेवीचे विवरण (वर्णन)

## तारादेवीच्या उपासकाच्या दुष्कर्मावर श्रीपादांची शिक्षा आणि कटाक्ष

शरभेश्वरशास्त्रींची परवानगी घेऊन आम्ही पुढच्या प्रवासास सुरुवात केली. श्रीपाद श्रीवल्लभांचे नामस्मरण करीतच आम्ही मार्ग आक्रमित होतो. थोडया दूरवर गेल्यानंतर आम्हाला एक आश्रम दिसला. त्या आश्रमात एक सिध्द महर्षि रहात

होते. ते महर्षि पूर्णत: वैराग्यवंत असून त्यांनी कौपीन धारण केले होते. दोन शिष्य आश्रम द्वारात उभे होते. आम्हाला पहाताच त्यांनी आपण शंकरभट्ट आणि धर्मगुप्तच आहात ना ? असा प्रश्न केला. "हो आम्हीच आहोत" असे आम्ही सांगितले. त्यांनी आम्हाला आत नेले. तेथे तारादेवीची मूर्ति होती. ते सिध्द महर्षि तारादेवीचे उपासक होते, हे समजले. मध्यान्ह समय झाला होता. पूजा झाल्यानंतर भजनास प्रारंभ झाला आणि भजन संपल्यावर आम्हाला भोजन देण्यात आले.

सिध्द म्हणाले "तुम्ही येणार असल्याची पूर्वसुचना आम्हाला श्रीपादांनी अगोदरच दिली होती. श्री प्रभूंच्या आदेशानेच आपले आदारातिथ्य करण्यात आले. मी तारादेवीचा उपासक आहे.

भक्तांना ही माता सदैव मोक्ष प्राप्ती देऊन त्यांना तारते म्हणूनच ह्या मातेला "तारादेवी" हे नांव पडले आणि तेच व्यवहारात पण आले. हिच्या कृपेने अकस्मात वाकशक्ति प्रसाद रूपाने मिळते त्यामुळे हिचे "नीलसरस्वती" असे नांव पडले. ही माता भयंकर अशा विपत्तीतून भक्ताची रक्षा करते. पूर्वकाली "हयग्रीव" या नावाचे तिघेजण होते. 1) विष्णुमूर्तिचा अवतार हयग्रीव 2) हयग्रीव महर्षि आणि 3) हयग्रीव राक्षस. तारादेवीने हयग्रीव राक्षसाचा वध केल्यामुळे ती नीलविग्रहरूपिणी या नावाने प्रसिध्द झाली. या देवीच्या कृपेने अति सामान्य मानव सुध्दा बृहस्पती सारखा विद्वान होतो. भारत वर्षात तारादेवीची उपासना वशिष्ठ महर्षिंनी सर्वात प्रथम केली. त्या कारणाने ह्या मातेला वशिष्ठ आराधिता असे नांव पडले. मी तारादेवीचा उपासक आहे. परंतु मला तारा

मातेचा दर्शन लाभ कधिहि झाला नाही. मी मिथीला देशातील महिषि या ग्रामातील उग्रतारासिध्द पीठचे दर्शन घेतले. या स्थानात तारा, एकजरा आणि नीलसरस्वती अशा त्रिमूर्ती एकाच ठिकाणी आहेत.मध्यभागी ऊंच मूर्ती आणि आजू बाजूला त्यापेक्षा थोडया लहान आकाराच्या मूर्ती आहेत. तेथेच वशिष्ठ महर्षींनी तारोपासना करून सिध्दी प्राप्त केल्या होत्या असे त्या गावातील वयोवृद्ध लोकांनी सांगितले.

मी उग्रतारादेवीचे दर्शन घेऊन बाहेर पडताच, एका सुंदर आणि आकर्षक बालिकेचे रूप समोर पाहीले. त्या बालिकेच्या पैंजणांचा आवाज कर्णमधुर होता. ती बालिका छम् छम् करीत चालत असता, तिच्या पैंजणांचा आवाज माझ्या हृदयात प्रतिध्वनित होत होता. त्या बालिकेने

मला प्रश्न विचारला, "बाबा ! कोठे कोठे किती फिरशील ? माझ्या दर्शनासाठीच या संपूर्ण लोकाची फेरी चालविली आहेस. हे खरे आहे ना ?" असे ऐकून मी आश्चर्यचकित झालो. मला क्षणभर हीच तारादेवी कां ? असे वाटले. परंतु दुसऱ्याच क्षणी ती कोणी वेगळी मुलगी असे बोलत आहे, असे वाटले. तारादेवी शिवावर प्रत्यलीढ मुद्रेने बसलेली कपाल असते, ती नीलवर्णी त्रिनेत्री असून तिच्या हातात कात्री, कपाल, कमळ आणि खड्ग असते. तिने व्याघ्रचर्म धारण केलेले असते आणि मुंडमाळा गळयात धारण करणारी ती देवी भोग मोक्ष प्रदान करणारी आहे, त्या मंगलमयी देवीचे खरे रूप असे आहे. मी आता पाहिलेले 12,13 वर्षाच्या सुंदर बालिकेचे मुग्धमोहक रूप आहे त्यामुळे मी आश्चर्य जनक स्थितीतच होतो. कांही बोलू शकलो नाही. तेवढयातच त्या

बालिकेचे शरीर तेजोभरीत अत्यंत तेजस्वी होत होत एकदम तिने मुलाचा आकार घेतला. त्या बालकाचे नेत्र योग्यांच्या नेत्रासारखे अत्यंत दयार्द्र आणि शांत होते, त्याचा रंग सुवर्णकांती समान होता, ते स्वरूप अत्यंत दिव्य आणि तेजोमय होते. त्या बालकाच्या दोन्ही पायात पैंजण होते. "माझ्या पायातील हे पैंजण अत्यंत घट्ट झाले आहेत ते तू काढू शकतोस का ?" बालकाने मला विचारले. मी त्याला होकार दिला. आणि हळुवारपणे त्याच्या पायातील ते दिव्य पैंजण काढले. तेंव्हा तो बालक म्हणाला "हे दोन्ही पैंजण तू तुझ्या जवळच ठेव . यांच्यात जीवशक्ति आहे. तू कोठे जावे, काय खावे, कोणाशी बोलावे या सर्व गोष्टींचा निर्णय हे पैंजणच घेतील."

 

असे सांगून तो बालक अंतर्धान पावला. मी कालिघाट मध्ये कालिकामातेचे दर्शन करून दक्षिणेस गेलो. पुरी या महाक्षेत्राचे दर्शन घेतले. दक्षिणेतील सिंहाचल क्षेत्राचे दर्शन घेतले. माझ्या पूर्व सुकृतानेच पादगया क्षेत्र असलेल्या श्री पीठिकापुरात पोहोचलो. तेथे श्री कुक्कुटेश्वर स्वामींचे दर्शन घेतले. स्वयंभू दत्तात्रेयांचे दर्शन घेतले. स्वयंभू दत्तमूर्ती जवळ एक सापाचे वारुळ होते. त्या बिळात एक देवता सर्प होता. मी दत्ताचे दर्शन घेतल्यावर त्या सर्पाने सुध्दा मला दर्शन दिले. त्या सर्पाच्या दर्शनानेच माझ्यातील कुंडलीनी जागृत झाली. माझे शरीर माझ्या स्वाधीन नव्हते. मी वेडयासारखा इकडे तिकडे फिरत तारामातेचा मोठ्या आवाजात नामघोष करीत होतो. मी योगायोगानेच नरसिंहशर्मा या नावाच्या क्षत्रिय जमीनदाराच्या घरासमोर आलो. महिषी या ग्रामांत पाहिलेले

बालिकेचे रूप पुन्हा माझ्या डोळयासमोर दिसले. परंतु ती बालिका थोडयाच वेळात बालकाच्या रूपात रूपांतरीत झाली. मला दर्शन दिलेला तोच तेजोमय दिव्य बालक माझ्या डोळयासमोरच होता. श्रीवर्माच्या घरी एक निराळाच टांगा होता. त्या दिव्य बालकाला त्या टांग्यात बसून आपल्या मातेच्या घरी जायचे होते. श्री वर्मांनी एका सेवकाची व्यवस्था केली. तो तेथे हजर झाला. त्या बालकाने त्या सेवकाला सुध्दा टांग्यात बसवले. आणि मला त्या टांग्यास ओढण्यास सांगितले. मी नाही ओढत म्हणालो,"तू जर नाही ओढलेस तर तुझे कातडे काढून त्याचे पादत्राण करून घालीन. मी तर चांभारच आहे. कातडे काढून चप्पल शिवणे ही माझी कुलवृत्तीच आहे. तुझ्या सारख्या जनावराचे कातडे म्हशीच्या किंवा गाईच्या

कातडया पेक्षा श्रेष्ठ असते" असे तो बालक म्हणाला.

मी इच्छा नसताना ती गाडी ओढण्याचे स्वीकारले. त्या बालकाच्या हातात एक छडी होती. त्या गाडीला ओढण्यासाठी मला फार श्रम पडत होते. तो दिव्य बालक त्याच्या हातातील छडीने मला सारखे मारीत होता. त्या दोघांचेच वजन वीस माणसांच्या बरोबरीचे होते. मोठ्या कष्टाने ती गाडी मी ओढत असता, दु:खावर मीठ चोळल्याप्रमाणे तो बालक छडीने जोरजोरात मारत होता. माझ्या पाठीतून रक्तधारा वाहु लागल्या आणि दु:खाचा भार वाहातच मी ती गाडी त्या बालकाच्या मातागृहापर्यंत आणून कशीबशी पोहोचविली.

 

त्या बालकाबरोबर आलेल्या सेवकाला माझी परिस्थिती सहन झाली नाही. परंतु तो बालक त्याच्या विनोदार्थ फार वूच्रतेने वागत होता. ह्या दुरात्म्यावर दया माया दाखविलीस तर तू पण शिक्षेस पात्र होशील असे त्या बालकाने सेवकाला बजावून सांगितले. मला कमरेच्या वर कांही वस्त्र नव्हते, रक्ताच्या धारा सारख्या वाहात होत्या, त्या बालकाने घरात जाऊन तिखट आणले आणि माझ्या अंगास लावले. माझ्या कमरेला मात्र महिषि ग्रामात मिळालेले पैंजण होते.

तेवढयातच त्या दिव्य बालकाची पुण्यमूर्ती आजी राजमांबा बाहेर आली. तिचे दुसरे नाव पुण्यरूपिणी असे होते. तिचे दर्शन झाल्या बरोबर माझ्या शरीरातील आग शांत झाली.

 

तिचे यजमान बापनार्युलु या नावाचे सुप्रसिध्द सत्यऋषिश्वर होते. ते म्हणाले "बाबा तू कोणत्या गावचा आहेस, कोठून आलास ? थोडावेळ विश्रांति घेऊन भोजन करून जावे." त्यांनी हिंदुस्थानी भाषेचा वापर केला. त्या सेवकाने, श्रीपादांनी दिलेल्या कठीण वागणुकीचे वर्णन त्यांच्या आजी आणि आजोबां जवळ केले.

तेव्हा श्रीपाद म्हणाले "आजी ! हा सेवक चक्क खोटे बोलतोय, ह्या माणसाच्या अंगातून रक्त आले नाही. त्या घामाच्या धारा होत्या. मी त्याला तिखट लावलेच नाही. ती चंदनाची उटी होती. हवे असेल तर त्या सेवकाला पहावयास सांगा." त्या सेवकाने पाहिले. श्रीपादांनी सांगितलेलेच तंतोतंत खरे झाले.

 

तेवढयात बापनार्युलु म्हणाले "श्रीपादा ! तू सत्यव्रति आहेस. तिथे रक्ताच्या धारा म्हणालास की रक्ताच्या धारा दिसतील. चंदनाची उटी म्हटलेस की तीच दिसेल. तू जे म्हणशील तेथे तेच दिसते म्हणजे तू साक्षात उग्रतारा देवीचे रूप आहेस असेच वाटते. उग्रतारा देवीच्या अनुग्रहाने वाकसिद्धी प्राप्त होते असे ऐकले होते. पण साक्षात समोरच पाहिले. उग्रतारादेवी प्रमाणे तू केवळ संकल्प मात्रानेच कोणत्याही वस्तुंचे स्वभावधर्म बदलू शकतोस. तुझा लीलाविनोद आता थांबवून त्या अभाग्यावर करुणाकटाक्ष कर." त्या वेळी श्रीपाद म्हणाले "आजोबा ! आपण जास्तच बोललात. मी संकल्प करेन आणि तो संकल्प लगेच फलीभूत होईल असे म्हणालात. हे कोठपर्यंत खरे आहे ? का खोटे ? निर्णय शास्त्रांच्या सहाय्यानेच घेता येईल. असो हा अगंतुक एक सद्ब्राह्मण आहे,

उग्रतारादेवीचा उपासक आहे हे सगळे ठीकच आहे, पण याने संन्यास दीक्षा आपल्या गुरुंच्या अनुमतीने न घेता त्याला जसे योग्य वाटले त्या प्रमाणेच त्याने संन्यास घेतला. याच्या पित्याने अनेक कष्ट सहन करून याचे लालन-पालन करून यास मोठे केले. याच्या मातेला गर्भावस्थेत फार कष्ट सहन करावे लागले. हा जन्मला तेंव्हा त्याच्या मातेच्या अंगातून बरेच रक्त गेले . रक्तचळलेल्या घावावर मिर्चिची पूड लावल्यास ते दु:ख कसे असते तसे दु:ख त्या मातेने तेंव्हा सहन केले होते. ते दोघेही आता या जगात नाहीत आणि पूर्व सुकृताने त्यांचा जन्म पीठिकापुरात झाला आहे."

## काशीत वास केल्याचे फळ

"नरसिंह वर्मांच्या घरात असलेला सेवक दुसरा कोणी नसून या अगंतुकाचा पूर्वजन्मीचा पिताच आहे. त्याची पत्नी यांची पूर्वजन्मीची माता आहे. मृत्यु पावलेल्या मोठ्या लोकांना पिंडप्रदान योग्य विधीने न करणे हे एक पापच आहे. ह्या अगंतुकाने संन्यास घेतला असल्याने माता-पित्यांचे पिंडप्रदान केले नाही. याचे पापकर्म आणि याचे पुण्यकर्मानेच याला येथे म्हणजे पादगयाक्षेत्री, श्री पीठीकापुरात ओढून आणले. याने थोडया दु:खानेच याच्या पापकर्मांचे फळ अनुभवले. याच्या संपूर्ण दुर्योगांचा परिहार झाला. शिशु नऊ महिने मातेच्या गर्भात असतो, तसेच काशीक्षेत्रात नऊ महिने नऊ दिवस आणि नऊ घटिका राहल्यास

 

तो मनुष्य पितृशापातून मुक्त होतो. श्री पीठिकापुरम हे काशी क्षेत्रा समान आहे. ह्या अगंतुकाने त्याच्या पूर्वजन्मीच्या माता-पित्यांची सेवा केल्यास हा पितृदेवतांच्या शापातून मुक्त होईल." एवढे बोलून श्रीपाद प्रभू मौन झाले. मी प्रभूंच्या आदेशानुसार माझ्या गत जन्मीच्या माता पित्यांची सेवा केली. त्यांचा आशिर्वाद मिळाला त्यांच्या कडून मिळालेले पैंजण देवघरात सुरक्षित ठेवले . मला उग्रतारा देवीच्या अनुग्रहाने सिध्दी प्राप्त झाली. माझ्या तंत्रशक्तीच्या बळावर मी लोकांचे दु:ख, आजाराचा परिहार करू लागलो.

आपण इकडे येण्या पूर्वी श्रीपाद श्रीवल्लभांनी मला दृष्टांत दिला, ते म्हणाले. "शंकरभट्ट आणि धर्मगुप्त असे दोन यात्री या मार्गाने

 

येथे येतील, त्यांचे योग्य आदरातिथ्य करून त्यांची येथे रहाण्याची सोय सुध्दा करावी तसेच माझे पैंजण त्यांना बक्षिस म्हणून द्यावे."

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -36

# वेदांतशर्मांचा वृतांत

## मातंगीचीउपासना

मी आणि धर्मगुप्त, आम्ही दोघांनी श्रीपाद प्रभूं कडून बक्षिसरूपी मिळालेले पैंजण घेऊन प्रवासास सुरुवात केली. रात्रभर त्यांच्या पायातील पैंजणांचा मधुर आवाज आमच्या हृदयात प्रतिध्वनित होत होता. हृदयातील अनाहत चक्रात ॐकार अति प्रयत्नानेच ऐकु येतो असे आम्ही

ऐकले होते, गतरात्री मात्र ते प्रत्यक्षात अनुभवास आले. त्या पैंजणांचा मधुर आवाज अगदी राग, तालयुक्त संगितासारखा होता. अनाहत चक्रापासून शक्ति इतर चक्रांकडे प्रसारीत होत असते. त्या शक्तीचा प्रसार होत असताना शरीरातील सर्व नाडयातून नूतन शक्तीचा प्रादुर्भाव होत असतो.

आम्ही चाललो तितका वेळ पैंजणांचा आवाज येत असे. आम्ही थांबलो की थांबत असे. त्या भागातील शेतात आम्हाला एक आश्रम असल्याचे दिसले. त्याच्या बाजूलाच छोटेसे खेडे गांव असल्या सारखे वाटले. गावाच्या सीमेजवळ दलित लोकांची वस्ती होती. त्या वस्ती जवळच हा आश्रम होता.

आम्ही आश्रमाच्या जवळ पोहंचताच पैंजणांचा आवाज थांबला. कोणता तरी दिव्य असा अनुभव येणार आणि ही सुध्दा प्रभूंची एक दिव्य लीलामात्र असणार असे आम्हाला वाटले. एवढयातच त्या आश्रमातून सुमारे 60 वर्षाचे तेजस्वी असे महर्षी बाहेर आले. त्यानंतर अंदाजे तीस वर्षे वयाची योगिनीमाता बाहेर आली. त्या दोघानी आम्हाला अत्यंत आदराने आश्रमांत नेले. आणि जलपान झाल्यावर महर्षिनी सांगण्यास सुरुवात केली. "माझे नांव वेदांतशर्मा आहे. खरे पाहाता. मी पीठिकापुरवासी आहे. आता मी बंगारय्या या नावाने ओळखला जात आहे. हिचे नांव बंगारम्मा आहे. मी जन्मत: ब्राह्मण आहे आणि ही स्त्री जन्मत: नीच कुलिन आहे. आमच्या घरी मातंगी मातेचे पीठ आहे. दशमहाविद्येतील

 

मातंगी माता एक आहे, तिचीच आम्ही येथे आराधना करतो."

हे ऐकताच माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले. हा ब्राह्मण आणि ती स्त्री हीन कुलातील असे असताना या दोघांचे दांपत्य कसे धर्मसम्मत झाले असेल, असा मला प्रश्न पडला. आम्हाला फल, मूल आणि कंद भोजनार्थ दिले गेले. बंगारय्याने पुढे सांगण्यास सुरुवात केली, "बाबांनो ! वशिष्ठ महामुनींना अरुंधतीने लग्न करण्याची विनंती केली तेंव्हा वशिष्ठ मुनींनी एक अट घातली. ते म्हणाले "मी कांही केले तर तिने त्याचा विरोध करू नये." त्या गोष्टीला तिने होकार दिला.

महर्षींनी तिला सातवेळा दग्ध केले तरी पण ती काहीच म्हणाली नाही. त्यामुळेच तिला अरुंधती हे नांव मिळाले त्यानंतर महर्षींनी तिचा आपली धर्मपत्नी म्हणून स्विकार केला."

मी पीठिकापुरत असताना माझा तीन वेळा विवाह झाला. तिन्ही बायका कैलासवासी झाल्या कुणाचाही संग लाभला नाही. असे कसे माझे खडतर कर्म म्हणून मी अत्यंत दु:खी झालो. त्यावर श्रीपाद हास्य करून म्हणाले "आजोबा मी तुमच्यासाठी अजून एक नवीन आजी पाहिली आहे. विवाह न करताच तिचा धर्मपत्नी म्हणून आपण स्विकार केल्यास तुम्हाला उत्तम जन्म प्रसाद रूपाने मिळेल."

बापनार्युलु हे पीठिकापुरातील ब्राह्मणपरिषदेचे अध्यक्ष होते. या संबंधात वेदपंडितांची बैठक परिषदेत करावी असे ब्राह्मण समाजाचे मत होते. धर्मकर्माच्या विषयी शास्त्रानुसार चर्चा करून निर्णय घ्यावा असे ठरले . दूर दूर प्रांतातील पंडितांना, आमंत्रणे पाठवली होती. कोणाकोणाला बोलवावे हा कार्यभार माझ्यावर सोपविला गेला.

श्रीपादांनी उपनयन संस्कार झाल्यावर इतर मुलांप्रमाणे वेदपठन केले नाही. आजोबा जवळ किंवा त्यांच्या वडिलासमोर त्यांनी कधीही पाठंतर केले नाही आणि केलेले सांगितले नाही. परंतु कोणी परिक्षार्थ कांही विचारल्यास श्रीपाद पटकन त्याचे उत्तर सांगत. बापनार्यांचे सर्व वेदांत श्रीपादांना येत होते. एवढेच नव्हे तर वेदांत

आणि त्यातील रहस्यमय गूढार्थ तर श्रीपादांच्या हातचा मळ होता. एकंदरीत श्रीपाद विद्वान पंडितच होते. त्यांना सुध्दा परिषदेत बोलविण्याचा निर्णय मी घेतला.

ब्राह्मणांचा उद्देश वेगळाच होता. अप्पलराजूंना आणि बापनार्यांना कुळातून बहिष्कृत करावे असा निर्णय ब्राह्मण सभेने दिला. त्याची एक प्रत श्री शंकराचार्यांना पाठवली आणि त्यांची अनुमति मिळाल्यावर त्या दोन्ही कुटुंबियांना पीठिकापुरतून हाकलून द्यावे असे त्यांच्या मनात होते. श्रीपादांनी जेंव्हा त्यांच्या मनातले मला सांगितले तेव्हा मी पण त्या ब्राह्मणा कडून झालो. कारण ब्राह्मण परिषदेचे अध्यक्षपद मिळवण्याची विचित्र इच्छा माझ्या मनात अंकुरित झाली होती.

कूल, मत भेदाची पर्वा न करता श्रीपाद स्वतंत्रपणे सगळयांच्याच घरी जात असत आणि सगळयांशी समान वर्तन करीत. पीठिकापुरत बंगारय्या आणि बंगारम्मा हे दांपत्य रहात होते. त्यांना श्रीपादांना भेटावयाची, त्यांच्याशी बोलावयाची उत्कट इच्छा होती.

श्रीपादांनी मला कातडयाच्या पादुका हव्या आहेत अशी इच्छा प्रकट केली. तेंव्हा त्यांचे वय चौदा वर्षाचे होते. ब्राह्मणांनी लाकडी पादुका वापराव्यात, कातडयाच्या वापरू नयेत असे घरातील मोठ्यांनी सांगितले. हा विषय उडत उडत त्या चांभार दांपत्याच्या घरी पोहोचला. श्रीपादांना कातडयाच्या पादुका समर्पित करून जीवनाचे सार्थक करावे असा निश्चय त्या

दांपत्याने केला. तितक्यात त्यांच्या घरात श्रीपाद श्रीवल्लभ प्रगट झाले. त्यांच्या दिव्यश्रीचरणांचे मोजमाप घेण्यात आले. बंगारम्मा म्हणाली,"महाप्रभो ! माझेच कातडे काढून त्यांची चप्पल शिवून द्यावी असे माझ्या मनांत आहे." त्यावर श्रीपाद श्रीवल्लभांनी मंदहास्य केले आणि अंतर्धान पावले. आमच्या घरी एक चांगली गाय होती, तिला असाध्य रोग जडला आणि त्यातच ती मरण पावली. त्या मरण पावलेल्या गाईचे कातडे काढून, त्यास शुध्द करून, त्याच्या श्रीपाद प्रभूंना देण्यास चर्मपादुका तयार केल्या गेल्या. ठरल्या प्रमाणे वेदपंडितांची बैठक भरली, चर्चा सुरु झाली. चर्चेचा मुख्य विषय आदिशंकरांचा काशी मध्ये झालेला मंडनमिश्रा बरोबरचा वादविवाद हा होता. वाद विवादात स्वत: उभय भारती देवीला सुध्दा जिंकले तर परिक्षा पूर्ण होईल असे भारती देवी म्हणाली.

कामशास्त्र या विषयावर उभय भारतीने प्रश्न विचारला. त्या शास्त्रात आदिशंकराचे ज्ञान शून्यच होते. त्यासाठी सहा महिन्यांचा अवधि त्यांनी मागितला. आपण धर्मविरुध्द न जाता कामशास्त्राचे ज्ञान मिळवावे असा विचार शंकरचार्यांनी केला. त्याच वेळी राज्यातील महाराजाचा देहांत झाला होता. आदिशंकरांनी परकाया प्रवेश विद्येचा वापर केला आणि त्या राजाच्या शरीरात त्यांनी सूक्ष्म शरिराने प्रवेश केला. त्यांची भौतिक काया सांभाळुन ठेवावी , कांही अति महत्वाचे सांगावयाचे असेल तर राजप्रासादा जवळ येऊन सांकेतिक भाषेने मला सांगावे असा श्रीशंकराचार्यांनी आपल्या शिष्यास आदेश दिला. महाराणीला आपल्या महाराजात कांही तरी बदल, नविनपण जाणवला एखाद्या महापुरुषाच्या आत्म्याचा प्रवेश तिच्या पतीच्या

शरिरात झालेला आहे, हे तिने ओळखले. मरण पावलेल्या तिच्या पतीच्या शरिरात प्राणमय जगतातील चैतन्यास आकर्षित करून, राजा-राणींच्या दांपत्य सुखाचा अनुभव तो दिव्यात्मा केवळ साक्ष भावानेच बघून ज्ञान मिळवत आहे, असे सुध्दा त्या राणीला समजले. जो पर्यंत त्या दिव्यात्म्याचे वास्तव्य माझ्या पतीच्या शरिरात आहे तोपर्यंत त्यांचे प्राण त्याच्या शरिरात रहातील हे तिने ओळखले. तिने आदेश दिला की नगरात दहन न केलेले मृत शरीर असल्यास, त्या शरीराचे दहन करावे. शंकराचार्यांचे शरीर दहन करण्यास नेण्यात आले. तेंव्हा शिष्यगणांनी त्वरीत राजवेशात असलेल्या शंकरांना सांकेतीक भाषेत हा विषय सूचित करण्याचा प्रयत्न केला परंतु उशीर झाला होता. अग्नित जळालेले हात, पाय श्रीलक्ष्मी

 

नरसिंहाच्या कृपाकटाक्षाने आदिशंकरांनी परत मिळविले.

## ब्राह्मण परिषदेत श्रीपादांचा अद्भूत संवाद

श्रीपादांनी परिषदेला प्रश्न केला."आत्मा हा एका शरीरातून एका वेळेस ते शरीर सोडल्या नंतरच दुसऱ्या शरीरात प्रवेश करू शकतो असे तुम्ही सांगता, पण मी तुम्हाला एक प्रश्न विचारतो आत्मा एकाच वेळी तीन चार शरीरातून तीन चार जन्मांचे कर्मफळासहित अनुभव घेऊ शकतो का?" "हा फार जटील विषय आहे आजपर्यंत आशारीतीचे झाल्याचे पुरावे नाहीत" असे उत्तर परिषदेने दिले.

"श्रीपाद प्रभू परिषदेस उद्देशून म्हणाले, "पूर्वी असे झाले आहे. परंतु तुम्हाला ते माहित नाही. शापामुळेच देवेंद्राला पंचपांडवांचा जन्म घ्यावा लागला आणि शचिदेवीला द्रौपदीच्या रूपाने जन्म ध्यावा लागला, तिला पांडवांची पत्नी व्हावे लागले. शचिपुरंदरांनी भूमीवर जन्म घेतला तरी त्यांचे मूलतत्व स्वर्गात नक्कीच होते. द्रौपदीचे शय्या सुख केवळ अर्जुनालाच मिळाले. मंत्रांग विषयांवर ती धर्मराजा बरोबर चर्चा करीत असे. भीमास माते सारखे रूचकर भोजन करून देत असे. नकुलास ती लक्ष्मीस्वरूपिणी दिसे. सहदेवास भूत, भविष्य, वर्तमान काळाचे ज्ञान होते त्यामुळे पुढे घडणाऱ्या घटना लवकर लवकर घडून क्षेत्र संग्राम लवकर संपावा अशी इच्छा तो दर्शवित असे, त्या मुळे भूमातेपेक्षाहि जास्त सहनशील वृत्तिने ती त्यांच्या बरोबर वागत असे. देवता

धर्म, मनुष्य धर्म आणि जंतु धर्म हे वेगवेगळे असतात. त्या सर्वांना एकत्रित मिसळु नये." त्यावर मी म्हणालो पुराण काळात अशा अनेक आश्चर्याच्या गोष्टी घडल्या असतील, परंतु प्रस्तुत काळात तसे कांही घडत नाही. श्रीपादांची तीक्ष्ण दृष्टि माझ्यावर पडली. ते म्हणाले, "तुझा तीन स्त्रीया बरोबर विवाह झाला. त्या तिन्ही स्त्रिया मरण पावल्या. तिघींना तीन वेगवेगळे आत्मे होते का ? नसेल तर एकच आत्मा होता का ? पुरुषांनी तीन स्त्रियांशी विवाह करणे धर्मसम्मत आहे. पण एका स्त्रीने तीन पुरुषांशी विवाह करणे धर्म सम्मत आहे का ? खरे पहाता आत्मा म्हणजे काय ? दांपत्य धर्म म्हणजे काय?"

 

तेवढयात मी म्हणालो, "पुरुष किती ही स्त्रियां बरोबर विवाह करू शकतो पण स्त्रीला मात्र तो हक्क नाही." श्रीपाद प्रभू म्हणाले "ओहो ! तू जगन्नियंत्या पेक्षा मोठा आहेस का ? मंदोदरी पातिव्रत्याच्या गुणासाठी प्रसिध्द होती. ती वालिची पत्नी असताना तिचे शरिराणु वेगळे होते. रावणाची पत्नी असताना तिचे शरिराणु वेगळे होते. विभीषणाची पत्नी असतानाचे शरिराणु वेगळे होते. आत्मा निर्विकार असल्याने कोणत्याही गुणांशी त्याचा संगम नसतो म्हणूनच आत्मा नित्य निर्विकार, सत्ययुक्त शुध्द आणि अत्यंत पवित्र आहे. तमोगुणी रावणा बरोबर त्याला अनुसरूनच मंदोदरीने व्यवहार केला. विभीषणा बरोबर असताना तिने सत्वगुण प्रधान होऊन जवाबदारी पार पाडली."

 

मी निरूत्तर झालो. पण थोडा वेळ विचार करून म्हणालो, तुम्ही सांगितलेल्या गोष्टीचा स्वीकार केला तर बहु पतित्वास स्वीकारावे लागेल. यावर श्रीपाद म्हणाले, "हे कलियुग आहे. येथे किती तरी निरनिराळया अवांतर जातीचा आविर्भाव होत असतो. पशुपक्षी, वृक्ष , कृमी-कीटक मानवजन्मास येत आहेत. त्यांच्या त्यांच्या स्वभावानुसार निरनिराळी नाती जुळत आहेत. धर्मविरूध्द नाते जुळले असता अवांतर कुल निर्माण होते. कलियुगांतात अशा कुलांचा नाश होणारच. हे अवांतर कुल असुरी शक्तिमुळे निर्माण होते. त्या साठीच असुरध्वंस करावा लागतो. एकदा असुराचा ध्वंस झाला असता त्याला परत जन्म मिळत नाही. परंतु एका असुराच्या जागी दहा असुरांचा जन्म त्या स्थानात होऊ लागला आहे. धर्मबध्द संबंधच

कायमचे टिकुन राहातात या साठी संगळयांनी विधिने कुलगोत्र, वर्णाश्रम धर्माचे पालन करावे.

दिव्यात्म्याचा आविर्भाव तुरळकपणे होत असतो. त्यांना आत्मा एकच असतो. त्या आत्म्याचा पुरुषरूपात आविर्भाव झाल्यास, स्त्रीरूपात त्याच आत्म्याच्या शक्तीचा आविर्भाव होतो.

त्यांनाच दिव्यदंपत असे म्हणतात. असे दिव्यात्मे सृष्टींच्या आदिपासुन ते अंतापर्यंत असतात. पराशक्ति आणि परब्रह्म हेच अद्‌वितीय स्वरूपांत सायुज्य स्थितीत असतात." श्रीपाद प्रभू पुढे म्हणाले आता बघ, वेदांतशर्मा नावाचा तूच ब्राह्मण होतास. बंगारय्या नावाने चांभार कुलात जन्मला आहेस, हे सारे एका काळीच घडले. तुझीच स्त्री शक्ति तुझ्या तीन

पत्नी रूपाने चांभाराची स्त्री बंगारअम्मा नावाने जन्मली. नुकतीच तुमच्या घरी मरण पावलेली गाय एकेकाळी तुझी पत्नीच होती. तुझ्या दिवंगत पत्नीचे चैतन्य आणि त्या गोमातेचे चैतन्य प्रस्तुत बंगारम्मा या नावाच्या महान वनितेच्या चैतन्यात मिळून गेलेले आहे. चैतन्य हे जेथून येते तेथेच मूलचैतन्यात जाऊन मिळुन जाणे हे निश्चितच. सृष्टींचे रहस्य अती गहन आहे. हे समजण्यास सप्तऋषींची शक्ति सुध्दा अपुरी पडते.

बंगारअम्माचे शरीर बंगारअय्या साठीच नेमलेले आहे. यामुळे हे कांही धर्मविरूध्द नाही, तू तिच्या बरोबर संसार कर. तिच्याकडून तुला शरीर सौख्य मिळणार नाही. मी हा निर्णय धर्मस्थानात बसून केलेला आहे. प्रकृत्ती मध्ये

 

आल्यास प्रकृत्तीचा धर्म, मर्यादा यांचे पालन विधिवत करावेच लागते. आपल्या अंगावरचे कातडे काढून मला त्याची चप्पल शिऊन देते असे बंगारम्मा म्हणाली मी त्याला होकार दिला. ती बंगारम्मा जीवित असतानाच तिला नकळत तिने गाईचा जन्म घेतला. तिला माहीत नसताच ती तुझ्या तिन्ही बायकांच्या रूपात जन्मली. जेंव्हा चैतन्य तीन चार शरीरात विभाजित झाले. तेंव्हा त्या प्रत्येक शरीरातील चैतन्याला मीच आहे असा भाव होतो. त्यातील एकत्व लक्षात येत नाही. "कलौ पंचसहस्राणि जायते वर्णसंकर:" असे सांगितले गेले आहे. त्याचा अर्थ असा की कुलसांकर्य सांगितलेले नाही, वर्णसांकर्यच सांगितले गेले आहे. कुलसांकर्य झाल्यास नीच जन्मास जावे लागते. वर्णसांकर्य झाले असता. नूतन शक्तियुक्त अशा नवीन जाती उद्भवतात. त्याच्या परिणामत:

 

नवीन मानव जातीस दैवत्व लाभते. ह्या भूमीवर दैवत्त्व लाभलेल्या जाती उत्पन्न करावयाच्या आहेत.

या ब्राह्मण परिषदेचा खरा उद्देश मला माहीत आहे, माझ्या आजोबांना आणि वडीलांना कुलातून बहिष्कृत करण्याचे त्यांच्या मनात ठसून भरलेले आहे. म्हणूनच मी, वेदांतशर्माला कुलबहिष्कृत करीत आहे. आज पासून तुझे नांव बंगारय्या असे व्यवहारात येईल."

सगळीच परिषद बुचकळयात पडली. एक ज्योति स्वरूप सगळयांच्या देखतच माझ्या मध्ये विलीन झाली. तेंव्हाच श्रीपाद श्रीवल्लभ म्हणाले "तुमच्या डोळयासमोरच बंगारप्पाची आत्मज्योती वेदांतशर्मात विलीन झाली. हा ब्राह्मण आहे का

 

चांडाळ आहे. हा निर्णय तुमचा तुम्हीच करावा. आम्हाला कुलबहिष्कृत करून त्यासाठी शंकराचार्यांची सुध्दा अनुमती मिळविण्याचा प्रयत्न तुम्ही केलात. शंकराचार्य मला काय करतील ? तुमच्याच डोळयासमोर मी आजोबा कडून किंवा आमच्या वडिलांकडून वेदाभ्यास न करताच मी वेद उच्चारण करु शकतो. एकाच वेळी अनेक ठिकाणी दर्शन देऊ शकतो. शंकराचार्य माझ्या समोर आले तरी मला कशाची भीति ? त्यांना त्यांच्या नित्य आराधित शारदाचंद्र मौळीश्वर या रूपात दर्शन देऊन त्यांच्यावर अनुग्रह करीन. तेंव्हा तरी दुसरा कोणता मार्ग नसल्यामुळे माझा त्यांना देव म्हणून अंगीकार करावा लागेल. त्यांचा निर्णय तेंव्हा तुमच्या साठी दु:खप्रद होईल. क्षत्रिय परिषद, वैश्यपरिषद तुमच्या निर्णयाला सम्मती देणार नाहीत. पौरोहित्य, कर्मकांड, दान, शिधा, दक्षीणा जर त्यांनी

देण्याचे थांबविले तर लेकरा बाळांसह तुमची दीन अवस्थाच होईल. मजबरोबर जर भांडण केलेत तर सर्वनाशाचे मूळ कारण व्हाल. मी चतुराश्रमाचे धर्मपालन करावे असे सांगत आहे. अष्टदश वर्णाच्या लोकांनी सुख संतोषाने नांदावे असे सांगत आहे. तुम्ही आपआपल्या धर्माच्या नियमांचे अचुक पालन करून धर्मसंस्थापन करण्यात हातभार लावावा. तसे न केल्यास अनेक आपत्ती कोसळतील. मी तर शांतच रहाणार, पण तुमचीच परिस्थिती कष्टप्रद होईल. प्रकृतीचे परिणाम देण्याचे दोन प्रकार असतात. पहिला एकदम सुधार करणे आणि दुसरा म्हणजे सावकाश सुधार करविणे. दुसऱ्या पध्दती प्रमाणे वेळेचा अवधि पण दिला जाईल. तुम्ही जर आपल्यात सुधारणा केली नाही तर विनाशास आमंत्रित केल्यासारखेच होईल. मी विनाश करूनहि धर्मस्थापन करीन." एवढे बोलून

 

श्रीपाद प्रभूंनी मौन धारण केले. बंगारअप्पा पुढे म्हणाले, "मला कोठेच आधार नव्हता, त्या स्थितीत मी बंगारम्माला घेऊन गावोगाव फिरत येथे पोहोंचलो. आमच्या ह्या आश्रमांत मातंगी देवीची प्रतिष्ठा करून जीवन कंठीत आहे."

श्रीपाद श्रीवल्लभ या मार्गाने जाताना आमच्या या आश्रमांत आले. आम्हाला त्यांनी आशिर्वाद दिला आणि ते म्हणाले. "तुझ्या शरीरपातानंतर तू परत ऋणानुबंधाने ब्राह्मण कुलात जन्म घेशील, आणि बंगारम्मा शूद्रजातीत जन्मेल. तेंव्हा तुम्ही दोघे पति-पत्नि व्हाल, तुम्हाला संतान पण होईल. त्या संतानास कुरुगड्डीत माझी सेवा करण्याची संधी लाभेल, सुखीभव !"

बाबा ! हाच आमचा वृतांत आहे. आपण या प्रातांत याल, तुमच्या जवळ त्यांचे पैंजण आहेत. ते पैंजण घेऊन, तुम्हाला चर्मपादुका द्याव्यात असा मला त्यांचा आदेश आहे.

आम्ही मातंग मुनींची कन्या मातंगी देवीचे आराधक आहोत. ह्या आईची आराधना केल्यास दांपत्यसौख्य चांगले लाभते. हिला राजमातंगी कर्णमातंगी वगैरे नावांनी संबोधतात. एकदा श्रीपाद श्रीवल्लभांनी भौतिक स्वरूपात या आश्रमांत दर्शन दिले. त्या वेळी बंगारम्मा दूध गरम करीत होती. ज्या गोमातेच्या कातडयानी ह्या पादुका बनल्या, ती गोमाता सुध्दा मान हालवित समोरून गेल्याने तिला दर्शन झाले. श्रीपादांनी आमच्या कडून दूध स्वीकारले.

आम्ही पूजलेली मातंगदेवीची मूर्ती, तिच्या नावाने स्थापिलेल्या संस्थानांतील औदुंबरवृक्षाच्या खाली अनेक गजापर्यंत खोलवर जाईल, आणि तेथे अनेक सिध्दपुरुषांकडून तिची सेवा होईल. ते बंगारम्माला बोलावून म्हणाले, "बाई ! तुझा पति खूप अनुकूल आहे. पुढच्या जन्मी याच्याकडून तुला सर्व सुख लाभेल. तुझ्यासाठी सोन्याची बिंदी तयार करून ठेवली आहे. तसेच अत्यंत शुभप्रद असे मंगळसूत्र पण तयार केलेले आहे. हे दोन्ही हिरण्यलोकांत व्यवस्थितपणे ठेवले आहेत. उत्तर जन्मांत मी स्वत:च तुमच्यावर कृपा करून स्वहस्ताने तुमचा विवाह करवीन." एवढे बोलून श्रीपाद प्रभू अंतर्धान पावले बाबांनो ! तुम्ही आमची गाथा ऐकलीत. नेहमी सिध्द मंगलस्तोत्राचे पठन करीत रहावे, तुम्हाला महापुरुषांचा अनुग्रह नक्की प्राप्त होईल. सिध्द, महासिध्द, महायोगी

 

हे श्रीपादांचे करचराणावयवासारखेच होय, त्यांच्या कडूनच श्रीपाद प्रभू आपल्या संकल्पांची पूर्ति करतात. एकदा त्यांनी राजमाता मातंगीदेवीच्या रूपांत दर्शन देऊन आम्हास अनुग्रहीत केले. समस्तसृष्टी , तसेच सृष्टीचे रहस्य हे सगळे त्यांच्याच हातात असते. तुम्ही सदा सर्वदा त्यांचे स्मरण करा, ध्यान करा, अर्चना करा. सर्वसिध्द तेच आहेत. माते प्रमाणे ते तुमची रक्षा करतील. कोटयावधी आईच्या प्रेमापेक्षा श्रीपादांचे आपल्या भक्तावरील प्रेम कितीतरी उच्चकोटीचे असते.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

# अध्याय -37

## छिन्नमस्तादेवीचे वर्णन

बंगारय्या व बंगारम्मा यांचा निरोप घेऊन, त्यांनी दिलेल्या चर्मपादुका घेऊन आम्ही प्रवासास प्रारंभ केला. आम्ही एका अरण्यातून चाललो होतो. जाता जाता एका वटवृक्षाखाली विश्रांतीसाठी थांबलो. तेवढयातच काही योगिनीगणांचा घोळका तेथे आला. त्यांनी आम्हाला पाहून म्हटले, "आता सायं संध्येची वेळ आहे. यावेळी आपण या प्रातांत येऊच नये. येथे आम्ही छिन्नमस्तादेवीची पूजा करणार आहोत. ही फार रहस्यमय देवता आहे. येथे पुरुषांना प्रवेश नाही. एवढेच नव्हे तर ही दैवभूमी आहे. येथे आलेला कोणी ही जीवंत

 

बाहेर पडत नाही हे ऐकून आमच्या पायाखालची जमीन सरकत असल्याचा भास झाला. त्याच वेळी एका तेजोमयी योगिनी मातेचे तेथे आगमन झाले. तिचे नेत्र अग्नि सारखे लाल होते. तिच्या बरोबर आलेल्या योगिनींनी एका टोपलीत छिन्नमस्तादेवीला ठेऊन बरोबर आणले होते." तेंव्हा ती योगिनी माता म्हणाली, "यांना नेसायला साडी आणि चोळी द्या." तिच्या म्हणण्याप्रमाणे आम्हाला वस्त्रे दिली आणि आमच्या वस्त्रांना तेथे प्रज्वलित केलेल्या अग्नि कुंडात घातले गेले.

आम्ही साडीचोळी नेसल्यावर आमच्या शरीरात आम्हाला बदल वाटला. आमचे पुरुषत्व नष्ट होऊ लागले. उरोज पुष्ट झाले, सारे पुरुषत्व नष्ट होऊन स्त्रीरूप प्राप्त झाले. आमचे नांव नविन प्रकाराने ठेवण्यात आले. माझे नांव शंकरम्मा आणि धर्मगुप्ताचे नांव धर्मम्मा असे ठेवण्यात आले. आम्हाला भोजनार्थ

 

मांस पदार्थ दिले गेले. पिण्यास मदिरा दिली गेली. दिवसा माणसाप्रमाणे आणि रात्रीच्या वेळी मोठ्या वाघाप्रमाणे संचार करणाऱ्या वाघाबद्दल आम्ही बरेच ऐकले होते. परंतु या प्रमाणे देवता पूजा असते किंवा योगीजन केवळ संकल्पाने पुरुषाला स्त्री रूपात बदलू शकतात असे आम्हास स्वप्नात सुध्दा वाटले नव्हते. आम्हाला भयग्रस्त करून नृत्य करविण्यात आले. तेवढयात योगिनी माता म्हणाली "कबंध मुनि हे परिवर्तनशील जगताचे अधिपति आहेत. परिवर्तन शक्तिलाच "छिन्नमस्ता देवी" असे म्हणतात. या जगतात वृध्दि आणि क्षय सर्वदा चालूच असतो. क्षीणत्व कमी झालेल्या वेळी विकासाचा स्तर आपोआप वाढतो त्यावेळी भुवनेश्वरी देवीचे प्रागटय होते. या उलट क्षीणत्व अधिक होऊन विकास वृध्दि कमी झाल्यास"छिन्नमस्ता देवीचे प्राधान्य असते. या महामातेचे स्वरूप अत्यंत रहस्यमय आहे. एके वेळी पार्वती देवी आपल्या सखीबरोबर मंदाकिनी नदीवर

स्नानासाठी गेली होती. स्नान झाल्यावर दोन्ही सखींना खूप भूक लागली त्यामुळे त्या कृष्णवर्णा झाल्या. भोजनाची याचना केली तेंव्हा पार्वती देवीने थोडे थांबण्यास सांगण्यात आले.

थोडा वेळ झाल्यावर सखींने पुन्हा एकदा जेवणाची मागणी केली. या वेळी सुध्दा तिला थोडे थांबण्यास सांगण्यात आले. असे अनेक वेळा झाले तेंव्हा मात्र पार्वती देवीने आपल्या खड्गाने मस्तक तोडून टाकले. त्यावेळी कंठातून रक्ताच्या तीन धारा वाहू लागल्या. दोन धारा तिने दोघी सखींना पिण्यास दिल्या आणि एका धारेचे स्वत: प्राशन केले. मस्तक छेदन केल्यामुळे तिला छिन्नमस्ता म्हणतात.

अर्धरात्री केलेली छिन्नमस्तादेवीची उपासना फार चांगले फळ देते. शत्रूवर विजय मिळविण्यासाठी, शत्रुच्या

समूहाला थांबवून ठेवण्यासाठी, राज्य प्राप्तिसाठी, दुर्लभ अशा मोक्ष प्राप्तिसाठी तिची उपासना अत्यंत फलदायी ठरते . चारी दिशा या महामायेची वस्त्रे आहेत. तिच्या नाभीस्थानात योनिचक्र असते. कृष्ण म्हणजे तामस गुण आणि रक्तवर्ण म्हणजे राजस गुण. या दोन्ही गुणांनी युक्त अशा सखी तिच्या बरोबर सतत असतात. तिने आपले शिर खंडन केले तरी सुध्दा ती सजीवच राहिली याचा योग भाषेत असा अर्थ होतो की ती परिपूर्ण अंतर्मुखत्वाचे प्रतिक आहे. अग्निस्थान असलेल्या मणिपूर केंद्रात छिन्नमस्तादेवीचे ध्यान योगीजन करीत असतात. ही हिरण्यकश्यपूची उपास्य देवता आहे. आम्हाला हा एक भयभीत करणारा आणि विचित्र असा अनुभव होता. इतक्यात अर्धरात्रीची वेळ झाली. चित्र-विचित्र अशा प्राण्यांचे आवाज येऊ लागले. यात प्रामुख्याने वाघाच्या डरकाळयांनी आमचा थरकाप झाला. वाघाच्या आवाजाने तो शांत असलेला असमंत एकदम दणाणून जात होता. दोन चांगल्या स्त्रियांचा

बळी मिळाला असे योगिनी गणांना वाटले. त्यांच्या सांनिध्यात असलेल्या आम्हा दोघांचा वध करणे अत्यंत श्रेयस्कर आहे असे त्यांना वाटले. आमच्या डोक्याला त्यांनी कडुलिंबाची पाने बांधली. कपाळावर मोठा कुंकवाचा टिळा लावला. चांगल्या धारदार चाकूने आमचा शिरच्छेद करण्यात आला. रक्ताच्या धारा वाहू लागल्या त्या पाहून योगिनी गणांना आनंद झाला. मदोन्मत्त होऊन त्या रक्तपान करू लागल्या. आमची शिरे एका बाजूस आणि धड एका बाजूस टाकण्यात आले. तरी सुध्दा आम्ही सजीवच असल्या प्रमाणे वाटत होतो. शरीराचा दाह मात्र असहनीय होता. त्या योगिनी गणांच्या क्रूर आणि अत्यंत हीन अशा क्षुद्र विद्येला आम्ही बळी पडलो होतो.

तेवढयात आम्हास गाढ झोप लागली. त्या निद्रा अवस्थेत आम्हाला अस्पष्ट अशा आकाशात असलेला प्रकाशाचा एक झोत दिसला. तो प्रकाश आम्हास जवळ

येणाऱ्या काळाप्रमाणे योगिनी गणाच्या वाऱ्यात मिसळून गेल्या प्रमाणे वाटला. आमची शिरे पुन्हा आमच्या धडांना येऊन चिटकली असे वाटले. आम्ही नेहमी प्रमाणे झोपेतून जागे झालो. आमच्या अंगावर साडी, चोळी होती. नंतर आमची स्त्री लक्षणे हळू हळू लोप पावू लागली. आणि पुरुष लक्षणे स्पष्ट होऊ लागली. रात्रीच्या अग्नीमध्ये आमची स्त्री वस्त्रे दग्ध होऊन आता त्या ठिकाणी नवीन पुरुष वस्त्रे आली. स्नानादी करून आम्ही ती नवीन वस्त्रे धारण केली. एवढयात एक वाटसरू आमच्या मध्ये येऊन मिळाला. तो आम्हास म्हणाला "मित्रानो, काल रात्री तुम्ही पाहिली ती एक प्रकारची योग प्रक्रिया आहे. तुमच्या शरिरातील 'स्त्री' तत्त्व अत्यंत शुध्द करण्यात आले. प्रत्येक शरीरात स्त्री आणि पुरुष तत्त्व अशी दोन्ही तत्त्वे असतात. या दोन्ही तत्त्वांची शुध्दी झाल्याशिवाय योगशक्ति , विश्वचैतन्यातून प्रवाहित होत नाही. तुमच्यातील विश्वचैतन्यातून आवश्यक तेवढी शक्ति

प्रवाहित होत आहे. आत्म्याला स्त्री, पुरुष असा भेद नसतो. तो या दोन्ही तत्त्वांच्या आधाराच्या अतीत आहे."

तुम्ही श्रीपाद श्रीवल्लभांच्या दयेने योगिनी गणांच्या असाधारण योग प्रक्रियेने अनुपमेय अशी करूणा प्राप्त करून घ्याल. कितीही प्रयत्न केले तरी प्राप्त न होणारी अशी सुषुम्नामार्गाची तुम्हाला ओळख झाली. यापेक्षा महान भाग्य ते कोणते ? एवढे महाभाग्य प्राप्त होण्याचे कारण म्हणजे तुमच्या जवळ असलेल्या श्रीपादप्रभूंच्या चर्मपादुकाच होत. चर्म देहातील चैतन्यातून निघून तुम्ही चैतन्य प्रवाहरूप असलेल्या दिव्यत्वाच्या अनुसंधानात आहात. श्रीपाद प्रभूंच्या दिव्य लीला ते स्वतःच जाणतात. त्या इतर सर्वांसाठी अति अगम्य, अद्भूत आणि चमत्कारपूर्ण असतात.

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -38

## बगळामुखी देवीच्या आराधनेचे विवरण

आम्ही पीठिकापुरमला जात असतांना एक बैरागी भेटला. तो एका पिंपळाच्या झाडाखाली बसला होता. त्याचे डोळे तेजस्वी दिसत होते. आम्हाला पहाताच त्या बैराग्याने विचारले, "तुमची नावे शंकरभट्ट आणि धर्मगुप्त अशी आहेत ना ?" आम्ही होकारार्थी मान हालविली. तो पुढे म्हणाला, "या पिंपळाच्या झाडाखाली थोडावेळ विश्रांती घ्या.

तुमच्याकडे श्रीपाद प्रभूसाठी चर्मपादुका आहेत ना, त्या मला द्या आणि माझ्याकडील कालनाग मणी स्वीकारा.

आम्ही त्याच्या विनंतीस मान्यता दिली आणि चर्मपादुका देऊन तो दिव्य मणी ठेवून घेतला.

मी त्या बैराग्यास म्हणालो "अहो महाराज ! मी श्रीपादप्रभूंच्या दिव्य चरित्र लेखनाचा संकल्प केला आहे. त्यांच्या जीवनात घडलेल्या प्रत्येक वर्षीच्या घटना श्रीपाद प्रभूंचा भक्ताला वर्णन करून सांगतो. या लीलांचे श्रवण करून ते भवसागर सहजपणे तरून जातात. या सर्वासाठी मी केवळ एक निमित्तमात्र आहे." यावर तो बैरागी म्हणाला, "श्रीपाद श्रीवल्लभ हे आदिभैरव व आदिभैरवी यांचे संयुक्त स्वरूप आहेत. कालावर शासन करणारे कालभैरव सुध्दा तेच आहेत. ते कालस्वरूप असून कालपुरुष हा त्यांच्या पेक्षा भिन्न नाही. महाकाल स्वरूप सुध्दा तेच आहेत. कोणत्या वेळी कोणती घटना घडेल याचे संपूर्ण ज्ञान त्यांनाच असते. त्यामुळे अव्यक्त रूपात असलेले श्रीपाद श्रीवल्लभांचे संकल्प स्वरूप कोणत्याही देश कालाने बंदिस्त

असणाऱ्या जिवाला समजणे शक्य नसते. देश-काला बरोबर क्रीडा, जीवांचा विकास, धर्म, कर्म यांचे फलित आणि त्यांचा प्रभाव संपूर्णपणे श्रीपाद प्रभूंच्या आधिन असतो. ज्ञान नसताना अहंकाराने स्वत:ला महापंडित समजणाऱ्या लोकांचा गर्व ते तत्काळ हरण करून त्याना अहंकार रहित करतात. तसेच विनयी, नम्र परंतु ज्ञानाचा अभाव असणाऱ्या साधकांना ते आपल्या कृपा दृष्टीने पंडित करू शकतात. त्यांचा हा योगसंपन्न अवतार आहे. ते अवतारी पुरुष असून प्रत्यक्ष श्रीदत्तात्रेयांचे अवतार आहेत हे समजण्यासाठी आपल्या पापराशी जळून दग्ध व्हाव्या लागतात आणि पुण्य राशींचा संचय व्हावा लागतो. असा सर्व साधारण नियम आहे. त्यांचा कृपाकटाक्ष झाल्यास हा साधारण नियम दूर सारून ते भक्तांचे रक्षण करतात. ते क्षणोक्षणी लीला विहारी आहेत. श्रीपाद प्रभूंच्या चरित्राचे पारायण करणाऱ्या साधकांचा एका क्रमबध्द पध्दतीने विकास होतो. त्यांच्या जीवनातील प्रत्येक वर्षात घडलेल्या एक

 

किंवा दोन दिव्य लीला साधकांना समजू शकतात. या क्रमा क्रमाने समजाव्या हा सुध्दा त्या दिव्य लीलांचा अंतर्भाग आहे. श्रीपाद प्रभूंनी केवळ एकाच देशाच्या किंवा एकाच प्रांताच्या लोकांच्या उध्दारासाठी अवतार घेतला नाही.

अनेक कोटी ब्रह्मांड प्रति क्षणी निर्माण, स्थिति आणि लय पावत असतात. त्यांच्यातील परिणाम क्रम सुध्दा श्रीपाद प्रभूंच्या अधिकारात असतो. त्यांच्या दिव्य नेत्र गोलकात कोटयावधि ब्रह्मांडाची वृद्धी आणि क्षय होत असतो. हेच त्यांचे निजतत्व स्वरूप आहे. त्यांचे निराकार स्वरूप म्हणजेच परतत्व होय. अव्यक्त स्वरूपात असलेले त्यांचे रूप कोणीच जाणू शकत नाही. त्यांचे महातत्व साकार रूपात पीठिकापुरत अवतरीत होणे हीच त्यांची एक दिव्य लीला आहे. श्रीपाद प्रभूंच्या लीला अत्यंत अद्भूत आणि अनाकलनीय आहेत. त्या लीलांना अंत नाही. वेद सुध्दा त्यांचे वर्णन

करताना मौन झाले. श्रीपाद प्रभूंचा जन्म अनंत आहे. वेदातील ज्ञान परिमित आहे परंतु श्रीपादांचे ज्ञान, दिव्य शक्ति आणि करूणा अनंत आहे. ते सर्व देशात, सर्व काळात स्थित असतात. सत्याचे सत्य, ज्ञानाचे ज्ञान आणि अनंताला सुध्दा न कळणारे त्यांचे महा अनंत स्वरूप आहे.

## बगलामुखी देवीची उपासना

बैरागी म्हणाला, मी वास्तविक पहाता बंगाल देशाचा रहिवासी आहे. मी बगलामुखी देवीची आराधना करतो. ही देवी दशमहाविद्यां पैकी एक आहे. शत्रूंचा नाश इच्छिणाऱ्यांनी या बगलादेवीची आराधना करावी. सर्व रूपातील परमेश्वराची संहार शक्ति बगलादेवीच आहे. या देवीची आराधना केल्याने वाकसिध्दि प्राप्त होते. मनोवाक्य आणि कर्ममूल या दोघांच्या ऐक्य भावाने

धर्मबध्द जीवन जगणाऱ्या लोकांनी उच्चारलेले प्रत्येक वाक्य खरेच मानले जाते. वाक्याला सुध्दा परा, पश्यंति, मध्यमा असे भेद असतात."

सत्ययुगात सर्व जगताचा नाश करणारे एक भयंकर वादळ आले होते. पृथ्वीवरील आलेल्या या संकटाने विष्णु भगवान चिंतित झाले होते. त्यानी तेंव्हा तपस्या करण्यास आरंभ केला. त्यावेळी विद्या महादेवी बगलामुखी रूप घेऊन अवतरली. श्रीमन् नारायणांना दर्शन देऊन तिने ते सृष्टींचा विध्वंस करणारे वादळ थांबविले. या देवीला कांही लोक वैष्णवी देवी असे सुध्दा मानतात. मंगळवारी चतुर्दशीच्या अर्धरात्रीच्या वेळी ही प्रकट झाली. ही स्तंभन शक्ति रूपिणी आहे. तिच्या मुळेच सूर्यमंडळ स्थित आहे. तसेच स्वर्गसुध्दा स्थित आहे. इहलोक आणि परलोकातील सर्व सुखे ही देवी कृपेने आपल्या भक्तांना प्रदान करते. साधकांच्या जीवनात हलकल्लोळ माजविणाऱ्या दुष्ट शक्ति आणि

अंधशक्तींचे ही देवी निर्मूलन करून प्रगतीचे अभयदान देते. बगलामुखी देवीस "वडवामुखी" "जातवेदमुखी" "उल्कामुखी" "ज्वालामुखी" "बृहद्भानु मुखी" अशा नांवाने सुध्दा संबोधिले जाते. सर्वप्रथम ब्रह्मदेवाने बगला महाविद्योपासना केली. या देवीने ब्रह्मदेवांस बालरूपात दर्शन दिले. तिरुपती तिरुमलै या क्षेत्रात त्यांनी तिची अर्चना केली. या देवीच्या मूर्तीची. वेंकटेश्वर, पद्मावतीच्या मूर्ती समवेत ब्रह्मोत्सवाच्या मंगल समयी अर्चना केली जाते. ह्या महाविद्येचा ब्रह्मदेवांनी सनकादिक ऋषींना उपदेश केला होता. ब्रह्मानंतर या देवीची उपासना भगवान विष्णूंनी केली होती. भगवान परशुरामाने सुध्दा आपल्या शत्रूंचा नाश करण्यासाठी या देवीची उपासना केली होती. मी तीर्थयात्रा करीत असता पीठिकापुरमला येऊन पोहोचलो. श्री कुक्कुटेश्वराच्या देवस्थानात अर्चना केली. त्यानंतर अत्यंत मधुर बोलणाऱ्या एका सुंदर बालकास पाहिले. तो बालक मला म्हणाला "हे महोदया ! आपण बंगाल देशातून आला

 

आहात हे मला माहित आहे. मी बऱ्याच काळापासून आतापर्यंत या मंदिरात स्वयंभू दत्तात्रेयांच्या रूपात या स्थानी स्थित आहे. माझी लवकरात लवकर एका अर्चकाकडून नित्य पूजा करण्याची व्यवस्था करा". त्या बालकाच्या सांगण्यानुसार एका उत्तम ब्राह्मणाद्वारे अर्चना करवून त्यांचा यथोचित बहुमान करण्यात आला. त्या अर्चकाचे नाव कलवर असे होते. त्याने कुक्कुटेश्वर आणि स्वयंभू दत्तात्रेय या दोन्ही देवतांची मनोभावाने, कष्टांची तमा न बाळगता आराधना केली होती. त्याला यासाठी भरपूर दक्षिणा व स्वयपाकासाठी दक्षिणा दिली होती. ती त्याने घरी नेऊन पेटीत ठेवली आणि आश्चर्य असे की सकाळ पर्यंत ती अदृश्य झाली होती. स्वयंपाकातील सारे पदार्थ अदृश्य झाले होते परंतु तेथील ब्राह्मणांची पोटे रोजच्या पेक्षा, दुप्पट तिप्पटीने भरली असल्याचा त्यांना अनुभव येत होता. या मुळे ते सुस्त होऊन आळसावले होते. सुस्ती येणे, धन-दक्षिणा स्वयंपाक अदृश्य होणे हा सर्वसामान्याना अनाकलनीय

विषय होता. कलवर एक निष्ठावंत, नियम निष्ठ, वेद-शास्त्र जाणणारा आणि त्याचा प्रचार करणारा अर्चक होता. परंतु यक्षिणींच्या प्रभावामुळे तो अत्यंत क्षीण झाला होता. या मुळे त्याची स्थिती लाजिरवाणी झाली होती. परंतु सर्व ब्राह्मण या बद्दल चर्चा न करता मौन राहात.

एकदा एक बैरागी साधू कुक्कुटेश्वराच्या मंदिरात मच्छिंत पडला. परंतु त्याच्या काहीच हालचाली होत नसल्याचे पाहून लोकांनी तो मृत झाला असल्याचे अनुमान केले. थोडयाच वेळात त्याला श्रीपाद प्रभूंचे आजोबा श्रीबापनार्युलु यांच्याकडे नेले. त्यानी त्या साधूची परिक्षा करून सांगितले की तो मृत झाला नाही अथवा मूच्छित पडलेला नाही तो समाधी अवस्थेत आहे. परंतु लोकांनी बापनार्युलूंचे म्हणणे ऐकले नाही व ते त्या बैराग्यास दहन करण्यास घेऊन गेले. आश्चर्य असे की श्रीपाद प्रभूंच्या कृपा प्रसादाने त्याला अग्नि

 

जाळू शकला नाही. तो समाधीतून जागा झाला आणि चितेवरून खाली उतरून आला. आठ दिवसातच तो साधू पूर्वी सारखा स्वस्थ झाला. यानंतर त्याला गावातील ब्राह्मण समाजाने भिक्षा देण्याचे नाकारले त्यामुळे त्याला नाइलाजाने गवळयाच्या घरी राहावे लागले. तेथे त्याच्या भिक्षेची सोय झाली. कुल, जाती, वर्ण यांचा भेदभाव न ठेवणारा तो साधू गवळी समाजात अत्यंत लोकप्रिय झाला होता. त्या ग्वाल समाजात एक युवती होती तिचे नांव लक्ष्मी असे होते. बालपणीच तिला वैधव्य प्राप्त झाले होते. तिचा पति तिच्याशी अत्यंत प्रेमाने वागत असे. तो सर्व गवळयांचा आवडता होता. त्या समाजात त्यास श्रेष्ठत्व प्राप्त झाले होते. गवळी लोकातील तंटे बखेडे तो आपल्या कुशाग्र बुध्दीने तत्काळ सोडवून उत्तम निर्णय देत असे. त्याच्या लहान वयाकडे न पहाता लोकांनी त्याला नेता निवडले होते. त्याची पत्नि लक्ष्मी मोठी पतिव्रता स्त्री होती. त्यावेळी श्री वेंकटप्पय्या श्रेष्ठींची गाय

 

हरविली असल्याने, श्रेष्ठींच्या घरी लक्ष्मी दूध आणून देत असे. श्रीपाद प्रभू श्रेष्ठींच्या घरी नेहमी जात असत. ते आजीला भूक लागली असे म्हणताच महालक्ष्मी समान असलेली वेंकट सुब्बम्मा श्रीपादांना गरम दूध आणून देत असे.

एवढेच नव्हे तर ती श्रीपादांना मोठ्या प्रेमाने साय, लोणी सुध्दा देई. एकदा लक्ष्मी गवळण दूध घेऊन आलेली असताना श्रीपाद प्रभू तेथे होते. ते "मला खूप भूक लागली आहे" असे म्हणू लागले. त्यावेळी वेंकट सुब्बम्माने लक्ष्मीस अजून दूध आणून देण्यास सांगितले. तिने आपल्या घरातील स्वत:साठी ठेवलेले दूध सुध्दा आणून दिले आणि स्वत: ताकावर काम भागविले. कुक्कुटेश्वराच्या मंदिरात दहा दिवस एक उत्सव चालू होता. यात ब्राह्मणांना यथोचित दक्षिणा, संभावना दिली जात होती. यामुळे यक्षिणीचा प्रभाव थोडा कमी झाला होता परंतु अजून सुध्दा ब्राह्मण

 

भोजनासाठी केलेली पाक सामुग्री अदृश्य होत होती. यामुळे ब्राह्मणांना वेळेवर अन्न न मिळाल्याने ते क्षीण होत होते.

## पुराण सांगणाऱ्या पंडिताची कथा

पीठिकापुरम गावात एक पुराण सांगणारा पंडित आला होता. कुक्कुटेश्वर मंदिराच्या बाहेरील प्रांगणात प्रवचनाची व्यवस्था करण्यात आली होती. पुराण श्रवणासाठी गावातील सर्व जातीचे लोक येत असत. पुराण सांगणाऱ्या पंडिताच्या जेवणाची व्यवस्था बापनाचार्युलु यांनी आपल्या घरी केली होती. पुराण कथन करण्यापूर्वी तो पुराणीक लक्ष्मी गवळणीने आणलेले दूध घेत असे. श्रीपाद प्रभू सर्व हृदयांतर्यामी असल्याने त्यांना या पंडिताबद्दल सर्व काही ज्ञात होते. हा पुराणीक महान पंडित आणि महान योगी होता. तो

आपल्या योगशक्तीने त्याच्या आत्म्याने धारण केलेली पूर्वीची रूपे ओळखू शकत असे. त्या रूपातील चैतन्य तो आकर्षण करून घेत असे. दूध देणाऱ्या लक्ष्मीस तो योगदृष्टीने पहात असे. लक्ष्मीच्या पतीच्या रूपात सुध्दा त्या पंडिताला स्वत:चा आत्मा दिसत असे. लक्ष्मीचा पती मृत्युनंतर एका ब्राह्मण जमीनदाराच्या घरी बालरूपात जन्मला होता. त्या वेळी तो चार-पाच महिन्यांचा होता. पुराण पंडिताने योगशक्तीने आपले शक्ति रूप कसे आहे ते पाहिले. त्याचे मूल रूप स्त्रीसमान लक्ष्मीशी निगडित होते. हे त्यास कळाले. त्याचे स्वरूप स्त्रीतत्त्वाच्या लक्ष्मीशी विलीन होऊन राहिलेले त्याने पाहिले. आपले पुरुषतत्त्व चार महिन्याच्या बालकात असल्याचे आणि थोडेच दिवसात आपले कर्मशेष पूर्ण झाल्यासारखे जाणवले. पीठिकापुरम् मधील कर्मऋणानुबंध पूर्ण करण्यासाठी त्याने पुराण पंडिताचे रूप धारण केले होते. लक्ष्मीचे तिच्या पतीवर अनन्य साधारण प्रेम होते. तिच्या पतीचे चैतन्य भूत

 

कालातील शरीर सोडून येणार नाही हे तिला कळले होते. लक्ष्मीच्या पतीचे चैतन्य मूल तत्व पुराण पंडितात विलीन झाले होते हा विषय सर्वज्ञानी श्रीपाद प्रभूंना माहित होता. श्रीपाद प्रभू त्या पुराण पंडितला म्हणाले "अरे पंडिता, ही लक्ष्मी निरागस आहे. ती कांही दिवसातच आपली जीवन यात्रा संपविणार आहे. ती मृत झाल्यावर तिची काय गती होईल ? तू ज्ञानरूप ब्राह्मण होशील. किंवा अज्ञान रूपात गवळी होशील. त्या तुझ्या रूपात लक्ष्मी तुला तुझ्या कष्ट / सुखात साथ देईल. तिच्या प्रेमाने तिने आपल्या पतीचे चैतन्य स्वत:कडे आकर्षिले आहे. गवळणीच्या रूपात असलेले चैतन्य थोडया दिवसांनी शरीराचे पतन झाल्यावर ब्राह्मण चैतन्यात मिसळणार ना ? ही गवळणीच्या रूपात असलेली ब्राह्मण स्त्री आहे. तू ब्राह्मण रूपातील गवळी आहेस. तुमचे कर्म संबंध मला उत्तम रीतीने माहित आहेत. भविष्य काळात ब्राह्मणी स्वरूपात येणाऱ्या या लक्ष्मीला पद्मावती देवी स्वरूप मानून मी

 

तिला सुवर्ण तिलक लावून आशिर्वाद देईन. तिला मांगल्य प्रदान करून हिरण्य लोकांत सुरक्षित ठेवीन . पुढील जन्मात तुम्ही आदर्श दंपती व्हाल. आणि माझे भक्त होऊन उध्दरून जाल."

एवढे बोलून श्रीपाद प्रभू थांबले. त्यांच्या लीला अति अगम्य, अद्भूत असतात.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -39

## नागेंद्र शास्त्रींबरोबर

मी कालनाग मण्याचा स्वीकार करून प्रवासाला सुरवात केली. श्री पीठिकापुरम क्षेत्रास केंव्हा पोहचेन अशी मनाला तीव्र ओढ लागली होती.

## कालनागाचे स्वरूप

प्रवासात असतांना आम्ही एका ब्राह्मणाचे आदरातिथ्य स्वीकारले. त्या ब्राह्मणाचे नांव नागेंद्रशास्त्री असे होते. तो मंत्रशास्त्रविद्येत अत्यंत निपुण होता. त्याच्या घरात

अनेक नाग, साप निर्भयपणे फिरत होते. ते कोणाला चावत नसत. नागेंद्रशास्त्री या नाग, सर्पांना आपल्या अपत्या प्रमाणे संभाळीत असत. ते त्यांच्या अंगाखांद्यावर खेळत असत. दिव्य नागांना मणी असतो. अनेक वर्षापासून तो ब्राह्मण नागोपासना करीत असे. त्याने "कालनाग" नावाचा मणी पूजेसाठी प्राप्त व्हावा म्हणून नागदेवतेची अखंड आराधना केली होती.

## नाग मण्याचा प्रभाव

नागेंद्रशास्त्री आम्हास म्हणाला "हे बंधूनो, आजचा दिवस अत्यंत शुभदिवस आहे. आपल्या सारख्या थोर व्यक्तींचे चरण कमल माझ्या या कुटित विसावले. मी पंधरा वर्षाचा असताना श्रीपाद प्रभूंच्या दर्शनास गेलो होतो. पीठिकापुरम क्षेत्रातील कुक्कुटेश्वराचे मंदिर आणि पादगया क्षेत्राचे दर्शन घेतले. मंदिरातील स्वयंभू

 

दत्तात्रेयांच्या मूर्ती जवळ एक कालनाग पाहिला. त्यांच्या फणीवर एक मणी होता. कालावर शासन करणाऱ्या नागास कालनाग असे म्हणतात. कालनागाच्या फण्यावर मणी असून तो महर्षि प्रमाणे निरंतर योग ध्यानात मग्न असतो.

मानवांनाच नव्हे तर नागांना सुध्दा वेगवेगळया स्थिती असतात. साधारणपणे कालनाग मानवाला दिसत नाही. कालनागाच्या फण्यावर असलेल्या मण्यामध्ये मंगळ ग्रहापासून येणाऱ्या अशुभ स्पंदनांना निवारण करण्याची शक्ति असते. या नागमण्यामुळे अशुभ स्पंदनांचा लय होऊन शुभप्रद स्पंदने प्रस्फुटित होतात. त्या मंगलमयी स्पंदनाने मंगळ ग्रहाच्या पीडितांना त्यांच्या पीडा नष्ट होऊन शुभफल प्राप्त होते. मंगळ ग्रह पत्रिकेत योग्य स्थानी नसेल तर जीवनात अनेक अडचणी येतात. जसे घरच्या लोकांचा विरोध, बांधवांचा, मित्रांचा विरोध, ऋण, बाधा, कन्येच्या विवाहास विनाकारण विलंब, कोणत्याही

कामात समर्थता असून सुध्दा यशप्राप्ति न होणे इत्यादी. स्वयंभू दत्तात्रेयांचे दर्शन घेतल्यावर मला नागमणी मिळावा अशी अत्यंत तीव्र इच्छा लागून राहिली. तो मणी मिळाल्यास मला जीवनातील सर्व कांही मिळाल्या सारखे होईल."

## श्रीपाद प्रभूंच्या पादुकांचा महिमा नागदोष निवारणार्थ नियम

मी नरसिंह वर्माच्या घराजवळून जात होतो. श्रीपाद प्रभू त्यांच्या घराच्या समोरील अंगणात लीला विनोद करीत होते. त्या बरोबरच झाडांना पाणी घालणे सुध्दा चालू होते. श्री नरसिंह वर्मा झाडांना आळे करीत होते. त्यांच्या अंगणात एक औदुंबराचे झाड होते. त्याला चांगले पाणी मिळावे या साठी नरसिंह वर्मा त्या झाडास आळे करीत असताना त्यांच्या हातास श्रीपादांच्या पायाच्या ताम्र

पादुका लागल्या. त्या बारा वर्षाच्या मुलाच्या, सामुद्रिक शुभ लक्षणांनी युक्त अशा पादुका होत्या. तितक्यात नागेंद्रशास्त्रीची हाक कानावर आली. मी आश्चर्याने त्यांच्या जवळ गेलो. नरसिंह वर्मा त्या पादुकांना शुध्द जलाने व नंतर नारळाच्या जलाने धूत होते. त्या धुतल्यानंतर त्यांनी त्या श्रीपादांच्या पाद पद्माजवळ ठेवल्या . त्या पादुकांची पूजा करण्यासाठी वर्मा अत्यंत उत्सुक असल्याचे दिसत होते. परंतु श्रीपाद प्रभूंचा संकल्प काही वेगळाच होता. त्या पादुकांना त्यांनी मोठ्या प्रेमाने कुरवाळले. नागेंद्रांना एका पीठाची स्थापना करून या पादुकांची पूजा कर असे श्रीपादांनी सांगितले. ते म्हणाले, "नागेंद्र शास्त्री तू "कालनागा जवळ" असलेला मणी मिळावा म्हणून फार दिवसापासून वाट पहात होतास. मी तुझ्यावर प्रसन्न झालो आहे.

 

कालनाग ज्या दिव्य पादपद्माची आराधना करून त्याच्या दिव्य मण्याने ज्या स्वामींची पूजा करतो तो महास्वामी मीच आहे. या दिव्य पादुका माझ्याच आहेत. त्याचीच तू नित्यनेमाने पूजा अर्चना करीत जा. आधि-व्याधींनी पीडित जन तुझ्याकडे येतील. त्यांना तू या पादुकांचे तीर्थ दे. ते प्राशन करताच त्यांची व्याधींपासून सुटका होऊन ते त्वरीत शांत होतील." श्रीपाद प्रभूंनी नंतर नागदोष परिहारार्थ देण्यात येणाऱ्या दक्षिणेबद्दल सविस्तर विवेचन केले. आणि म्हणाले, "अहो नागेंद्रशास्त्री ! माझ्या या वचनांचे तुम्ही पालन करा. लोक कल्याणासाठीच नागशास्त्र विद्येचा उपयोग करा."

# दत्त आराधना करणाऱ्या भक्तांना मिळणारे विशेष फळ

श्रीपाद प्रभू म्हणाले "हे नागेंद्रशास्त्री ! कालांतराने शंकरभट्ट, धर्मगुप्त तुझ्याजवळ नक्की येतील. माझ्या दिव्य पादुकांमुळे तुला हवा असलेला दिव्य मणी नक्की प्राप्त होईल. तो पर्यंत तू माझ्या दिव्य पादुकांची आराधना नित्य नियमाने कर. शरीर धर्माचा सुध्दा एक काळ असतो तसेच मनाचा, प्राणाचा एक काळ असतो. परंतु आत्मा मात्र कालातीत आहे. त्या त्या ग्रह नक्षत्राप्रमाणे तो तो काळ असतो. वृद्धी किंवा क्षय काळा प्रमाणे होत असतात. अनेक ब्रह्मांडाचा जन्म होऊन त्यांची वृद्धी होते. कांही काळ त्यांची एक स्थिती असते नंतर ते सर्व लय पावतात हा अंत म्हणजे काल महिमाच आहे. या प्रकारचा काळस्वरूप ही माझ्या आधीन आहे. माझी आराधना करणाऱ्यांना काळपुरुष मी सर्वदा अनुकूल ठेवतो . भूत-प्रेत पिशाचादि महाशक्ति सुध्दा दत्त आराधना करणाऱ्या साधकांचे काही बिघडवू

 

शकत नाहीत. किंवा कांही वाईट करू शकत नाहीत. या सृष्टींत असलेल्या सर्व प्राण्यापेक्षा जास्त बलवान मीच आहे. माझ्याकडून बल प्राप्ति करून घेऊन जीवराशी वृध्दिंगत होतात. गर्वाने मदोन्मत्त झालेल्या मानवापासून मी माझे बळ काढून घेतो. गर्वाला, अहंकाराला आणि सर्व अनिष्ट स्वरूपांच्या घटनांना मीच कारणीभूत असतो. माझी आराधना करीत सर्वदा शांतीरूप होऊन राहणाऱ्यांना मी नित्यसंतुष्ट ठेवून आनंदरूप करतो."

त्या महापुरुषांनी माझी वर्माच्या घरी जेवणाची व्यवस्था केली होती. श्री वर्मा हे स्वत: अन्नदाते आहेत. दत्तात्रेयांना सुध्दा अन्नदानाची खूप आवड होती. कोणताही जीव भूकेला असल्यास त्यांना अत्यंत दया येत असे. ते त्याच्या जेवणाची व्यवस्था करीत. ते सर्वभूत हितकारी होते. मी महास्वामींची आज्ञा घेऊन निघालो होतो या स्थळी मी आश्रम उभारला होता. जो

कोणी माझ्या कडे येई त्याला मी वर्णाश्रम धर्म समजावून सांगत असे. श्रीपाद प्रभू मला म्हणाले "तुझी मंत्र शास्त्रविद्या चांगल्या कामासाठी उपयोगात आण. पीडितांची निरपेक्ष भावाने सेवा कर. लोकांनी स्वेच्छेने दिलले तेवढे धन स्वीकार कर. अधिक धनाची अपेक्षा करू नकोस."

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

# अध्याय -40

## भास्कर शास्त्रीं,शंकरभट्ट आणि धर्मगुप्त यांचे अनुभव

आम्ही अनेक प्रकारच्या वाहनातून प्रवास करीत होतो. कधी पायी, कधी दोन बैलांच्या गाडीने तर कधी घोडा गाडीने असा आमचा प्रवास चालू होता. असा प्रवास करीत करीत त्रिपुरांतक क्षेत्री येऊन पोहोचलो. तेथे त्रिपुरांतकेश्वराचे दर्शन घेतले. या ठिकाणी आम्हास अनेक दिव्य अनुभव आले. आमच्या जवळ श्रीपाद प्रभूंच्या दिव्य पादुका होत्या. आम्ही प्रवास करीत असताना श्रीचरण सुध्दा आमच्या बरोबर प्रवास करीत असल्यासारखे भासत असे. आम्ही पाऊले टाकीत

असताना ती पाऊले आमची नसून श्रीचरणच आमच्या शरीरात प्रवेश करून पाऊले टाकीत असल्यासारखे वाटे. आम्ही बोलत असताना सुध्दा आम्ही काय बोलत असू ते आम्हालाच कळत नसे. श्रीपाद प्रभूच आमच्या द्‌वारे बोलत असल्याचे जाणवे. आम्ही जेवण करीत असताना. ते आमच्या मुखानेच भोजन करीत असल्याचा भास होत असे. आमच्या शरीरातील मांस, रक्त नाडयामधून श्रीप्रभूच भरून असल्याचा अनुभव येत असे. शास्त्रातील, "जीवात्माच परमात्मा आहे" हा सिध्दांत आम्ही ऐकून होतो. परंतु आज मात्र आमच्या संपूर्ण शरीरात श्रीपाद प्रभुंचेच चैतन्य भरून आहे याचा प्रत्यक्ष अनुभव श्रींचा स्पर्श नसताना सुध्दा अनुभवास येत होता. या प्रकारची लीला आम्ही पूर्वी कधी पाहिली नव्हती अथवा ऐकली नव्हती.

श्रीत्रिपुरांतकेश्वराच्या अर्चकस्वामींचे नाव भास्करशास्त्री असे होते. त्यांना आमचा फारच अभिमान होता. ते

पीठिकपूरमला वास्तव्यास होते. अर्चना करण्यासाठी त्यांची नियुक्ति झाली होती. ते षोडशी राजराजेश्वरी देवीचे भक्त होते. श्रीपीठिकापूर निवासीनी, कुक्कुटेश्वर महाप्रभूंची स्वामिनी श्रीराजराजेश्वरी देवीने स्वप्नात त्यांना मंत्रदिक्षा दिली होती. आम्ही दोघांनी त्यांच्या घरी अतिथि म्हणून रहावे अशी आम्हास त्यांनी विनंती केली. आमच्या जवळ श्रीपाद प्रभूंच्या पादुका असल्याचे त्यांना कळले होते. त्या पादुका आम्ही त्यांच्या पूजा मंदिरात ठेवल्या होत्या. त्या पादुकेमधून दिव्य अशा आवाजात श्रीपाद प्रभू म्हणाले "बाळानो तुम्ही केवढे धन्य आहात. या पादुकांची भास्करशास्त्री पूजा करीत असत. या पादुका सध्या ताम्ररूपात आहेत. भास्कर शास्त्रींच्या मंत्रोपासनेच्या बलाने त्या पादुका कांही वर्षानंतर सुवर्ण रूपात परिवर्तित होतील. हिरण्यलोकातील कांही महापुरुषांनी त्या पादुका हिरण्य लोकात नेऊन अर्चना अभिषेक केला होता. त्यानंतर त्या पादुका कारण लोकांत असलेल्या माझ्याजवळ

आणण्यात आल्या. त्या पादुका घालून मी कारण लोकात येऊन येथील दिव्य आत्म्यांना आशिर्वाद देतो. त्यानंतर हिरण्य लोकात जाऊन तेथील महापुरुषांना आशिर्वाद देतो. त्यावेळी माझ्या पादुकांना तेजोमय सिध्दि मिळते. यानंतर या पादुकांची अठरा हजार महासिध्द पुरुष स्वर्ण विमानातून घेऊन जाऊन माझ्या जन्म स्थानी पीठिकापुरम गावी समंत्र पूजा अर्चना करून जमीनीच्या तीनशे फूट खाली खोलवर प्रतिष्ठापना करतील. तेथे स्वर्णमय कांती असलेले दिव्य नाग माझी दर रोज अर्चना करतील. याच्या समवेत चौंसष्ट हजार योगिनी असतील. त्या पादुका सुवर्णमय सिंहासनावर ठेवल्या जातील. मी तेथे ऋषी संघटने बरोबर आणि योगिनी समवेत दरबार भरवून सर्वांना सत्संगाचा लाभ घडवीन. या भूमीला संलग्न असलेले परंतु अदृष्य आणि अगोचर असलेले अजून एक स्वर्ण पीठिकापूरम आहे. हे योगदृष्टी असलेल्या भक्तांनाच अनुभविता येते. माझ्या सुवर्ण पादुका ज्या

ठिकाणी प्रतिष्ठापित होणार आहेत त्या ठिकाणीच पीठिकापुरम प्रतिष्ठापित होईल. यासाठी तुम्ही सर्वजण अत्यंत आनंदात रहा. भविष्यात अनेक चित्र-विचित्र घटना घडणार आहेत. माझ्या महा संस्थानात पादुकांच्या दर्शनासाठी भक्तगणांची मुंग्यासारखी रांग लागेल" ही देववाणी ऐकून आम्ही अत्यंत आश्चर्यचकित झालो. अंगावर रोमांच दाटले, नेत्रातून अश्रूपात होऊ लागला. अशा स्थितीत आम्ही किती वेळ होतो ते कोणालाच कळाले नाही. श्रीभास्कर शास्त्री षोडशी राजराजेश्वरीचे परमश्रेष्ठ भक्त होते. मी त्यांना राजराजेश्वरी देवीच्या वैभवाबद्दल विवरण करून सांगण्याची विनंती केली.

# श्री राजराजेश्वरी देवी विवेकाची खाण

ते म्हणाले,"हे बंधुनो, राजराजेश्वरीच्या चैतन्याचा विचार करणारे तुमचे मन यापुढे विशाल सीमा ओलांडून पलिकडे जाणार आहे. राजराजेश्वरीच्या शुध्द आचरणाने आपले सर्वसाधारण मन मेधा शक्तीत परिवर्तित होईल तसेच आपली बुध्दि विवेकपूर्ण होण्यासाठी ती महामाता आपणास सहाय्य करेल. आपल्या संकुचित वृत्तीचे निर्मुलन करून विशाल दृष्टी प्रदान करेल.

साधारण पणे शक्ति आणि विवेक एकाच व्यक्तीत एकत्रित दिसत नाहीत. परंतु राजराजेश्वरी देवीचा अनुग्रह झाल्यावर शक्ति आणि विवेक दोन्ही एकाच व्यक्तिमध्ये नांदतात. दिव्य चैतन्याची अनेक रूपे असतात ती समजण्याची बुध्दी या देवीकडून आपणास प्राप्त होते. विश्वातील विशाल भावांची वृद्धी करण्यास

 

श्रीराजराजेश्वरीदेवी आपणास मुक्त हस्ताने सहकार्य करते. अत्यंत अद्भूत असे दिव्य ज्ञान मिळविण्यासाठी, शाश्वत अशी दिव्य मातृशक्ती , मिळविण्यासाठी, विश्वातील महान कार्ये सफल होण्यासाठी, तिचा अनुग्रह अत्यंत आवश्यक आहे. श्रीराजराजेश्वरीदेवी अनंत अशा विवेकाची खाण आहे. तिने कांही जाणण्याचा संकल्प केल्यास ती ते जाणून घेते. तिला अगम्य असे या विश्वात काहींच नाही. सर्व विषय, सर्व जीव, त्यांचे स्वभाव त्यांना हलविण्याचे सामर्थ्य, या प्रपंचातील प्रत्येक धर्म, त्याला संबंधित योग्य असा काळ, या सर्व गोष्टी राजराजेश्वरीदेवीच्या स्वाधीन असतात. तिच्यामध्ये पक्षपात दृष्टी अजिबात नसते. तिला कोणाबद्दल अभिमान किंवा द्‍वेषभावना नसते. साधना बलाने जे भक्त तिचे दर्शन घेऊ इच्छितात त्याना ती विश्वास पात्र समजून स्वत:च्या अंतरंगात स्विकारते. ही राज राजेश्वरीची शक्ति वाढवून साधक त्यांच्या विवेक बलाने विरोधी शक्तींचे निर्मूलन करू शकतात. ती

 

आपल्या भक्तांना इच्छित फल प्राप्त करून देते. ती विश्वात कुणाबरोबरही अनुबंध न ठेवता म्हणजे असंगत्वाने आपले कार्य करीत असते. ती आपल्या प्रत्येक साधकाशी त्याच्या स्वभावा प्रमाणे, गरजे प्रमाणे आपला व्यवहार ठेवते . ती कोणावरही जबरदस्तीने शासन करीत नाही. साधना पूर्ण झाल्यावर ती आपल्या भक्तांना योग्यतेप्रमाणे प्रगति पथावर चालविते. अज्ञानांना त्यांच्या अज्ञान मार्गानेच जाऊ देते. त्या मार्गाने जाणाऱ्या भक्तांचे पालन पोषण करून त्याच्या अपराधा बद्दल त्याना क्षमा करते. ते चांगले वागोत अथवा वाईट वागोत ती त्यांच्या कडे दुर्लक्ष करते. तिची करुणा अनंत आहे. ती या संसाररूपी सागरातून तारून नेणारी आहे. तिच्या दृष्टीने अखिल जगतातील सारे मानव प्राणी तिच्या अपत्याप्रमाणे आहेत. राक्षस, असुर, पिशाच या सर्वांनाच ती आपल्या मुलांप्रमाणे वागविते तिला कितीही दया आली तरी तिचा विवेक जागृतच असतो. परमात्म्याने आज्ञापिलेला मार्ग ती कोणत्याहि

परिस्थितीत सोडत नाही. ती प्रयोगात आणते त्या शक्तीचे ज्ञान केंद्र ती स्वत:च असल्याने आपण तिचा अनुग्रह प्राप्त केल्यास आपणास "सत्यज्ञान बोध" होतो. राजराजेश्वरी देवीची शक्ति प्राप्त करावयाची असेल तर आपणास कर्तव्य दक्षता, सत्यशोधन या सारख्या गुणाचा अवलंब केला पाहिजे. यामुळेच आपणास मातेचा अनुग्रह प्राप्त होईल. मी पीठिकापुरमला वास्तव्य करून असल्याने श्रीपाद प्रभूंच्या कृपेस पात्र झालो. तसेच त्यांच्या कृपाप्रसादानेच माझी राजराजेश्वरी देवीची दीक्षा सुफलित झाली. आज माझा दीक्षा दिन आहे. आपल्या प्रगतीचा आढावा घेण्याचा दिवस तसेच अधिक वेळ ध्यानात राहण्याचा दिवस. श्रीपाद प्रभू कोणत्या परिस्थितीत पीठिकापुरमहून निघून संचार करण्यास जातील, हे मी तुम्हाला उद्‍या सांगेन. तुम्ही येथे येण्यापूर्वी श्रीपाद प्रभूंना मी अर्पण केलेला प्रसाद थोडासा घेतला. हा महाप्रसाद घेऊन तुम्ही सुध्दा धन्य व्हा."

॥ श्री गुरुवे नमः ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -41

# परिव्राजकाचा वृतांत

श्री भास्कर पंडित म्हणाले "श्रीपाद श्रीवल्लभ हे महासरस्वती, महालक्ष्मी, महाकाली, राज राजेश्वरी स्वरूप आहेत. त्यांच्यातील देवीतत्व त्यांचे अनुष्ठान करणाऱ्यांना कळते."

मी भास्कर पंडिताना प्रश्न केला "हे आर्य ! परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी अशा चार वाणी असतात असे मी ऐकले आहे. त्या बद्दल

कृपा करून विस्ताराने सांगा. यावर भास्कर पंडित म्हणाले" अंबिका प्रतिवाक्यद्वारा व्यक्त होत असते. ती प्रत्येक मनुष्या द्वारे, प्रत्येक व्यक्तिद्वारे बोलत असते. आपणास कानाद्वारे ऐकू येणारे वाक्य स्थूल असते. एखादे वेळी वाक्य मुखाच्या बाहेर अजिबात ऐकू येत नाही, आतच केवळ ओठांच्या हालचाली वरून आपणास अर्थबोध होतो तेंव्हा तिला "मध्यमा" वाणी म्हणतात. या मध्यमा पेक्षा अजून थोडी सूक्ष्म असणारी वाणी तिला "वैखरी" म्हणतात. कंठाच्या आतील वाणी गळया पर्यंत येते. तेथून बाहेर येऊ शकत नाही अशी वाणी जी आतच म्हणजे मनातच घोळते तिला "पश्यंती" वाणी असे म्हणतात. या पश्यंतीहून सुध्दा सूक्ष्म

असणारी, नाभीत निर्विकलपणे राहून संकल्प मात्र असणारी वाणी म्हणजे "परा" वाणी होय.

अंबिकेची त्रिपुरभैरवी स्वरूपात सुध्दा आराधना करतात. गुणत्रय, जगत्रय, मूर्तीत्रय, अवस्थात्रय या सर्वांची आदिशक्ति त्रिपुरभैरवी आहे. बाळांनो ! आपण श्रध्देने आत्मसमर्पण करून संपूर्ण शरणागती पत्करली असता, या लोकात किंवा अदृश्य लोकात कोणत्याही प्रकारचे शत्रुत्व आडवे आले असता आपले काहींच नुकसान होत नाही. विरोध शक्ति केवळ भौतिक जगतातच परिमित नसतात तर त्या प्राणमय, भौतिकमय, मानसिकमय, अध्यात्मिकमय सुध्दा असतात. आपण जेवढी प्रगति करू इच्छितो तेवढी प्रगती साधल्यावर त्या त्या लोकात आपण भौतिक

प्रपंचात ज्या प्रकारे जीवन जगतो त्या लोकात सुध्दा तसेच जीवन जगू शकतो.

मनुष्याला प्रगति करावयाची असेल तर श्रध्दा हवी, जीवन मूल्यांवर संपूर्ण विश्वास हवा. आपण आपले जीवन विश्वासाच्या आधारावरच जगत असतो. आपल्या संकट काळी परमेश्वराचे सहाय्य नक्की मिळेल आणि तोच त्या संकटातून मुक्तता करेल असा आपला दृढ विश्वास असावा. हा विश्वासच आपणास एक प्रकारच्या सुरक्षिततेची जाणीव उत्पन्न करून आपला आत्मविश्वास वृध्दिंगत करतो.

 

शक्तिहीन ज्ञान निर्लेपतेकडे वहात जाते. ज्ञानहीन शक्ति आंधळी असून ती विनाशाला कारणीभूत होते. यासाठी आपण ज्ञान संपादन करून प्रकृतीच्या बंधनातून मुक्त झाले पाहिजे. शक्ति अनुग्रहानंतर परिपूर्णता साधली पाहिजे. सांख्य मार्गात चैतन्याला पुरुष म्हटले आहे. कर्म करणाऱ्याला प्रकृती म्हटले आहे. खालच्या अवस्थेत या दोघात विरोध असतो. चैतन्य असते ते कर्म करीत नाही आणि प्रकृतीला ज्ञान नसते. प्रकृती आणि पुरुष ही दोघे मिळूनच सृष्टीचे कार्य चालवितात. या दोघांनाही अपंगत्व आहे. चैतन्य पाहिले तर ते लंगडे आहे आणि प्रकृती आंधळी आहे. सर्व लोकांत आंधळेपण आणि लंगडेपण कसे व्यापून आहे हे समजावून सांगण्यासाठी श्रीपाद प्रभूंच्या कुटुंबात

एक भाऊ आंधळा आणि एक भाऊ लंगडा जन्माला आले होते. हे दोघे आंधळे आणि लंगडेपणाचे प्रतीकच होते.

उन्नत स्थितित पोहोचल्यावर पुरुष व प्रकृती हे दोन्ही "ईश्वर" "ईश्वरी" या नांवाने ओळखले जातात तेंव्हा या दोघांमध्ये विरोध नसतो. श्रीपाद प्रभू योग्य वेळी, योग्य काळी आपल्या बंधूंचे अपंगत्व दूर करतील यात शंकाच नाही. लोकांमधील अंधत्व आणि पंगुत्व घालविण्याच्या बृहहदत्तर कार्याची सूचना स्वरूप म्हणून ते हे कार्य करतील. अतीत अशा स्थायी रूपात असलेल्या पुरुष-प्रकृतींना ब्रह्म माया असे संबोधिले जाते. श्रीपाद प्रभूंनी वयाच्या सोळाव्या वर्षी वैराग्य धारण करून घराचा त्याग केला

आणि धर्म प्रचारासाठी घराबाहेर पडले. ते स्वत: ब्रम्ह आणि तेच माया असल्याचे सामान्य जनास समजावून सांगण्याचा उद्देश त्यांच्या गृहत्यागामागे होता. अपरिमित आणि अनंत गुण असलेल्या ब्रह्म स्वरूपास परिमितता आणणारी शक्ति म्हणजे माया. श्रीपाद प्रभूंचा पीठिकापुरम येथे जन्म घेण्याचा उद्देश, ते अपरिमित ब्रह्म स्वरूपाचे असल्याने मायेसमोर न झुकता परिमित व्यवहार केल्याचे सूचित करणे, हा होता. वयाच्या अवघ्या सोळाव्या वर्षी ते मायेच्या बंधनात न पडता केवळ भक्तांचा उध्दार करायचा हा संकल्प करून घरातून बाहेर पडले.

संपूर्ण विश्वात श्रीपाद प्रभूंचा महिमा विस्तार पावल्यानंतर येणाऱ्या शताब्दीमध्ये त्यांच्या संकल्पाप्रमाणे पीठिकापुरमच्या रहिवाशांचा सुध्दा ज्ञानोदय होणार आहे. श्रीपाद प्रभूंची दिव्य चैतन्य शक्ति मानव चैतन्याचे अपंगत्व आणि प्रकृतीचे अंधत्व दोन्हीचे निवारण करील. श्रीपाद प्रभूंच्या लीला सामान्य मानवांना अनाकलनीय आहेत.

एकदा एक संन्यासी कुक्कुटेश्वराच्या मंदिरात आला. तो दत्तात्रेयांचा भक्त होता. तो दत्तदीक्षा सुध्दा देत असे. दत्तदीक्षा घेतल्याने आपले नियोजित कार्य अडचणी न येता सिध्दिस जाते असे त्याने आपल्या वक्तव्यात सांगितले होते. पीठिकापुरमच्या अनेक ब्राह्मणांनी

 

दत्तदीक्षेचा स्विकार केला. तो संन्यासी दीक्षा देऊन साधकाकडून दक्षिणा स्वीकारीत असे. त्या दक्षिणेतील कांही भाग तो त्याच्या कडून दीक्षित झालेल्या ब्राह्मणांना देत असे. अनेक ब्राह्मण आणि इतर कुलस्थांनी विचार विनिमय करून दत्तदीक्षा घेतली आणि गुरुदक्षिणा दिली. परंतु मंदिरात आलेल्या कांही लोकांत दत्तदीक्षा घ्यावी का नाही यावर वाद सुरु झाला. ब्राह्मण परिषद, क्षत्रिय परिषद, वैश्य परिषद यांचे एक संयुक्त संम्मेलन झाले. त्या सम्मेलनाचे अध्यक्ष श्री बापनाचार्युलु होते. ते म्हणाले श्री दत्तात्रेय प्रभु सर्वांचेच आहेत. त्यामुळे सर्वजण दत्त दीक्षा घेऊशकतात. अष्टादश वर्णांच्या सर्व लोकांना संन्यासी महाराजांकडून दीक्षा घेता येते. दीक्षा घेण्याची

 

ही सुवर्णसंधि सगळयांना उपलब्ध आहे. यावेळी ब्राह्मण परिषदेतील काही लोकांचे असे मत होते की ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य लोक आचार संपन्न असल्याने ते दीक्षेस पात्र असतात. परंतु शूद्र वर्णाचे लोक अनाचारी असल्याने ते दीक्षा घेण्याचे अधिकारी नाहीत. त्यांच्या कडून दक्षिणा घेऊन आपण आपल्या तप:शक्तीने त्यांना शुध्द करू शकतो. यावर बापनाचार्युलु म्हणाले "सर्व कुलामध्ये आचारवंत आणि अनाचारवंत दोन्ही लोक असतात. कोण आचारवंत आणि कोण अनाचारवंत हे सांगणे कठीण असते. त्यामुळे सामूहिक कल्याण, स्थैर्य, क्षेम यावर दृष्टी ठेऊन आपण दत्तहोम किंवा इतर यज्ञ यागादी कार्यक्रम करून संघातील क्षेम, स्थैर्य साधू शकतो. दक्षिणा घेऊन शूद्रांना

दीक्षा न देणे म्हणजे त्यांच्यावर अन्याय केल्या सारखे मला वाटते. दक्षिणा घेऊन आपण आपल्या तप:शक्तीने शूद्र लोकांना शुध्द करून घेतल्यावर ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य लोकांचा सुध्दा उध्दार करू शकतो. या प्रमाणे कोणत्याही कुळातील लोकांना व्यक्तिगत स्वतंत्र दीक्षा देण्याची आवश्यकता नाही. या शिवाय दक्षिणेची रक्कम खूप अधिक ठेवली आहे. प्रत्येक कुलात गरीब लोक असतात. ते एवढी रक्कम दक्षिणा म्हणून देऊ शकणार नाहीत. आपल्याला एवढी मोठी रक्कम दिल्यावर त्यांना कांही दिवस उपाशी राहावे लागेल. दक्षिणा ही ऐच्छिक असली पाहिजे. यथाशक्ति आणि श्रध्दायुक्त अंत:करणाने दिलेली दक्षिणाच दक्षिणा

म्हणून स्वीकारली पाहिजे. तरच श्री दत्त प्रभू संतोष पावतील."

यावर तेथे जमलेले ब्राह्मण म्हणाले, आपण महाराज आपल्या गावी आल्यावर त्यांचे स्वागत पूर्णकुंभाने, वेद मंत्रानी केले नाही. महाराजांनी स्वत: जनहित भावनेने आपणा सर्वांना दत्त दिक्षा दिली. परंतु आपल्या ब्राह्मण परिषदेने मात्र त्यांना काही दिले नाही ही लाजिरवाणी गोष्ट आहे.

यावर बापनाचार्युलु म्हणाले "खरे तर परमहंस परिव्राजकाचार्य यांचे स्वागत करण्याची एक विशिष्ट पध्दत आहे. प्रथम त्यांच्या प्रधान

शिष्यांकडून कांही दिवस अगोदर ब्राह्मण परिषदेस सूचना मिळाली पाहिजे. त्यावर परिषद संपूर्णपणे विचार करून, प्रधान शिष्यांशी बोलणी करून सर्व गोष्टी निश्चित करते. यामुळे प्रधान शिष्याची सर्वांशी ओळख होते. त्या नंतर परिषद एक निर्णय घेऊन योग्य अशा परिव्राजक शिष्याची निवड करते. त्यानंतर परमहंस परिव्राजक येण्याचे ठरवितात . तेंव्हा त्यांचे स्वागत वेदमंत्राने, पूर्णकुंभाने केले जाते. त्यानंतर त्यांच्या बरोबर शास्त्रचर्चा होते. यानंतर परिव्राजक महोदयाच्या सूचनेनुसार यज्ञ, याग, दीक्षा, किंवा प्रवचनाचे आयोजन होते. या प्रकारे पूर्वसूचना न देता परिव्रजकाचार्य कुक्कुटेश्वरास आले. आल्याबरोबर त्यांनी दीक्षेचा प्रस्ताव

मांडला व गुरुदक्षिणा सुध्दा मागितली. हा सर्व आपल्या नियमांविरुध्द घडलेला प्रकार आहे."

यावर ब्राह्मण म्हणाले, "नियमांचे उल्लंघन झाले या विषयावर चर्चा करण्याची ही वेळ नाही. आता तुम्ही किंवा तुमचे जावाई अप्पळराज शर्मा दीक्षा घेऊन दक्षिणा देणार आहात किंवा नाही ?" यावर बापनाचार्युलु म्हणाले, "सामुहिक स्थैर्यासाठी दीक्षा घ्यायचा आमचा विचार आहे. व्यक्तिगत क्षेम स्थैर्य या साठी नाही. आम्ही दीक्षा घेत नाही त्यामुळे दक्षिणा देणार नाही. ब्राह्मण लोकात ज्यांना दीक्षा घ्यायची आहे ते स्वेच्छेने घेऊ शकतात. ब्राह्मण परिषद ही सामूहिक समस्येसाठी असते. सामूहिक प्रयोजन असलेल्या विषयावर परिषद विचार विनिमय

करते. व्यक्तिगत दीक्षा किंवा व्यक्तिगत समस्या या बद्दल विचार विनिमय करीत नाही." श्रेष्ठी आणि नरसिंह वर्मा यांनी दीक्षा घेण्यास नकार दिला. ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्यांना दीक्षा घेणे किंवा न घेणे हे त्यांच्या इच्छेवर सोडले होते.

## श्रीपाद प्रभूंकडून दत्तदिक्षा

श्रीपाद प्रभूंवर श्रध्दा-भक्ति असणाऱ्या लोकांमध्ये काही शेतीचा व्यवसाय करणारे होते. या मध्ये प्रमुख असे वेंकटप्पय्या श्रेष्ठी होते. श्रीपाद वेंकटप्पय्याच्या घरी गेले आणि म्हणाले "दत्तदीक्षा मिळाली नाही म्हणून कोणी निराश

 

होऊ नका. मी दत्त दीक्षा देतो एवढेच नव्हे तर यथाशक्ति दक्षिणा सुध्दा मीच देईन. मंडल (40 दिवस) दीक्षेची गरज नाही. एक रात्री दीक्षा घेतली तरी पुरे."

श्रीपाद प्रभू एक दिवस वेंकटप्पय्याच्या घरी अष्टदशवर्णाच्या लोकांना दीक्षा देत होते. ही दीक्षा घेणाऱ्या साधकांत कांही ब्राह्मण, थोडे क्षत्रिय आणि कांही वैश्य होते

**श्रीपाद प्रभूंचे दत्त स्वरूपात प्राकटय**

श्रीपाद प्रभू बहुरूपी असून दत्त स्वरूपात प्रगट होण्याचा तो दिवस होता. तो श्रीदत्त प्रभूंचा

 

आवडता वार, गुरुवार होता. दीक्षा दिलेल्या सर्व भक्तांना त्यांनी मंगलमय आशिर्वाद दिले. सर्वभक्तांनी मोठ्या श्रध्दा भावाने श्रीदत्त प्रभूंचे भजन अर्चन केले. यानंतर श्रीपाद प्रभूंनी आपल्या पुढील कार्यक्रमा बद्दल विस्तृत माहिती आपल्या भक्तगणांना सांगितली. श्रीदत्त प्रभूंचे स्मरण करता क्षणीच ते भक्तांना दर्शन देतात आणि त्यांच्या मनोकामना पूर्ण करतात असे त्यांनी भक्तांना सांगितले. त्यानंतर दुसरे दिवशी (म्हणजे शुक्रवारी) सकाळी मी नरसिंह वर्माच्या घरी गेलो. तेथे श्रीपादांचे मंगल स्नान चालू होते. स्नानानंतर नरसिंह वर्मानी श्रीपादांना खाण्यासाठी अनेक फळे आणून दिली. परंतु त्यांनी केवळ एकच केळी घेतली. ते सुध्दा वर्माच्या घरी असलेल्या गोमातेस दिली. यानंतर

ते वेंकटप्पय्या श्रेष्ठींच्या घरी आले. येथे सुध्दा त्यांना मंगल स्नान घालण्यात आले. येथे श्रीपादांनी लोणी, दूध, ताक आणि सायीचा स्वीकार केला. तेथे ते म्हणाले "माझे भक्त मला बोलावित आहेत. पीठिकापुरम् सोडून जाण्याची वेळ आता आली आहे."

वेंकटप्पय्यांच्या घरून निघून ते आपले आजोबा बापनाचार्युलुच्या घरी आले. तेथे सुध्दा त्यांनी मंगल स्नान केले. श्रीपाद श्रीवल्लभ प्रत्यक्ष दत्तस्वरूप आहेत. त्यांनी आपल्या भक्तांची दु:खे, पीडा, अडचणी दूर करण्यासाठी अवतार धारण केला आहे. त्यांनी आपल्या वक्तव्यात अनेक वेळा असे स्पष्टपणे उच्चारण केले होते. आपल्या दिव्य लीलांद्वारे जनता जनार्दनाच्या

उध्दारासाठी निश्चित केलेल्या कार्यक्रमाची माहिती श्रीपाद प्रभूंनी आपल्या भक्तांना सांगितली. यानंतर ते स्वगृही आले. श्रीपाद प्रभूंचा पीठिकापुरम सोडून जाण्याचा मनोदय त्यांच्या आई वडिलांना कळला होता. त्यांनी श्रीपादांना समजावून सांगण्याचा पुष्कळ प्रयत्न केला परंतु श्रीपाद प्रभू आपल्या निर्णयावर अटळ होते. यानंतर श्रीपाद प्रभूंच्या माता-पित्यांनी त्यांच्या विवाहाविषयी बोलण्यास प्रारंभ केला त्यावेळी श्रीपाद म्हणाले "मी आतापर्यंत अनेक वेळा श्रेष्ठी आजोबांना, वर्मा आजोबांना अनघालक्ष्मी समवेत दर्शन दिले आहे. त्या दिव्य दंपतीनी श्रेष्ठी आजोबांच्या आमराईत विहार केलेला सर्वांनी पाहिला आहे. हे पहा माझे अनघा लक्ष्मी समवेत दिव्य मंगलमय स्वरूप" असे

 

म्हणून श्रीपादांनी त्या दिव्य स्वरूपाच्या दर्शनाचा लाभ माता पित्यांना घडवून आणला. ते मंगलमय स्वरूप पाहून माता-पिता अगदी भारावून गेले. त्याच्या मुखातून शब्दच निघेना. श्रीपाद प्रभू पुढे म्हणाले "मी अवधूत स्वरूपात आलो असताना सांगितले होते की माझा विवाह प्रस्ताव मांडताच मी घर सोडून निघून जाईन."

एवढे बोलल्यानंतर श्रीपाद प्रभूंनी त्यांच्या दोन मोठ्या भावांना स्पर्श केला आणि आपल्या अमृतमय दृष्टीने त्यांच्या कडे पाहिले. तत्काळ अंध असलेल्या बंधूस दृष्टी प्राप्त झाली आणि पायाने अधू असलेला बंधू अव्यंग होऊन चांगला चालू लागला. त्या दिव्य स्पर्शाने त्या दोघा बंधूना ज्ञान प्राप्ति सुध्दा होऊन ते ज्ञानतेजाने

तळपू लागले. हे सर्व दृष्य पाहून श्रीपादांच्या माता-पित्यांना आश्चर्ययुक्त आनंदाचा धक्का बसून त्यांच्या मुखातून शब्दच फुटेनात. तेवढयात तेथे आजी राजमांबा आणि आजोबा बापनाचार्युलु तसेच वेंकटप्पा श्रेष्ठी आणि त्यांची धर्मपत्नी वेंकट सुब्बम्मांबा, नरसिंहवर्मा व त्यांची धर्मपत्नी अंमाजम्मा आले. श्रीपाद प्रभू सर्वांबरोबर आनंदात थट्टा मस्करी करीत बोलत होते. सुमती महाराणी तेंव्हा म्हणाल्या "बाळा, श्रीपादा ! तू सर्व जवाबदाऱ्या पूर्ण करून जाईन असे म्हणाला होतास. तू अजून वेंकटप्पय्या श्रेष्ठींच्या घरची दुधबाकी, वत्सवांची दुधबाकी, मल्लादींची दुधबाकी पूर्ण केली नाहीस." यावर श्रीपाद म्हणाले "आई ! तू म्हणतेस ते बरोबर आहे. या तीन वंशातील

लोकांना मी कधी विसरणार नाही. मी जरी विसरलो तर तू आठवण करून दे. त्यांच्या कडून योग्य ती सेवा करवून घेऊन मी त्यांना वर प्रदान करीन. तुझ्या माहेरच्या कोणत्याही एका घरी मी जेवणासाठी येत जाईन परंतु दक्षिणा मात्र स्वीकारणार नाही. तुझ्या माहेरची माणसे माझ्याशी वात्सल्यपूर्ण भावाने वागतात आणि मला जावाई असे संबोधतात. मी हा मानवी संबंध स्वीकारून त्यांच्या बरोबर जावयास शोभेल असे प्रवर्तन करीन." एवढे बोलून श्रीपाद प्रभू आपल्या पित्याकडे वळले आणि त्यांना उद्देशून म्हणाले "तात, आपल्या दंडिकोट वंशात अनेक वर्षा पासून वेदपरंपरा चालू आहे. आता माझे दोन्ही ज्येष्ठ बंधू वेदशास्त्र संपन्न होऊन मोठे पंडित झाले आहेत. ते आपली वेद

 

परंपरा चालवतील. दंडिकोट वंशातील लोकांना मी कधीच विसरणार नाही." श्रीपाद प्रभू कांही क्षण डोळे मिटून बसले व नंतर म्हणाले, "आपले श्रीधर शर्मा पुढील एका जन्मी "समर्थ रामदास" या नावाने एक महापुरुष होऊन महाराष्ट्र देशात जन्मास येतील. नरसिंह वर्मा छत्रपती शिवाजी या नावाने जन्म घेऊन महाराष्ट्रात राज्य स्थापित करून श्री समर्थ रामदासांचे शिष्यत्व पत्करतील. या प्रमाणे आपले पूर्व संबंध बंधुरूपात स्पष्टपणे कायम राहतील. समर्थ रामदास स्वामीच्यानंतर श्रीधरशर्मा शिवग्राम (शेगाव) क्षेत्रात गजानन नावांचा महायोगी होईल. त्याच्या मुळे शिवग्राम क्षेत्र महिमा अपरंपार वाढेल. रामराज शर्मा "श्रीधर" नांवाने जन्म घेऊन महायोगी होतील. श्रीधराची शिव परंपरा

असलेल्या ह्या पीठिकापुरातील माझ्या अंगणात महासंस्थान निर्माण होणार आहे. वेंकटप्पय्या श्रेष्ठी बरोबर असलेले आपले ऋणानुबंध स्थिर स्वरूपाचे होतील. एवढेच नव्हे तर त्यानंतर वत्सवाई कुटुंबातील लोक सुध्दा येतील. येथे सावित्र पन्नाचे पारायण होईल." असे बोलून श्रीपाद प्रभू थांबले. त्यांना वेदाचे पठन अत्यंत प्रिय होते. कित्येक वेळा श्रीपाद प्रभू वेदांचे पठन चाललेले पाहून अंतर्लिन होत. त्यावेळी वेदपठन करणारे विप्रगण अत्यंत श्रध्दाभावाने श्रीच्या दिव्य मुखाकडे एकटक पहात वेदपठन चालू ठेवीत.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

 

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

# अध्याय -42

## श्रीपाद प्रभू पीठिकापुरातून अंतर्धान

## श्रीपाद प्रभूंचे माता-पिता, बापनाचार्युलू यांना दिव्य दर्शन

दुपारच्या जेवणानंतर श्री भास्कर पंडित म्हणाले, श्रीपाद प्रभूंनी शूद्राच्या घरी राहून दत्तदीक्षा दिली. दीक्षा विधीत केल्या जाणाऱ्या पूजा, अर्चना व इतर नियमांचे पालन न करता केवळ भक्तांच्या हातात पवित्र दोरा बांधून

 

केवळ भजन करण्यास सांगितले. श्रीपाद प्रभूंनी दीक्षा घेणाऱ्याना सांगितले होते की ते स्वत:च दत्तात्रेय असून त्यांच्या स्मरण मात्रानेच भक्तांच्या पीडा, कष्ट निवारण होतात. या दीक्षेमध्ये शास्त्राची अवहेलना झाली असे कोणी समजू नये, असे प्रभू आवर्जून सांगत होते. परंतु पीठिकापुरम् मधील ब्राह्मणांनी एकत्र येऊन त्या वेळी पीठाधीश असलेल्या शंकराचार्यांकडे या विषयीची माहिति तक्रारीच्या सुरात दिली. तसेच श्री बापनाचार्युलू आणि अप्पळराज शर्मा यांना ब्राह्मण कुलातून बहिष्कृत करावे, अशी सूचना सुध्दा ब्राह्मणांनी श्री शंकराचार्य स्वामींना केली.

त्यावेळी श्रीपाद प्रभू अंतर्ध्यानस्थ असल्याने ती चर्चा तेथेच थांबली. श्रीशंकराचार्यांच्या अनुमती शिवाय अध्यात्मिक विषयात कोणताही बदल करता येणार नाही असा एक ठराव मान्य झाला. या संदर्भात सोळा वर्षाच्या बालकाने स्वत: दत्तप्रभूंचा अवतार असल्याचा निर्णय घेणे देवद्रोह केल्या प्रमाणे आहे असे मत अनेक ब्राह्मणानी व्यक्त केले. कांही ब्राह्मणांच्या मनात कपट असून सुध्दा ते वर वरची खोटी सहानभूती प्रकट करण्यासाठी बापनाचार्युलूच्या घरी आले. बापनाचार्युलू म्हणाले "श्रीपाद प्रभू आम्हाला त्यांच्या तेजाने दिपवीत आहेत. ते महाप्रभू श्रीपाद श्रीवल्लभ बालरूपात आमच्या घरी खेळले आणि आम्हाला दिव्य आनंदाचा लाभ करवून दिला. आमच्या नेत्रावर असलेला

मायेचा पडदा त्यांनी दूर केला. आज ते आमच्या डोळयात किरण होऊन चमकत आहेत. त्यांच्या नयन मनोहारी, दिव्य दर्शनाने आम्हास भारावून टाकले आहे. आम्ही किती भाग्यवान आहोत याची गणतीच करता येत नाही." बापनाचार्युलूचे हे वक्तव्य ऐकून खोटी सहानभूती दर्शविण्यास आलेले ब्राह्मण एक शब्दही न उच्चारता तसेच परतले. त्यांच्या मनातील किल्मिष भाव पूर्ण पणे निघून गेला होता. थोडया वेळाने श्रीपाद प्रभू आपल्या घरी परतले. सुमती महाराणी, अप्पळराज शर्मा त्यांच्या बहिणी आणि भाऊ सर्वजण अत्यंत आनंदात होते.

श्री अप्पळराज शर्मा म्हणाले "श्रीपादाबद्दल आम्हाला या पूर्वी खूपच काळजी होती. परंतु आता आमच्या मनावरचे ओझे कमी झाले. आम्ही त्यांचे स्मरण केल्या बरोबर ते आमच्या मनोनेत्रा समोर प्रगट होतात. आम्ही मागितलेले सर्व कांही ते स्थूल रूपात येऊन आमच्याशी संभाषण करून देतात. श्रीदत्त प्रभूंना जन्म देणारे जननी-जनक झाल्यामुळे आम्हाला अत्यंत धन्यता वाटते. आम्हाला आता निरंतर आनंदाची प्राप्ति झाली आहे." एवढे बोलून अप्पळराज शर्मांनी आपल्या उपरण्याने डोळयातून ओघळणारे आनंदाश्रू टिपले. ब्राह्मणांनी जे गृहीत धरले होते त्याच्या पेक्षा येथील परिस्थिती पूर्णपणे भिन्न होती. वेंकटप्पय्या श्रेष्ठी सर्व ब्राह्मणांना उद्देशून म्हणाले "हे विप्रगण हो, आता पर्यंत

 

आपण कांही क्षणांचा काळ श्रीपाद प्रभू बरोबर घालवत असू. परंतु या पुढे ते आपल्या मनोनेत्रात सदैव वास करणार आहेत. तसेच स्थूल देहाने दर्शन देऊन आमच्या घरीच निवास करणार आहेत." यानंतर नरसिंह वर्मा ब्राह्मणांना म्हणाले "श्रीपाद प्रभूंनी आमच्या डोळया वरील मायेचा पडदा दूर केला. नित्य विनोद, दिव्य विनोद करणारे महाप्रभू श्रीपाद श्रीवल्लभांच्या रूपात आमच्या बरोबर उत्कट हास्य करीत आमच्या अवती भोवती असतील. पूर्वीपेक्षा अधिक उत्कटभावाने ते आम्हास स्थूल रूपात दर्शन देतील."

श्रीपाद प्रभूच्या या सत्य स्वरूपाची कल्पना कुक्कुटेश्वरातील दत्तभक्त संन्याशास आली.

 

आणि त्याच्या हृदयात कालवा कालव झाली. श्रीपाद प्रभू स्वयं साक्षात दत्तात्रय भगवान आहेत असे सुस्पष्टपणे सुचवून ते ध्यानस्थ झाले. श्रीपाद प्रभू एक वेगळे दैवत नसून त्यांचे उपास्य दैवत असलेले दत्तात्रेयच आहेत हे त्यांनी पटवून दिले. श्रीपाद प्रभूंचा विरोध करणारे कांही ब्राह्मण पीठिकापुरात होते. त्यांच्या मनात एकच प्रश्न सतत घोळत होता "खरेच दत्तात्रेय श्रीपाद श्रीवल्लभाच्या स्वरूपात अवतरले का ? हे जर खरे असेल तर आपण त्यांना त्रास देणे केवळ कठीणच नाही तर अशक्य सुद्धा आहे ”

दत्तात्रेय प्रभून्चा स्वभाव फार वेगळा आहे ते स्वत: त्रास सहन करून, अनन्य भावाने शरण येणाऱ्या साधकांचा उध्दार करतात. हा त्यांचा

स्वभावविशेष आहे. पीठिकापुरम् मधील अनेक ब्राह्मणांनी श्रीपाद प्रभूंना ब्रह्म रथात बसवून शोभा यात्रा काढली होती. मोठी धनराशी सुध्दा दक्षिणेच्या स्वरूपात अर्पण केली होती.

दत्तदीक्षा देणारे संन्यासी केवळ गुरुदक्षिणा मिळावी या उद्देशाने दीक्षा देत होते. त्यांनी ते एक धनार्जनाचे साधनच केले होते. दीक्षा झालेल्या साधकांची इच्छा आकांक्षा पूर्ण न झाल्यास त्यांच्यात निष्ठेचा अभाव आहे असे संन्यासी सांगून मोकळे होत. इच्छा, आकांक्षा पूर्ण झाल्यास ते दत्त दीक्षेचे फळ आहे असे ते संन्यासी सर्वांना सांगत असत. त्या संन्याशाच्या मनात श्रीपाद प्रभू बद्दल सदैव भिती असे. त्याना वाटे श्रीपाद प्रभू आपल्या

दिव्य लीलांनी त्याचे सत्यस्वरूप सर्व लोकासमोर आणतील.

त्यावेळी कुक्कुटेश्वर मंदिरात एक वृद्ध ब्राह्मण आला. त्याचे नांव नरसिंह आणि गोत्र काश्यप होते. तो दूर असलेल्या महाराष्ट प्रांतातून आला होता. त्याने कुक्कुटेश्वराचे दर्शन मोठ्या श्रध्दाभावाने घेतले नंतर स्वयंभू दत्तात्रेयांचे दर्शन घेतले. त्या वेळी त्याला तेथे दत्तदीक्षा दिली जात असल्याचे कळले. दीक्षा देणाऱ्या परमहंस परिव्राजकाचार्यांकडे तो वृद्ध ब्राह्मण गेला. त्याने त्या संन्याशाना मोठ्या नम्र भावाने नमस्कार करून गुरुदक्षिणेच्या रूपात त्याने आणलेली नाणी दिली. ती दक्षिणा पाहून संन्यासी आनंदित झाले. त्यांनी दीक्षा घेण्यासाठी

 

त्या ब्राह्मणास आपली ओंजळ पुढे करण्यास सांगितली. त्याच्या हातावर कमंडलुतील पवित्र जल घालण्यासाठी संन्याशाने आपला कमंडलु उचलला आणि त्या ब्राह्मणाच्या हातावर पवित्र जल घातले. परंतु आश्चर्य असे की कमंडलुतील जलाबरोबर एक विंचु ब्राह्मणाच्या हातावर पडला. त्या ब्राह्मणाचा कंठ कोरडा पडला. संन्याशाने हातातील पाणी पिण्यास सांगितले आणि म्हणाला "अहाहा ! तू अनेक वर्षापासून केलेल्या तपश्चर्येचे फळ आज मला अर्पण केलेस." तेवढयात तो ब्राह्मण विंचवाच्या दंशाने जोरात ओरडला. मंदिरात असलेल्या कांही ब्राह्मणांना विंचवाच्या दंशाचा दाह कमी करण्याचा मंत्र येत होता. तो त्यानी घातला परंतु त्याने दाह कमी झाला नाही. या वेळी

तो संन्यासी घाबरून देवळातील एका कोपऱ्यात लपून बसला. दाह कमी होण्यासाठी अनेक मंत्र जप केले, कुक्कुटेश्वराला अभिषेक करण्यात आला. स्वयंभू दत्तात्रेयांना विशेष कर्पूर आरती करण्यात आली परंतु कशाचाच काही उपयोग झाला नाही. ब्राह्मण मूर्छित अवस्थेत पडून होता. त्याच्या मुखातून फेस येत होता. हा फेस पाहून कांही लोकांना वाटले की ब्राह्मणास साप चावला असेल. परंतु कांही ब्राह्मणांनी त्या वृद्ध ब्राह्मणाच्या हातावर कमंडलुतील पाण्याबरोबर पडलेला विंचु पाहिला होता. ब्राह्मणाचा दाह कमी करण्यासाठी सर्वांनी आपापल्या परीने प्रयत्नांची पराकाष्टा केली. परंतु उपयोग झाला नाही या सर्वासाठी संन्यासीच कारणीभूत असल्याचे सर्वांना वाटले.

ब्राह्मणास होणाऱ्या वेदना न सहन झाल्याने तो थोडा वेळ गडबडा लोळत होता व नंतर मूर्छित झाला.

थोडया वेळाने ब्राह्मण शुध्दिवर आला परंतु त्याच्या पोटात असह्य वेदना होत असून त्याला उचक्या लागत होत्या. तेवढयात तेथे एक शेतकरी आला. तो त्या वृद्ध ब्राह्मणास म्हणाला, "आमच्या कुलातील व्यंकय्या नांवाच्या एका प्रतिष्ठित व्यक्तींनी श्रीपाद प्रभूंच्या मंत्राक्षता दिल्या आहेत. त्या ब्राह्मणाने मोठ्या श्रध्दा भावाने श्रीपाद प्रभूंचे स्मरण करून त्या मंत्राक्षता हातात घेऊन थोडया आपल्या मस्तकी धारण केल्या. आणि आश्चर्य असे की कांही क्षणातच ब्राह्मणाच्या साऱ्या वेदना नाहिशा

झाल्या व तो पूर्ववत् स्वस्थ झाला. या सर्व प्रकाराने लोकांचा संन्याशा वरील विश्वास उडाला. सर्व दीक्षित साधकांनी दिलेली गुरुदक्षिणा त्याच्या कडून परत घेतली आणि त्या संन्याशाला पीठिकापुरम् मधून हाकलून दिले. संन्याशाकडून परत घेतलेल्या पैशांचा विनियोग कसा करावा हे सर्व साधकांनी बापनाचार्युलूंना विचारले, तेंव्हा ते म्हणाले, "त्या द्रव्याने अन्न सामुग्री आणून सर्वांना अन्नदान करावे.

अन्नदानामुळे श्रीदत्त प्रभू प्रसन्न होतील. वेगळी दत्त दीक्षेची गरज नाही." बापनाचार्युलूंच्या सांगण्याप्रमाणे कुक्कुटेश्वराच्या प्रांगणात एक मोठा मंडप घालण्यात आला. तेथे मोठ्या प्रमाणात अन्नसंतर्पण झाले. भोजनोत्तर सर्व लोकांनी

"दिगंबरा, दिगंबरा, श्रीपाद श्रीवल्लभ दिगंबरा" या दिव्य नामाच्या जयघोषाने सारा परिसर दणाणून सोडला. या दिव्य महामंत्राने सारे विश्व व्यापून राहील अशी भविष्य वाणी श्रीपाद प्रभूनी पूर्वी केली होती.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -43

## श्री अनघालक्ष्मी वर्णन - श्रीपादांची वैष्णवी माया

श्री भास्कर पंडितांनी रात्रीच्या वेळी आपली आराधना वगैरे संपवून बोलण्यास सुरवात केली. ते म्हणाले "अहो महोदय ! विद्योपासना ही सर्वश्रेष्ठ आहे. विद्योपासनेला वयाचे बंधन नसते. श्रीपाद श्रीवल्लभ वास्तवीक पहाता महासरस्वती, महालक्ष्मी, महाकाली स्वरूप आहेत." या वक्तव्यावर मी म्हणालो, "श्रीपाद

प्रभू श्री पद्मावती वेंकटेश्वर स्वरूप आहेत असे आपण पूर्वी सांगितले होते. आता या त्रिमाता सुध्दा तेच आहेत असे म्हणता. तसेच त्यांना अनघालक्ष्मी समवेत अनघदेव असे सुध्दा म्हटले जाते. मला याचा बोध होत नाही तेंव्हा सर्व कांही विस्तार पूर्वक सांगा."

## श्रीपाद प्रभूंचे विराट स्वरूप

तेंव्हा ते महा पंडित म्हणाले, "बंधुनो ! परमात्मा सर्व जीवराशी मध्ये विद्यमान आहे, असे शास्त्राचे वचन आहे. पिपीलिकेपासून ब्रह्मापर्यंत तो सर्वांत व्यापून आहे. श्रीपाद प्रभूंच्या अवतारात ते पिपीलिका रूपात आणि

ब्रह्म रूपात दोन्ही मध्ये आहेत. म्हणून सर्व सृष्टीत सृष्टी रूपाने ते उभे आहेत. ते संपूर्ण जीवराशीतील चैतन्यात तादात्म्य स्थितिशी एकरूप होऊन असतात. हीच त्यांची विशेषता आहे. ते सर्व राशीत जीवराशी रूपाने राहून सुध्दा कोणत्याही जीवात त्यांचा स्पर्श जाणवत नाही. हीच त्यांची वैष्णवी माया आहे. सृष्टीची मर्यादा, परिमितता या संबंधी कांही नियम मानण्यात येतात. श्रीपाद प्रभूंचे महासरस्वती, महालक्ष्मी, महाकाली रूपात असणे म्हणजे त्या चैतन्य रूपात ते व्यक्त होतात. ते चैतन्य रूप ते स्वत:च असतात. ज्या रूपाची अभिव्यक्ति होते त्या स्वरूपात ते आपल्या योगमायेने निरंतर तादात्म्य स्थितीत असतात. ते जेंव्हा महासरस्वतीचे चैतन्य घेऊन तादात्म्य

स्थितीत असतात, तेंव्हा चर्तुमुखी ब्रह्म स्वरूपाशी तादात्म्य पावतात. महासरस्वती असो अथवा हिरण्यगर्भरूपाने असो, ते स्पर्श बंधनात असतात. याच प्रमाणे एकच आत्मा चार-पाच पुरुष रूपात सुध्दा अविर्भूत असू शकतो. या आत्म्याची शक्ति स्त्री रूपाने एकाच वेळी चार-पाच रूपात सुध्दा आविर्भूत होऊ शकते. तसेच पुरुष रूपाला, स्त्री सुध्दा सगुणसाकार रूप घेऊन विधि निर्णयानुसार निश्चित केलेल्या मर्यादेचे कटाक्षेने पालन करते.

या प्रमाणे श्रीपाद प्रभू अनघालक्ष्मी समवेत अनघदेव होऊन वास्तव्य करतात ते त्यांचे अर्धनारीश्वर रूप आहे. सध्या ते श्रीपाद श्रीवल्लभ रूपाने यतीश्वराच्या रूपात आहेत.

 

सगुण साकार रूपातील मर्यादा, परिमितता, ते न चुकता पाळतात ही धर्माची सूक्ष्मता आहे. धर्म वेगळा आणि धर्मसुक्ष्मता वेगळी असते. श्रीपाद प्रभूंनी दिव्य अनुभवांचा विशेष वर्षाव करण्यासाठी सृष्टीरूप धारण केले आहे. सृष्टीत असलेल्या तादात्म्य स्थिती मुळे मानवाला त्वरित गती मिळू शकते. हे त्याचे तात्पर्य आहे. श्रीपाद प्रभू जप, ध्यान, तपस्या करीत आणि त्याचे सर्व फल स्वत: न घेता सृष्टीला देत. भक्तांची आधिव्याधीतून सुटका करण्यासाठी ते आपले तपोफळ वाहून त्यांची कर्मबंधनातून सुटका करतात. जगन्नाथ आपल्या चार शक्ति महासरस्वती, महालक्ष्मी, महाकाली, राजराजेश्वरी या विश्वातील दैवाभिव्यक्तीसाठी , विश्वपरिपालनासाठी अविर्भूत

करतात. अंबिका देवीला तीन स्थिती असतात 1) अतीत स्थिती 2) विश्व स्थिती 3) शक्ति स्थिती. सृष्टीचे कार्य चालण्यासाठी पराशक्ति अतीत स्थितीत असते. परमात्म्यात असलेल्या अनंत सत्त्याना ती आपल्यात आकर्षित करून आपल्या चैतन्यात मिसळून त्यानंतर सृष्टीत जन्म घेते. नुसते जन्म घेऊन तिचे कार्य पूर्ण होत नाही. ती सर्व जीवांना निर्माण करून त्यांना आपल्यात घेऊन, त्यांच्यात प्रवेश करून बळ देते. हा तिचा विश्वस्थायी स्वभाव आहे.

व्यक्ति स्थायी असल्याने ती मानवी व्यक्तित्वाला दिव्य प्रकृतीच्या मधे मध्यवर्ती अशी राहते. हेच अनघालक्ष्मीरूपांत अविर्भवण्याचे रहस्य आहे. तिच्या मूलतत्वातून थोडासा अंश

भाग घेऊन ती अवतार घेते. त्या अंशाच्या निर्वाहण्याचे काम पूर्ण झाल्यावर त्या अंशाला पुन्हा मूळ तत्त्वात आकर्षुन घेते. अनघदेवाच्या संकल्पाशिवाय अनघालक्ष्मी एखादे छोटे कार्य सुध्दा करू शकत नाही. पण तीच प्रभूंचा प्रत्येक संकल्प पूर्णपणे पूर्णत्वास नेते. श्रीपाद श्रीवल्लभांच्या रूपात माता आणि पिता ही दोन्ही रूपे असल्याने त्यांचा विशेष अनुग्रह असतो. अनघालक्ष्मीच्या मुख्यत: तीन भूमिका आहेत. पदार्धगोलाविषयी असणारी सच्चिदानंद भूमिका. या भूमिकेत या ठिकाणी अनंत अशी स्थिती, अनंत अशी शक्ति , अनंत असा दिव्य आनंद भरून असलेले लोक असतात. या भूमिकेतून या जीवाचे वर्णन करण्यास शब्द असमर्थ ठरतात . या सच्चिदानंद भूमिकेत खालच्या स्थितीत

परिपूर्ण असा दिव्य चैतन्य सृष्टी लोक आहे. या भूमिकेत अनघालक्ष्मीची दिव्य चैतन्य महाशक्ति असते. वेदामध्ये या विश्वाचे महाश्लोक असे वर्णन केले आहे. या लोकातील कर्मांना अपयश नसते. प्रत्येक प्रक्रियेत ज्ञान, शक्ति प्रयत्न न करता परिपूर्णतेस जाते. येथे दिव्य अशा आनंदाचा अनुभव निरंतर येतो. येथे असत्य, बाधा, दु:ख, पिडा ह्यांचा संपूर्ण अभाव असतो. या भूमिकेच्या खाले एक अज्ञान भूमिका आहे. येथील जनसमुदायात अज्ञान असते. येथील लोकामध्ये सुध्दा मन, जीव, शरीर असते परंतु त्यांचा अनुभव अपरिपूर्ण, परिमित आणि वैफल्याने युक्त असतो.

# राजराजेश्वरी महिमा

राजराजेश्वरी चैतन्य मातृमूर्तीमध्ये अनंतमयी करुणा ओतप्रोत भरलेली आहे. सर्व भक्तगणांना ती आपल्या बालका प्रमाणे मानते. प्राणमयी, मनोमयी भूमिकेत अज्ञानी असणाऱ्या जीवांना "असुर" म्हटले जाते. ते भित्रे, आत्मनिग्रही आणि तपस्वी असलेले अहंकारी असतात. प्राणमयी भूमिकेत अधिकारी पक्षात असलेल्याना राक्षस असे म्हणतात. त्यांची शक्ति अचाट असून त्यांचे भाव प्रचंड आणि तीव्र असतात. या शिवाय कांही खालच्या स्तरातील निम्न प्राणमय भूमिकेत असणारे जीव असतात त्यांना पिशाच किंवा प्रमादी असे म्हणतात. ते कोणतेही असुरी रूप आणि वेष धारण करू

 

शकतात. खरे पाहता पिशाच ही कोणी व्यक्ति असू शकत नाही. केवळ एखादी इच्छा किंवा दुराशा अपूर्ण राहिली असता ती मनाचे काल्पनिक रूप असते. राक्षसांना बलवंत अशी प्राणमयी स्थिती असते. त्यांना "मन" असे काही नसते. जे दिसेल त्यालाच घट्ट पकडून धरण्याचा ते प्रयत्न करतात. कालीमातेचे रूप आपणास काळया, श्याम अशा प्राणमयी स्थिती द्वारा दिसणारे रूप असते. "काली" म्हणजे "विध्वंसक शक्ति " असते. सर्वांना दु:खी कष्टी करून, त्यांची छिन्न-भिन्न अवस्था करणारी ही अज्ञानी प्रकृती शक्ति आहे. महाकाली ही उन्नत भूमिकेत असते. ती साधारणपणे सुवर्ण रूपात असते. ती राक्षसांना महाभयंकर स्वरूपात दिसते. राजराजेश्वरी विवेकाची प्रतिनिधी आहे

 

तर महाकाली बलशक्तीची प्रतिनिधी आहे. या मातेमध्ये विनाशाची अफाट शक्ति असते. ही शक्ति प्रकट झाल्यास विनाश आणि संघर्ष करूनच शांत होते. महाकाली ही काली माते पेक्षा वेगळी देवता आहे. ज्यावेळी साधकाला आपल्या साधनेत विघ्न आल्याचे समजते तेंव्हा त्याने आपल्या अंतरंगात असलेल्या महाकाली शक्तीला आव्हान करावे.

**असुरी, काली, श्यामा, महाकाली इत्यादींचे स्वरूप**

काली, श्यामा या आद्य प्राणशक्ति होत. काली ही विध्वसंकशक्ति होय, महाकाली ही सुवर्णवर्णा आणि असुरांना महाभयंकरी अशी

आहे. राजराजेश्वरी विवेकाची स्वामिनी, तर महाकाली बलाची स्वामिनी आहे. महालक्ष्मीचे सौंदर्य अप्रतिम असते. विवेक आणि शक्ति संपूर्णपणे मिळविण्यासाठी सौंदर्य असणे आवश्यक आहे. हे नसल्यास आपल्या प्रयत्नांना पूर्णत्व येत नाही. परंतु कांही कांही ठिकाणी एखाद्या प्रकाराची समतोल अवस्था असते. या वेळी आपणास ती परिपूर्ण वाटते. यापेक्षा थोडया उन्नत अवस्थेत पोहोचल्यावर पुन्हा तेथे आपणास नविन परिस्थिती अनुभवास येते. त्यांना अनुसरून नविन समतोल स्थिती प्राप्त होते. ही अवस्था आपणास परिपूर्ण वाटते. या अवस्थेची महालक्ष्मी प्रतिक आहे. विवेकामध्ये परिपूर्णता येऊन बल आणि शक्तिमध्ये परिपूर्णता न आल्यास पूर्व सिध्दी अनुकुल

नसते. याच कारणाने परिपूर्ण परिपूर्णता साधण्यासाठी विवेक, बल, सौंदर्य आणि परिपूर्णता या चार गुणांची आवश्यकता असते. मनुष्याला गूढ असलेले रहस्य म्हणजे दिव्य सामरस्यपूर्ण सौंदर्य. हे संपूर्ण विश्वाला व्यापून असणारा चिद्विलास आहे. केवळ महालक्ष्मीच्या अनुग्रहाने या विविधतेने नटलेल्या सृष्टीतील वस्तु, शक्ति आणि जीवजंतु एकात्मतेने राहतात. या एकात्म स्थितीतच त्याना आनंदाचा लाभ होतो ती विविध प्रकारच्या वस्तु, शक्ति आणि जीव यांची लयबध्द आणि रूपबध्द वाढ करते. महालक्ष्मी परमप्रेम आणि परम आनंदाची आदि देवता आहे. त्याच प्रमाणे लक्ष्मी ही भौतिक वस्तुंच्या संचयाची प्रतिक आहे. महालक्ष्मी म्हणजे भौतिक वस्तु, जीव

शक्ति यांना दिव्यानंदाच्या साम्राज्याकडे वळवून दिव्य जीवनाचा आनंद प्रदान करणारी महाशक्ति आहे.

अनघालक्ष्मीची शक्ति पुर्णत: प्राप्त करण्यासाठी विवेक, बल आणि सौंदर्य या बरोबरच कर्मामध्ये सुध्दा कौशल्य असावे लागते. वेदामध्ये सरस्वती मातेची प्रशंसा आहे. दशविद्येमध्ये तिला मातंगी म्हणतात. तिची वैखरी वाणी असते. महासरस्वती निराळी असते. दिव्य नैपुण्य आणि आत्मचैतन्य कर्माचे महासरस्वती प्रतिक आहे. या महामातेच्या करूणेने आणि कृपा प्रसादाने आपली इष्ट कर्मे पूर्णत्वास जातात. तिने प्रसादिलेल्या दिव्य ज्ञानामुळे आपली कर्मसिध्दी होण्यासाठी उपयोग

होतो. आत्मचैतन्याचा अन्वय कसा करायचा याचे ज्ञान होते. अनेक शक्तींच्या सामरस्याने आनंदाची प्राप्ति कशी होते ते कळते. परिवर्तनता, परिपूर्णता या सारख्या अति दुर्गम अशा विषया बद्दल तसेच अति सूक्ष्म विषया बद्दलचे ज्ञान महासरस्वतीवर दृढ श्रध्दा ठेवल्याने आपणास प्राप्त होऊ शकते. हे श्रोत्यांनो ! आनंद हा परमेश्वराशी संबंधित विषय आहे परंतु अत्युच्च आनंद हा योग्यांनाच येणारा अनुभव आहे. निरीच्छ योग्याला मिळणारा हर्ष हाच होय. सर्व जीवांना सुख आपापल्या पूर्व सुकृतानुसार प्राप्त होते परंतु प्रत्येक सुखाच्या मागे दु:ख हे ठरलेलेच असते.

# अनघा देवीच्या व्रताचे दत्तभक्तांकडून आचरण

श्री अनघा देवीचे रूप हे लक्ष्मी देवीचेच प्रतिरूप आहे. तिच्या मध्ये राजराजेश्वरी, महालक्ष्मी, महाकाली या देवतांची लक्षणे ओतप्रोत भरलेली आहेत. श्री अनघा देवीचे एक विष्णुरूपही आहे. त्याच्यात परमेश्वराची, दत्तात्रेयाची लक्षणे परिपूर्ण भरलेली आहेत या मुळेच अनघा देवीच्या आराधना समवेत विष्णुरूप अनघाची आराधना केल्यास सर्वफल प्राप्ति होते. "अनघाष्टमी" हे व्रत दत्तभक्तांना अत्यंत आदरणीय आहे. या व्रताच्या आचरणाने सर्व सुखांची प्राप्ति होते.

 

## "श्रीपाद प्रभूंची महती-दत्त आराधनेचे माहात्म्य"

हे श्रोतेहो ! श्री अनघादेवीच्या समवेत असणारे अनघरूप विष्णु म्हणजेच श्री श्रीपाद प्रभूंचा अवतार आहे. ते सर्व सामान्य जनांच्या बौध्दिक, मानसिक आणि आत्मिक चैतन्याच्या अत्यंत निकट असतात. ते सर्वगामी असून भक्तांच्या हाकेला तत्काळ धावून येतात. ते आपल्या भक्तांची आणि आश्रितांची दु:खे नष्ट करून त्यांना सुखाची प्राप्ति करून देतात. दशमहाविद्यांची आराधना केल्याने मिळणारे फळ केवळ श्रीपादांची किंवा दत्तात्रेयांची आराधना केल्याने तत्काळ प्राप्त होते. दुसऱ्या देवांची श्रध्दाभावाने आराधना केल्यास इष्ट फल प्राप्ति होते परंतु श्री दत्तात्रेयांची आराधना तत्काळ

फलदायिनी आहे. दत्तात्रेय हे सर्व देवांचे स्वरूप असून ते चतुर्युगातील महान अवतार आहेत. त्यांचा महाअवतार समाप्ति नसलेला असून ते अत्यंत सुलभ साध्य आहेत.

## श्रीपाद चरित्रामृत लीला

हे शंकरभट्टा ! तू रचना करीत असलेल्या पवित्र ग्रंथाचे महापुरुष आणि महायोगी सुध्दा अध्ययन करतील. ते त्यांच्या संबंधित व्याकरणाने त्याचा अर्थ लावतील. योग संपन्न विभूती या ग्रंथाचा अभ्यास करून ज्ञान संपादन करतील. सर्व सामान्य भक्त या ग्रंथाचे पारायण करून इहलोकीचे व परलोकीचे सुख,

वैभव आणि समृद्धी प्राप्त करतील. हा अक्षर सत्य ग्रंथ असल्याने त्या मधील प्रत्येक अक्षर हे बीजाक्षर, शक्ति युक्त आहे. या ग्रंथाचे कोणत्याही भाषेत श्रध्दा, भक्तियुक्त अंत:करणाने पारायण केल्यास इष्ट फल प्राप्ति होते. हा महाग्रंथ त्या महाप्रभूंचे प्रत्यक्ष अक्षर स्वरूप आहे.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

|| श्री गुरुवे नम: ||

|| श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ||

## अध्याय -44

# स्वर्ण पीठिकापूर वर्णन

श्री भास्कर पंडिताने त्या दिवशी आम्हास त्यांचे आदारातिथ्य स्वीकारून घरी राहण्याचा आग्रह केला व श्रीपाद श्रीवल्लभाचे चरित्र ऐकविण्याची विनंती केली. आम्ही भास्कर पंडिताचा आग्रह मोडू शकलो नाही. रात्री त्यांचेकडे वास्तव्य करून दुसऱ्या दिवशी स्नान संध्या आटोपून त्रिपुरांतकेश्वराच्या दर्शनाला गेलो. तेथे श्रीपाद

श्रीवल्लभांच्या अत्यंत रसपूर्ण अशा चरित्राचे विवेचन झाले. वक्त्याने आपल्या मधुर वाणीने श्रोत्यांना मंत्रमुग्ध केले होते.

## श्रीपाद प्रभूंचे जन्मस्थान

हे श्रोते हो ! श्रीपाद श्रीवल्लभ प्रत्यक्ष शिव स्वरूप आहेत. ते पीठिकापुरम् गावी अंतर्धान पावून काशी नगरीत अवतरीत होत आणि गंगेचे स्नान करीत. त्यांच्या पीठिकापुरम् मध्ये अवतरीत होण्याने तेथील भूत पिशाच्च बाधेचे निर्मूलन झाले होते. पीठिकापुरम् मधील त्यांच्या जन्म स्थळाची भूमी चैतन्यमय झाली होती. भविष्यात, कांही शतकानंतर त्यांच्या जन्मस्थळी

निर्माण होणाऱ्या महासंस्थानात त्यांच्या दिव्य पादुकांची प्रतिस्थापना होईल. तेथील भूमी जागृत होऊन क्रमाक्रमाने आजूबाजूच्या भूमंडलास जागृत करील. तेथील जन समुदाय पीठापुरमच्या परिसरातील दिव्याकर्षणाने आकर्षित होतील. ज्या ज्या ठिकाणी श्रीपाद श्रीवल्लभांनी संचार केला आणि ज्या ज्या ठिकाणी ते संचार करतील त्या त्या प्रदेशात न कळत जागृतीचा प्रभाव दिसतो व तसा दैवी शक्तीचा अनुभव येतो.

प्रत्येक मनुष्यात पृथ्वी तत्व असते. हे शब्द, स्पर्श रूप, रस, गंध या तत्त्वांनी बनलेले असते. योग दृष्टीने पहाता ज्या शरीरात पृथ्वीतत्त्व असते ते श्रीपाद प्रभूंच्या दिव्य

करूणा भावामुळे पीठिकापुरम् या क्षेत्री निश्चितपणे आकर्षित होतात. यावर मी प्रश्न केला "आर्यावर्तातील लोक त्यांच्यातील पृथ्वी तत्वाच्या जागृती मुळे पीठिकापुरमला भौतीक रूपाने येतात का ?"

## सुवर्ण पीठिकापुर महिमा

श्रीपाद प्रभूंनी मंद हास्य केले आणि म्हणाले "तू विचारलेला प्रश्न योग्यच आहे. भौतिक दिसणाऱ्या पीठिकापुरम् मध्ये एक सुवर्ण पीठिकापूर आहे. जितकी भौतिक पीठापुरमची व्याप्ति आहे तेवढीच सुवर्ण पीठिकापुरची सीमा आहे. सुवर्ण पीठिकापुर केवळ चैतन्याने

 

निर्माण झाले आहे. वास्तविक पहाता साधकांमध्ये असलेल्या चैतन्याच्या संबंधित पदार्थ निर्माण होताना त्याला सुवर्ण पीठिकापुरात वास्तव्य करीत असल्या सारखे वाटते. या सुवर्ण पीठिकापुरातील चैतन्यामुळे हजारो दिव्य किरणांची आभा निर्माण होते. योगी, तपस्वी, महापुरुष या सुवर्ण पीठिकापुरात राहण्यासाठी उत्सुक असतात. परंतु हे दिव्य पुरुष आपल्या सामान्य दृष्टीला अगोचर असतात. सुवर्ण पीठिकापुर केवळ योग चक्षु, ज्ञान चक्षु असलेल्या साधकांनाच गोचर असते."

# काशीतील पंचकोश यात्रा विशेष

सुवर्ण पीठिकापुरा प्रमाणेच सुवर्ण काशी नावाचे एक दिव्य क्षेत्र आहे. ते भौतिक काशीच्या विस्तारा एवढेच आहे. सुवर्ण काशी चैतन्यमय पदार्थांनी निर्मित आहे."काशि यात्रां गमीष्यामि तत्रैव निवसाम्यहम् । इतिब्रुवाणस्सततं काशीवास फलं लभेत् ॥" असे शास्त्र वचन आहे. "मी काशीला जात आहे आणि तेथेच राहण्याचा विचार आहे." असे सतत म्हणणाऱ्या लोकाना सुध्दा काशीवासाचे फल प्राप्त होते. सुवर्ण काशीत निवास करण्यासाठी आणि काशी विश्वेश्वराच्या दर्शनासाठी प्रत्येकांने त्यांचे निरंतर, मोठ्या श्रध्दाभावाने, चिंतन केले पाहिजे.

तुझ्या अन्नमय कोषाच्या संबंधित एक भौतिक पीठिकापुर आहे तसेच एक भौतिक काशी सुध्दा आहे. प्राणमय कोषाच्या संबंधीत एक भौतिक पीठिकापुर आहे तसेच एक भौतिक प्राणमय काशी सुध्दा आहे. मनोमय कोष, विज्ञानमय कोष आणि आनंदमय कोष, या प्रत्येक कोषाच्या संबंधाने एक एक पीठिकापुर व काशी आहे.

या आनंदमय पीठिकापुरमलाच सुवर्ण पीठिकापुर असे म्हणतात. तसेच या आनंदमय काशीलाच सुवर्ण काशी असे म्हणतात. या वक्तव्यावर मी म्हणालो, "महोदया, मी अल्पज्ञ आहे.

 

कृपा करून माझ्यावर अनुग्रह करा आणि या विषयाचे सुबोध विवेचन करून सांगा. काही लोक काशीतील पंचक्रोष यात्रेच्या फला बद्दल सांगतात ती यात्रा कोणती ?" माझ्या प्रश्नाचे समाधान करण्यासाठी श्री भास्कर पंडित म्हणाले "बाळा, पंचक्रोश यात्रा म्हणजे भौतिक यात्रा असते. वास्तविक पाहता आपण करावयाची असते ती यात्रा अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय कोष म्हणविली जाणारी ही पंचक्रोष यात्रा. ही आपण चैतन्य रूपानेच करायची असते. हेच या पंचक्रोषमय यात्रेचे गूढमय दैवरहस्य आहे. श्रीपादांच्या अनुग्रहामुळेच साधकाला पंचक्रोष यात्रा करण्याचे सामर्थ्य प्राप्त होते त्यामुळेच पंचभूतांशी संबंधित पंचमहायज्ञ श्रीपाद प्रभूंच्या योगशक्तीने सिध्द

होतात. या पंचमहायज्ञाचे प्रतिक म्हणून कुरुगड्डीजवळ पंचदेव पहाड सुशोभित केलेला आहे. दैव रहस्याचे अनुष्ठान ज्यांनी केले, ज्यांची योगदृष्टी आहे अशा साधकालाच हे सर्व आकलन होते. इतर सर्व सामान्य मानवांना त्या बद्दल कांहींच बोध होत नाही."

श्रीपाद प्रभूंनी काशीत गंगास्नान केले तेंव्हा गंगामाता प्रत्यक्ष प्रगट झाली आणि तिने श्रीपाद प्रभूना रोज गंगा स्नान करण्याची प्रार्थना केली. त्या वेळी श्रीपादांनी "मी दररोज गंगेत स्नान करीन" असा वर दिला यामुळेच गंगामातेचे चैतन्य सुध्दा पंचक्रोषात सामावलेले आहे. तसेच गंगामातेचे वास्तव्य पंचक्रोशात आहे. यावर मी म्हणालो महाराज "गंगामाता

 

जल स्वरूप असते असते ना ? ती पंच कोशात कशी असेल ? मला हे समजत नाही." यावर हसून भास्कर पंडित म्हणाले, "बाळा, देवता या मंत्रस्वरूप असतात. त्या भौतिक स्वरूपात नसतात मंत्रस्वरूप म्हणजे शब्दब्रह्माचे शक्तीरूप होय.

गंगामाता ही शक्ति देवता आहे. चैतन्य स्वरूप असलेली ही देवता असा याचा अर्थ आहे. ती भौतिक स्वरूपातील गंगानदी ही तादात्म्यस्थितीतील अभिमान देवता आणि चैतन्य स्वरूपातील देवता आहे. त्याच प्रमाणे सूर्यदेवता (चैतन्य स्वरूप) जे सृष्टीत दिसतात ते सूर्य खगोलात तादात्म्य स्थितीतील चैतन्यरूप देवता

असतात. हे धर्मसूक्ष्म गूढ असलेले दिव्य रहस्य तुला आता चांगले समजले असेल.

प्रत्येक मानवात जलतत्व असते त्याच्या शुध्दिकरणासाठी जलयज्ञ करण्याचा संकल्प करतात. त्यासाठी ते दररोज काशीतील गंगा स्नानास जातात. या योग प्रक्रियेमुळे भौतिक रूपात असलेल्या जलवासनेला पवित्रता येते. पवित्र अशा नद्‌या आपल्या अतिपवित्र जलांनी मानवांचे मालिन्य दूर करून त्यांना पवित्रता प्रदान करतात. गंगा, गोदावरी या सारख्या महानद्‌या पापी मानवानी केलेल्या त्यांच्यातील स्नानाने अपवित्र होतात. या नद्‌यांमध्ये जेंव्हा चैतन्यस्वरूप महापुरुष आणि पुण्यात्मे स्नान करतात तेंव्हा या महानद्‌या पूर्ववत् पवित्र

 

होतात. जलयज्ञ करण्याचा अर्थ म्हणजे जीव राशींच्या शरीरात जल स्वरूप आणि जलतत्वांचेच शुध्दिकरण असते. श्रीपाद श्रीवल्लभ सार्वभौम आहेत. केवळ एका आदेशाने कोटयानी कोटी ब्रह्मांडांची रचना, रक्षण आणि विलय करणारे असे महान त्रिमूर्ति स्वरूप दत्त प्रभूच आहेत. त्रेता युगात भारद्वाज मुनींना दिलेल्या वचनानुसार, भारद्वाज गोत्रातील सावित्रिकाठक महायज्ञ केलेल्या पुण्य स्थळी म्हणजेच पीठिकापुरम् या गावी श्रीपाद प्रभूंनी अवतार घेतला. त्यांच्या अवताराचे प्रयोजन, महायोग्यांना, महासिध्दांना, महापुरुषांना अनुग्रहित करून त्यांच्या करवी धर्माचा उध्दार करायचा. त्यांनी या अवतारानंतर नरसिंह सरस्वती नामरूपाने अवतार घेणार असल्याचे सांगितले, या दिव्य

वचनावर जे कोणी अविश्वास दाखवतील त्यांना आणि श्रीपाद प्रभूच्या अवताराची जे अवहेलना करतील त्यांना पिशाच्च योनी प्राप्त होईल. ते बलहीन आणि अत्यंत हीन दीन अवस्थेस प्राप्त होऊन नरक यातना भोगतील. अशा पापी व्यक्तींना गाणगापूर येथे श्री नृसिंह सरस्वती स्वामींच्या अवतारात विमुक्ति मिळेल असे श्रीपादांनी सांगितले आहे

तू लिहित असलेला श्रीपाद श्रीवल्लभ यांचा चरित्रामृत ग्रंथ अक्षरश: अक्षर सत्य ग्रंथ आहे. हा ग्रंथ सर्व भाषेमध्ये अनुवादिला जाईल. या महान ग्रंथाचे कोणत्याही भाषेत पारायण केले असता त्याचे विशिष्ट फळ प्रत्येकाला मिळेलच. याचे भाषांतर करण्याची योग्यता असणाऱ्यांची निवड ते स्वत:च करतील. या ग्रंथाचा अनुवाद

करणारे आणि अनुवाद करण्यास सहाय्य करणारे संबंधित यांच्यावरही महाराजांची विशेष कृपा होईल. हा ग्रंथ पुण्य मंदिरात ठेऊन त्यांची पूजा केल्यास त्यांना कृपालाभ होईल. या ग्रंथ पारायणाने, कलीयुगात, सर्व शुभ गोष्टी घडतील. असे महाप्रभू म्हणाले. तुझे हे ग्रंथ लेखनाचे काम श्रीचरण तुझ्या कडून पूर्ण करून घेतील." त्यावर मी म्हणालो "महाराज तुम्ही सांगितलेले सर्व योग्यच आहे. पण मी पंडित मुळीच नाही. शिवाय वेद वेदांताचे ज्ञानाविषयी मी अनभिज्ञ आहे. या अल्पज्ञाकडून आपण केवढे महत्कार्य करून घेत आहात याचे मला आश्चर्य वाटते आणि आंनदही होतो." यावर भास्कर पंडित म्हणाले "खरे तर असे दत्तविधानच आहे की निषिध्द पदार्थाने रोग बळावतात परंतु

आश्चर्य असे की अद्भूत अशी महतकार्ये कांही न येणाऱ्या सामान्य व्यक्तीकडून करवून घेण्याचा श्रीपाद प्रभूंचा नित्य विनोदी स्वभाव आहे. हे त्यांच्या दिव्य शक्तीचेच निदर्शन आहे."

एके दिवशी एक संन्यासी पीठिकापुरम् मधील कुक्कुटेश्वर मंदिरात आले. त्यावेळी श्रीपाद श्रीवल्लभ बालअवस्थेत होते. श्री नरसिंह वर्मा (महाशय) आणि वेंकटप्पय्या श्रेष्ठी (महाशय) बालक श्रीपाद श्रीवल्लभांना घेऊन घोडागाडीतून कुक्कुटेश्वराच्या मंदिरात आले. त्यावेळी ते संन्यासी स्वयंभू दत्तमंदिरात ध्यान अवस्थेत बसले होते. त्यांना पाहून श्रीपाद श्रेष्ठींना म्हणाले "या साधूला मंदिरात का येऊ दिले ?"

नरसिंह वर्मा श्रीपादांना हलकेच म्हणाले "अरे बाळा, ते संन्यासी आहेत. त्यांना राग आल्यास आपणास ते शाप देतील." श्रीपाद म्हणाले, "म्हणजे यांना सुध्दा राग येतो तर. मासे पकडून ज्यांच्या जवळ माशांचा वास येतो त्यांना का संन्यासी म्हणावे ?" तितक्यात त्या संन्याशाने डोळे उघडले. त्यांच्या जवळ माशांचा वास येत होता. ते त्या संन्याशांना समजले. ते खरेखुरे संन्यासी होते. त्यांनी श्रीपादांकडे पाहिले. त्यांना मत्स्य अवतारातील श्रीविष्णुंची आठवण झाली. तेंव्हा श्रीपाद म्हणाले "तुमच्या कमंडलूत सुध्दा छोटे छोटे मासे आहेत, तुम्हीच पहा."

# संन्याशावर विशेष अनुग्रह

संन्याशाला कमंडलूत मासे पाहून खूप आश्चर्य वाटले. श्रीपाद त्या संन्याशाकडे तीव्र नजरेने पाहात होते. तितक्यात ते संन्यासी अंत:र्मुख झाले. त्यांना योग दृष्टी प्राप्त होऊन त्यांच्या शरीरातील रक्त नलिकेतील विभिन्न द्रवातील लहान लहान थेंब मत्स्याकार असल्याचे जाणवले. ते थेंब विविध प्रकारच्या अनुभूतीचे प्रदर्शन करीत होते. एक एक थेंब जणु काही एका एका वासनेचे रूप घेऊन माशाच्या आकारात तरळत होता. "अहा ! मत्स्यावतार प्रक्रिया म्हणतात ती हीच काय ?" असे आश्चर्यचकित होऊन ते संन्यासी ओरडले. या सूक्ष्म थेंबाविषयी ज्ञानप्राप्त झाल्यास प्रपंचातील

 

सर्व वासनांवर नियंत्रण ठेवता येणे शक्य असल्याचे त्या संन्याशांना कळाले. संन्यासी बहिर्मुख झाले. त्यांनी मंद हास्य करीत श्रीपादांच्या मुखाकडे मोठ्या श्रध्दा भावाने पाहिले. श्रीपादांनी सुध्दा मंदहास्य करीत त्यांच्या कडे बघितले. संन्यासी श्रीपादांच्या चरण कमलावर नतमस्तक झाले. श्रीपादांनी मोठ्या प्रेमभराने आपला हात त्या संन्याशाच्या मस्तकावर ठेऊन त्यांच्यावर अनुग्रह केला. त्या स्पर्शाने त्या संन्याशाच्या शरीरातील माशाचा वास लुप्त झाला आणि त्या जागी एक दैवी सुगंध येऊ लागला. या वेळी त्या संन्याशास पराशर मुनींनी आपल्या कृपा दृष्टीने मत्स्यगंधेच्या शरीरास येणारा माशांचा दुर्गंध नष्ट करून त्या ठिकाणी सुगंध प्रस्थापित

केल्याच्या घटनेची स्मृती झाली. याच प्रमाणे पतिव्रता मातलीच्या शरीरातून सुगंध येत असे म्हणूनच तिला सुवासिनी असे म्हणत.

ज्या प्रमाणे शरीरातील अनुभूती सुवासात परिवर्तित होतात त्या प्रमाणे भौतिक शरीरात सुध्दा बदल होऊन सुवासाची अनुभूति येते असा श्रीपाद प्रभूंनी त्या संन्याशाला मौनबोध केला. यानंतर श्रीपाद म्हणाले, "अरे बाबा, तुला मत्स्य अवतारा बद्दल कळाले. दैवी प्रकृती आणि असुरी प्रकृती यांना कुर्मावताराचा आधार आहे. मंदार पर्वताला कूर्मावर प्रस्थापित करून देव दानवांनी समुद्र मंथन केले होते. तू अंतर्मुख होऊन कासव ज्या प्रमाणे संकटाचे समयी आपली इंद्रिये आत ओढून घेऊन ती

नियंत्रणात ठेवतो त्याच प्रमाणे तू आपल्या ज्ञानेद्रिंयांना आणि कर्मेंद्रिंयांना आपल्या स्वाधीन ठेवल्यास मोठा योगी होशील. असे न केल्यास बहिर्मुख होऊन सर्व दुर्गुणांनी युक्त होऊन राक्षस होशील. तू बहिर्मुख झाल्या क्षणीच कोणी तरी तुला मारून टाकील. तुला जीवन हवे असल्यास तू अंतर्मुख होऊन योगाभ्यास कर. असे केल्यास तुझी सर्व बंधनातून सुटका होईल."

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

 

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

# अध्याय -45

## श्री हनुमंताला भूमीवर अवतार घेण्याची अनुज्ञा-काशी क्षेत्रातील श्रीपाद प्रभूंच्या लीला

श्री भास्कर पंडितांच्या घरी आमचे मध्याह्न भोजन झाले. त्यानंतर त्यांनी सांगण्यास सुरुवात केली. ते म्हणाले "श्रोते हो ! श्रीपाद प्रभूंच्या लीला अतर्क्य आहेत. त्यांनी काशी नगरात अनेक महापुरुषांना आशिर्वाद दिले. त्यांना हव्या असलेल्या योगसिध्दि प्राप्त करून दिल्या. ते

ऋषींच्या समुदायास उद्देशून म्हणाले, "मी नृसिंह सरस्वती नावाने अजून एक अवतार धारण करणार आहे. मी पीठिकापुरत अदृश्य होऊन काशी क्षेत्री येण्याचे प्रबल कारण हे महापुण्य क्षेत्र आहे. सिध्द संकल्पाची येथे पूर्तता होते. मी दररोज गंगेत स्नान करण्यासाठी योग मार्गाने येत असतो. मी नृसिंह सरस्वती अवतारात येथेच संन्यास दीक्षा स्वीकारणार आहे. येत्या शतकात क्रिया योगाचे ज्ञान इच्छिणाऱ्या गृहस्थाश्रमी लोकांना बोध करण्याच्या निमित्ताने श्यामाचरण नावाच्या एका साधकाला येथे काशीत जन्म घेण्याचा आदेश देत आहे. येणाऱ्या युगात ब्रह्मज्ञानी हनुमंताला श्यामा चरणांजवळ क्रिया योग शिकण्यास सांगितले आहे. हे त्रिवार सत्य आहे."

# हनुमंताला सीता, राम, लक्ष्मण आणि भरताचे दर्शन

तेवढयात श्रीपाद प्रभू ऋषिसंघा बरोबर योगमार्गाचे अनुसरण करीत बदरिका वनात येऊन पोहोचले. तेथे त्यांनी नर-नारायण गुहेत अनेक शिष्यांना क्रिया योग दीक्षा दिली. तेथून बारा कोस दूर असलेल्या उर्वशी कुंडाजवळ ते आले. ऋषिगंगेत सुध्दा त्यांनी स्नान केले. पाच हजार वर्षा पासून तपस्या करीत असलेल्या सर्वेश्वरानंद नांवाच्या महायोग्यास श्रीपाद प्रभूंनी आशिर्वाद दिला. तेथून ते नेपाळ देशात गेले. तेथे एका पर्वतावर रामनामाच्या ध्यानांत मग्न

असलेल्या हनुमंतास श्रीराम, सीता, लक्ष्मण, भरत आणि शत्रुघ्न या सर्वांचे दर्शन एकत्रितपणे श्रीपादांनी घडविले. ते हनुमंताला म्हणाले, "हे हनुमंता, तू रामनामाचा किती कोटी जप केलास याचा अंदाज लागत नाही. इतक्या थोडया काळात तू रामनामाचा एवढा महान जप केलास की चित्रगुप्ताला सुध्दा त्याचा हिशेब ठेवणे अशक्य झाले. या मुळेच तू चिरंजीव पदास प्राप्त झालास. तू कालातीत आहेस. तुझे आयुष्य किती लक्ष वर्षे आहे ते चित्रगुप्ताला सुध्दा लिहिणे अशक्य आहे. तू कलियुगात अवतरीत हो, जितेंद्रिय होऊन सर्वांना वंदनीय होशील."

# रामबीज महिमा

यावर हनुमंत म्हणाला "प्रभु राम बीज हे अग्निबीजच आहे. त्यांच्या मुळेच मला अग्नि सिध्दि प्राप्त झाली. मी देहबुध्दिने तुमचा अंश आहे. आत्मबुध्दिने मी तुमचेच स्वरूप झालो आहे. मी कोणत्या स्वरूपात अवतार घ्यावा ते मला सांगा." श्रीपाद प्रभु मंदहास्य करून म्हणाले. "तू शिवांश रूपाचा रामभक्त हो. अरबी भाषेत अल म्हणजे शक्ति आणि अहा म्हणजे ती शक्ति धारण करणारा म्हणून अल्लाह म्हणजे शिवशक्ति स्वरूप असा त्याचा अर्थ आहे. इतकी वर्षे सीतापती म्हणून माझी सेवा केलीस आता यवन जातीच्या लोकांनी अंगिकार करण्यायोग्य असा शिवशक्ति स्वरूप

अल्लाह नावाने माझी आराधना कर." यावर हनुमंत म्हणाला, "प्रभो मला भारद्वाज महर्षी त्रेतायुगात सावित्रीकाठक पिठपुरात करणार असल्याचे ज्ञात होते. त्यावेळी दिलेल्या वरामुळे तुम्ही भारद्वाज गोत्रात जन्म घेणार असल्याचे मला समजले होते. त्यामुळे मी तुम्हाला सोडून कोणत्याही परिस्थितीत राहू शकत नाही. तुमचे आणि माझे गोत्र एकच आहे. त्यामुळे मी तुमचा मुलगाच आहे होय ना ?"

**श्रीपाद प्रभू आणि हनुमंताचा संवाद**

यावर श्रीपाद प्रभू म्हणाले "बालका हनुमंता तू धारण केलेला देह हा भारद्वाज गोत्राचा आहे."

यावर हनुमंत म्हणाला "अल्ला मालिक" याचा अर्थ अल्लाच सर्वाचा मालक आहे असाच ना ? श्रीपादानी मोठ्या प्रेमभराने हनुमंतास आलिंगन दिले व म्हणाले "हनुमंता, तू देहबुध्दि सोडून दे. तू माझाच अंश आहेस. "प्रभो, याचा मी अंगिकार करतो, की मी तुमचाच अंश आहे," हनुमंत म्हणाला, "मी या भूमीवर तुमचे कार्य करून नंतर मूळ तत्वात विलीन होऊन जाईन तेंव्हा अंश अवतार ही पूर्णपणे नष्ट होईल. अंश अवतारात मूळ तत्त्व निरंतर माझ्या सोबतच राहतील. ती तत्वे जेंव्हा फोफावतील तेंव्हा तुमच्या शक्ति संपदा आणि मूळ तत्त्वांनी मला धरून ठेवा ." यावर श्रीपाद म्हणाले, "अरे हनुमंता, तू फारच बुध्दिवान आहेस. ज्या माझ्या शक्ति आहेत त्या तुझ्याच

आहेत. मी नृसिंह सरस्वती अवतारात श्रीशैल्या जवळील कदळीवनात गुप्तपणे तीनशे वर्षे योग समाधि मध्ये राहीन. त्यानंतर प्रज्ञापूर (सध्याचे अक्कलकोट गांव) येथे स्वामी समर्थ या नांवाने प्रसिध्द होईन. हा अवतार समाप्त करते वेळी साई रूपाने तुझ्यात अवतरीत होईन. मी हे स्पष्टपणे सांगतो की माझा अवतार तुझ्या स्वरूपात प्रकट होईल. त्यावेळी तू एका समर्थ सदगुरुंच्या अवतारात प्रसिध्दि पावशील. यानंतर हनुमंत म्हणाला "प्रभू मी तुमचा सेवक अल्ला मालिक है ! असे म्हणत संचार करीन. जीवत्व बुध्दिमुळे मी आपला अंश असून सुध्दा आपल्या प्रमाणे प्रवर्तन करू शकणार नाही. आपले श्रीचरण म्हणजे प्रत्यक्ष दत्त प्रभूच. आपणांत आणि माझ्यात अंतर असणे कसे

शक्य आहे. मी तुमच्या स्वरूपात आणि तुम्ही माझ्या स्वरूपात बदलल्यास आपणातील अद्वैत सिध्द होईल. यासाठी आपण मला दत्त प्रभूंच्या सायुज्यतेचा प्रसाद द्या."

श्रीपाद प्रभूंनी कालपुरुषास आपणाजवळ येण्याची आज्ञा केली. कालपुरुष श्रीपाद प्रभू समोर हात जोडून उभा राहिला. तेंव्हा श्रीपाद प्रभू म्हणाले "हे कालपुरुषा ! हा हनुमंत कालातीत आहे. मी याला माझी सायुज्यता प्रसाद रूपाने दिली आहे. त्याला नाथ असे संबोधन देत आहे. आता पासून तो साईनाथ या नावाने संबोधन केला जाईल. आज दत्त जयंती साजरी करू या.

हनुमंतातील चैतन्य दत्त स्वरूपात प्रकट झाले. हे पाहून ऋषि समुदाय श्रीपाद प्रभूंकडे आश्चर्याने पाहू लागला. तेवढयात हनुमंताच्या शरीरातील जीवाणुंचे विघटन झाले. त्यातून अनसूया माता प्रकट झाली. ती श्रीपाद वल्लभांना पाहून म्हणाली, "बाळ, कृष्णा ! तू किती उत्तम मुलगा आहेस. तुला जन्म दिला तेंव्हा सर्व साधारण मातेला होणाऱ्या प्रसव वेदना मला झाल्या नाहीत. मातेला अशा वेदनेमध्ये सुध्दा एक प्रकारचे सुख असते. त्यात माधुर्याची अनुभूति येत असते. परंतु तुझ्या जन्माच्या वेळी मी या सुखापासून वंचितच राहिले. तू माझ्या पोटी पुन्हा जन्म घेणार नाहीस ना ? ही तुझी वैष्णवी माया मला समजत नाही." यावर श्रीपाद प्रभू म्हणाले

"हे माते ! पुत्राने मातेची धर्मबध्द इच्छा पूर्ण करायचीच असते. तुझ्या गर्भातून प्रकट झालेला हा हनुमान आहे. त्याला माझी सायुज्य स्थिति प्राप्त करून दिली आहे. एका प्रकारे सांगायचे म्हणजे माझ्या मायेने मी तुझ्या पोटी पुन्हा जन्म घेत आहे. थोडयाच वेळात तुला तीव्र प्रसव वेदना होतील. अनसूया मातेने तीन शिरे असलेल्या दत्तमूर्तीस जन्म दिला. थोडयाच वेळात ती मूर्ती अंर्तधान पावून तिच्या मांडीवर एक शिशु प्रकट झाला. त्या नवजात शिशूला अनसूया देवीने स्तनपान करविले. ही घटना घडल्यानंतर थोडयाच वेळात हनुमंताचे स्वरूप दिसले. त्यांच्या समोर श्रीरामचंद्र उभे होते. त्यानंतर हनुमान म्हणाला "म्लेंछ धर्मातील चांगली तत्वे व सनातन धर्माची उत्तम तत्वे

या दोघांचा समन्वय करण्याचा मी प्रयत्न करीन. म्लेंच्छ लोकांचा सुध्दा गुरु असावा ना ?" यावर श्रीपाद म्हणाले "मेहबूब सुभानी नांवाचा एक महाज्ञानी माझ्यात समावलेला आहे. तो वारीफ अलिफ या नांवाने अवतरीत होईल. तो तुझा गुरु होऊन योगरहस्याचे ज्ञान देईल. क्रिया योगाचे ज्ञान शामाचरण नांवाचे गुरु देतील. त्यांच्या कडून तुला हवे असलेले वर प्राप्त होतील."

## माणिक प्रभूंचा अविर्भाव

हनुमंत म्हणाले, "प्रभू तुम्ही पद्मावती वेंकटेश्वर स्वरूप असल्याचे मी ऐकले होते. तुमची

आराधना जाणणाऱ्या वैष्णव स्वामींना सुध्दा तुमचा अनुग्रह प्राप्त झाला." यानंतर श्रीपाद प्रभु म्हणाले "निरंतर माझे स्मरण करून माझ्या चैतन्य रूपात तुझ्या मनाला सदैव लीन कर. गोपालराव नावाचे महावैष्णव तुझे गुरु होतील असा मी तुला वर देत आहे. ते श्री वेंकटेश्वराचे भक्त होऊन व्यंकन्ना या नांवाने संबोधित होतील. त्यांच्या महा प्रयाणानंतर त्यांच्या अस्थि कांही काळपर्यंत एका मातीच्या भांडयात घालून भूमीमध्ये सुरक्षित ठेव . माझी सूचना मिळाल्यानंतर तू ते भांडे उघडून पहा त्यात वेंकटेशाची मूर्ती असेल. त्या मूर्तीची तू पूजा कर. मी प्रसन्न होईन आणि तुला इच्छित वर प्रदान करीन." यावर हनुमंत जानकी मातेस म्हणाला "माते तू मला अत्यंत

 

प्रेमाने व वात्सल्यभावाने एक माणिक मोत्यांचा हार दिला होतास. त्या हारातील माणीक मोत्यात राम शोधण्यासाठी मी दगडाने ते माणिक मोती फोडले. परंतु त्यात श्रीराम दिसले नाही म्हणून तो हार मी फेकून दिला. या महान अपराधाची मला क्षमा करावी." यावर श्रीपाद प्रभू म्हणाले "देवाच्या सान्निध्याशिवाय कोणतेही कार्य पूर्णतेस जात नाही. तो माणिकांचा हार मी व्यवस्थित ठेवला आहे.

तो हार दत्त स्वरूप आहे यात शंकाच नाही. माझ्यात असलेल्या आत्मज्योतीने मी त्या हारात प्राण ओतले आहेत." तो माणिकांचा हार गुरुस्वरूपाच्या दिव्य तेजाने तळपत होता. ते

 

गुरु स्वरूप माणिक प्रभूंच्या स्वरूपात प्रसिध्द पावेल.

श्रीपाद श्रीवल्लभ म्हणजे बदरिनाथ क्षेत्रातील नारायण स्वरूपच आहेत. ते पुन्हा मानव देह धारण करणार आहेत परंतु त्यांचे नाम व रूप कसे असेल ते कोणीच जाणू शकत नाही.

## श्रीपाद प्रभूंचे द्रोणागिरी पर्वताजवळील शंबलगिरी ग्रामात वास्तव्य

श्रीपाद प्रभूंचे मामा वेंकावधानी महाराज विद्यार्थ्यांना वेदांचे शिक्षण देत असत. त्या स्थळाच्या जवळच एक नारळाचे झाड होते. त्या

वेदशाळेच्या दिव्य परिसरात एक वानर वेदाध्ययनाकडे आकर्षित झाले होते. ते झाडावरील नारळ न तोडता किंवा इतर कोणत्याही वस्तुला हात न लावता मोठ्या श्रध्दाभावाने वेदांच्या पाठाचे श्रवण करीत असे. श्रीपाद प्रभूंनी मोठ्या निरागस भावाने विचारले "मामा, भगवंताच्या अवतारा प्रमाणे नारळाच्या झाडाचा अवतार असतो का ?" "कृष्णा, हा कसला तुझा प्रश्न ? प्रश्नाला सुध्दा अर्थ असावा." यावर श्रीपाद म्हणाले "तसे नव्हे मामा झाडांना फळे येतात. त्या फळातील बीजापासून पुन्हा नवीन झाडाची उत्पत्ती होते. या प्रमाणे ही प्रक्रिया बीजापासून झाड व त्याच्या पासून पुन्हा बीज निर्मित चालूच असते." येवढयावर त्यांचे संभाषण थांबले. त्याच

वेळी त्यांच्या शेजारी असलेल्या झाडाचे एक मोठे नारळ खाली पडले. ते नारळ श्रीपादानी आपल्या हातात घेतले. त्या वानराकडे पाहून श्रीपाद म्हणाले "तुला रिक्त हस्ताने पाठवणे मला योग्य वाटले नाही. माझ्या हातांनी तुला हे नारळ प्रसाद म्हणून देत आहे." श्रीपादांनी ते नारळ त्या वानराच्या हाती देऊन मोठ्या प्रेमभावाने त्याच्या पाठीवरून हात फिरविला व म्हणाले, "तू माझ्याकडून अजून एक नारळ मागू नकोस. तुला हे मान्य असल्यास मी तुला नारळ देईन." वानराने होकारार्थी मान हालवली तो नारळ घेऊन ते वानर आनंदाने निघून गेले. प्रत्यक्षात ते वानर कोण होते ? श्रीपादांनी ते नारळ त्याला का दिले ? अजून एक नारळ देणार नाही असे ते का म्हणाले

? कांही प्रयत्न न करीता ते नारळ खाली कसे पडले ? आणि कोणासाठी ? या सर्व प्रश्नाची उत्तरे कोण देऊ शकेल ? श्रीपाद प्रभूंच्या लीला अद्भूत, अगम्य आणि अनाकलनीय आहेत हेच खरे.

श्रीपाद प्रभू द्रोणागिरी नांवाच्या संजीवनी पर्वतावर गेले. काही दिवस तेथील ऋषि मुनींच्या समुदाया बरोबर आनंदात राहिले. तेथे असलेल्या महायोग्यांना अनुग्रह देऊन कृतार्थ केले. तेथून ते कल्कि प्रभूंचा जन्म ज्या गावी होणार आहे. त्या गावी गेले. तो प्रदेश महायोग्यांनी सुध्दा न पाहिलेला होता. हिमालयात हजारो वर्षापासून तपश्चर्या करणारे महापुरुष या ग्रामात आहेत. संबल गावातील

स्फटिक पर्वतावरील शुध्द जल श्री प्रभूंनी प्राशन केले. ते जल पिणाऱ्याचे वय वाढत नाही असे येथील या जलाचे माहात्म्य आहे. या मुळेच श्रीपादांचे वय सोळा वर्षाच्या कुमारा सारखेच राहिले. त्यात वयानुसार कोणताच बदल झाला नाही.

## श्रीपाद प्रभूंचे गोकर्ण क्षेत्रातून दिव्यलोकात प्रयाण

यानंतर श्रीपाद प्रभू अनेक दिव्य स्थानांना भेट देत साधकांना, भक्तांना , महापुरुषांना अनुग्रह देत गोकर्ण महाबळेश्वर क्षेत्रास येऊन पोहोचले. या क्षेत्री प्रभू तीन वर्षे राहिले. ह्या पुण्य क्षेत्रात त्यांनी अनेक अगम्य लीलांचे प्रदर्शन

केले. परंतु त्यांचे वर्णन करणे केवळ अशक्यच आहे. गोकर्ण क्षेत्राहून निघून श्रीपाद प्रभू श्री शैल्य क्षेत्रास येऊन पोहोचले. श्री बापनाचार्युलूंनी येथे एक महायज्ञ केला होता. या यज्ञाचे फलस्वरूप श्री मल्लिकार्जुनाच्या लिंगामध्ये सूर्य मंडलातून शक्तिपात झाला होता. त्या योगानेच श्रीपाद प्रभूंचा अवतार झाला.

श्रीपाद प्रभू योगमार्गाने महाअग्नि गोलका सारखे लाल तप्त होऊन सूर्य मंडलात गेले. तेथून ते धुरव नक्षत्रातून, सप्तऋषि मंडलातून आद्र्रानक्षत्रातून फिरून चार महिन्यानंतर श्री शैल्यास परत आले. त्यांच्या बरोबर त्या नक्षत्रावर वास्तव्य करणारे महर्षी अत्यंत नूतन असा योग इये शिकण्यासाठी आले.

श्रीशैल्यामधील सिध्द पुरुषांची, ऋषींची श्रींनी एक सभा बोलावून सर्व ऋषीना, दुसऱ्या ग्रहावरून आलेल्या महर्षींना त्या नूतन महायोगाचा, सिध्दयोगाचा बोध केला. त्या बोधाने सर्व ऋषि , मुनीगण अत्यंत आनंदित झाले. या ज्ञानामृत प्राशनानंतर आद्र्रानक्षत्रातील ऋषि स्वस्थानी परतले. श्रीपाद प्रभू श्रीशैल्याहून कांही दिवसानी कुरुगड्डी या पवित्र क्षेत्री येऊन पोहोचले.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

# अध्याय -46

## श्रीपादांच्या चरण पादुकेवरील मंत्राक्षता-मध्येवाढ पादुकांची श्री भास्कर पंडिताना भेट

आम्ही भास्कर पंडिताकडून परवानगी घेऊन प्रयाणास सिध्द झालो. भास्कर पंडित थोडया वेळ ध्यानस्थ झाले. श्रीपादांच्या पादुका भास्कर पंडितानी आपल्या देव घरात ठेवल्यास होत्या. त्या पादुकावर वाहिलेल्या अक्षता वाढत होत्या. ते पाहून आम्ही आश्चर्य चकित झालो. भास्कर

पंडित म्हणाले "हे श्रोत्यांनो ! श्रीपादांच्या लीला अगम्य आहेत. श्री पद्मावती मातेचे जन्मनक्षत्र मृग आहे. आणि श्री वेंकटेश्वराचे जन्मनक्षत्र श्रवण आहे. उत्तर फाल्गुनी नक्षत्र पद्मावती मातेस मित्रतारा आहे तर श्री वेंकटेश स्वामीना ते परममित्र तारा असल्याने त्यांचे लग्न नक्षत्र उत्तरा फाल्गुनी आहे. आजसुध्दा उत्तरा फाल्गुनी नक्षत्र आहे. या दिव्य नक्षत्रावर श्रीपाद प्रभूंच्या चरण पादुकां वरील मंत्राक्षता वाढल्या. यावरून श्रीपाद प्रभू साक्षात पद्मावती आणि श्री वेंकटेश स्वरूपच आहेत. हे कळण्यासाठी त्यांनी ही लीला केली. यातील थोडया मंत्राक्षता तुमच्या जवळ ठेवा . त्या तुम्हाला शुभ ठरतील आणि श्री प्रभूंची कृपा तुमच्यावर सदोदित राहील."

# शंकरभट्ट आणि धनगुप्त यांच्या बरोबर देश पर्यटन आणि विविध क्षेत्राचे दर्शन

आम्ही प्रवासाचा संकल्प करून बैलगाडीने प्रवास सुरू केला. ती बैलगाडी एका लग्नाच्या वरातीची होती. या वरातीतील वैश्य प्रमुख, घोडा गाडीतून प्रवास करीत होते. ते "कोंडविडू" गावी जात होते. ते वैश्यप्रमुख धनगुप्ता म्हणाले "आज फार शुभ दिवस आहे. तुम्ही बैलगाडीतून प्रवास करून श्रीपाद प्रभूंच्या मंत्राक्षता लग्न घरी दिल्या व नंतर आम्हालाही दिल्या." ते पुढे सांगू लागले "मी एकदा व्यापाराच्या निमित्ताने पीठिकापुरमला गेलो होतो. तेंव्हा मला श्रीपाद

प्रभूंचे दर्शन श्री वेंकटप्पा श्रेष्ठींच्या घरी झाले होते. त्या वेळी श्रीपाद प्रभू प्रेमभराने म्हणाले "तुझ्या पुत्राच्या विवाह समयी मी मंत्राक्षता आशिर्वाद स्वरूप तुला पाठवून देईन. ज्यांच्याकडून मंत्राक्षता पाठविन त्या ब्राह्मणास दोन वराह दक्षिणा दे. या नंतर आम्ही कोंडविडू गावी पोहोचलो. तेथे धनगुप्ताच्या मुलाचे लग्न मोठ्या थाटात पार पडले. या ठिकाणी आमची ओळख एका हिरे मोत्याच्या व्यापाऱ्याशी झाली. धनगुप्त कोंडविडू या गावी थोडे दिवस राहिले. मी मात्र घोडागाडीने विजय वाटिका (सध्याचे विजयवाडा) या स्थळी आलो. या महाक्षेत्रात कृष्णा नदी असून श्री कनकदुर्गा व श्री मल्लेश्वर स्वामी यांचे मंदिर आहे. कृष्णानदी मध्ये स्नान करून मी देवदर्शन

घेतले. देवीच्या देवळात मला एक वृद्ध संन्यासी भेटले. त्यांना अनेक दिवसांपासून पीठिकापुरमला जाऊन श्रीपाद प्रभूंचे दर्शन घेण्याची तळमळ लागली होती. विजयवाटिकेतून निघून आम्ही दोघे कांही दिवसांनी राजमंडी क्षेत्री येऊन पोहोचलो. तेथे गोदावरी नदीत स्नान करून श्री माडेश्वराचे आणि कोटी लिंगेश्वराचे दर्शन घेतले. आमचा प्रवास श्रीपादाचे कृपेने अत्यंत सुखकर होत होता. मी माझ्याबरोबरच्या संन्याशाला म्हणालो, "थोडयाच दिवसात आपण पीठिकापुरमला पोहोचू. तेथील श्रीपाद प्रभू अवतरीत झालेले त्यांचे घर पाहू. श्री वेंकटप्पा श्रेष्ठी आणि नरसिंह वर्मा यांची भेट घेऊ या. श्रीपादांचे आजोबा श्री बापनाचार्युलु यांचे आशिर्वाद घेऊ. श्रीपाद प्रभूच्या माता सुमती महाराणी, पिता

अप्पलराज शर्मा यांची भेट घेऊ या. त्यानंतर आपण पीठिकापुरमहून कुरगड्डीस जाऊन श्रीपाद प्रभूंचे दर्शन घेऊ."

संन्यासी अत्यंत आनंदित झाला होता. मार्गातील अनेक देवालयाचे दर्शन घेत आम्ही थोडयाच दिवसात पीठिकापुरमला पोहोचलो. श्री बापनाचार्युलुच्या घरी आमची राहण्याची व जेवणा खाण्याची व्यवस्था झाली. श्रीपादांच्या अनेक बाललीला आम्ही भक्त जनांच्या मुखातून ऐकल्या. श्रीपाद प्रभूंच्या असंख्य लीलांचे वर्णन करणे सहस्त्रमुखे असलेल्या आदि शेषाला सुध्दा कठीण आहे तेथे माझ्या सारख्या य:कश्चित ब्राह्मणाची काय कथा ?

## श्रीपादांच्या भक्तांचे कुरगड्डीस प्रयाण

श्री नरसिंहवर्माच्या धर्म पत्नीने कुरगड्डीस जाऊन श्रीपादांचे दर्शन घेण्याचा संकल्प केला. याच संदर्भात त्यानी श्री वेंकटप्पा श्रेष्ठी आणि बापनाचार्युलु बरोबर चर्चा केली. सर्वानी मिळून एक मताने कुरगड्डीस जाण्याचा निश्चय केला. श्रीपादांचे माता-पिता, सुमती महाराणी आणि अप्पळराज शर्मा आपल्या पुत्राच्या भेटीची अत्यंत उत्सुकतेने प्रतीक्षा करीत होते. या सर्व मंडळींनी अठरा घोडागाडया ठरविल्या , त्यात बसून सामानासह एका शुभ दिनी प्रात:काळीच सर्वांनी प्रयाण केले. पिठापुरम् ते कुरगड्डी

अंतर बरेच असल्याने प्रवासास कित्येक दिवस लागणार होते. सुमती महाराणीस आपल्या लाडक्या पुत्राचे मुख केंव्हा पाहीन असे झाले होते. त्यांच्या आठवणीने त्या मातेच्या डोळयात पाणी तरळले. सर्वांनी तिला आता आपण श्रीपादांना लवकरच भेटणार आहोत ना, असे सांगून तिचे समाधान केले. प्रवास चालूच होता.

## आईवडील, आजी आजोबा यांना श्रीपाद प्रभूंचे पुन:दर्शन

सर्वांतर्यामी आणि मायानाटकसुत्रधारी असलेले त्रिकालदर्शी श्रीपादांना बसल्या ठिकाणी पीठिकापुरमहून येणारी मंडळी घोडा गाडीसह

दिसत होती. प्रात:काळी निघालेल्या गाडया दुपारचे बारा वाजेपर्यंत चालतच होत्या. अचानक एक अद्भूत घटना घडली. गाडीवानासह सर्व मंडळींना एकदम मूर्च्छा आल्या सारखी वाटले. त्या सर्वांना आपल्या गाडया आकाश मार्गाने जात असल्यासारखा भास झाला. थोडया वेळाने मर्च्छा गेल्यावर आम्ही पाहिले तर एका अनोळखी प्रांतात आल्याचे जाणवले. गाडीतून खाली उतरून तो कोणता प्रांत आहे ते आम्ही पाहू लागलो.

रस्त्याने येणाऱ्या एका वाटसरूस ते कोणते गाव आहे ते विचारले. तो म्हणाला, महाराज, "हे पंचदेव पहाड गांव आहे. आज गुरुवार असल्याने आम्ही श्रीपाद प्रभूंच्या दर्शनास गेलो

होतो. त्या महाप्रभूंनी त्यांच्या दर्शनास आलेल्या प्रत्येक भक्ताला क्षेम कुशल विचारून त्याच्या आधिव्याधी दूर केल्या. दर्शनास आलेल्या सर्व भाविकांसाठी जेवणाची उत्तम व्यवस्था होती." असे सांगून तो वाटसरू आपल्या मार्गाने निघून गेला. आम्ही प्रात:काळी पिठापुरमहून घोडागाडीने निघालो होतो. आता दुपारचे साडेबारा वाजले होते आणि एवढया थोडया वेळात येथे कसे येऊन पोहोचलो याचे महदाश्चर्य वाटत होते. आम्ही नावेतून नदी पार करून कुरगड्डी गावात प्रवेश केला. हे स्वप्न आहे का वस्तुस्थिती आहे याचा आम्हाला भ्रम पडला होता. परंतु ही वस्तुस्थिती होती. आम्ही सर्वजण प्रभूंच्या दरबारात गेलो. सुमती मातेने श्रीपादांना मोठ्या वात्सल्यभावाने आपल्या

हृदयाशी धरले. तिच्या नयनांतून आनंदाश्रू ओघळत होते ते श्रीपादांच्या पाठीवर पडत होते. श्रीपाद म्हणाले "आई तू निर्गुण निराकार असलेला परतत्वाच्या मुलाची माता आहेस. तू अनसूया माते प्रमाणे पतिव्रता शिरोमणी आहेस." असे म्हणून त्यांनी आपल्या हाताने मातेचे अश्रु पुसले.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

|| श्री गुरुवे नम: ||

|| श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ||

# अध्याय -47

## पीठिकापूर पासून पंचदेव पहाड ग्रामापर्यंत श्रीपादांच्या माता, पिता, आजी आजोबा आणि भक्त गणांचे विचित्र प्रयाण

श्रीपादांच्या दरबारात सर्वांना यथेच्छ भोजन मिळत असे. अन्नपात्रातून कितीही अन्न काढले तरी त्यातील अन्न संपतच नसे. हे मोठे दिव्य आश्चर्य होते. सर्व प्राणीमात्रांनी भरपूर अन्न खाल्ल्यावर जलचरांना सुध्दा तो प्रसाद

 

मिळावा या उद्देशाने अन्नपात्रातील उरलेले अन्न कृष्णा नदीत सोडण्यात येई.

श्रीपाद प्रभू बापनाचार्युलुंना म्हणाले "आजोबा, तुम्ही श्रीशैल्यावर सावित्रि काठक यज्ञ संपन्न करून सूर्यमंडलातील तेज शक्तिपातद्वारा आकर्षित केले होते. तसेच मी अवतार घ्यावा म्हणून भारद्वाज मुनींनी अत्यंत आर्त भावाने प्रार्थना केली होती. त्यांना दिलेल्या वचनाचे पालन करण्यासाठी मी अवतार घेतला आहे. ब्रह्मस्वरूप हे शब्दांनी वर्णन करता येत नाही. तसेच मनानेही त्याची कल्पना करता येत नाही. ते ब्रह्मस्वरूप केवळ दत्तात्रेय प्रभूच जाणू शकतात. त्यासाठी आपण त्यांच्याच नांवाचा जयघोष करू या. मी देश कालावर

मात करू शकतो. माझ्या इच्छेला पर्याय नाही. माझ्या गरजेनुसार मी माझ्या मताशी तुमच्या मताची एक वाक्यता करू शकतो. अंतराळातील सारे तारे, ग्रह माझ्या हातातील खेळणे आहेत. मी तुमच्या प्रत्येक इच्छा आकांक्षा पूर्ण केल्या. आजोबा ! तुम्ही पूर्वी लाभादि महर्षी, नन्द, भास्कराचार्य झालात तेंव्हा प्रत्येक वेळी मी तुमच्यावर कृपा केली, आता बापन्नावधानुलु म्हणून आलात व मी श्रीपाद श्रीवल्लभांच्या रूपात भावविभोर होऊन आलो आहे. ह्यात आश्चर्य वाटण्यासारखे काहीं नाही."

यानंतर वेंकटप्पा श्रेष्ठी म्हणाले "हे सोन्या, हे कृष्णा, तुला सर्व कांही सोपे वाटते परंतु आम्हाला ते असाधारण आणि रोमांचकारी

 

वाटते." यावर श्रीपाद प्रभू म्हणाले "आजोबा मी पूर्णप्रज्ञ असून प्रत्येकाच्या कर्म-धर्मा प्रमाणे ज्याचे त्याला फल देत असतो. माझ्यातून निघालेला लहानसा किरण सुध्दा पृथ्वी सहन करु शकत नाही. थोडीशी कुंडलिनी शक्ति जागृत केली तरी तुम्ही ती सहन करू शकत नाही. त्यामुळे मी माझ्याच मायेमध्ये स्वता:ला सुरक्षित ठेवतो . जेंव्हा गरज पडेल तेंव्हा मी असाधारण कार्य करू शकतो. असा कोणताच वर नाही ज्यात माझी माया नाही. मी करू शकणार नाही असे कोणतेच कार्य नाही. तुम्हा सर्वांना पीठिकापुरमहून इतक्या थोडया वेळात पंचपहाड ग्रामापर्यंत आणण्यामागे मी "दत्त प्रभूच" आहे. हे तुम्हास कळावे हाच उद्देश होता. नरसिंह वर्मा म्हणाले, "सर्वजनांचे रक्षण

करणारा एकमेव क्षत्रिय तूच आहेस. बाकी सारे नाममात्र क्षत्रिय आहेत." यावर श्रीपाद प्रभू म्हणाले "क्षत्रियत्व हा माझा नेहमीचा स्वभावच आहे. शिवाजी महाराज या नावाने महाराष्ट्रात अवतार घेऊन सनातन धर्माचे रक्षण करावे अशी ईश्वरी इच्छा होती. या इच्छेनुसार शिवाजी राजाचा अवतार धारण करून महाराष्ट्रात हिंदवी राज्याची प्रतिष्ठापना करीन."

यावर नरसिंह वर्मा म्हणाले "सार्वभौम श्रीपादांचा जयजयकार असो" श्रीपादांच्या आजी म्हणाल्या "अरे बाळा ! तुझा विवाह सोहळा पाहण्यासाठी आमचे डोळे आतुर झाले आहेत. तुझा विवाह सोहळा मोठ्या थाटामाटाने साजरा झालेला आणि तुझ्या कपाळावर लग्नाच्या टिळा लाऊन,

मुंडावळया बांधलेला, सर्व श्रृंगारानी नटलेला नवरदेव आम्हास पहायचा आहे." श्रीपाद म्हणाले "आजी ! अवश्य तुमच्या इच्छेप्रमाणे होईल. मी कल्की अवतारात शंबल गावात जन्म घेईन. त्या वेळी पद्मावती नांवाच्या अनघालक्ष्मी बरोबर विवाह करीन. परंतु यासाठी कांही काळ लागेल. तुमची इच्छा मात्र मी अवश्य पूर्ण करीन." वेंकट सुब्बम्मा श्रीपादांना म्हणाली, "हे कान्हा ! तू माझ्या हातानी दूध, दही, साय, लोणी खाऊन खूप दिवस झाले. माझ्या हाताने तुला खाऊ घालण्याची तीव्र इच्छा आहे."

# मायानाटक सुत्रधारी श्रीपाद प्रभू आणि त्यांचा लीला विनोद

श्रीपाद म्हणाले "आजी तू अवश्य खाऊ घाल. मला आपल्या हाताने खाण्याचा कंटाळा आला आहे" तुम्ही पीठापुरमहून येताना दूध दही लोणी आणणार असे मला कळले होते परंतु एवढया लांबच्या प्रवासात ते चांगले रहावे म्हणून तुमच्या वात्सल्य प्रेमाने बंधित होऊन अशी लीला केली की ते जसे होते तसेच चांगले राहिले. आजी, यासाठी मी किती कष्ट सहन केलेत म्हणून सांगू. इतक्या दुरून अठरा घोडागाडयांना पंचदेव पहाड पर्यंत आणणे सामान्य आहे का ? माझे सारे अंग ठणकत आहे. माझ्या हातावर किती वळ उमटले ते

बघ. खरोखरी श्रीपादांच्या हातावर फोड आले होते. वेंकट सुब्बम्माने अत्यंत मृदु भावाने श्रीपादांच्या हातांना लोणी लावले. आणि अंगास गरम पाण्याचा शेक दिला. खरोखरी मायानाटक सुत्रधारी श्रीपादांच्या लीला मोठ्या अगम्य होत्या.

राजमंबा म्हणाली "हे कृष्णा, तुझा आवडता हलवा करून तो चांदीच्या पात्रात घालून आणला आहे. तू जवळ ये तुला खाऊ घालते." श्रीपादांच्या तीन आजींनी मिळून त्यांना तो मधूर हलवा खाऊ घातला. परंतु त्या पात्रातील हलवा संपतच नव्हता. श्रीपादांनी ही लीला बऱ्याच वेळ पर्यंत चालू ठेवली . ते आजीला म्हणाले "तुम्हा तिघींना माझ्या विषयी अत्यंत प्रेमभाव आहे. तिघींनी मिळून मला एकटयालाच

हलवा खाऊ घातला तेंव्हा मला त्रास होणार नाही का ?" यानंतर श्रीपादांनी आपल्या भावाला, बहिणीला, मेहुण्यांना तो हलवा आपल्या हातानी खाऊ घातला. तेथे आलेल्या भाविका मध्ये वेंक्कय्या नावाचा एक शेतकरी होता. त्याला श्री प्रभूंनी दीक्षा दिली आणि आपल्या हाताने हलवा दिला. राहिलेला हलवा गाडीवानांना व घोडयांना देण्यास सांगितले. ते चांदीचे भांडे वेंकय्यास भेट स्वरूपात दिले. अप्पळराज शर्मा म्हणाले "बाळा, तू दत्त प्रभू असल्याचे न कळल्यामुळे आमच्या हातून न कळत झालेल्या अपराधांची क्षमा कर." तेंव्हा श्रीपाद प्रभू म्हणाले "तात, आपण माझे पिता आहात. पित्यास पुत्राने क्षमा करायची असते काय ? तुम्ही मला पूर्वी प्रमाणे आपला मुलगाच

समजून वात्सल्य अमृताचा सतत वर्षाव करावा. तसेच माझ्या अभ्युदयाची आकांक्षा करा." यावेळी श्री वेंकावधानी आणि त्यांच्या धर्मपत्नीच्या डोळयातून अश्रुधारा वाहात होत्या. यावर श्रीपाद प्रभू म्हणाले "मामा, आपले बंधन शाश्वत स्वरूपाचे आहे. मी केवळ तुमचाच जांवई आहे असे नाहीतर तुमच्या वंशातील जन्म घेतलेल्या प्रत्येक व्यक्तीचा मी जांवईच आहे. मी माझ्या दिव्य लीलांनी तुम्हास सुखवीत जाईन. कल्की अवताराच्या वेळी पद्मावती देवीचा वधु स्वरूपात स्वीकार करून तुमची मनोकामना पूर्ण करीन. सुमती महाराणीचे दु:ख दूर करीन. तिचा लाडका पुत्र, सर्वपुत्रांप्रमाणे, नवरदेवाच्या स्वरूपात नटलेला न पहाता एका यतीच्या रूपात, वैराग्य धारण

केलेला पाहून ती दु:खी झालेली आहे." श्रीपाद प्रभू आईकडे पाहून म्हणाले आई ! तू आणि अनसूया माता मला वेगळया वाटतच नाहीत. तुम्हा दोघींच्या मनोकामना मी कल्की अवतारात नक्की पूर्ण करीन. श्रीपाद प्रभू पुढे म्हणाले "आई, तुझ्या गर्भातून जन्म घेतल्याने मी केवढा महान झालो. तुझ्या वात्सल्यामृतानेच माझे भरण-पोषण झाले. माझी बहिण वासवीने केवढे महान कार्य केले ते पाहिलेस ना ? मला भूक लागली असताना माझे लहान बाळात रूपांतर करून अनसूया मातेजवळ दुग्धपान करण्यास पाठवले."

वेंकय्या त्यावेळी म्हणाले "हे महागुरो ! आपल्या चरणी एक नम्र प्रार्थना आहे, आपण

ज्या असंख्य लीला या दरबारात केल्या. तो दरबार आणि याला लागून असलेला परिसर विश्व विख्यात व्हावा." श्रीपाद म्हणाले "भविष्य काळात माझा दरबार पक्कया इमारतीत परिवर्तित होईल. यात गोधन सुध्दा असेल. त्यात माझ्या कितीतरी लीला प्रदर्शित होतील. हा माझ्या डोळयांनी पाहिलेला भविष्य काळातील अनुभव आहे." तेथे जमलेल्या सर्व भाविकांना गाढ निद्रा लागली आणि कांही क्षणातच मी, तो संन्यासी, श्रीपाद प्रभू आणि त्यांचा संपूर्ण दरबार सारेच अदृष्य झाले. त्याचे काय झाले असेल याची मला हुर हुर लागली. हे सारे राक्षसी मायेने झाले असेल अशी मला शंका आली. यावर श्रीपाद प्रभू म्हणाले, "माझ्या सान्निध्यात कोणतीही राक्षसी माया कार्य करू

शकत नाही. मी त्या सर्वांना सुरक्षित रीतीने पीठिकापुरमला नेऊन पोहोचविले. ही एक महान अनुभूती होती. मला जे ज्या भावाने भजतात त्याच भावाने मी त्यांचे रक्षण करतो. हे माझे व्रत आहे."

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

# अध्याय -48

## श्रीपादांचे स्त्री, पुरुषाना संबोधन

श्रीपाद प्रभू प्रत्येक गुरुवारी पंचदेव पहाड येथे सत्संग करीत असत. श्रीपाद प्रभू कृष्णा नदीच्या पाण्यावरून चालत जात. त्यांची पाऊले ज्या ज्या ठिकाणी पडत त्या त्या ठिकाणी एक एक पद्म विकसित होत असे. त्या पद्मावर श्रीपादांच्या पाऊलांचे चिन्ह उमटत असे. ते कसे घडायचे हे मानवाच्या सीमित बुध्दिला

न उलगडणारे एक कोडेच होते. एवढेच नव्हे तर पाण्यावरून चालत जाणे हा सुध्दा एक अद्भूत विषय होता. थोडे दिवस हे सर्व पहाणाऱ्यांना आश्चर्य वाटत असे परंतु काही काळानंतर लोकांना श्रीपादाची ती साधारण लीला वाटू लागली. श्रीपाद प्रभू कृष्णा नदीतून आल्यावर सर्व भक्त त्यांचे भव्य स्वागत करीत असत. सायंकाळ पर्यंत सत्संग चालू असे, नंतर ते कृष्णा नदीच्या पाण्यावरून चालत ती पार करून पैलतीरी जात त्यावेळी भक्त मोठ्या श्रध्दाभावाने त्यांचा जयजयकार करीत. रात्रीच्या वेळी ते एकटेच कुरुगड्डी येथे राहात. पंचदेव पहाड आणि कुरुगड्डी यांच्या मध्ये कृष्णा नदीचे पात्र आहे. प्रत्येक शुक्रवारी ते विवाहेच्छुक कन्यांना सौभाग्यवती होण्याचा

आशिर्वाद देत. महिलांना हळकुंड देत. श्रीपाद प्रभू स्वत:पेक्षा मोठ्या असलेल्या महिलांना "अम्मा सुमती" अथवा "अम्मा अनसूया तल्ली" असे संबोधित त्यांच्या पेक्षा लहान असलेल्या स्त्रियांना "अम्मा वासवी" किंवा "अम्मा राधा," "अम्मा सुरेखा" अशा नावाने बोलवित. त्यांच्या पेक्षा वयाने मोठे असलेल्या पुरुषांना ते "अय्या" किंवा "नायना" असे संबोधीत. त्यांच्या पेक्षा लहान असलेल्या मुलांना "अरे अब्बी" किंवा "बंगारू" या नावाने बोलावित. त्यांच्या आजोबांच्या वयाचे असलेल्या वृध्दांना "ताता" असे बोलावित. वृद्ध स्त्रियांना "अम्ममा" असे संबोधीत.

## श्रीपादांचे नित्य कार्यक्रम आणि दरबार (सत्संग)

गुरुवार आणि शुक्रवारी होणारा सत्संग, श्रीपादांच्या इच्छेनुसार कधी कुरुगड्डीस होइ तर कधी पंचदेव पहाडावर. रविवारी होणाऱ्या सत्संगात श्रीपाद प्रभू अत्यंत गहन अशा योगविद्येबद्दल चर्चा करीत. त्यानंतर दर्शनाला येणाऱ्या भक्तांना क्षेम कुशल विचारून त्यांच्या अडचणी, प्रश्न मोठ्या प्रेमभावाने सोडवित आणि अभयवचन देत.

सोमवारच्या सत्संगात पुराणातील कथा सांगत. त्यानंतर भक्तांच्या समस्येचे निराकरण करीत. मंगळवारचा सत्संग उपनिषदाचा बोध करण्यासाठी

असे. यानंतर भक्तांच्या वैयक्तिक समस्यांची चर्चा होऊन त्यावर उपाय योजना सांगत. बुधवारी वेद आणि वेदांचा अर्थ विवरण करून सांगण्यात येत असे. गुरुवारी गुरुतत्त्वाबद्दल विवेचन असे.

यानंतर भक्तांच्या आधि-व्याधि श्रीप्रभू मोठ्या शांतपणे ऐकून घेऊन त्याचे निराकरण करण्याचा उपाय सांगत. या दिवशी विशेष स्वयंपाक करून सर्वांना पोटभर सुग्रास भोजन असे. या जेवणाचे वैशिष्टय असे की श्रीपाद प्रभू पंगतीत स्वत: कांही पदार्थ वाढीत असत. कांही भाग्यवंतांना त्यांच्या हाताने घास देत. त्यांच्या कडे अन्नधान्याचा किंवा धनाचा कधीच अभाव नसे. शुक्रवारच्या सत्संगात ते

श्रीविद्येबद्दल बोध करीत. आणि सर्वांना विधिपूर्वक हळकुंडाचा प्रसाद देत. शनिवारी शिवाराधना महात्म्याबद्दल बोध करीत. श्रीपाद प्रभूंचा सत्संग ज्यांना लाभला ते खरोखर धन्य होत.

श्रीप्रभूंचे भक्त भाजीपाला, ज्वारी, रागी वगैरे आपल्या शेतात पिकलेले धान्य आणीत. दररोज भक्तांना अन्नदान असे परंतु गुरुवारी विशेष स्वयंपाक केला जाई, त्या दिवशी सर्व पदार्थां बरोबर एक पक्वान्न केले जाई, ते सर्व भक्तांना प्रसाद रूपाने वाटले जात असे. श्रीपादांचे हृदय लोण्यासारखे अत्यंत मृदु होते. त्यांना भक्तांची दु:खे पाहवली जात नसत. त्यांच्या सत्संगात आलेला दु:खी श्रोता जातांना

अत्यंत आनंदाने घरी जात असे. श्री दत्तात्रेयाच्या दत्तपुराणाचे पारायण करणाऱ्या भक्तांना श्रीपादांचा तत्काळ अनुग्रह होत असे. अशी ही श्रीप्रभूंची माया कोटी मातेच्या प्रेमा पेक्षा अधिक असे.

रात्रीच्या वेळी कुरुगड्डीस राहण्याची कोणासही परवानगी नसे. परंतु माझ्या बरोबर आलेल्या वृद्ध संन्याशास श्रीपाद प्रभूनी राहण्याची सम्मति दिली. मला सुध्दा रात्री कुरुगड्डीस रहा असे श्रीपाद प्रभूंनी सांगितले. दुसऱ्या दिवशी श्रीपाद प्रभूंनी त्या संन्याशास काशीस जाण्याचा आदेश दिला व अंतकाळापर्यंत तेथेच राहाण्यास सांगितले. स्वयंपाकाची भांडी घासणे, स्वयंपाक करणे, येणाऱ्या भक्तांची सर्व प्रकारे व्यवस्था

ठेवणे ही माझी कामे होती. दरबारात कोणत्याही वेळी भक्त आल्यास त्याला जेवण मिळत असे. जे भक्त घरी जेवण करून आलेले असत त्यांना सुध्दा प्रसाद म्हणून भोजन घ्यावेच लागे. ज्या वेळी शिजविलेले अन्न कमी असून जास्त लोक जेवणास आले असतील त्यावेळी श्रीपाद प्रभू आपल्या कमंडलूतील जल भोजन पदार्थावर सिंचन करीत.

असून जास्त लोक जेवणास आले असतील त्यावेळी श्रीपाद प्रभू आपल्या कमंडलूतील जल भोजन पदार्थावर सिंचन करीत. त्यावेळी ते पदार्थ आलेल्या सर्व भक्तांच्या भोजनानंतर ही शिल्लक राहात. या प्रमाणे श्रीपादांनी अनेक

 

लीला केल्या. रात्रीच्या वेळी अनेक देवता कुरुगड्डीस विमानाने येत आणि श्रीपाद प्रभूंची सेवा करीत. सकाळ होताच ते महाप्रभूंचा आशिर्वाद घेऊन स्वस्थानी जात. कांही वेळा हिमालयातून कांही योगी येत ते सुध्दा कृष्णेच्या पाण्यावरून चालत येत. त्यांचे देह अत्यंत कांतिमान आणि दैदिप्यमान असत. या योग्यांना श्रीपाद प्रभु स्वत: जेवण वाढीत.

श्रीपादांचे जेवण म्हणजे मूठभरच असे, ते वऱ्याचे तांदुळ असोत किंवा ज्वारीचा भात असो किंवा रागी संकटी असो. त्यांच्या भक्तांचे पोट भरले की त्यांना स्वत:चे पोट भरल्याची संतृप्ति प्राप्त होत असे.

 

रविदास नावाचा एक रजक होता. त्याला श्रीपादांचे वस्त्र धुण्याचे महाभाग्य प्राप्त झाले होते. परंतु श्रीपादांच्या दर्शनानंतर सुध्दा वाईट प्रवृत्ति त्याला त्रास देत होत्या. त्यांच्या निवारणासाठी श्रीपादांच्या चरणांचाच आश्रय घेतला. श्रीपाद प्रभू सांगत असत की "पितरांचे विधियुक्त श्राध्द केल्यास त्यांना शांती लाभून मुक्ति मिळते. अष्टदशा वर्णातील सर्वांना त्यांच्या धर्म कर्मा प्रमाणे फळ भोगावे लागते. त्यात पक्षपाती दृष्टी नसते. आज मिळालेली सुसंधी नेहमी मिळेलच असे नाही. माझ्या पुढच्या अवतारात मला थोडे कठीण प्रवर्तन करावे लागेल."

 

कित्येक जन्माच्या पुण्य फळानेच श्रीपादाचे दर्शन लाभते. अशा आलेल्या संधीचा पुरेपुर फायदा करून घ्यावयास हवा. या संधीचा उपयोग न केल्यास कित्येक जन्मापर्यंत सद्‌गुरुंचे दर्शन होणे कठीण आहे. या विशाल प्रपंचात ज्या युगामध्ये एक लाख पंचविस हजार महासिध्द पुरुषात त्यांचा अंश मात्राने राहणाऱ्या भक्ताला त्यांचा आश्रय मिळून अनुग्रह प्राप्त होतो व त्याच्या द्‌वारेच या सृष्टीला सृष्टीला या भक्तांचाच आधार असतो. श्रीपादांच्या केवळ संकल्पाने सृष्टीची निर्मिति, स्थिति आणि लय होत असते.

भक्तगण जेंव्हा गुरुंना श्रध्दाभावाने नमस्कार करतात तेंव्हा गुरु तो नमस्कार आपल्या

स्वत:च्या गुरुंना पोहोचवितात. या प्रमाणे आपण आपल्या गुरुंना केलेला नमस्कार अनेक गुरुंना पोहोचतो. देवांना जरी आपणावर राग आला असला तरी गुरु त्या क्रोधापासून आपले रक्षण करतात. प्रत्येक शिष्याला गुरुंचा आशिर्वाद लाभतो. गुरुंच्या आराधनेने इहलोक आणि परलोक दोन्हीची प्राप्ति होते. श्रीपाद प्रभूंचे सारे शिष्य सात्विक भावाचे होते.

## **हृदयात भगवंताचे नामस्मरण करीत कर्मांचे आचरण**

कुरुगड्डीचा विशेष महिमा नित्यक्षेत्रा सारखा आहे. येथे असलेले दैवत जागृत स्वरूपात आहे. या

क्षेत्रात अनेक देवता, महर्षी, महापुरुष वेश बदलून येऊन गुप्त रूपाने राहतात. येथे त्यांचे स्थान ठरलेले असते. हृदयामध्ये देवाचे नांव भरून, सदाचरणाने राहून विहित कर्म करीत रहावे असे श्रीपाद प्रभू आपल्या भक्तांना सांगत. प्रत्येकाच्या धर्माप्रमाणे वर्तन करून त्या योगे पूर्वीच्या पापाचा क्षय करून त्यानंतर पुण्य कर्म करून त्याचा कर्ताभाव स्वत:कडे न घेतल्यास त्या कर्माचे शुभफल प्राप्त होते. श्रीपाद प्रभूंच्या या दिव्य वचनाचे पालन केल्यास आपली जीवन नौका या भवसागरातून सुलभतेने पैलतीरी जाईल.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -49

## श्रीपाद प्रभूंचे कर्मविनाशा संबंधीचे विधान

## तेहतीस (33) संख्या विशेष - कुरुगड्डीतील श्रीपादाचे कार्यक्रम

श्रीपाद प्रभू एकदा म्हणाले "शंकरभट्टा ! आपण ज्याचे अनुष्ठान करतो ती अग्नि विद्या आहे. अग्नि उपासना करणे श्रोत्रिय लक्षण आहे. तुझी अग्नि उपासना म्हणजे विझलेल्या शेगडीवर

स्वयंपाक करण्यासारखी आहे." यावर मी श्री प्रभूंचा जयजयकार करून म्हणालो, "महाराज माझ्या जीवनानंतर सुध्दा ही शेगडी अशीच राहणार आहे." यावर श्रीपाद प्रभू म्हणाले "तुझ्या विझलेल्या शेगडीत स्वत:ची शक्ति नाही. माझ्या योगशक्तिने त्या शेगडीवर केलेला स्वयंपाक प्रसादरूप होऊन भक्तांची दैन्य, दु:ख हरण करीत आहे. ही शेगडी अजून नऊ वर्षे पर्यंत पेटणार आहे. म्हणून मी तेहतीस (33) वर्षे गुप्त स्वरूपात राहिलो. त्यानंतर तीन वर्षे पर्यंत तेज स्वरूपात राहून श्रध्दाळू भत्तचनांच दर्शन देत होतो. तेंव्हा मी तेहतीस वर्षाचा होतो. योग्यांच्या जीवनात तेहतीसाव्या वर्षी अनेक बदल घडून येतात. रुद्रगणांची संख्या तेहतीस कोटी आहे." श्रीपाद प्रभु पुढे

म्हणाले, "आपला अग्नियज्ञ यानंतर सुध्दा चालूच राहील. कर्माला स्थूल रूप देऊन दग्ध करण्याचे प्रतिक म्हणून अग्नि आराधना करायची असते. यामुळे भक्तांचे कर्म स्थूल रूप घेण्यापूर्वी सूक्ष्म रूपात असते, त्या पूर्वी कारणरूप देह हा कारण शरीरात असतो. यामुळे तेहतीस वर्षे उलटल्यावर अशा प्रकारची अग्निपूजा करण्याची गरज नसते. त्यावेळी माझा आश्रय घेणाऱ्याची पापकर्मे सूक्ष्म शरीरात राहून आणि कारण शरीरात राहून योग अग्नीने दग्ध होऊन जातात.

माझे भक्त येऊन त्यांचा ते स्वयंपाक करून आपली क्षुधा तृप्त करतील असे तीन वर्षे पर्यंत चालेल. त्यानंतर या स्थूल रूपात

अग्नीपूजा करण्याची आवश्यकता नाही. पृथ्वी यज्ञाचा मी प्रारंभ केला आहे तो यशस्वी रीतीने चालू आहे. तसेच जलयज्ञ सुध्दा मी सुरु केला आहे. तो सुध्दा मोठ्या थाटात साजरा होत आहे. आता अग्निपूजा आणि अग्नि यज्ञाची सुरवात करायची आहे. तो यज्ञ सुध्दा अप्रतिम होईल यात शंकाच नाही. समस्त जीव राशीतील अग्निस्वरूप माझेच आहे. सर्वांचे शुध्दिकरण मीच करतो सर्वांचा नाश करणारा सुध्दा मीच आहे. पंचतत्वा संबंधित यज्ञाबद्दल माझ्या इतकी माहिती कोणालाच नाही.

एके दिवशी एक नवदांपत्य श्रीपाद प्रभूंच्या दर्शनास आले होते. त्यांना पंचदेव पहाडावरील दरबारात राहण्याची प्रभूंनी आज्ञा केली. त्या

 

आदेशानुसार ती दोघे पती, पत्नी पंचदेव पहाडावरील दरबारात गेली. परंतु दोन दिवसातच तो युवक गतप्राण झाला. या अकस्मात मृत्युने ती नववधु अत्यंत घाबरून गेली. ती म्हणाली "प्रभु आपल्या भक्तांचे रक्षण करतात आणि त्यांची कृपा दृष्टी सर्वावर असते असे ऐकले होते. परंतु आज तर हे अघटितच घडले" ती दु:खाने रडू लागली. त्यांचे नातेवाईक ही बातमी कळताच पंचदेव पहाडावर आले. त्या शवाचे दहन करावे का करू नये असा प्रश्न सर्वांना पडला. श्रीपाद प्रभूंच्या आज्ञेशिवाय तो मृतदेह दरबाराच्या बाहेर नेता येणार नाही असे दरबारातील सेवाधारी म्हणू लागले. तेवढयात श्रीपाद प्रभू दरबारात आले. शोक सागरात बुडालेल्या त्या नववधूने श्रीपाद प्रभूंना आपल्या

 

दुर्भाग्याची कर्म कहाणी सांगितली. श्रीपाद प्रभू म्हणाले "कर्माचे फल भोगणे अनिवार्य असते" यावर ती नववधू मोठ्या श्रध्दायुक्त भावाने म्हणाली "प्रभो ! या विश्वात आपणास अशक्य असे काहींच नाही. माझे मांगल्य देऊन मला या भयंकर दु:खातून सोडवा" त्या नववधूला श्रीपाद प्रभूच्या कारुण्यपूर्ण स्वभावावर दृढ विश्वास होता.

## मृतजीवास जीवनदान

श्रीपाद प्रभु म्हणाले "तुझा दृढ विश्वासच फलदायक ठरेल . माझ्यावर असलेल्या तुझ्या श्रध्दा भावाने तुझा पती नक्कीच जीवित होईल.

कर्म सिध्दांताचा व्यतिरेक न होता तुला एक उपाय सांगतो. तू तुझ्या पतीच्या वजना इतकी लाकडे तुझे मंगळसूत्र विकून आणुन त्या लाकडांवर स्वयंपाक कर. चुलीमध्ये ती लाकडे जशी जळतील तसे तुझे अमंगल जळून जाईल." श्रीपादांच्या सांगण्या प्रमाणे सर्व लाकडे जळून जाताच तो तरूण झोपीतून उठल्या प्रमाणे उठून उभा राहीला. आजूबाजूस सर्व नातेवाईक पाहून त्या नववधूच्या आनंदाला पारावर राहिला नाही. सर्व भक्तगणांनी आनंदाने श्रीपाद प्रभूंचा जयजयकार केला.

## दरिद्री ब्राह्मणावर श्रीपाद प्रभूंची विशेष कृपा

एकदा एक अत्यंत गरीब ब्राह्मण श्रीपाद प्रभूंच्या दर्शनासाठी आला. तो परिस्थितीने एवढा गांजला होता की, श्रीपाद प्रभूंची कृपादृष्टी न झाल्यास आत्महत्या करण्याचा त्याने निश्चय केला होता. श्रीपाद प्रभूंनी त्याचा भाव जाणला. त्यांनी शेगडीतील एक जळते लाकूड आणून त्याचा त्या ब्राह्मणाच्या पाठीस स्पर्श केला. त्या जळत्या कोलीताने ब्राह्मणाची पाठ भाजली व त्या वेदना बऱ्याच वेळ होत्या. श्रीपाद प्रभू म्हणाले "अरे ब्राह्मणा ! तू आत्महत्या करण्यास सिध्द झाला होतास. मी तुझी उपेक्षा केली असती तर तू खरोखरी आत्महत्या केली असतीस. त्या आत्महत्येच्या सबंधित सर्व पाप

कर्माची स्पंदने या जळत्या लाकडाच्या स्पर्शाने नष्ट झाली. आता तुला दारिद्र्यापासून मुक्तता मिळेल." असे म्हणून श्रीपाद प्रभूंनी थंड झालेले ते लाकूड त्या ब्राह्मणास देऊन पंचात बांधून काळजीपूर्वक घरी घेऊन जाण्यास सांगितले. प्रभूंच्या आदेशानुसार त्या ब्राह्मणाने ते लाकूड पंचात बांधून घरी नेली. घरात जाऊन त्या पंचाची गाठ सोडून पाहीले तो काय आश्चर्य ते लाकूड सोन्याचे झाले होते. अशा प्रकारे त्या गरीब ब्राह्मणावर श्रीपाद प्रभूंची विशेष कृपा झाली हाती.

श्रीपाद प्रभूंनी अनेक भक्तांच्या पापाचे अग्नि यज्ञाने दहन केले होते. कांही वेळा ते भक्तांना वांगी, भेंडी भोपळा अशा फळभाज्या

आणण्यास सांगत. त्या भाज्यांच्या रूपाने भक्तांच्या पापकर्माची स्पंदने आकर्षून घेत. अशा प्रकारच्या भाज्या स्वयंपाकात वापरून भक्तांना खाण्यास देत. यामुळे ते कर्म बंधनातून मुक्त होत. एकदा एक उपवर कन्या श्रीपादांच्या दर्शनासाठी आली. तिचा विवाह कोठे जमत नव्हता. तिला कुज दोष (मंगळ दोष) असल्याने प्रभूंनी तिला कंद आणावयास सांगितला. त्या कंदाची भाजी त्या मुलीसह तिच्या कुटुंबियांनी खावी असे प्रभूंनी सांगितले. त्याप्रमाणे केल्यानंतर कर्मबंधनातून मुक्तता होऊन तिचा एका योग्य वराबरोबर विवाह झाला. श्रीपाद प्रभू कांही लोकांना गायीचे तूप आणून स्वयंपाकासाठी देण्यास सांगत. तर काहींना गायीच्या तुपाचा दीप देवासमोर

लावण्याचा आदेश देत. घरात अत्यंत बिकट परिस्थिती असल्यास किंवा कन्येच्या विवाहा संबंधीच्या अडचणी असल्यास त्याना श्रीपाद प्रभु दर शुक्रवारी राहुकालाच्या वेळी (सकाळी 10-30 ते 12-00) अंबिकेची पूजा करण्यास सांगत. श्रीपाद प्रभूंचा एक भक्त एकदा खूप आजारी झाला. त्याच्या कुटुंबियांना प्रभूंनी त्याच्या खोलीत एरंडयाच्या तेलाचा दिवा लाऊन तो सतत तेवत ठेवण्यास सांगितले. तो दिवा कोणत्याही परिस्थितीत विझावयास नको असे त्यांना बजावून सांगितले. असे केल्यावर तो भक्त लवकरच रोगमुक्त झाला. एका भक्ताची आर्थिक परिस्थिती अत्यंत बिकट होती. त्याला श्रीपाद प्रभूंनी गायीच्या तुपातील दिवा आठ दिवस अखंडपणे तेवत ठेवण्यास सांगितले. असे

केल्यानंतर त्यांच्या घरात लक्ष्मीचा वरदहस्त प्राप्त झाला. अशा किती तरी नवीन नवीन पध्दतीद्वारा श्रीपाद प्रभूंनी आपल्या भक्तांची पापकर्मा पासून मुक्तता केली. या सर्व पध्दती समजून घेणे सामान्य मानवाला असाध्य आहे.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

# अध्याय -50

## **गुरुनिंदा केल्याने दारिद्रय प्राप्ति**

एक वृद्ध ब्राह्मण पोटदुखीच्या त्रासाने कुरुगड्डीस श्रीपाद प्रभूंच्या दर्शनास आला. त्याच्या वेदना एवढया असह्य होत्या की त्याला त्या वेदना सहन करण्यापेक्षा आत्महत्या केलेली बरे असे वाटू लागले.

# नामस्मरण महिमा

त्या ब्राह्मणाने श्रीपादांचे दर्शन घेऊन आपली व्यथा दूर करण्याची अत्यंत कारूण्य पूर्ण वाणीने प्रार्थना केली. तेंव्हा श्रीपाद प्रभू म्हणाले "अरे विप्रा, तू पूर्वजन्मी अनेक लोकांना आपल्या कठीण वाणीने दुखविलेस. अनेकांना आपल्या हृदयभेदी कठोर शब्दांनी घायाळ केलेस. त्या कर्माचे फलस्वरूप तुला या जन्मी ही पोटदुखीची व्याधि जडली आहे मानवास या कलियुगात वाकदोषा पासून मुक्त होण्याचा "नामस्मरण" हा एकच मार्ग आहे. भगवंताच्या नामस्मरणांने वायुमंडळ शुध्द होते. मी कुरुगड्डी येथे नामस्मरण महायज्ञाची सुरवात करणार आहे. त्या नामाबरोबर "श्रीकार" ही जोडणार

आहे. यामुळे चिरस्थायीपणे परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी अशा चारी वाणी नियंत्रित होतील. जे भक्त "दिगंबरा, दिगंबरा, श्रीपाद वल्लभ दिगंबरा" आणि "श्रीदत्ता दिगंबरा" असे मन:स्फुर्तीने नामस्मरण करतील त्यांना मी अत्यंत सुलभ पणे प्राप्त होऊन त्यांच्या मनोकामना पूर्ण करीन." त्या व्याधिग्रस्त ब्राह्मणाला श्रीपाद प्रभूंनी तीन दिवस तीन रात्री कुरुगड्डी येथे राहून "दिगंबरा, दिगंबरा, श्रीपाद वल्लभ दिगंबरा" असा जप करण्यास सांगितला. या आदेशा प्रमाणे तो वृद्ध ब्राह्मण तीन दिवस व तीन रात्री कुरुगड्डीस राहिला व अत्यंत श्रध्दाभावाने त्याने जप केला. त्या ब्राह्मणाची पोटदुखी कमी झाली.

श्रीपाद म्हणाले, "वायुमंडलास आज पूर्वीसाखेच वाग्जल भरून आहे. आपण उच्चारलले प्रत्येक वाक्य प्रकृतीतील सत्व, रज, तम या तिन्ही गुणांनी किंवा एक अथवा दोन गुणांनी परिपूर्ण असते. या त्रिगुणात्मक सृष्टीचा पंचमहाभूतांवर वाईट प्रभाव पडतो. ही पंचभूते दुषित झाली की संपूर्ण अंतराळ दुषित होते. यामुळे मानवाकडून पापकर्म घडून तो दरिद्री होतो. या दारिद्रयामुळे त्याच्याकडून पुन्हा पापकर्म घडते. या पापामुळे मन दूषित होऊन दान, धर्म लोकसेवा अशी सत्कर्मे त्याच्या कडून न घडल्यामुळे पुन्हा दारिद्रय येते. हे दुष्ट चक्र असे चालूच राहते.

# त्रिकरण शुध्दीची आवश्यकता

मानवास दारिद्र्यापासून मुक्तता अथवा पापकर्मापासून विमुक्ति हवी असल्यास त्याचे काया, वाचा, मन शुध्द असावयास हवे. यालाच त्रिकरण शुध्दि असे म्हणतात. आपल्या मनात जे असेल तेच वाणीतून बाहेर पडावे. मनात दुष्ट भाव आणि वाणीने अगदी मधुर बोलणे असा दुटप्पीपणा नसावा. आपल्या वाणी प्रमाणेच आचरण सुध्दा अगदी पवित्र असावे. त्रिकरण शुध्दि पावलेला मानव महान पदाला जाऊन पोहोचतो. मनात एक असणे, वाणीतून दुसरेच उच्चारण करणे आणि या दोहो पेक्षा वेगळेच आचरण करणे अशा व्यक्तीस दुरात्मा असे म्हणतात. या कलियुगात जीवन सागर तरून

जाण्यास ईश्वराने अनेक मार्ग सांगितले आहेत. यात "नामस्मरण" हे अत्यंत सुलभप्राय साधन आहे. नामस्मरण करणाऱ्या साधकाची वाणी मधूर असते. नामस्मरण न करणाऱ्याचे मन सुध्दा अशुध्द असते. नामस्मरणाच्या योगाने पवित्र कर्म करण्याची प्रेरणा मिळते.

## कर्म विमोचन

एक क्षयरोगाने ग्रस्त असलेला गृहस्थ कुरवपुरला आला. त्याला मधुमेहाचा आजार आणि त्या बरोबर दुसऱ्या अनेक व्याधी होत्या. त्याला पाहून श्रीपाद प्रभूंना खूप राग आला. तो पूर्वजन्मात एक कुख्यात चोर होता. त्याने

 

अनेक निरपराध लोकांची संपत्ती हिरावून घेऊन त्यांना निर्धन केले होते. एका उपवर कन्येच्या पित्याने तिच्या विवाहासाठी संपत्ती जमा करून ठेवली होती. ती या दुष्ट चोराने हिराऊन नेली. त्यामुळे त्या कन्येचा विवाह होऊ शकला नाही. वर दक्षिणा देण्यास धन नसल्याने योग्य वर मिळू शकला नाही. शेवटी एक वृद्ध वर वरदक्षिणे शिवाय लग्नास तयार झाला. या विवाह प्रस्तावामुळे त्या तरूण उपवर कन्येने आत्महत्या केली होती. पूर्वजन्मीची अशी कर्मे असलेला तो क्षय रोगी अत्यंत दीन अवस्थेत श्रीपादांच्या जवळ आला आणि त्याने मोठ्या कारूण्यपूर्ण वाणीने श्रीपाद प्रभूंना त्या दुर्धर व्याधीतून सुटका करण्याची विनंती केली. दयावंत श्रीपाद प्रभूंनी त्याला पंचपहाड येथील

गोशाळेत झोपण्यास सांगितले. तेथे डासांचा अत्यंत त्रास होता. तहान लागल्यास पिण्यासाठी पाणी सुध्दा नव्हते. त्या रात्री त्याला एक स्वप्न पडले. त्या स्वप्नात एक राक्षस त्याचा गळा दाबून मारत असल्याचे दिसले. तो घाबरून उठला इकडे तिकडे पाहिले आणि ते स्वप्नच असल्याची खात्री झाल्यावर पुन्हा झोपला. त्याला पुन्हा एक स्वप्न पडले. एक मोठा दगड त्याच्या छातीवर ठेवला असून त्याच्यावर एक बलवान मल्ल बसलेला दिसला. या दोन्ही स्वप्नामुळे त्याच्या कर्म फलाचा परिष्कार होऊन तो आपल्या क्षय रोगापासून व दुसऱ्या व्याधिपासून मुक्त होऊन निरोगी झाला. अनेक वर्षे क्षयरोगाने ग्रस्त अशा

रोग्यास श्रीपाद प्रभूंनी स्वप्नात शिक्षा देऊन कर्मविमुक्त केले.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

# अध्याय -51

## जलोदरा पासून रक्षण-ग्रंथ पारायण महिमा

मी कुरवपुरला असताना अश्विन कृष्ण द्वादशी आली. त्या दिवशी हस्त नक्षत्र होते. कृष्णानदीत स्नान करून श्रीपाद प्रभू थोडा वेळ ध्यानस्थ बसले. ध्यानातून उठल्यावर त्यांनी मला अजून एकदा स्नान करून येण्यास सांगितले. त्यांच्या आज्ञेनुसार मी पुन्हा एकदा कृष्णेत डुबकी मारून आलो. तेंव्हा प्रभू म्हणाले

"अरे शंकरभट्टा ! मी गुप्त रूपात राहण्याची वेळ आली आहे. मी कृष्णा नदीत अंतर्धान पावून या कुरवपुरात गुप्त रूपाने संचार करीन नंतर नृसिंहसरस्वती नावाने संन्यासी रूपाने धर्माच्या उध्दारासाठी अवतार घेईन. तू लिहीत असलेला "श्रीपाद श्रीवल्लभ चरित्रामृत ," महापवित्र ग्रंथ भक्तांना कल्पतरू समान लाभप्रद होईल. तो "अक्षर सत्य" ग्रंथ असेल." "दिगंबरा, दिगंबरा, श्रीपाद श्रीवल्लभ दिगंबरा" या माझ्या नांवाचा जयघोष सर्वत्र होईल. या ग्रंथाचे पारायण केल्याने प्रपंच सुखरूप होईल. इहलोक आणि परलोकात सौख्य प्राप्त होईल. या ग्रंथातील प्रत्येक शब्द हा वेदवाक्यासमान मानला जाईल. तू लिहित असलेला संस्कृत ग्रंथ माझ्या महासंस्थानातील औदुंबर वृक्षाखाली शब्द

स्वरूपात कायमचा राहील. तेथून निघणारे दिव्य शब्द दर्शनास येणाऱ्या भक्तांना ऐकू येतील. हृदयापासून ज्यांना माझ्या दर्शनाची तळमळ लागली असेल त्यांना माझे दर्शन अवश्य होईल. मी माझ्या भक्तांच्या संरक्षणासाठी सदैव सज्ज असतो. तुझ्या संस्कृत ग्रंथाचा तेलुगु भाषेत अनुवाद केला जाईल तो बापनाचार्युलुच्या तेहतीसाव्या पिढीतील वंशजाकडून उदयास येईल. या ग्रंथाचे अनेक भाषांमध्ये अनुवाद होतील. या पवित्र ग्रंथाचे कोणत्याही भाषेत पारायण केले असता दिव्य अनुभव येतील आणि पारायण करणाऱ्या भक्तांचे सर्व काही शुभ मंगल होऊन त्याचे सकल व्याधिपासून रक्षण होईल.

# भक्तांना श्रीपाद प्रभूंचे अभय वचन

श्रीपाद प्रभू शंकर भट्टास पुढे म्हणाले "तू माझी खूप सेवा केलीस. तू मला पित्याप्रमाणे सन्मान देऊन मनोभावाने माझ्या सेवेचे व्रत मोठ्या काटेकोरपणे पाळलेस. मी माझ्या लाकडी पादुका तुला भेट म्हणून देत आहे. मी नाही म्हणून तू दु:खी होऊ नकोस. तू तीन वर्षे येथेच रहा. या तीन वर्षात मी तुला तेजोवलय रूपाने दर्शन देत राहीन. तसेच अनेक योग रहस्याबद्दलचे ज्ञान देईन."

# श्रीपाद प्रभूंचे अंतर्धान

"हे शंकरभट्टा ! तीन वर्षानंतर येणाऱ्या अश्विन कृष्ण द्वादशीस तू रचलेला श्रीपाद श्रीवल्लभ चरित्रामृत " ग्रंथ माझ्या पादुकाजवळ ठेव . त्या दिवशी दर्शनास येणारे सारे भक्त धन्य होतील.

सर्वांना माझे मंगलमय आशिर्वाद. श्रीपाद श्रीवल्लभ प्रभू अशा प्रकारे निरोप घेऊन कृष्णा नदीत अंतर्धान पावले. त्यांच्या त्या लाकडी पादुका मी हृदयाशी घट्ट धरून, आई पासून दुरावलेल्या निरागस बालका सारखा स्फुंदुन स्फुंदुन रडू लागलो. श्रीपाद प्रभू पाण्यात दिसतात काय ते पाहण्यासाठी मी पुन्हा एकदा

नदीत स्नान केले आणि बाहेर येऊन ध्यानस्थ बसलो. तेंव्हा माझ्या मनोनेत्रांना श्रीपाद प्रभूंनी तेजोमय रूपात दर्शन दिले.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

 

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

# अध्याय -52

## शंकरभट्टाचे योगानुभव निरूपण

## श्रीपाद प्रभूंचे दिव्य दर्शन

मी तीन वर्षे सतत दररोज मध्यरात्रीच्या वेळी श्रीपाद प्रभूंचे दिव्य तेजोमय दर्शन घेत असे. मी योगाच्या अनुभूती एका पुस्तकाच्या रूपात लिहिल्या. ते पुस्तक हिमालयातील एक योगी येऊन घेऊन गेले. ही श्रीपाद प्रभूंचीच इच्छा

असणार असे मी मानतो. त्यांच्या आज्ञेनेच हे घडले यात तिळमात्र संशय नाही.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

॥ श्री गुरुवे नम: ॥

॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥

अध्याय -53

# श्रीपाद श्रीवल्लभ चरितामृत ग्रंथाचे पीठिकापुरम पोहोचण्याचे विधान - ग्रंथाचे वैशिष्टय

मी लिहिलेला "श्रीपाद श्रीवल्लभ चरित्रामृत " ग्रंथ थोडे दिवस श्रीपाद प्रभूंच्या मामांच्या घरी होता. त्यानंतर त्या संस्कृत ग्रंथाचा तेलुगु भाषेत अनुवाद करण्यात आला. तेलुगु भाषेत भाषांतर झाल्यावर मूळ संस्कृत ग्रंथ अदृश्य झाला. गंधर्वानी तो श्रीपाद प्रभूंच्या जन्मस्थानी

नेऊन जमिनीत खोलवर पुरून ठेवला . त्याचे सिध्दयोग द्वारा पठन होत आहे. मी रचलेले चरित्रामृत श्रीपाद प्रभूंच्या दिव्य पादुकाजवळ ठेऊन मी त्यांना वाचून दाखविले. ऐकण्यास आलेले पांच भक्त ते श्रवण करून धन्य झाले. मी पंडित नाही त्यामुळे कोणता अध्याय वाचला असता काय फळ मिळेल ते सांगु शकत नाही. श्री बापनाचार्युलुच्या तेहतीसाव्या पिढीच्या कालखंडात या ग्रंथाची तेलुगु भाषेतील प्रत उदयास येईल. ज्या भाग्यवंत व्यक्तींनी हा ग्रंथ उदयास आणला त्यांनी श्रीपाद प्रभूंच्या जन्मस्थळी जाऊन तेथील महासंस्थानाच्या पवित्र परिसरात पारायण करून हा ग्रंथ श्रीपाद प्रभूंच्या चरणी अर्पण करावा. या ग्रंथाचे पारायण चालू असताना पारायण

करणाऱ्या भाग्यवान भक्तास गाणगापूर क्षेत्रातून पाठवलेला प्रसाद मिळेल. तो प्रसाद आणून देणारी व्यक्ति बापनाचार्युलुच्या तेहतीसाव्या पिढितील असेल. हे तेजोमय स्वरूपात दर्शन देणाऱ्या श्रीपाद प्रभूंचे दिव्य वचन आहे.

**॥ श्रीपाद श्रीवल्लभांचा जयजयकार असो ॥**

 

**॥ ॐ ॥**

**॥ दिगंबरा दिगंबरा श्रीपाद श्रीवल्लभ दिगंबरा ॥**

**॥ दिगंबरा दिगंबरा श्रीपाद श्रीवल्लभ दिगंबरा ॥**

**॥ दिगंबरा दिगंबरा श्रीपाद श्रीवल्लभ दिगंबरा ॥**

## "श्रीपाद श्रीवल्लभ चरित्रामृत ग्रंथाच्या प्रत्येक अध्याय-पठणाचे फल

| अध्याय | पठण केल्याने फल | अध्याय | पठण केल्याने फल |
|---|---|---|---|
| 1 | घरात शांती नांदते सुखाची प्राप्ति | 28 | विवाह अनुकूल व शीघ्र होण्यास |
| 2 | मन:क्लेश निवारण | 29 | पितृ देवतांचे आशिर्वाद |

| | | | |
|---|---|---|---|
| 3 | नागदोष निवारण, संतान-प्रतिबंधक-दोष निवारण | 30 | उज्वल भविष्य होण्यास |
| 4 | मुलीना योग्य वर प्राप्ति, गुरुनिन्दा-दोष-निवारण | 31 | विद्या, ऐश्वर्य यांची प्राप्ती |
| 5 | विघ्न दूर होण्यास, देवता कोपापासून मुक्ती | 32 | सद्गुरु कृपाकटाक्ष प्राप्ति साठी |
| 6 | पितृ शापापसून निवृत्ती | 33 | अनुकुल विवाह होण्यास |
| 7 | अज्ञान निवृत्ती, विवेक प्राप्ति | 34 | ऋण मोचानासाठी |

| | | | |
|---|---|---|---|
| 8 | संतानप्राप्ती, लक्ष्मी-कृपा-कटाक्ष लाभ | 35 | वाक्सिध्दी साठी |
| 9 | प्रारब्ध-कर्म-नाश | 36 | अनुकूल दाम्पत्य जीवना साठी |
| 10 | दौर्भाग्य-नाश | 37 | जीवनात स्थैर्य |
| 11 | दुर्गुणापासून मुक्ती | 38 | आत्मस्थैर्य |
| 12 | शरीरारोग्य प्राप्ति | 39 | सर्प दोष-निवारण |
| 13 | यवसाय वृद्धी, पशु-वृद्धी | 40 | असाध्य कार्यात यश मिळण्या साठी |
| 14 | आपदा-निवारण, उत्साह- वृद्धी | 41 | लोकनिन्दा-परिहारार्थ |

| | | | |
|---|---|---|---|
| 15 | अकारण कलह निवारण, पूर्व जन्म कृत दोष निवारण | 42 | हरवलेले मूल सापडण्यास |
| 16 | धनाकर्षण- शक्ती - वृद्धी | 43 | अष्टैश्वर्य प्राप्ति साठी |
| 17 | सिध्द पुरुषांचे आशिर्वाद | 44 | उज्वल भविष्या साठी |
| 18 | पापकर्मांचा नाश, भाग्य वृद्धी | 45 | सर्व क्षेत्रात वृद्धी |
| 19 | मानसिक क्लेश निवारण | 46 | त्वरित विवाह साठी |
| 20 | कष्ट-नष्ट-निवारण | 47 | सर्व शुभफल मिळण्यास |

| | | | |
|---|---|---|---|
| 21 | अध्यात्मिक लाभ, पुण्य वृद्धी | 48 | आर्त, अर्थार्थी, जिज्ञासु, मुमुक्षु यांना चारी पुरुषार्थ सिध्दी साठी |
| 22 | कर्मदोष निवारण | 49 | समस्त कर्म-दोषापासून निवृत्ती |
| 23 | ऐश्वर्य-प्राप्ति | 50 | गुरुनिन्दा केल्यामुळे आलेले दारिद्रय दूर होण्यास |
| 24 | दांपत्य-सुख | 51 | जलगंडादिकापासून रक्षण |
| 25 | आर्थिक समस्या | 52 | सर्व समस्या |

 

| | | | |
|---|---|---|---|
| | **दूरिकरण** | | **अप्रयत्नाने दूर होतील** |
| **26** | **दुर्दैव नाश, सत्संतान-प्राप्ति** | **53** | **महापाप-ध्वंस होण्यास** |
| **27** | **ऐश्वर्य लक्ष्मी प्राप्ति** | | |

**॥ दिगंबरा दिगंबरा श्रीपाद श्रीवल्लभ दिगंबरा ॥**

**॥ दिगंबरा दिगंबरा श्रीपाद श्रीवल्लभ दिगंबरा ॥**

**॥ दिगंबरा दिगंबरा श्रीपाद श्रीवल्लभ दिगंबरा ॥**

**॥ ॐ ॥**

॥ दिगंबरा दिगंबरा श्रीपाद श्रीवल्लभ दिगंबरा ॥

॥ दिगंबरा दिगंबरा श्रीपाद श्रीवल्लभ दिगंबरा ॥

॥ दिगंबरा दिगंबरा श्रीपाद श्रीवल्लभ दिगंबरा ॥

**॥ श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥**

**श्रीपाद श्रीवल्लभ चरित्रामृत या ग्रंथाची पारायण पध्दति**

| | |
|---|---|
| प्रथम दिवस | 01 ते 06 अध्याय |
| दूसरा दिवस | 07 ते 12 अध्याय |
| तिसरा दिवस | 13 ते 18 अध्याय |
| चौथा दिवस | 19 ते 22 अध्याय |
| पाचवा दिवस | 23 ते 34 अध्याय |

| | |
|---|---|
| सहावा दिवस | 35 ते 42 अध्याय |
| सातवा दिवस | 43 ते 53 अध्याय |

॥ दिगंबरा दिगंबरा श्रीपाद श्रीवल्लभ दिगंबरा ॥

॥ दिगंबरा दिगंबरा श्रीपाद श्रीवल्लभ दिगंबरा ॥

॥ दिगंबरा दिगंबरा श्रीपाद श्रीवल्लभ दिगंबरा ॥